४

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परमभागवत

श्री अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा

विरचित

# श्री दत्तप्रबोध

## भाग ४ था

अध्याय २६ ते ३५

# अर्पण-पत्रिका

अनंतकोटी ब्रम्हांडनायक योगीराज

## ( कुंभार गल्लीतील श्री दत्त महाराज )

कोल्हापूर

यांचे पवित्र चरणी

**श्री दत्तप्रबोधरूपी कमलपुष्पातील चतुर्थदल अर्पण.**

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

## — श्रीदत्तात्रेय अष्टक —

वेदांतवेद्यो वरयोगिरूपम् । जगत्प्रकाशं सुरलोकपूज्यम् । इष्टार्थसिद्धिं करुणा करेशं । श्रीपादराजं शरण प्रपद्ये ॥ १ ॥ योगिशरूपं परमात्मवेषं । सदानुरागं सत्कार्यरूपम् । वरप्रसादं विबुधैक सेव्यम् ॥ श्री ॥ २ ॥ काषायवस्त्रं करदण्डधारिणं । कमंडलुं पद्मकरेण शंखं । चक्रगदा भूषित भूषणाढ्यं ॥ श्री ॥ ३ ॥ भूलोकसारं भुवनैकनाथं । नाथादिनाथं नरलोक नाथं । कृष्णावतारं करुणा कटाक्षं ॥ श्री ॥ ४ ॥ लोकाभिरामं गुणभूषणाढ्य । तेजोमुनि श्रेष्ठ मुनिवरेण्यम । समस्त दुःखानि भयानि शांतम् ॥ श्री ॥ ५ ॥ कृष्णावतीरं वसती प्रसिद्धं । श्रीपाद श्री वल्लभ योगिमूर्ति । सर्वजनाथिनित कल्पवृक्षं ॥ श्री ॥ ६ ॥ मंत्राधिराज यतिराज पूज्यं । त्रैलोक्यनाथं जन सेव्यनाथं । आनंद चित्तं अखिलात्मतेजं ॥ श्रीपाद ॥ ७ ॥ मंत्रानुगम्यं महनिर्मितेजं । महत्प्रकाशं महज्ञानमूर्ति । त्रैलोक्य चित्त अखिलात्म तेजं ॥ श्री ॥ ८ ॥ श्रीपाद अष्टकमिदं पुण्यं । प्रातरुत्थाय यः पठेत । कोटि जन्म कृतं पापं स्मरणेन विनश्यति ॥ ९ ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥

॥ अवधूतचिंतन श्रीगुरुदेवदत्त ॥

---

# ॥ श्री दत्त प्रबोध ॥

## ॥ अध्याय २६ वा ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीसद्गुरुदत्तात्रेयाय नमः ॥

ॐ नमोजी चतुराक्षरा । अजअनादि परात्परा । सद्गुरु शांता सर्वेश्वरा । परम उदारा परमात्मया ॥१॥
जयजय विश्वोद्धारा विश्वपती । करुणाघना कृपामूर्ती । तूं सकळ जीवांची विश्रांती । करितां प्रीती पालन ॥२॥
तूं अज्ञानतिमिरनाशक । तूं रोगपीडादोषदाहक । तूं ज्ञानदाता प्रकाशक । सुखदायक सर्वज्ञ तूं ॥३॥
तूं दुरितनाशक भवतारू । तूंचि हर्ता सकळ विकारू । तूं बोधप्रकाश भास्करू । दीनोद्धारू कर्ता तूं ॥४॥
पतितपावन तूं समर्थ । पुरवी आर्थिकांचे अर्थ । स्वरूपें साधविसी परमार्थ । सकळ ज्ञानार्थ बोधवोनी ॥५॥
सद्गुरु अगाध तुझी कीर्ती । वर्णावया कुंठित शेषमती । तेथें पामर मी साधीन गती । हें तों निश्चितीं घडेना ॥६॥
तुझे गुण वर्णितां भले । वेदही जेथें मौनावले । श्रुति शास्त्रहि उगले । होवोनि ठेले थकित ॥७॥
तेथें अल्पमति मी अज्ञान । केवीं करूं सांगा निरोपण । वर्णावया नसे अंगवण । म्हणोनि चरण वंदितों ॥८॥
अनन्य शरण जालों तव पदीं । आतां अंगीकारी कृपानिधी । तोडी समूळ आधिव्याधी । नुरवी उपाधी दुःखीक जे ॥९॥
तोडोनिया विषयबंधन । निर्विकल्प करीं माझें मन । विवेकबोध दे बाणवोन । ज्ञानें सधन मज करी ॥१०॥
सर्व ज्ञानामार्जी श्रेष्ठ । आत्मज्ञान असे वरिष्ट । तें बोधी मज अवीट । करीत निष्ठ मन माझें ॥११॥
हेंचि आर्त सकळांचें । श्रोते भाविक सज्जनांचें । लुब्धलें मन अनसूयेचें । अनंतसुताचें याच परी ॥१२॥
भाव आर्तातें जाणोन । तूं बोळलासि अवधूत कृपाघन । त्याऐसें निरोपण । करवोनि मन बोधिसी ॥१३॥
पंचवीस अध्यायपर्यंत । निरोपण जालें गोड बहुत । तें परिसोनि आनंदभरित । श्रोते संत सुखावले ॥१४॥
तो अध्याय संपतां । प्रश्न अनसूया करी दत्ता । सांग षड्चक्राचे भेद आतां । गुणवंता ऐकों दे ॥१५॥
ऐकोनि मातेचें वचन । अवधूत जाले सुप्रसन्न । म्हणे होइजे सावधान । करवितों श्रवण तुम्हांतें ॥१६॥
या षड्चकाची रचना । ऐकावया जाली तुज भावना । तरी एकाग्र करी मना । श्रवण श्रवणा बोढवी ॥१७॥
येथें निवांत श्रवण करितां । विवेकबळें आकर्षितां । तरिच चढेल हे हातां । पूर्ण अभ्यासितां अभ्यासें ॥१८॥
अनेक सांडोनिया गोष्टी । हें ज्ञान सांठविजे पोटीं । साधने साधविजे हातवटी । ज्ञानदृष्टीं करोनिया ॥१९॥
येथें रिघाव मनवायोचा । क्रम पाहिजे साधनाचा । आश्रय जोडावा गुरुकृपेचा । तरीच साचा लाभ जोडे ॥२०॥
वर्म निवेदिलें म्यां तूतें । आतां सावध होईं श्रवणातें । तुझेनि सुख श्रोतियांतें । मुमुक्षु भाविकांतें अर्थलाभ ॥२१॥
या औट हाता भीतरीं । आणि या चक्रावळी माझारी । आजपा गायत्री सुंदरी । जप निर्धारीं होतसे ॥२२॥
कोण दळी कोण वर्ण । कोण मातृका कोण स्थान । कोण देव ऋषिगण । शक्ति कोण जप किती ॥२३॥
हे प्रमाणयुक्त प्रकार । तुज मी निवेदितों सविस्तर । चुंबकन्याय करी स्वीकार । शुद्ध अंतर करोनिया ॥२४॥
आधारचक्रीं गुदस्थळ । चार पाकोळिया निर्मळ । चंद्र सूर्य आरक्त तेजाळ । दैवत विशाळ गणपति ॥२५॥

आश्चर्य बोलतां बोली । अनसूया देवी आनंदली । म्हणे दत्ता त्वां मात केली । निरोपणीं निववीली वृत्ति माझी ॥८२॥ पुत्र नोव्हेसी तूं ईश्वरू । प्रबोधोनि केला उद्धारू । मज करविला भवपारू । धन्य तारूं तूं होसी ॥८३॥ या ज्ञानामृताचें पान । मज करविलें आवडीकरून । मायामोहो दवडिला निरसोन । भयनिवारण सर्व केलें ॥८५॥ कांहींच उरली नाहीं उरी । आनंद प्रगटविला अंतरीं । मीपण उडविलें द्वैत दुरी । सबाह्य अभ्यंतरीं मींच केलें ॥८४॥ ब्रह्मरूप करोनि दाविली माया । मीपण मिथ्यत्व सांडविली माया । तुझिया निरोपणीं सखया । मी गा दत्तात्रेया निवालें ॥८६॥ श्रवणीं तोषलें माझें मन । वृत्ति जाल्या आनंदघन । आन पदार्थ नावडती यावीण । केलें त्वां सधन मज येथें ॥८७॥ परी एक प्रश्न उद्भवला । तो मी निवेदितें सत्य तुजला । ऐकोनि पाहिजे निरोपिला । आक्षेप केला श्रवणार्थी ॥८८॥ या देही वावरे इच्छा मन । तें क्षणक्षणा पालटे काय म्हणोन । नाना कल्पना करीतसे जाण । याचें कारण न कळे मज ॥८९॥ तयाचा कोण कैसा प्रकार । तो मज कळावा साचार । हें जाणावया इच्छितें अंतर । तरी सविस्तर तो सांग ॥९०॥ मन हें अत्यंत चंचळ । एक ठायीं न स्थिरे निश्चळ । ऐसें कां करितें चळवळ । हें तूं निवळ निरोपी ॥९१॥ अवधूत म्हणे वो जननी । बरवा प्रश्न काढिला निवडोनी । तरी सावध होईजे श्रवणीं । तुज हें निरोपणी निरोपितों ॥९२॥ मन मीन आणी मारुत । तेवींच मक्षिका चंचल बहुत । स्वच्छंदें करोनि हे रमत । स्थिर न राहात कांहीं केल्या ॥९३॥ सर्वांहोनि हें मन जाण । कधीं स्थिर नोव्हे एक क्षण । याचें सांगतों मी तुजकारण । चित्त देऊन परियेसी ॥९४॥ जीव आणि हें मन । येथें नाही द्वैतपण । एकची ओळखिजे पूर्ण । याचें लक्षण ऐकिजे ॥९५॥ जीवहंस खेळतां खेळा । जावोनि विंदुस्थानीं आदळला । वाम सत्य भ्रमत सलीळा । अष्टदळा पावतसे ॥९६॥ त्या कमळाचा प्रकार । अष्टदळें असती सुंदर । तेयींचे अनेक विचार । सांगतो निर्धार परियेसी ॥९७॥ अष्ट पाकोळिया अष्ट गुण । तेही असती भिन्न भिन्न । त्या प्रकृतीचे करितो निरोपण । ऐक सावधान होवोनी ॥९८॥ हरुष आणि विषाद । भय चौथा असे आनंद । उत्साह आणि प्रमाद । जाण ध्रुवपद शोक मोहो ॥९९॥ ह्या जाणा अष्ट पाकोळिका । नववी ते मध्य बैसका । तेथें जीव निर्विषय देखा । स्वात्मसुखा भोगूं इच्छी ॥१००॥ पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर । आग्नेयी नैर्ऋत्य वायव्य ईश्वर । या पाकोळियांवरी सुंदर । मनभ्रमर फिरतसे ॥१॥ त्या पाकोळिकेचे गुण । सेवीं तैसेंचि होय मन । त्याऐसें इच्छित कारण । परी सक्त होऊन न राहे ॥२॥ या मनाची ऐसी परी । राहे जंव ज्या पाकोळीकेवरी । तेचि वृत्ती व्यापे शरीरीं । कार्यही करी तद्गुणें ॥३॥ दुसरे पाकोळियेवरी जातां । मागील वासना होय सांडिता । ठायींचीच वाढवी छंदता । ऐसेचि भ्रमता गुण दावी ॥४॥ बाह्य प्रकृति जे बाणे । त्यावरोनी जाणिजे त्या खुणें । सूक्ष असूक्त विवेके घेणें । स्थिर चर करणें विवेकेंची ॥५॥ मना संगाऐसें रमत । भोगविल्यापरी लांचावत । त्याच गुणें इंद्रियें धांवत । कार्य स्वीकारीत इच्छेचें ॥६॥ मन इंद्रियांचें अधिपती । इंद्रियें त्याऐसें वागती । तया चहडविते निगुतीं । पांच असती अनिवार ॥७॥ त्या पांचाजणांपासोन । लोलुपेसी चढे हें मन । ते म्हणसी जरी कोण । नामाभिधान ऐक त्यांचें ॥८॥ श्रोत्र चक्षु घ्राण रसना । पांचवें जाणें विधिस्याना । त्यांत उत्तम मध्यम कनिष्ठ जाणा । भाग खुणा असती ॥९॥

येथें पंच विषय मूर्तिमंत । मनालागीं चेववित । परी एकाचा न करवी घात । इतर अनर्थ भोगवती ॥११०॥
रसना रसाते आदरें सेवी । मन लोलुपें वेधें चवी । विपरीत करणी तदर्थ करवी । थोरवी हारवी रसास्तव ॥११॥
षड्दळींची विकारता । संगें संग होय वाढता । तेणें मनीं चढे उन्मादता । सर्वत्रीं आघाता पावबी ॥१२॥
श्रवणें शब्दातें ऐकावें । ऐकोनि हृदयीं सांठवावें । तें मनें टोकारोनि स्वीकारावें । तैसेंचि रहाटावें अगत्य ॥१३॥
प्रियकर दूरीची वार्ता ऐकत । देहे टाकोनि आपण धांवत । ऐकिल्या ऐसे भोग भोगित । तन्निष्ठ होत मन तेथें ॥१४॥
मनीं प्रथम श्रवण गादलें । दुसरियानें आणीक कथिलें । त्याचें सांगणें व्यर्थ गेलें । मन फांकलें म्हणोनिया ॥१५॥
नयन रूपातें न्याहाळी । तें मन हृदयीं आकळी । रुचिता जडे तये स्थळीं । भ्रमर कमळीं तेवीं तें ॥१६॥
जें जें या नेत्रें पाहिलें । तेथेंचि मन हे धांवलें । देहा स्वस्थळीं जरी आणलें । मन भरलें वस्तूतें ॥१७॥
देहें मार्गी चालतां । आला गेला न भासे चित्ता । अथवा दूरीचा पाचारितां । कोण्ही पालवितां कळेना ॥१८॥
जें येतसे देहावरी । तें वार्ता पुसती कोण्ही तरी । आम्ही पाचारितां निर्धारी । कां न उत्तरीं बोलिला ॥१९॥
एक म्हणे तुम्हां जवळून । जातां आम्ही न बोलां वचन । तंव तो म्हणे तुम्हांलागून । नाहीं निरखून पाहिलें ॥१२०॥
एकीं मानें पाचारिलें । तेंहीं म्यां नाहीं ऐकिलें । तंव ते परगृहस्थ ते वेळे । खुणा सगळे सांगती ॥२१॥
अंगीं बाणतांची खुणा । म्हणे सत्यचि बोलतां वचना । मनोवृत्ति होत्या परस्थाना । देहीं भ्रमणा प्राप्त होती ॥२२॥
लक्ष नवतेंचि सत्य ठायीं । म्हणोनि पाहिलेंचि तुम्हां नाहीं । सावध असतां ऐसें पाहीं । कधीं कांहीं घडेना ॥२३॥
अंध पंगु बधिर मुकें । अरुची मन असे निकें । परि हें दाविलिया ठायां सोके । आवश्यकें गग तैसें ॥२४॥
मन आणि स्फटिक । रंगोपाधी ऐसे होती देख । उचलितां दिसती निरुपाधिक । हे गुण चोख तयांचे ॥२५॥
मन असे हें पराधीन । दाविता राहे लांचावोन । न सोडी कदापि तें स्थान । हा उत्तम गुण मनाचा ॥२६॥
हित-अनहित निश्चिती । मार्ग जगीं दोन असती । त्यांत साधावया स्वहितगती । परमार्थपंथीं लाविजे मना ॥२७॥
विवेकें लावितां परमार्थ सोय । तेणें निवटती सहज अपाय । घडोनिया येताती उपाय । ब्रह्मरूप काय होय तो ॥२८॥
म्हणोनी मन नित्य बोधावें । सत्संग सोयीतें लावावें । आत्मस्वरूपीं सुख घ्यावें । आवश्यक त्यजावें दुःसंगा ॥२९॥
या पिंडब्रह्मांडांची रचना । अष्ट चक्राचे भेद नाना । तत्त्वावबोधाच्या निरोपणा । कथिलें तुज ज्ञाना बहुतची ॥१३०॥
कथनीं यथा निरोपिली । आद्यंत सर्व निवेदिली । तुम्हीं आदरें श्रवण केली । हृदयीं सांठविली खरीच ॥३१॥
परी याचा अनुभव पाहिजे । अनुभवाविण सुख केवीं लाहिजे । यास्तव कांहीं उपाव कीजे । अभ्यासीं रिघिजे प्रयत्नें ॥३२॥
यां अभ्यासाची हातवटी । केवीं सांपडे सांगा हाटीं । नोहेत सावज्या ह्या गोष्टी । नोव्हे राहाटी अबलाची ॥३३॥
हें सद्गुरुवांचोनि साधन । अभ्यासमार्ग सांगेल कोण । यालागीं तयासीं शरण । कायावाचा मन जाईजे ॥३४॥
तो सद्गुरु तरी असावा कैसा । ज्ञानप्रकाश सूर्य जैसा । तोच करील आपणाऐसा । धुंडीजे तैसा निवडोनी ॥३५॥
गुरु उपदेश करिती बहुत । इच्छिती शिष्यांचें धन वित्त । लोकीं म्हणविती महंत । योग्यता बहुत मिरविती ॥३६॥
गुरु अनुग्रह देती पाहून । बहु ऐश्वर्य संपत्ति धन । त्याचे आधारें वसोन । अंकित होऊन वर्तती ॥३७॥

डाकिनी शक्ति विलसे । तेथें ईश्वर ऋषि असे । चतुरांगुळें उंच दिसे । जप होतसे शतसहा ॥२६॥ चतुरांगुली चार गुण । चारी मातृकेचें स्थापन । वंअंते संपूर्ण । जाणिजे खूण तेथींची ॥२७॥ हा मूळाधारींचा क्रम । तुज निवेदिला उत्तम । हे बोलतां वाटे सुगम । साधतां दुर्गम साधकां ॥२८॥ आतां जें का स्वाधिष्टान । तेथींचेंहि कथितों तुज ज्ञान । स्वाधिष्टान चक्र तें लिंगस्थान । शोभायमान षड् दळें ॥२९॥ तप्त कांचनवर्ण तयाचा । वास सावित्रीसहित विधीचा । ऋषिसूर्य तेथील साचा । जप याचा सहस्र सहा॥३०॥ सहा आंवोळिया उर्ध्वगती । उंची तयाची शोभती । सहा पाकोळिया कमळीं असती । आणि षड्गुण वसती त्या स्थानीं ॥३१॥ तेथें विराजती सहा मातृका । वंकारांत लंकारदेखा । विवेकें जीवीं यानें ओळखा । ज्ञानसाधका निवेदिलें ॥३२॥ एवं द्वितीय चक्रींचा निवाडा । करोनि दाविला चोखडा । आतां पुढल्यानें सावडा । करोनि उघडा दाविलों ॥३३॥ आतां मणिपुरीची उत्पत्ती । ते तुज निरोपितों निगुती । सावधान राखिजे वृत्ती । श्रवणीं प्रीती धरोनी ॥३४॥ मणिपुरचक्र नाभिकमळ । तेथील श्यामवर्ण दशदळ । दशांगुली उंची प्रबळ । दशगुण विशाळ तेथींचे ॥३५॥ दशमात्रा तेथें वसती । डंकारान फंकार बोलती । विष्णु दैवत तेथें निश्चिती । लक्ष्मी शक्ती समवेत ॥३६॥ पवनऋषि तेथींचा महंत । सहा सहस्र जप करीत । अति तेजस्वी दैदीप्यवंत । स्वानंदे रमत तये ठायीं ॥३७॥ हा मणिपुरींचा सोहोळा । जन्मा येवोनि पाहिजे डोळां । जाणावया निवेदिली कळा । वेंचोनि स्वबळा जाणिजे ॥३८॥ आतां चवथिया चक्रासी । माते सावधान परियेसी । विस्तारें निवेदितों तुजसी । सांठवीं मानसीं निजभावें ॥३९॥ तें अनाहतचक्र हृदयस्थान । द्वादश दळीं विराजमान । तो ठाव शोभे कर्पूरवर्ण । तेथें अधिष्टान रुद्राचें ॥४०॥ रुद्र तेथींचें दैवत । वास करी उमे सहित । अर्धांगी मिरवे निश्चित । लावण्यमंडित सौभाग्यभरणी ॥४१॥ द्वादश गुण प्रमाण तेथींचें । द्वादशगुण द्वादशदळांचें । वरी ठाण द्वादश मातृकांचें । कंकरांत ठंकाराचे वास्तव्य ॥४२॥ सूर्याचे जेवी द्वादश कळा । तेवींच द्वादश मातृकांचा येथे मेळा । कीं द्वादशलिंगें पूजी वेल्हाळा । शैलबाळा ते ठायीं ॥४३॥ पाहतां अनाहत ठायासी । तेथें तप आचरे इंद्रऋषी । सहासहस्र जप करी मानसीं । अहर्निशीं जागृत तो ॥४४॥ हे अनाहतीचे भाषण । सहजीं केलें निरोपण । वर्म न कळे अनुभवावांचुन । अभ्यासाविण अनुभव न ये ॥४५॥ निःसीम सत्संग साधितां । तरीच साधन येईल हातां । साधनीं अभ्यास नित्य ठेवितां । मग अनुभवतां दिसेल ॥४६॥ असो आतां विशुद्धीचे बोल । ते तुम्हां निवेदितो निर्मळ । परिसोनि साधिजे आकळ । वाउगे बरळ दवडूं नये ॥४७॥ विशुद्धचक्र तें कंठकमळ । परम विस्तीर्ण षोडश दळ । उंची जयाची सोळा अंगुळ । वर्ण सुढाळ शुभ्र तो ॥४८॥ तेथें लिंगदैवत आपण । आदिशक्तीसमवेत जाण । वास्तव्य करी आनंदघन । सुखसमाधान पावोनी ॥४९॥ तेथें विष्णुऋषि करी तप । एक सहस्र होतसे जप । सदा शांत आणि सद्रूप । श्यामरूप तयाचें ॥५०॥ षोडश गुणी असे मंडित । जेवीं पौर्णिमेचा नक्षत्रनाथ । कळे ऐस्या विराजित । मात्रा निश्चित त्या ठायीं ॥५१॥ अंकारांत अंकार गणिजे । षोडश येणेंचि ऐस्या जाणिजे । हे श्रीगुरुकृपें ओळखिजे । अनुभवोनि घेइजे त्या हातीं ॥५२॥ हे विशुद्ध चक्रींचे प्रमोद । तुम्हां निरोपिले करोनि विविध । पुढें आज्ञाचक्रींचा भेद । निरोपितों सावध ।

श्रवण कीजे ॥५३॥ आज्ञाचक्र तें भ्रूस्थान। जाणते जाणती सज्ञान। तेथिंचें अद्भुत महिमान। तें योगीजन जाणती ॥५४॥ आज्ञाचक्र तें द्विदळ असे। दैवता परम हंस विलसे। इच्छाशक्तीसहित वसे। सर्वज्ञत्व दिसे त्या अंगीं ॥५५॥ द्विअंगुळ प्रमाण असे तेथें। इडापिंगळा म्हणती तयांतें। मध्यें वाहणे सरस्वतीतें। रूप शोभतें तिचेंनी ॥५६॥ ते सुषुम्णा मध्यवाहिनी। कामरूप प्रकाशिनी। वायुसी रमणें तेयोनी। स्वहितसाधनीं मार्ग तो ॥५७॥ रेचक कुंभक पूरक त्राहाटक। तेयोनिही क्रम आवश्यक। तत्वीं घडे सर्व बोळख। साधिती साधक याचि पंथा ॥५८॥ राजस आणि हठ। या दोहींसी मार्ग हाचि नीट। प्राणायामीं हें स्थळ चोखट। जाणती सुभट जाणतें ॥५९॥ असो ऐसें करितां भाषण। वर्णावे लागेल समाविलक्षण। राहू पाहे मागील निरोपण। म्हणोनी सावधान मुरडलो ॥६०॥ द्विदळीचे द्विअंगुल। हें प्रामाणिक बोलिलों बोल। दोन गुण असती प्रबळ। मात्रा निर्मळ दोन त्या ॥६१॥ हंसरूपि तेथें तप करी। हं क्ष दोन्ही अक्षरीं। दोन सहस्र संख्या निर्धारीं। दो स्थळां माझारी होतसे ॥६२॥ त्या दळीचे वर्ण कैसे। तरी माणीक्य नीळ असे। अंतर्बाह्य प्रकारे। चहूंकडे वसे पाहतां ॥६३॥ हें आज्ञास्थान पावन। याचें केलें निरोपण। एवं षट्चक्रीचें ज्ञान। तें संपूर्ण निरोपिलें ॥६४॥ अजपाजप निवडिला। तो षट्चक्रीं प्रमाणें दाविला। एकविस सहस्र सातशें गणनीला। एवं संख्येला जाणिजे ॥६५॥ तेवींच मात्रा असती बावन्न। पन्नास षट्दळीं गेल्या भागोन। तळी उरल्या असती दोन। तो भाग भिन्न वेगळा ॥६६॥ आतां या षट्चक्राचे वरी। अद्भुत असे नवलपरी। कोण्हा न वर्णवे तेथिंची थोरी। ब्रह्मांडशिखरीं अगोचर ॥६७॥ तें या षट्चक्रांचें मूळ। तया नांव सहस्र दळ। ब्रह्मरंध्रीं वास्तव्य स्थळ। परम तेजाळ अनुपम्य ॥६८॥ कोटि भास्करांचे उमाळे। लोपती अग्नीचे बंबाळे। कोटि शशी लोपोनि गेले। त्याहोनि आगळें तें तेज ॥६९॥ अनंतप्रभा अपरंपार। वर्णितां कुंठित श्रुति जिव्हार। अवघा तेजोमय प्रकार। विस्तारला विस्तार तेयोनि ॥७०॥ तया सहस्रदळाचे आंत। प्रेमें देवगुरु राज्य करीत। ज्ञानशक्तिसवें क्रीडत। उन्मनी साक्षात ते ठायीं ॥७१॥ जें निर्गुण निराकार। ते हें ब्रह्मस्थान होय साचार। निर्विकल्प निरंजन निरंतर। सहस्रदळ निर्धार होय हें ॥७२॥ तें सहस्रगुणें असे मंडित। पाहतां स्थळें गुणातीत। विस्तीर्ण असंभाव्य बहुत। न कळे पार अंत तयाचा ॥७३॥ प्रकाशक म्रपीचें स्थान। मुख्य जप एक सहस्र जाण। सकळ चक्रींची दैवतें नेमें करून। घालोनि आसन जपती तेथें ॥७४॥ एकवीस सहस्र साक्षात। जप नित्यनेमें असे होत। और मातृका तेथें रमत। वाद्यें अद्भुत वाजती ॥७५॥ पन्नास मातृका ह्या पाहीं। लोमविलोम त्या ठायीं। दळें व्यापलीं सर्व हीं। तेथील नवलाई न वर्णवे ॥७६॥ अकार उकार मकार। तिन्ही मिळोनि ॐकार। प्रणव तो हाचि साचार। मात्राप्रकार येथोनी ॥७७॥ हें प्रणवाचें दाविलें स्थान। परी न पवे त्या सद्गुरुवाचुन। या प्रणवाचें मूळ स्थान। मात्रा दोन असती ॥७८॥ साडेबावन्नीचा सर्व खेळ। याहोनि उरलें जो निःखळ। तें निखिल ब्रह्म वस्तु निर्मळ। दिसे ढळढळ अर्धपोटीं ॥७९॥ तया नांव निरंजन। परंज्योति प्रकाश गहन। तया पैलीकडे लक्षण। वसे निर्गुण निराभास ॥८०॥ तेथें वर्णना कांहीं व्यक्ती। द्वयअद्वय नाहीं स्थिती। तेथें रूप ना रेखा निश्चितीं। मतीची गती विरतसे ॥८१॥

प्रशंसा शिष्याची करावी । आर्जवें मोहून वृत्ति हरावी । महत् भीड त्याची वहावी । कवीं नुलंघावी मर्यादा ॥३८॥
मर्जीऐसेंचि बोलणें । लौकिकाचार संपादणें । विरुद्ध नाणितां आनंदविणें । एवं संपादणें धनार्थ ॥३९॥
हे आशालोभिक जाणिजे गुरु । हे कैसेनि म्हणावे तारुं । यांचा यांसी न चुके मारु । न कैसेनि परतीर पाववितील ॥१४०॥
असो गुरु असती बहुतापरी । ते न पावती सद्गुरुची सरी । अद्भुत तयाची थोरी । दृष्टांत विचारीं दिसेना ॥४१॥
परी किंचित आठवलें मनीं । तें ऐकिजे श्रोतेजनीं । एक हिरा एक अग्नी । दिसे निवडोनी पाहतां ॥४२॥
ज्या भूमीं हिरा असे । तो अवनीगर्भी फिरतसे । सहजीं फिरतां गार स्पर्शे । हिराचि होतसे तात्काळ ॥४३॥
परी एक येथें उणीव खरे । गारेचा हिरा भूमीं न फिरे । त्यापासाव न होती हिरे । पारखी सरे येव्हढेंची ॥४४॥
उपमेसि घेतला स्पर्शगुण । दुजा दृष्टांतीं बोलिलों हुताशन । तयाचेंही जाणिजे लक्षण । तुम्ही विचक्षण बैसलां ॥४५॥
नाना वस्तु टाकितां अग्नीत । तया स्पर्शे ते अग्नीच होत । तो जरी स्पर्शी अन्य पदार्थ । अग्नीच करीत तयांचा
॥४६॥ मज पाहतां एकदेशी दृष्टांत जाला निश्चयेसी । गुरुषड्गुण संपन्न तेजोराशी । उपमा तयासी साजेना ॥४७॥
शांत दांत आणि विरक्त । भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । उदार धीर ऐश्वर्यवंत । करी सनाथ अनाथा ॥४८॥
विवेकें बोधवी ज्ञान । करी अज्ञानाचें खंडण । त्रिविध तापातें निरसोन । करी पावन पापध्वंसी ॥४९॥
नेत्रीं लेववी ज्ञानांजनासी । बिंबवी नेवोनि आत्मरूपासी । सुलभ मार्गे मुमुक्षूसी । आत्मत्वासी पाववी ॥१५०॥
पाहोनि शिष्यांचें विनयधन । सत्कर्मे करी तया पावन । बोध वैराग्य बाणवोन । हरी अहंपण क्षणमात्रें ॥५१॥
न जाणवितां करी सेवा । राहणी आचरोनि अभ्यासीं वरवा । तो शिष्य आवडे जीवा । ठेवी ठेवा त्यापाशीं ॥५२॥
शिष्य विवेकी असावा भाविक । सेवा निश्चित्त चोख । विषयीं नसावा लंपक । आज्ञावर्तक तोचि निका ॥५३॥
: निंदा द्वेष रोष । हा नसावा देहीं निःशेष । भक्तिभाव प्रीति विशेष । तो उपदेशास पात्र होय ॥५४॥
[illegible] दुराचारी । कर्मे करी जो अघोरी । निंदक खळ कुटिळ अंतरीं । तो शिष्य निर्धारीं नुपदेशिजे ॥५५॥
[illegible] द्वेषी घातक जार । दुष्ट दुरात्मा तस्कर । अति जल्पक मळिन कठोर । उपदेश निर्धार न कीजे त्या ॥५६॥
यद्यपि उपदेशी जाला । बोधितां न सांडी गुणाला । शिकवितां प्रवर्ते वादाला । त्यागिजे त्याला अवश्य पैं ॥५७॥
आधीं गुणातें परीक्षोन । सुवर्ण घेइजे कसीं लावून । तोचि हिरा म्हणावा जाण । अहेरणीं गहन घण सोसी ॥५८॥
एवं परीक्षेसि उतरला । तोचि अलंकारीं योग्य जाला । सकळ भूषणीं मिरवला । मान्यतेसि आला सहजची ॥५९॥
ऐसें उतरतां लक्षण । करावा अंगीकार त्याचा पूर्ण । त्याहीवरी पाहावी सांठवण । रूप गुण केवीं दिसे ॥१६०॥
रहणी अभ्यासीं जडे प्रीती । सदा सावध साधनार्थी । लालसा अत्यंत परमार्थी । तेथेंचि सकळ युक्ती वोपिजे ॥६१॥
हें गुरुशिष्यांचे लक्षण । युक्त अयुक्त निवडिलें जाण । जैसा अधिकार तैसा गुण । परस्परें पूर्ण वोळखिजे ॥६२॥
उभय पक्ष युक्त असती । तैंच लाधिजेल प्रचीती । आनंदचि तेथें वर्षती । नुरे भ्रांती कांहींच ॥६३॥
यालागीं सत्संगी वसतां । गुरुशिष्यीं पडे ऐक्यता । लाभ चढों लागे हाता । लोभ अहंता विझुळे ॥६४॥
सत्संगाचे महात्म्य थोर । शुद्ध होतसे अंतर । संघटणें जाणवती विचार । सेवेसी तत्पर मन जडे ॥६५॥

मन जडतां सेवेसी । विकार पळती निश्चयेंसी । श्रवणेंचि पावे अधिकारासी । भक्ति प्रेम मानसीं ठसावे ॥६६॥ ठसावतां हृदयीं भाव । मग तो भेटे सद्‌गुरुराव । प्रेमा देखोनि अपूर्व । मग दे ठाव स्वपदीं तो ॥६७॥ विनय होतांचि त्याच्या पदा । तात्काळ निवटी सर्व आपदा । आपली स्वात्मत्व दे संपदा । स्वानंदपदा पाववी ॥६८॥ भ्रांति भ्रमा नुरवोनि कांहीं । देहींच करीतसे तो विदेही । अद्‌भुत त्याची नवलाई । अनुपम्य ठायीं पावविती ॥६९॥ पावविताचीं अनुपम्य ठाया । गुरुशिष्य जाती मावळोनिया । कैंची काया कैंची माया । पाहतां पहावया कोण कैंचा ॥१७०॥ मनाअंगीं जाणपण । तेंही तेथें जालें उन्मन । ब्रह्मांडचि उजळलें तेजें करून । न वदवे खूण वाचेतें ॥७१॥ ऐसे सद्‌गुरु सच्चिद्धन । अनन्या करीतसे पावन । आपणत्व दे दासा लागून । त्याचें महिमान न कळे वेदां ॥७२॥ अविनाश विनवी अनसूयेसी । जया पावणें स्वहितासी । तेणें शरण जावें सद्‌गुरुसी । तैं या लाभासी पावेल ॥७३॥ परिसोनि दत्ताची वाणी । अनसूयेच्या आनंद न मायें मनीं । म्हणे तृप्त जालें आजिचे श्रवणीं । हृदयभुवनीं ठसावलें ॥७४॥ हें तुझें दिव्य रसायन । जे आदरें करितील सेवन । त्यांचे त्रिविध ताप जातील निरसोन । होतील पावन श्रवणमात्रें ॥७५॥ संत साधु ज्ञानी विरक्त । योगी सिद्ध आणि पंडित । प्रेमळ भाविक मुमुक्षु निश्चित । हे अधिकारी सत्य तेथींचे ॥७६॥ दांभिक अभिमानी द्वेषिक । कुबुद्धि मलिन तल्पक । चांडाळ कुमति अभाविक । तेन आवश्यक अधिकारी ॥७७॥ येथें जे अधिकारी असती । त्यांचे मन गढे या ग्रंथीं । तोचि जाणे येथिंची व्युत्पत्ती । येरां प्राप्ती कैसेनी ॥७८॥ तुम्ही संत श्रोते सज्ञान । जाणते पंडित विचक्षण । या दत्तकथेचें निरोपण । तुम्हींच श्रवण करें कीं ॥७९॥ तुम्हां प्रश्नोत्तरांची आवडी । म्हणोनि श्रवणीं लागली गोडी । सांठविली अत्यंत चोखडी । तुमचेनि प्रौढी ग्रंथातें ॥८०॥ पुढील कथेचें प्रश्नोत्तर । असे अत्यंत प्रौढकर । तें निवेदील दत्त योगेश्वर । श्रवणीं अपार सुख तुम्हां ॥८१॥ तुम्ही सज्ञान संत श्रोते । या ज्ञानरसाचे परम भोक्ते । म्हणोनि विज्ञापना तुम्हांतें । चित्त पुढिल्यातें देईजे ॥८२॥ संत अनंत तुम्ही सद्‌गुरु । तुमचे कृपेचा सुतासि आधारु । देवोनिया अभयकरु । पैलपारु नेईजे ॥८३॥ मी हीन दीन निश्चयेंसी । शरण तुमच्या चरणांसी । मज लावोनिया कासेसी । कृपाराशि तारिजे ॥८४॥ तुम्ही मायबाप माझे संत । होईजे सदय कृपावंत । जाणोनि अंतरींचे पुरवा हेत । करा साह्यार्थ सर्वस्वें ॥८५॥ तुमचे चरणींचा किंकर । अनंतसुत जोडी कर । करोनि याचा अंगीकार । अभयवर देईजे ॥८६॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपद्मपुराणींचें संमत । परिसोत श्रोते भाविक भक्त । षड्‌विंशोध्यायार्थ गोड हा ॥१८७॥

॥ इति षड्‌विंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय २७ वा ॥

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीसद्गुरुदत्तानंताय नमः । ॐनमो सद्गुरु मंगलाधीशा । विद्यासागरा तूं सर्वेशा । अज्ञानछेदका मतिप्रकाशा । ज्ञाननिर्देशा विघ्नहरा ॥१॥ जयजय सद्गुरु प्रणवरूपा । रूपातीत तूं अरूपा । निरंजना तूं ज्ञानदीपा । दर्शनें खेपा चुकती ॥२॥ जयजय सद्गुरु निर्विकारा । अखिल अभंगा परात्परा । तूं साकार जालासि जगदोद्धारा । दयासागरा दीनार्थ ॥३॥ जयजय सद्गुरु अनंता । अनंतरूपा अनाथनाथा । विश्वपाळका कृपावंता । सर्वात्मक सत्ता वागे तुझी ॥४॥ तुझिया सत्तेवांचून । कांहीं न घडे कोणतें कारण । तूं सूत्रधारी होसी पूर्ण । दाविसी खूण तेंचि हलें ॥५॥ सहस्रदळीं तुझा वास । करनी चेतविसी इंद्रियांस । परस्परें गुंतवोनि त्यांस । राहसी निर्दोष साक्षित्वें ॥६॥ करोनि अकर्ता तूं होसी । तुझी माव न कळे कोणासी । वर्णितां ठक पडले बहुतांसी । अतर्क्य होसी गुरुवर्या ॥७॥ तुझा त्वांचि रचिला खेळ । पिंडब्रह्मांडादि सकळ । खाणी वाणी यादवीस्या प्रबळ । वरी मायाजाळ पसरिलें ॥८॥ त्या मायेनें मोहित केलें । विकारविषयीं जीव गुंतविले । लक्ष चौऱ्यायशींचे फेरे पाडिले । पराधीन जाले पामर ॥९॥ जीवांसि आपुली शुद्धि नाहीं । बुडते जाले भवप्रवाहीं । सोडविता त्यांतें कोणी नाहीं । देखोनि हृदयीं कळवळसी ॥१०॥ मग दीनाच्या उपाया । तरणोपायार्थ तुज उपजली दया । तेसाकारगुरें सद्गुरुराया । जग तारावया अवतरसी ॥११॥ तो तूं अविनाश दिगंबर । निमित्तें जालासि अत्रिकुमर । अवधूतवेषें निर्धार । जगदोद्धार करिसी तूं ॥१२॥ स्वज्ञानप्रबोध करोनी । विवेकवैराग्य बिंबवोनी । जीवा आत्मत्वपद देवोनी । मोक्षदानी उद्धरिसी ॥१३॥ तूं दीनदयाळू पतितपावन । उदार होसी गा सर्वज्ञ । मनोरथ करावया पूर्ण । नामाभिधान प्रगट दत्त ॥१४॥ वासना त्यजोनि अदत्त । सर्वस्व करावया दत्त । प्रगटलासी तूं देवदत्त । करोनि सिद्धांत संकल्प ॥१५॥ बोधिला यदु । त्रेतायुगीं सहस्रार्जुन प्रसिद्ध । द्वापारीं मातेसि करी संवादू । व्हावया प्रबोधू जगासी ॥१६॥ जे प्रश्न अनसूया करी । ते दत्त अवधारोनि शंका वारी । श्रेनिया उद्धवे प्रेमलहरी । श्रवणरंध्रीं सांठवितां ॥१७॥ अष्टचक्रींचे भेद । दत्तें निरोपिले प्रसिद्ध । आतां श्रोतीं परिसिजे सावध । प्रश्न अगाध अनसूयेचे ॥१८॥ अनसूया म्हणे गा योगेश्वरा । बरवें केलें मम प्रश्नोत्तरा । शांतविलें माझिया अंतरा । सुखाचा थारा दावोनी ॥१९॥ प्रश्नाऐसा विस्तार । करोनि दाविला साचार । त्या निरोपणींचें सार । पुसतें विचार तुजलागीं ॥२०॥ त्या प्रश्नांची गुंफोनि माळा । राजसा घालितें तुझिया गळा । तूं ज्ञानमार्गे होसी आगळा । जाणसी कळा सर्वही ॥२१॥ तुझें निरोपण अत्यंत गोड । मजही श्रवणीं असे चाड । प्रश्न अवधारोनि पुरवी कोड । तुजविण निवाड कोण करी ॥२२॥ प्रथम प्रश्नातें परिसावें । ब्रह्म कैसियातें म्हणावें । तया कवणेपरी वोळखावें । हें मज सांगावें निवाडें ॥२३॥ शबलब्रह्म तें असे कोण । काय तयाची निवेदी खूण । कैसें वोळखावें त्यालागून । हा द्वितीय प्रश्न अवधारी ॥२४॥ कोण जाणावा तो ईश्वर । केवीं वोळखावा त्याचा प्रकार । हें मज सांग तूं सत्वर । तृतीय साचार प्रश्न हा ॥२५॥ जीव कैसियासी म्हणती । केवीं ओळखावें त्यासी निगुतीं । प्रचीत बाणवी निश्चितीं । चौथा तुजप्रती प्रश्न माझा ॥२६॥ प्रकृति कोण म्हणिजे । ती कैसेनि वोळखिजे । हें मातें त्वां निरोपिजे । प्रश्न बोलिजे पांचवा हा ॥२७॥

परमात्मा तो म्हणिजे कोण । काय रूप त्याचे कोण गुण । ते जाणवी मजलागून । साहवा नेमून प्रश्न केला ॥२८॥
आद्य ब्रह्म म्हणावें कोणा । केविं आणिजे त्या ध्याना । हा संशयो माझिया मना । सातव्या प्रश्ना अवधारीं ॥२९॥
यातीचा कोण निश्चय । येथें उद्भवला मज संशय । कोण याचा सांग निर्णय । हा प्रश्न होय आठवा ॥३०॥
कर्म कोणातें म्हणावें । कैसेनि त्याते जाणावें । कोणतिया कर्मे ओळखावें । नवविया सांगावें प्रश्नोत्तरा ॥३१॥
अकर्म म्हणावें कोणासी । कोण गुणें ओळखिजे त्यासी । या दहाविया प्रश्नासी । विचारोनि मानसीं मज सांगें ॥३२॥
सर्वांमाजी श्रेष्ठ विचार । कोणतें तप असे सुंदर । प्रश्न अकरावा निवडोनि सार । निवेदी सत्वर विवेकें ॥३३॥
असुर म्हणावें कवणातें । कैसेनि वोळखावें त्यातें । जाणोनि प्रश्न बाराविया तें । निवडोनि मातें निवेदी ॥३४॥
ज्ञान कासया म्हणती । कोण त्याची सांग व्यक्ती । मज कळावया प्रचिती । तेरावा निगुतीं प्रश्न केला ॥३५॥
अज्ञान म्हणती कासया । कोण कृती ओळखावें तया । चौदावा प्रश्न कळावया । केला सुतराया म्यां तुज ॥३६॥
कैसेनि म्हणावा संसार । तयाचा कोण कैसा विस्तार । या पंधराविद्याचा करोनि आदर । निरोपोनि अंतर तोषवी ॥३७॥
प्रश्न परिसिजे सोळावा । बंध कैसियासी म्हणावा । कोण लक्षणें जाणावा । उमज करावा मज याचा ॥३८॥
मोक्ष कैसियातें म्हणिजे । कोण प्रकारें तो जाणिजे । तो कैसेनि सांग पाविजे । वर्म निवेदिजे सत्रावें ॥३९॥
सर्व सुखामाजीं सुख जाण । उत्तम सुख ते कवण । हें मज सांगिजे शोधून । म्हणोनि हा प्रश्न अठरावा ॥४०॥
दुःख कोणतें म्हणावें । कवण गुणें तें जाणावें । सांगोनि कल्पनेतें निरसावे । प्रश्न जाणावे एकोणीस ॥४१॥
स्वर्ग तो म्हणावा कैसा । प्राप्त होय कवणिया अंशा । हें सांग मज प्राणहंसा । प्रश्न ऐसा विसावा हा ॥४२॥
नरक कासयातें म्हणती । कोण्यायोगें भोग होती । हे मज पडलीसे भ्रांती । प्रश्न पदर्थी एकविसावा ॥४३॥
परं पद तें असे कोणतें । कैसेनि वोळखावें त्यातें । म्हणोनि बेविसावें प्रश्नातें । केले तूतें अवधूतां ॥४४॥
उपास्यदैवतातें कोण । कैसे असे औपासन । तेविसावें हें लक्षण । करी निरोपण याचें मज ॥४५॥
विद्वान कोणता असे । तया जाणावें तें कैसें । हें लक्षण चोविसावें पुसें । श्रवण विशेषें करवीं हो ॥४६॥
कोणालागीं म्हणावें मूर्ख मूढ । कैसेनि जाणावा त्याचा निवाड । पंचविसावा प्रश्न उघड । करोनि आवड पुरवी ॥४७॥
कोणता ओळखावा संन्यास । आचरण कोणते तयास । सव्विसावा प्रश्न जाणावयास । केला विशेष निरोपीं ॥४८॥
सत्ताविसावा प्रश्न पाहीं । काय ग्राह्य तें सांग लवलाहीं । त्याऐसें वर्तूं देहीं । निरोपिता होई भाग हा ॥४९॥
अग्राह्य पदार्थ कोणता । त्याग्य करावया सांग आतां । अठ्ठाविसावा प्रश्न निरुता । निवडोनि स्वहिता सांग मज ॥५०॥
समाधि ती कैसी काय । कोण म्हणिजे ती सांग सोय । हा प्रश्न एकोणतिसावा होय । तूं योगिराय निवेदी ॥५१॥
ब्राह्मण तो कोणता । हा तिसावा प्रश्न अवधूता । शोध करोनि बोधी चित्ता । क्षुधित श्रवणार्थ मी असे ॥५२॥
कोणते जाणावे आसन । मुद्रा वोळखावी कोण । कोणते म्हणावें ध्यान । जप तो कोण मुख्य पै ॥५३॥
क्षत्रिय कोणातें म्हणावें । वैश्य कैसे परीक्षावे । शूद्र केउते शोधावे । चांडाळ जाणावे श्रेष्ठांत ॥५४॥
कोण म्हणावी ते जागृती । निद्रा कोणती असे निश्चिती । या दहा प्रश्नांची निवृत्ती । कीजे सत्वरगती माझी पै ॥५५॥

एवं प्रश्न हे चाळीस । तुज म्यां केले विशेष । यांचें निरोपण करी सुरस । श्रवण आम्हांस प्रिय बहु ॥५६॥
तूं सर्वज्ञ आणि जाणता । तूं अध्वर्यु होसी या परमार्था । मजही श्रवणाची अपेक्षता । पुरवी अर्था निरोपोनी ॥५७॥
प्रश्नोत्तरें करावया श्रवण । क्षुधित भाविक श्रोतेजन । ज्ञानी योगी अनुभवी पूर्ण । पंडित अर्थज्ञ लक्षिती ॥५८॥
सकळां श्रवणाची आस । तरी निरोपणीं तोषवी त्यांस । तूं ज्ञानदाता अविनाश । तृप्त सर्वांस करीं वेगीं ॥५९॥
तूं उदारांचा होसी राणा । कृपें करवीं कथामृतपाना । पुरवी आवडीची वासना । सकळ सज्जना आनंदवीं ॥६०॥
तूं भवाब्धीचा तारक । तूं अज्ञानतिमिराचा नाशक । तूं होसी गा सुखदायक । दीनपालक करुणाब्धी ॥६१॥
अनसूयेची गौरव वाणी । ऐकतां अवधूत संतोषे मनीं । म्हणे अंबिके मम जननी । किती भूषणीं भूषवितां ॥६२॥
माते तुझा मी आज्ञांकित । मज कासया थोरीव निश्चित । तुझिया कृपेचें ज्ञान समस्त । स्तविसी किमर्थ यासाठीं ॥६३॥
तुज परोपकाराची आवडी । मजही त्यामार्गींच गोडी । धन्य तूं जोडविसी जोडी । जीवां रोकडी स्वश्रवणें ॥६४॥
पोटीं जगदोद्धाराची अपेक्षा । म्हणोनि अंगिकारिली श्रवणदीक्षा । करिसी प्रश्नीं उत्प्रेक्षा । पूर्वपक्षा धरोनिया ॥६५॥
धन्य माउली तूं होसी सती । हे प्रौढ तुझे प्रश्न असती । हे श्रुतिगर्भ मज दिसती । हृदयीं विलासती तुझिया कीं ॥६६॥
हे प्रश्न सत्य सुगमे । श्रुतीच ऐसे मज गमे । वेदमूर्ती अत्रिउगमे । त्याची संगमें हा लाभ ॥६७॥
धन्य माते तुझें ज्ञान आगळें । आजी मजसी कळों आलें । त्वा परोपकारार्थ प्रश्न केलें । मन सुखावलें ऐकतां ॥६८॥
आतां या प्रश्नांचें उत्तर । उपनिषदिक भाग सुंदर । तुजसाठीं करणें प्रखर । आलें निर्धार मज आतां ॥६९॥
या निरोपणार्थ चांग । निरालंबउपनिषदीं भाग । तो निवडोनिया प्रसंग । तुज अव्यंग निरोपितों ॥७०॥
सावध श्रवणार्थी असावें । चित्त उद्विग्न तें नसावें । एकाग्रता करोनि बैसावें । मन वसावें या कीर्तनीं ॥७१॥
नी सावधान होईजे । निकें निरोपण ऐकिजे । कथारस हृदयीं सांठविजे । सुख पाविजे परिसोनी ॥७२॥
. . प्रश्नीं ब्रह्म कोण । तरी त्याचें परिसिजे निरोपण । आद्यंत जाणावया लक्षण । करीं श्रवण साक्षेपें ॥७३॥
ब्रह्म अखिल अभंग । उपाधिरहित निःसंग । करोनि अकर्तृत्वीं चांग । भोगोनि भोग मुक्त तें ॥७४॥
तें शुद्ध आणि शांत । निर्गुण निरामय निश्चित । नित्यानंद सदोदित । अगोचर निश्चित म्हणतें ॥७५॥
तें सदा सर्वदा अखंड । तयासि नसे कांहीं खंड । जयाचेनि हें ब्रह्मांड । आणि हा पिंड विस्तारें ॥७६॥
सर्व रसातें जाणवी । शब्द श्रवणातें ऐकवी । नेत्रद्वारें तोचि पाहावी । मकरंद सेववी नासिकीं ॥७७॥
त्याविण न चलती इंद्रिय । जाणविता तोचि सर्व सोय । उपाय अथवा अपाय । त्याचेनि होय सर्व कांहीं ॥७८॥
खेळ खेळोनि निराळा । अद्भुत असे त्याची लीला । कोणा न कळे त्याची कळा । जीवींचा जिव्हाळा तोचि होय ॥७९॥
तोचि स्वरूपें नटला समस्त । सेखीं होय तो रूपातीत । आब्रह्मस्तंबपर्यंत । व्यापोनि अंत नसे त्या ॥८०॥
रूप नाहीं तया रेखा । तेंच चैतन्य ब्रह्म ओळखा । जाणावया नसे आवांका । वेदादिकां श्रुतिशास्त्रां ॥८१॥
ते ब्रह्म सनातन । सकळ ठायीं राहिलें व्यापून । परी पाहावया आंगवण । चर्मचक्षुलागून असेना ॥८२॥
पदार्थमात्रीं असे नाश । परी ब्रह्म तें अविनाश । उपसर्ग लावितां त्यास । न मळेचि लेश तयाचा ॥८३॥

ब्रह्मशस्त्रें तुटेना । विटवितां कधीं विटेना । जळीं बुडवितां बुडेना । दाहितां जळेना अग्नींत ॥८४॥
जैसें पात्रीं भरलें जीवन । कीं कूप सरिता वोहोळ पूर्ण । तयामाजी करितां अवलोकन । सूर्यकिरण बिंबलें ॥८५॥
अर्भक अपत्य शाहणा । कुचेष्टभाव उपजवी मना । म्हणे धरूं मारूं फोडूं किरणा । नाना विटंबना करोनी ॥८६॥
तेणें उदकातें हालविलें । अर्भक म्हणे हें कांपलें । वरी पाहतां अचळ देखिलें । नाहीं चळवळलें किंचित ॥८७॥
कोण्ही मळ्यूं म्हणोन । जीवनीं ढेंकूळ दिलें कालवून । वरी पाहतां सतेजपण । विराजमान दिसतसे ॥८८॥
एका मनीं भंगावें त्यासी । क्रोधें विटंबी पात्रासी । पाहतां भंग नसे सूर्यासी । पावली पात्रासी भग्नता ॥८९॥
एकचि दृष्टांताचा विस्तार । कळावया केला साचार । ब्रह्म अविनाश निर्धार । व्यापक विचार ऐसाची ॥९०॥
ब्रह्म दाटलें पाठींपोटीं । परी पहावया पाहिजे ज्ञानदृष्टी । त्यावीण व्यर्थ खटपटी । करोनि चावटी कायसी ॥९१॥
ज्ञानदृष्टी व्हावी जया । तेणें शरण जावें सद्गुरुराया । सेवें उपजवोनि त्यासी दया । स्वात्म उपाया साधिजे ॥९२॥
चैतन्य ब्रह्मज्ञान दिठी । ते दावितील उठाउठी । त्या आनंदें भरे सृष्टी । घळतील खोटी समरस ॥९३॥
द्वितीय शबलब्रह्माची वार्ता । ते मी होतो निरोपिता । सावधान होइजे श्रोतां । परमार्थ स्वहिता साधिजे ॥९४॥
शुद्ध निखिल ब्रह्मापासून । अहं ब्रह्मास्मि हें चैतन्य । महातत्त्व माया निर्माण । तेयोनि दोन प्रकृति त्या ॥९५॥
शुद्ध ब्रह्म असतां । इच्छा वसे पावली जीवता । तेयोनि निर्माण त्रिपदता । त्वंतदसितता जाणिजे ॥९६॥
तें त्रिआम्नत्र जाणिजे । एवं मातृत्व प्रणव म्हणिजे । तो त्रिमात्रिक प्रसविजे । त्रिगुणें स्थापिजे त्रिधेव ॥९७॥
त्या त्रिगुणात्मकीं त्रिअहंकार । त्यांची उत्पत्ति विभक्ताकार । तें जाणवितों प्रकार । कीजे स्वीकार निरोपणीं ॥९८॥
सात्त्विकीं अंतःकरणपंचक । राजसीं ज्ञानेंद्रिय कर्मेंद्रिय देख । आणि पंचतन्मात्रिक । एवं आवश्यक धरा हें ॥९९॥
उरला अहंकार तामस । तेयोनि जन्म पंचमहाभूतांस । पृथ्वी आप तेज वायु आकाश । हे ब्रह्मांडपिंडास उद्भविले ॥१००॥
अनेक रूपातें प्रसवलें । कर्मज्ञानार्थ रूप धरिलें । सत्य स्थापनार्थ अंगीकारिलें । प्रतिपादलें भासवोनी ॥१॥
एवं तामस शक्ति अचाट । औडंबर रचिलें उद्भट । स्वप्रतापें भरविली पेट । करोनी खटपट मायिक हे ॥२॥
महामायिक बाजेगर । नसतां दाविलें औडंबर । स्वशक्ती भासविलें खरें समग्र । खोटें अणुमात्र दिसों नेदी ॥३॥
एकोऽहं बहुस्याम । या ध्वनीचा केला संभ्रम । सबळें उद्भविला भ्रम । शबलब्रह्म म्हणोनिया ॥४॥
एवं शबलब्रह्म हे जाणावें । कृतीकारणीं ओळखावें । त्रिविधें त्यामाजीं वागावें । चमत्कार पाहावे दृश्यमान ॥५॥
तृतीय प्रश्नीं कोण ईश्वर । तोही निरोपितों परिसा विचार । शुद्ध करोनि अंतर । होइजे सादर श्रवणार्थी ॥६॥
सर्वात्मरूपणें व्यापक । सकळांचा जो आश्रय देख । चाळकपणें बुद्धिदायक । सकळ कौतुक ज्याचेनी ॥७॥
पाहें पां ज्यांचे आज्ञाधार । ब्रह्मादिक देव सुरवर । पत्रही न हाले निर्धारें । सत्ता समग्र तयाची ॥८॥
जयाची आज्ञा वंदोन । समुद्र राहिला मर्यादा धरोन । पर्वत अचळ बैसले होवोन । भूतें संपूर्ण भूमी वाहे ॥९॥
पृथ्वी आप तेज वायु आकाश । तदाज्ञे वागती निःशेष । होय सकळांचा ईश । ईश्वर यास म्हणावें ॥११०॥
षडाक्षरनि षड्गुण । व्यापकत्वें भरला परिपूर्ण । शक्ति दातृत्व आकर्षण । धर्ता म्हणोन ईश्वर तो ॥११॥

अनंत ब्रह्मांडें निर्मिना । होय सकळांचा नियंता । इंद्रियादिक सकळ खेळविता । करोनि अकर्ता ईश्वर तो ॥१२॥
पहा केल्हढें औडंबर । दाविला असंभाव्य विस्तार । सेखीं स्वात्मरूपीं आवर । करी तो ईश्वर जाणिजे ॥१३॥
जो ब्रह्मरूप सनातन । जो भावार्थे प्रगटे होवोनि सगुण । गुणी असोनि जो निर्गुण । ईश्वर पूर्ण तोचि तो ॥१४॥
आतां जीव कोण हा संशय । तोही निरोपितों निर्णय । श्रवणीं राखिजे शुद्ध सोय । तद्रूप होय मन जेणें ॥१५॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर । गणगंधर्व चंद्र भास्कर । इंद्रादि देव शक्ति सुंदर । दैवत अपार उक्त जे ॥१६॥
या द्वारां निजध्यासन । करिती मानिती आदरें करून । हे जीव स्थूळमान । ऐसें प्रमाण मानिजे ॥१७॥
तैसें मनुष्य जीवजाती । भूपाताळादि असती । एवं देहेचि निश्चितीं । भेदें दिसती विभक्त ते ॥१८॥
एवं तेथेच जाण येथें । नाहींच कांहीं जीवापरतें । श्रुत्या दृष्ट्वादि भासतें । जीव यातेंचि म्हणावें ॥१९॥
बहवो जीवाः हा नेम । येणें साधिला हा क्रम । येथें न धरिजे कांहीं भ्रम । जीव सर्वोत्तम सर्व हा ॥१२०॥
कोण म्हणसी प्रकृती । तेही ऐकें सावध वृत्ती । निरोपणीं करितों निवृत्ती । अर्थचित्तीं सांठवी ॥२१॥
मूल ब्रह्मापासून । इच्छाशक्ति झाली निर्माण । तेथोनि माया विलक्षण । व्याली गुणमात्रासह ॥२२॥
त्रिगुणोद्भव भूतसृष्टी । जीवमात्र भरविले पोटीं । स्वर्ग मृत्यु पाताळ गोमटी । करोनि हातवटी दाविजे ॥२३॥
एवं असंभाव्य सामर्थ्य दात्री । तेचि ब्रह्मीची शक्ति ओळखावी । हेचि प्रकृति जाणावी । अनुभवावी बोळखोनी ॥२४॥
परमात्मा कोणासि म्हणिजे । तरी तें निरोपण श्रवण कीजे । आत्मैव परात्मे पाहिजे । परमात्मा जाणिजे या नांवें ॥२५॥
जो या देहीं आत्मा असे । तोचि परदेहामाजीं वसे । द्वैत नासतां सहज भासे । परमात्माचि असे स्वपर तो ॥२६॥
व्यापक व्यापला स्वपर । तोचि असे परात्पर । फिटतां भ्रांतीचा पदर । मग सर्वांतर एकचि तो ॥२७॥
कल्प विकल्प जाती जळोन । तैं परमात्मिक पावे दरुषण । हे जीवीं जाणिजे खूण । जागल्या मीतूंपण असेना ॥२८॥
ब्रह्माद्य कोणातें म्हणावें । हें इच्छिलें तुमच्या जीवें । तें निरोपितों आघवें । श्रवणीं असावें सादर ॥२९॥
कैलासपति शंकर । वैकुंठधीश रमावर । चतुरानन भास्कर । पुरंदर रुद्रादि ॥१३०॥
कुबेर मनुचंद्र जाण । यमाग्नी वायु वरुण । देव पितर मरुद्गण । ऋषि ग्रहगण शक्ति तारा ॥३१॥
असुर मानव भूचर । स्त्रीपुरुषादि नाना आकार । दैत्य गंधर्व अप्सर । विद्याधर सुरादि ॥३२॥
जीवमात्र जे जे कांहीं । स्वर्ग मृत्यु पाताळ ठायीं । उत्तम मध्यम कनिष्ठ तेही । ब्रह्माद्य पाहीं सर्व ते ॥३३॥
सर्व ब्रह्मेति वचन । येथें निवडावा वेगळा कोण । श्वपच चांडाळादि काष्ठ पाषाण । ब्रह्माद्य संपूर्ण असती ॥३४॥
यानि माने विचारितां । निरोपितां येईल उदासता । परी भय नाहीं सत्य वदतां । भीड आतां कोण धरी ॥३५॥
.. जातां यानीचा शोध । तो मुळींच नाहीं भेदाभेद । विचारोनि पाहतां शुद्ध । एक वृंद असती ॥३६॥
. त्वचा नाडी रक्त । रोम भेद अस्थी सर्वांत । पंचभूतात्मक विस्तार । खेळ त्रिगुणांत सकळांचा ॥३७॥
..ाळे कोठें सांदी । अंतर्बाह्य सारख्या संधी । पहा चक्राची समूळ शुद्धी । एक विशुद्धी दिसतसे ॥३८॥
सारिखेची अवयव । साम्य इंद्रियांचे भाव । दश प्राणाचे लाघव । पाहतां अवघें समत्वें ॥३९॥

आहार निद्रा मैथुन । कार्य अकार्य समान । नादबिंद मातृका जाण । भिन्नमान न केल्या ॥१४०॥
चलन वलन आकुंचन । प्रसरण गमनागमन । ज्ञान आणि आज्ञान । जाणतपण इंद्रियांचें ॥४१॥
कोठेंही पाहतां द्वैत नाहीं । एकची असे सर्व पाहीं । याति निवडावया कोणताही । विचार काहीं मुळीं नसे ॥४२॥
वेव्हारीं योजिले प्राणी । पृथक भाग दिले नेमोनी । जैसी ज्या लाविली कर्मकरणी । तेचि त्यालागोनि याति पै ॥४३॥
मूळ आदिपुरुषापासून । इच्छाशक्ति माया निर्माण । प्रकृति पुरुष दोन । तेथोनि त्रिगुण त्रिधेत्र ॥४४॥
उद्भव महादेवाचा । प्रतिपालकपणा विष्णूचा । संहारकम तो रुद्राचा । व्यापार तिघांचा नेम हा ॥४५॥
येथें नाहीं वर्ण याति । पुढें विधि करितसे उत्पत्ती । कश्यपसृष्टी हे निगुतीं । वर्णाकृति निर्मिले ॥४६॥
वर्ण व्याप्ति झाली जेव्हां । अधिकार नेमिले तया तेव्हां । श्रेष्ठ वर्णाची निवेदिली सेवा । तिघां तेधवा अनुक्रमें ॥४७॥
तेवींच आधिपत्य कारण । पृथक्त्वें दिधलें नेमून । तें जरी म्हणाल कोण । त्रिविध निरोपण ऐकिजे ॥४८॥
द्विजें तपानें आचरावें । वेदशास्त्र पठण करावें । सूर्य अग्नीतें यजावें । ध्यानीं जपावें त्रिपदेस ॥४९॥
क्षत्रियें भूमी आवरोन । करावें गोद्विजांचें पालन । समरदानातें सावधान । स्वकर्माचरण निष्ठत्वें ॥१५०॥
वैश्यें करावा व्यापार । नाना पदार्थी सौदागर । शिवउपासना निर्धार । करावा आदर वरील दोंचा ॥५१॥
शूद्रें क्षेत्रातें पिकवावें । गाईब्राह्मणांतें सेवावें । आलिया अतिथिया यजावें । दास्य करावें तिहीं वर्णी ॥५२॥
एवं चहूं वर्णी हा विचार । त्यांसी नेमिला अधिकार । येथें यातीचा प्रकार । नाहीं निर्धार निवडिला ॥५३॥
व्यवहार कर्माच्या पोटीं । पृथक्त्वें आचरतां राहाटी । तोचि संबंध लागला पाठीं । याति सृष्टी तत्काजें ॥५४॥
जैसी कृति कारणावरोन । की ग्राम आश्रयसंगें जाण । उपनामाचें होतसे स्थापन । तेवींच महिमान यातीचें ॥५५॥
जातिव्यवहारोपि कल्पितः । निश्चयात्मकें हेचि वार्ता । मुळींच शोध शोधितां । यातिसंबंधता असेना ॥५६॥
परी श्रेष्ठें मर्यादा लाविली । तेचि पाहिजे प्रतिपाळिली । हे नुल्लंघिजे कदा काळीं । स्थापिल्या मेळीं राहावें ॥५७॥
मूळाचार वेदाचार । शास्त्राचार आणि श्रेष्ठाचार । वृद्धाचार कुलाचार । देशाचार सातवा ॥५८॥
जनाचार लौकिकाचार । इतुके रक्षिले पाहिजे साचार । नाचरतां दोष अपार । टोचितीं नर एकमेकां ॥५९॥
यद्यपि शुद्ध आपणा कळे । परी जग विरुद्ध त्यातें बोले । तरी तें पाहिजे नाचरलें । एकवीं भलें तेचि किजे ॥१६०॥
पूर्ण ज्ञानी झाला जाणता । तरी ठेवणेंच आली न विचारतां । रूढी न मोडिजे सर्वथा । चालिजे पंथा धरोनिया ॥६१॥
जया लौकिकाची चाड नाहीं । निर्मोह निरहंकार झाला पाहीं । तुरे लोभ आशा समूळ देहीं । मर्दिले साही आठ दोन ॥६२॥
समबुद्धी झाली समान । आले एकत्वा समानापमान । उडालें देहींचें द्वैतभान । स्वरूपीं निमग्न सर्वात्म कीं ॥६३॥
वादाविवाद हारपला । इंद्रियरुचीतें विसरला । काळ समत्वासी आला । शुद्ध बुद्ध ठेला होवोनी ॥६४॥
स्वरूपीं सावधान । तद्रूत ठसलें हें संपूर्ण । मोडली देहाची आठवण । मीतूंपणा मावळलें ॥६५॥
कर्म अकर्माच्या माथा । तोचि झाला बोलंगता । वर्ण याती कुळ गोत्रता । त्यागी निर्भयता तयासी ॥६६॥
असो वर्ण हें बहुत झालें । प्रश्न निरोपणीं असती उरले । ते पाहिजे निवेदिले । म्हणोन फिरलें मन मागें ॥६७॥

कथितां ग्रंथ वाढे अपार । यंदर्थी निरोपितों सारासार । झाले आठ प्रश्नांचें उत्तर श्रोतीं सविस्तर देखिलें ॥६८॥
प्रश्न गोमटे अनसूयेचे । त्यावरी निरोपण दत्ताचे । वर्षाव होती अमृताचे । सांठवण रसाचें पात्र श्रोते ॥६९॥
तुम्ही श्रोते सावधान । करितां कथामृतरसाचें पान । तुमचेनि श्रवणें निरोपण । गोड गहन विशेषार्थे ॥७०॥
या जगदोद्धारासाठीं । ज्ञानामृत वोगरी दत्तताटीं । हा रस लागेल जयाचे ओठीं । तोचि पैलतटीं पावेल ॥७१॥
त्याचीं निवारती जन्मसांकडीं । न करी यम तया दृष्टी वांकडी । तया कैंची भवभयवेडी । तो परात्परथडी सत्य पावे ॥७२॥
जया सद्भावें घडे श्रवण । त्याऐसी राहे धारणाधरोन । तयासि पावे पूर्ण ज्ञान । होय सधन स्वात्मसुखें ॥७३॥
दत्त सद्गुरु हा प्रसिद्ध । तोडावया पातला भवबंध । तारक निरोपी हा बोध । श्रवणीं सावध सांठवा ॥७४॥
पुढिले प्रसंगीं निरोपण । गोड असे अमृताहून । त्या रसाचे कर्तेपान । श्रोते संतजन तुम्ही कीं ॥७५॥
तुमचिया आश्रय भूतें । पान होईल या जगातें । तेणें नाश होईल कलिमलातें । पावन पदातें पावतील ॥७६॥
तुम्ही संत साधु महंत । सज्ञान उदार भाग्यवंत । धीर कृपाळू सदय शांत । पुरवीत अर्थ दीनांचे ॥७७॥
तुम्ही अवधूताचे जीवप्राण । अवधूतरूपी तुम्ही निमग्न । म्हणोन विनवीं कर जोडोन । अनाथ दीन हा सांभाळा ॥७८॥
सर्व पतितांहोनि पतित । अन्यायी अपराधी अनंतसुत । संतपदीं शरणागत । म्हणवी अंकित तुमचा ॥७९॥
या विनवणीवरी । लक्ष ठेविजे संतचतुरीं । तुम्हांवांचोनि कैवारी । कोणी साह्यकारी असेना ॥१८०॥
म्हणोनि भाकितों मी करुणा । सदयत्वें अंगिकारा मज दीना । दास आपुला ऐसें म्हणा । हे विज्ञापना पायांसी ॥८१॥
साधू विनय सरूप । तुम्हीच माझे मायबाप । तुम्हांविण हे त्रिविधताप । कोण संताप वारील ॥८२॥
तुम्ही करोनि पूर्ण दया । नाथिजे माझ्या तापत्रया । पूर्ण कृपेची कीजे छाया । तुरवोनि अपाया पायीं ठेवा ॥८३॥
चरणसेवेचें देवोनि दान । वृत्ति करवा समाधान । अंतरीचें गुप्त धन । बाणतां प्रगटोन जीव सुखवा ॥८४॥
पदसेवेची उपासना । देवोनि पुरविजे वासना । सांभाळा आपुल्या पदभूषणा । न घ्यावें दूषणा लावोनि ॥८५॥
मी अज्ञान मतिमंद । अर्भकपणें घेतला छंद । तरी नाणोनि मनीं द्वैतभेद । देइजे पदसेवा मज ॥८६॥
सेवेपरतें अन्य साधन । अणुमात्र न रुचे मजलागून । सेवेमाजी श्रेष्ठ सेवन । संतचरण सेवावे ॥८७॥
हेचि आवडी बहुवस । मानसीं छंद रात्रंदिवस । यासाठीं विनविलें तुम्हास । पुरवा आस एवढी ॥८८॥
तुमचे दयेवांचून । मज न घडेचि कांहीं भाषण । परी या ग्रंथींचें निरोपण । चालविलें महिमान तुमचें ॥८९॥
अनंतसुत हा निमित्तासी । ग्रंथ चालविणें तुमचा तुम्हांसी । बोलविता येथें अविनाशी । वर्म हें मानशी जाणतसां ॥१९०॥
ग्रंथरूपें हा अवधूत । तारक ज्ञान असे बोधित । ज्यासी होणें पारंगत । तो हा गुह्यार्थ सांठवी ॥९१॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । नारदपद्मपुराणींचें संमत । श्रोते परिसोत भाविक भक्त । सप्तविंशोध्यायार्थ गोड हा ॥१९२॥

॥ इति सप्तविंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय २८ वा ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

ॐनमो सद्गुरु परब्रह्म । तूं वंद्य गा आगमनिगमा । दीनवत्सला सुखधामा । नामाऽनामातीत तूं ॥१॥
तूं सर्वसाक्षी गुणवर्धना । तूं कामादिरिपुदळमर्दना । जगद्व्यापका जनार्दना । अघवारणा अविनाशा ॥२॥
जय सद्गुरु तूं आदि अंता । अपरंपार गहना अनंता । अचळ अभंगा अनाथनाथा । कृपावंता नमो तुज ॥३॥
सद्गुरु तूं सदय संपन्न । नाम तुझें पतितपावन । होसी उदार सर्वज्ञ । तुज अभिमान दीनाचा ॥४॥
दीन भाविकांचा कळवळा । तुज अंगीं फार दयाळा । जाणोनि अंतरींचा जिव्हाळा । पुरविसी स्नेहाळा आळ त्याची ॥५॥ करावया दीनोद्धार । सद्गुरु प्रगटलासी दिगंबर । सह्याद्रीवासी योगेंद्र । स्तविती मुनिवर देव प्रेमें ॥६॥
स्तुतिस्तवन तें तोषोन । शरणागता देसी अभयदान । जे जे इच्छि जयाचें मन । ते तूं परिपूर्ण हेतु करिसी ॥७॥
पुरवावे आर्थिकांचें मनोरथ । म्हणवोनि नाम धरिलेंसी त्वां दत्त । सदा सबाह्य स्वानंदभरित । पुरवी आर्त सकळांचें ॥८॥
उदारत्व जाणोनि लक्षण । अनसूया आदरें करी प्रश्न । तिचें आर्त करावया पूर्ण । स्वमुखें निरोपण करिसी प्रेमें ॥९॥
गत कथाध्याय अंतीं । निवडिल्या प्रश्नाच्या व्युत्पत्ति । यातीसंबंध निश्चितीं । ते पद्धति निरोपिली ॥१०॥
आठ प्रश्नांचें निरोपण । श्रोतीं ऐकिलें सावधान । मागुतीं दत्त अनसूयेलागून । बोले विनवून परियेसी ॥११॥
माते तुझा प्रश्न नवखा । किं कर्मेंति असे बरवा । निरोपितों तोही परिसावा । आत्म अनुभवा आणिजे ॥१२॥
देहालागीं दश इंद्रिय । हे जाणती अपुलाली सोय । क्रिया विभक्त वेगळी होय । तो तुज निर्णय निवेदितों ॥१३॥
ज्ञानेंद्रियें कासया म्हणती । वस्तुज्ञान आहे तयांप्रती । कवण इंद्रियाची कवण स्थिती । तेही निगुती परिसिजे ॥१४॥
कर्णेंद्रियें करावें श्रवण । मकरंदा जाण तें घ्राण । द्रव्य पदार्थी जाणपण । ते हे नयन पाहती ॥१५॥
रसना रसातें जाणती । सर्व चवीसी वोळखिती । त्वत घातपात वायोप्रती । जाणें निश्चितीं ज्ञान हें ॥१६॥
ऐसेचि कर्मेंद्रिय पांच जाणा । ते नेमिले आपुलाल्या कारणा । कैसी म्हणती ते भावना । करितो निरोपण ऐकिजे ॥१७॥
मुखें कीजे शब्दोत्तर । म्हणे त्यास अन्नोदक विकार । पाणी करिते कारभार । बहु विस्तार तयाचा ॥१८॥
चरणाचें एक मात्र चालणें । उपस्थासी लवकी मैथुन । गुदीं शुद्र मल त्यागणें । हीं कर्माचरणें तयांचीं ॥१९॥
या दश इंद्रियांचे क्रम । प्रसंगीं आचरती आपुले धर्म । येथील कर्तव्यपणाचें वर्म । असती नेम परस्परें ॥२०॥
या इंद्रियकर्माचा आचरता । मी होय हे नुपजे वार्ता । अद्वैत दृष्टि निरखितां । देहीं स्वानंदता परिपूर्ण ॥२१॥
जो जो कांहीं पदार्थ दिसे । तो तो ब्रह्मरूप अवघा भासे । आत्मविचारणीं निश्चय असे । व्यापारी नसे इंद्रियांच्या ॥२२॥
इंद्रियें व्यापारीं राहाटतीं । विचारें म्हणे नोव्हे माझी कृती । वोलाऐसी ठेवी वृत्ती । पाहे चित्तीं कर्ता त्या ॥२३॥
जो इंद्रियांसी चाळिता । त्यासीच साजे त्याची सत्ता । आपण साक्षित्वें राहतां । दोष माथा त्या कैंचा ॥२४॥
सहजीं इंद्रियें भोग होती । त्यांचा हर्षशोक नाहीं चित्तीं । करणें केलें हेही वृत्ती । हेहि स्थिती मनीं नसे ॥२५॥
लाभ हानीं मानापमान । सहजीं येतात घडोन । आनंद दुःख दोन्ही समान । कर्मी भिन्न जाणा तो ॥२६॥

नियम नेमिला ज्या रीतीं । इंद्रियां साधवी तेचि गती । तेथेंहि शक्यता नये चित्तीं । शुद्ध निश्चितीं कर्म हें ॥२७॥
देह इंद्रिय व्यवहार । हे चालतानी परस्पर । आपण आत्मत्वीं सदा स्थिर । लौकिकाचार दावी वरी ॥२८॥
कर्म यातेंच म्हणावें । या गुणें यातें वोळखावें । आतां अकर्मातें पारसावें । सावध व्हावें श्रवणार्थी ॥२९॥
प्रारब्धयोगें कर्म घडती । लाभ अलाभ वोळखोनि येती । तेथें दुःखलोभ वाटे चित्तीं । मग अहंकृती केल्याची ॥३०॥
म्यांचि बांधिलें घर । म्यां वाढविला हा व्यापार । माझेनि हे सर्व थोर । मीच कारभार कर्ता की ॥३१॥
म्यां अमुकाचें कार्य केलें । म्यां अमुकाचें चालविलें । म्यांच लौकिक मेळविलें । यश संपादिलें म्यां तेथें ॥३२॥
असो जें जें अहंपण । तेंचि बंधासी असे कारण । हे अकर्माची ओळखण । पुढती निरूपण ऐकिजे ॥३३॥
देहीं लोभ आशा बहुत । नाना फलविधि मनांत । तदर्थ योजना करीत । तेहि निश्चित अवधारा ॥३४॥
यज्ञ तप आणि दान । जप होम देवतार्चन । सेवा बहुविध आचरे पूर्ण । आदर सन्मान तदर्थी ॥३५॥
शुद्ध अथवा दुष्ट पंथ । साधावया आचरती फलार्थ । जगीं मीपणाचा लौकिकार्थ । अकर्म निश्चित हे जाणा ॥३६॥
कां जरी ऐसें म्हणसी । संकल्पीं गुंते हा फळआशीं । मग तें भोगणेंचि लागे निश्चयेंसी । अकर्ता ऐसियासी म्हणावें
॥३७॥ लोभामुळें चढे अहंता । अधिकाधिक होय कर्मकर्ता । त्याची त्यास घडे बाधकता । कैंची मुक्तता अकर्म हें ॥३८॥
हें आचरल्यारूपेंचि कर्म । सुखदुःखें भोगाचें हें वर्म । अहंगुणें हें अकर्म । हाचि उगम जन्मपंक्ती ॥३९॥
कर्मे त्रिगुण असती । रज तम सात्विक निश्चितीं । ते जागावया निगुतीं । करितों निवृत्ती किंचित ॥४०॥
रजोगुणाचा प्रकार । फलार्थ अवघा विचार । लावणी तेथें अहंकार । सदा तत्पर अर्थार्थी ॥४१॥
आतां जो वा तमोगुण । तेथें अहंकार दारुण । इच्छी ऐसें घडवी कारण । खहिंनीं प्राण वेचिती ॥४२॥
साधितां साधी बहुत । न साधितां त्यासी क्षणांत । दुःख शोक पीडा भोगांत । परा देत तैसाची ॥४३॥
आतां सात्विकाचें कर्म कैसें । घडोन येईल घडो तैसें । निमद्द कारणीं कांहीं नसे । भावना असे हरि अर्पण ॥४४॥
काया वाचा मन प्राणेंसी । वित्त आणी धनेंसी । जें जें घडेल ते हरीसी । अर्पी सद्भावेंसी सप्रेमें ॥४५॥
यज्ञ याग तप दान । जें ज्या काळीं येत घडोन । लाभ अलाभ हानी पूर्ण । ईश्वरार्पण सर्व त्याचें ॥४६॥
जी जी उद्भवे देहीं भावना । ते ते योजी नारायणा । फळाशा न ये त्याचिया मना । संकल्प नाना न करी तो ॥४७॥
संकल्प विकल्प दोन्ही नाहीं । ब्रह्मार्पण त्याचें सर्व पाहीं । कदा न पडे संशयडोहीं । स्मरतो देहीं विधातिया ॥४८॥
हे त्रिगुणात्मक लक्षण । कर्म अकर्मी दाविलें जाण । आतां पुढील प्रश्नाचें निरोपण । करा श्रवण सद्भावें ॥४९॥
तप तें म्हणावें कोणासी । तरी तें निवेदितों तुम्हांसी । अपरोक्षज्ञान जें पावसी । तप निश्चयेंसी तेंचि होय ॥५०॥
अपरोक्ष ज्ञानाचा विलास । सोस जगन्मिथ्याभास । ब्रह्मरूप देखे सर्वांस । अंतर्बाह्यास एकत्वें ॥५१॥
संकल्प विकल्परहित जाण । देहवृत्ती स्वरूपीं लीन । ब्रह्मत्वभावें सर्व भाषण । आत्मविवरण विवेकें ॥५२॥
जें जें दृष्टीचें देखणें । तें तें ब्रह्मरूप पाहणें । अध्यात्मज्ञानाची श्रवणें । तेंचि निरोपणें साधिया ॥५३॥
सदा स्वरूपीं निमग्न । गमनागमनीं नव्हे चलन । यातेंचि तप म्हणावें पूर्ण । अद्वय संपूर्ण जग देखे ॥५४॥

निद्रा द्वेष आणि राग। विकार विषय नावडे भोग। जगीं वावरोनि निःसंग। तप तें अभंग या नांवें ॥५५॥ सर्व गुणें सहिष्णुता। उपसर्गेही न घडे सवादता। अंतःकरणीं नये उपजाळता। एवं तपता हे जाणा ॥५६॥ हें तपाचें केलें विवरण। आतां निवेदितों असुर कोण। तें श्रवण कीजे सावधान। हृदयीं निरोपण सांठवा ॥५७॥ जप तप पूजा ध्यान। यज्ञ याग करितां दान। सन्मार्गिक नाना आचरण। आत्मविवरण आध्यात्मिक ॥५८॥ हे देहीं जीवभावें आचरता। यासि जो होय विक्षेपकर्ता। त्या नांव म्हणिजे असुरता। तेही पृथकता ऐकिजे ॥५९॥ दूरींचे उपसर्ग दूर असती। परी जवळील घाता प्रवर्तती। ते निवडोनि सांगतो निश्चितीं। तयाची शांती आधीं कीजे ॥६०॥ राग द्वेष अहंकार। काम क्रोध मद मत्सर। दंभादिक बुद्धिविकार। हेचि असुर निश्चयें ॥६१॥ यांचे आधीं करितां शमन। बाह्य असुर उठती कोठून। यांचे स्वभाव घातक जाण। यांसी जपून राहिजे ॥६२॥ आतां ज्ञान तें कोण। यदर्थी असे तुझा प्रश्न। त्यांचे करितों निरोपण। होवोनि सावधान परियेसा ॥६३॥ देहीं एकादश इंद्रिय प्रबळ। येथें सावध राहिजे सर्व काळ। विपरीत मार्गी वरळ। एकही पळ जाऊं नेदी ॥६४॥ सन्मार्गी तें लावावें। आडमार्ग विवेकें रोधावें। कार्य नेमोनिया चावें। कुकर्मी गुंतवावें तयांसी ॥६५॥ इंद्रियें असती सैराट। यांसी वावरती चहुंकडे वाट। चेवल्या न सोडिती हाट। शेवटीं वीट यांचेनी ॥६६॥ सुमार्ग कुमार्ग हे दोन। दोहीं ठायीं यांचे गमन। कुमार्गी लागतां भोगविती भ्रमण। कदा मग शीण न वारे तो॥६७॥ या दश इंद्रियांचा अधिपती। अत्मात्रें मन हें निश्चितीं। मनोवेगें हे धांवती। कर्म करिती स्वइच्छें ॥६८॥ मनासि कांता दोन पाहीं। सुमती कुमती वसे देहीं। जी संगें रमे तेचि होई। सैराट जाई तेसेंची ॥६९॥ त्यांत उत्तम ही सुमती होय। कुमती संगें होय अपाय। तेवींच संतती त्यांची होय। भांडवा जाय वेंचोनी ॥७०॥ कुमतीची पाहे संतती। पाप अपेश अपकीर्ती। हे कुहरीं नेवोनि पाडिती। भोगविती दुःखरूप ॥७१॥ ते भोग अति अनिवार। भोगितां भोगणें दुःख फार। कधींहि न चुके जन्मगार। त्यासी अंतर पडेना ॥७२॥ याचा सांगता विस्तार। तरी कथा वाढेल अपार। म्हणोनि किंचित ध्वनिसार। बोलिलों विचार कळावया ॥७३॥ आतां त्या सुमतीची संतती। पुण्य यश आणि कीर्ती। हे अद्भुत जोड जोडविती। अप्राप्य होती लाभ लाभें ॥७४॥ तेही असती त्रिविध क्रम। सकाम आणि निष्काम। एक उभयमिश्रित नेम। फळें हीं उत्तम तयांची ॥७५॥ निष्काम बुद्धीचें आचरण। तेथें फळइच्छेचें नाहीं कारण। कृत्य ईश्वरीं अर्पण। ते पूर्ण जनन न पावती ॥७६॥ तेणें जन्मोनि सार्थक केलें। जन्ममरणातें खुंटविलें। अविनाशपदीं बैसले। स्वयेंचि जालें तद्रूप ॥७७॥ सकामें करितां आचरण। तो इच्छिलें फळ पावे जाण। जन्मोनि सभाग्य होय पूर्ण। तेंचि कारण पुढतपुढतीं ॥७८॥ तयालागीं मुक्ती चार। आवडेल ती म्हणती वर। ऐसा तयाचा प्रकार। अतिसुंदर योजिला ॥७९॥ आतां समेष्टीचा गुण। तोही असे लाभकरण। उत्कर्ष ज्या पक्षीं येईल दिसोन। फळ निदान तें तया ॥८०॥ कामनिक आचरतां काम पावे। निष्कामें परमात्मपद पावे। हें सार सर्वही जाणावें। आचरण आचरावें पाहोनी ॥८१॥ या अंशें सत्य आचरतां। नवचे कधीं तो दुःखपंथा। सद्भाग्य भोग होय पावता। पावे मोक्षता सुकृतें ॥८२॥

असो विस्तार सुमती-कुमतीचा । सारस्य निवेदिला तुम्हां साचा। उत्तमासी गुण पाहिजे उत्तमाचा । अनुतमाचा अनुत्तम ॥८३॥ जयातें आपुलें स्वहित साधणें । तरी विवेकें मनातें बोधणें । सुबुद्धीसी ऐक्य करणें । क्रम बाणविणें इंद्रियां ॥८४॥ हरिकिया पुराणश्रवण । दीनशब्दीं वोडविजे कर्ण । त्याचें मनें कीजे विवरण । हेंचि लक्षण प्रथम पैं ॥८५॥ रसना गुंतवावी नामस्मरणीं । विनटवावी अमृतभाषणीं । रसज्ञता असे तिजलागोनी म्हणोनिया कारणीं योजिजे ॥८६॥ रसना हरिगुणनामीं रंगतां । मनासी लागेल ती ध्यासता । हा दुसरा प्रकार बाणतां । उपजेल चित्ता चाड ध्यासें ॥८७॥ चरणें करावें तीर्थाटण । देव संतसदनी करावें गमन । अथवा कांहीं प्रदक्षिणे योजून । तिसरा गुण संपादिजे ॥८८॥ करांसी योजना कराऐसी । देवगुरुद्विजपूजनासी । अथवा पादसंवाहनासी । दान तालिकेसी लावावें ॥८९॥ हा आर्चनिक गुण चवथा । आदरें अभ्यासविजे हाता । विष्णुनिर्माल्य सुवासता । ही योग्यता नासिकीं ॥९०॥ हा पांचवा गुण निवेदिला बरवा । पुढील परिसिजे सहावा । साळंकृत पूजोनि माधवा । नेत्रीं विंबवा मूर्तिते ॥९१॥ गुरुदेवाच्या मूर्ती निवाडे । अवलोकितां ध्यान नेत्रीं जडे । मग मनही तेथें सुखावें । वाडेकोडें ध्यास धरी ॥९२॥ सर्व गात्रीं प्रधान शिर । तें नमनीं योजावें निरंतर । सर्वां भूतीं हा सत्कार । गुण सुंदर सातवा ॥९३॥ नमनीं करितां अभ्यास । द्वैत अहंकारा होय नाश । नुरे पापबुद्धीचा लेश । नमन सर्वांस साधितां ॥९४॥ मूळ भक्ती हें नमन । ते अभ्यासितां आकळे मन । चुकवी चौऱ्याशींचें भ्रमण । पुनरागमन घडेना ॥९५॥ संत साधु गुरु देवासी । योगी सिद्ध ज्ञानी द्विजांसी । प्रेमे आलिंगावें तयांसी । धन्यता कायेसी या गुणें ॥९६॥ हा गुण होय आठवा । रंगोनि मनोवृत्ति हृदयीं सांठवा । याचि शृंगारें काया नटवा । अभ्यास घटवा यापरी ॥९७॥ ऐसिया गुणें इंद्रिय लागतां । सत्संगीं मन पावे बोधतां । प्रेमोद्भवें लागे भक्तिपंथा । होय विरक्तता शांति बाणे ॥९८॥ सत्संगविवेकें ज्ञान ठावें । पडतां अंगीं अनुताप पावे । विशेष वैराग्य उद्भवे । गुणचि गावे हे वाटे ॥९९॥ जाय लज्जा पळे अभिमान । सप्रेम भक्ती उपजे जाण । उल्हास करावया भजन । नामसंकीर्तन हरीचें ॥१००॥ नामसंकीर्तनीं लागतां गोडी । विद्या पाठांतर साधे जोडी । हरिगुणकीर्तिवर्णीं आवडी । उभवी गुढी प्रेमानंदें ॥१॥ नवविधा निवडिले भाग । येणें रंगविजे सर्व अंग । कर्मसंचिताचे जे योग । तेंहि सोंग संपादिजे ॥२॥ सक्त असावें इकडे । असक्त असावें सोंगाकडे । मग लाभ जोडतील रोकडे । मनीं वांकडे नाणितां ॥३॥ एवं येच रीतीं जाण । इंद्रियांचे कीजे दमन । सद्गुरूचे करूनि सेवन । दृढ उपासन राखिजे ॥४॥ घारा रक्षावा लौकिकाचार । परी इकडे पडूं न द्यावें अंतर । येणें उभय पक्षीं प्रियकर । तैसाचि जीवीं आर साक्षा ॥५॥ गृह दारा परिवारासी । आप्तवर्ग मित्रासी । न त्यागोनि वेव्हारासी । तोषवावें त्यासी त्यापरी ॥६॥ परी जो निवेदिला प्रसंग । तो अंतरीं विटों नेदी रंग । येऊं न दीजे तया व्यंग । अखंड अभंग रक्षिजे ॥७॥ दोन्ही पक्ष कैसे चालती । हेंही दृष्टांतें निवेदितों निगुती । नट तारेवरी फिरती । हावभाव दाविती पाहे पां ॥८॥ अंतरीं रक्षिती काया प्राण । हावभावें मागे जगीं दान । कीं उदकीं कुंभ भरोन । घेत रचोन गुर्जरी शिरीं ॥९॥ पल्लवासहीन माध्यावरी । मोकळे करी पंथ आवरी । नृत्य गीत दावी भंवरीं । हावभाववरी पुन्ह चेष्टा ॥११०॥

डोले हालें थरक चमके। क्षणें गजगती क्षणें धमके। पाहतां वेडावती भ्रमके। नाना गमकें ती करी ॥११॥ चालतां पद पडे वेडेंवांकुडें। हावभावीं झमकती चुडे। परी कुंभ न हाले न उदक पडे। लक्ष न बिघडे तेथींचें ॥१२॥ या दृष्टांतीं लक्ष देऊन। ऐसें द्वयपक्षीं रक्षिजे कारण। या नांव इंद्रियदमन। हे आवरीन गुरुसेवनीं ॥१३॥ असो दृढ सद्गुरुउपासना। राखोन कीजे श्रवणकीर्तना। निजध्यास दृग् दृश्य विचारणा। अध्यात्मविवरणा जाणिजे ॥१४॥ सद्गुरुप्रसादें तत्त्वबोध। आत्मानात्म वोळखोनि सावध। गुह्य गुह्य अनुभूतीं प्रसिद्ध। साधिजे शुद्ध विनयतत्त्वें ॥१५॥ एवं साधनीं परिपूर्ण असतां। भावप्रेम सदृढ होतां। तेथें प्रगटे साक्षात्कारता। ज्ञानअनुभवता सहजची ॥१६॥ साक्षात्कारीं ज्ञान झालें। तेव्हां सर्व अंतरस्थान ओळखिलें। तें अंतरस्थ केवीं व्यापलें। पाटवीं भरले तंतुचि कीं ॥१७॥ पटरंगे भिन्न दिसती। सबाह्य तंतूचीच भरती। कीं घटीं बिंबला गभस्ती। तेवीं व्याप्ती व्यापलीसे ॥१८॥ सर्व परमात्माचि व्यापला। विकार पदार्थादि भासला। स्वयंभेदपणा हारपला। एवं लाधला तें ज्ञान ॥१९॥ नैराश्य निर्मोह निरहंकार। ऐसी वृत्ती जयाची स्थिर। चैतन्यरूप अवघा सर्वेश्वर। होय ज्ञान निर्धार या नांव ॥२०॥ हें सार किंचित निवेदिलें गुण। कळावया ज्ञानाचें चिन्ह। विस्तार करितां वाढेल कथन। पुढील निरोपण होणें असे ॥२१॥ ज्ञानलक्षण निवेदिलें। आतां अज्ञान कासया बोलिलें। तें श्रोतें सावध परिसिलें। पाहिज भलें आवडीं ॥२२॥ ब्रह्म सर्वात्मकपणें व्यापक। चेतवी जडातेंचि चैतन्य देख। अभेदपणें निःशंक। एकीं अनेक दाविलें हें ॥२३॥ जळीं स्थळीं काष्टीं पाषाणीं। सजीव निर्जीव राहिलें व्यापोनी। सर्व त्याचीच अवघी करणी। तयावांचोनी कांहीं नसे ॥२४॥ येथें वर्ण याती भेद नाहीं। ओतप्रोत हें ब्रह्मचि पाहीं। परी ईश्वरमायेची नवलाई। असतां ठायीं पडों नेदी ॥२५॥ मोहलोभाचें पसरोनि जाळ। नेत्रां अडवी अज्ञानपडळ। आशापाशें बांधिले सकळ। मांडिला खेळ कळों नेदी ॥२६॥ नेत्रीं पावलें भ्रमें अज्ञान। त्याचें जाणवितों तुम्हां लक्षण। अंधारीं दोर लंबायमान। नेत्रीं पाहून दचकला ॥२७॥ पाहतांचि पावला भयकंप। दोरासीच म्हणों लागे सर्प। सावध म्हणावें कीं झोंप। रज्जुरूप दिसेना ॥२८॥ तेवि ब्रह्म असतां माया म्हणे। पाहूं लागला अज्ञानगुणें। नानाकारें वस्तु निरखणें। बाह्य लक्षणें भुलला तो ॥२९॥ हे माझें मायबाप असती। पैल कांता पुत्र सून निश्चितीं। आप्त मित्र सोयरे होती। हे गोत्रज दिसती बंधुवर्ग ॥३०॥ हे सासु सासरा माऊ दीर। नणंदा जावा कन्याघुर। व्याही जांवई भतार। मामा निर्धार भाचा हा ॥३१॥ हे आपुले हे परावे। हे शत्रु अव्हेरावे। हे निकामे काय करावे। दूरी धरावे वर्णावर्ण ॥३२॥ हे जळचर हे वनचर। हे पक्षी श्वापद थोर। हे जीवजंतूंचे प्रकार। विभक्त विचार चार खाणी ॥३३॥ हें माझें आणि तुझें। कोण कोणाचें वाहे ओझें। रिकामें कासया लाजें। फुकट ओझें कोण काशी ॥३४॥ आप्तातें संगीं सांभाळावें। सोयरे क्वचित्-आदरावे। वोळखी दुरोनि नमावे। इतरां तोषवावें परस्परें ॥३५॥ मित्र आप्त वांचवावे। वादें शत्रूतें दंडावें। द्रव्यवानातें आर्जवावें। निष्ठुर व्हावें दरिद्रिया ॥३६॥ येणें तेथेंचि कीजे जाणें। येणें तेथेंचि कीजे देणें। शुष्कपुजावें शुष्कपणें। नांव न घेणें, अपरोक्षा ॥३७॥ असो हे विचार बहुत। केवढें माजविलें बंड विख्यात। एक असतां दिसे विपरीत। झाले भ्रमित अहंते ॥३८॥

अब्रह्मस्तंबपर्यंत । सर्वांतरीं तोचि व्याप्त । तोचि कर्ता करविता सत्य । सर्वगत सर्व तो ॥१९५॥
सत्यत्वें ऐसें असतां । मायोपाधी हे जीवता । तेथोनि त्रिगुणात्मक अहंता । सर्व भ्रमता तेथोनी ॥१९६॥
पडतां मायेचें आवरण । सद्वस्तु गेली लोपोन । असत् जालें दृश्य मान हेंचि भान ठसावलें ॥१९७॥
सत् असत् तत्पद एक । हें जाणावया जोडिजे विवेक । तें नाचरतां वरी विवेक । असतां दोरक सर्प मानी ॥१९८॥
मूळ पदार्थ हा अविनाश । मायाभ्रमें नोळखी त्यास । कृतीच प्रतिपदीं पावे नाश । विष अमृतास म्हणताती ॥१९९॥
प्रत्यक्ष खवा शर्करा उत्तम । कनक भंगसवें जाली माजुम । ते सेवितांचि पावती भ्रम । आदर संभ्रम मानी तो ॥२००॥
रुचीचें असतां वहुवस । तो तया म्हणे हा कापूस । नग्न फिरे न धरी लज्जेस । दूषण सूज्ञास लावी तो ॥२०१॥
एवं या नांव हें अज्ञान । चोळवीस विस्तारिलें पूर्ण । ये अध्यायीं विवरिले सहा प्रश्न । सत्ताविसाव्यांत नेमून आठ पैं ॥२॥
ऐसे चवदा प्रश्न निवडोनिया । निरोपणीं तोषविली अनसूया । तें सुख पावले संत श्रोतियां । भाविक योगियां सुजनांसी
॥३॥ आर्त मुमुक्षांसी सुभटा । दत्तें दाविल्या ह्या तारक वाटा । तरी पंथ त्यजोनि खोटा । साधिजे चोखटा परमार्थ
॥४॥ पुढिले प्रसंगीं अवधूत । प्रश्नोत्तरें निवेदील अद्भुत । तो रस सांठवीत तुम्ही संत । तुमचेनि अर्थ सकळांचा ॥५॥
तुम्ही संत ज्ञाते मुनी । तुम्हां योग्य असती हीं लेणीं । तो दत्त तुम्हां भूषवी भूषणीं । प्रीतीं करूनी सादरें ॥६॥
करावा हा जगदोद्धार । म्हणोनि तेणें धरोनि अवतार । आपुलें उद्धारशक्तीचें भांडार । तें तुम्हां समग्र सोंपिलें ॥७॥
तुमचा अधिकार देखोनि समर्थ । सद्रूप जाले देवदत्त । सदैव स्वानंदें रमत । लीला दाखवीत तुम्हांमाजी ॥८॥
श्रीदत्त आणि संत । येथें नाहींच द्वैत । अद्वयरूपें आनंदभरित । सकळ दीनार्थ जागतसां ॥९॥
तुम्ही औदार्याचे सागर । पतितपावन समर्थ थोर । या कीर्तीनें उजळलें अंबर । जैसा शीतकर शांत तैसे ॥२१०॥
ऐसें ऐकोनिया श्रवणीं । अनंतसुत आला धांवोनि । गडबडा लोळे संतांगणीं । मिठी चरणीं दे प्रीतीं ॥११॥
विनवी भवभयाचे डोहीं । बुडतों ताराया अपायीं । अभयदान देवोनि लवलाहीं । धरा हृदयीं भय वारा ॥१२॥
तुम्ही अंगीकार केलिया । केवीं पावेन मी अपाया । तुम्ही जाणतसां या उपाया । म्हणोनि पायां विनटलों ॥१३॥
तुम्ही साधु कृपावंत । जाणतां माझें मनोगत । तें पुरवावया समर्थ । तुम्हीच निश्चित असां की ॥१४॥
मी अनाथ अपराधी दीन । त्रिवाचा म्हणे मी तुम्हां शरण । मज करोनिया पावन । सेवादान देइजे ॥१५॥
सचरणारविंदभ्रमर । सद्गुरुअनंताचा कुमर । विनवीतसें वारंवार । करा अंगीकार सुताचा ॥१६॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपद्मपुराणींचें संमत । श्रोते परिसोत भाविक भक्त । अठ्ठाविसोध्यायार्थ गोड हा ॥२१७॥

॥ इति अष्टाविंशोध्यायः समाप्तः ॥

## ॥ अध्याय २९ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

जयजय सद्गुरु परब्रह्मा । अज अजित अनामा । अतर्क्य तूं निगमागमा । सर्वोत्तमा तुज नमो ॥१॥ जयजय सद्गुरु व्यापका । करुणार्णवा सर्वात्मका । विश्वंभरा विश्वपालका । सुखदायका नमो तुज ॥२॥ जयजय सर्वेशा उदारा । गुणातीता गुणगंभीरा । परमानंदा परात्परा । दीनोद्धारा तुज नमो ॥३॥ जयजय सर्वाधीशा सद्गुरुराया । शरणागत मी तुझिया पाया । कृपा करोनि देईजे अभया । तव गुण गावया मती दे ॥४॥ तव प्रसादाचे महिमान । अद्भुत चालविसी निरोपण । वाट पाहती श्रोतेजन । करवी पान कथामृत ॥५॥ श्रद्धा अनसूया माउली । सप्रेमें वाट पाहे वेल्हाळी । तिची पुरविजे येगीं आळी । तोपवी मंडळी सज्जनांची ॥६॥ तूं दत्तदिगंबर ज्ञानसागर । तव हृदय कोमल अत्यंत फार । जाणोनि आर्थिकांचे अंतर । प्रश्नोत्तर निरोपी ॥७॥ वोळखोनि सकळांचें मानस । श्रवणीं देखोनिया उल्हास । परमानंदे सद्गुरु अविनाश । सावध सकळांस म्हणतसे ॥८॥ दत्त वंदे अभयोक्ती । परमार्थ वासना तुमचे चित्तीं । कितेक आर्त भूत आन पदार्थी । नाना विभक्ती तयांच्या ॥९॥ परि भक्तिभाव निष्ठा साधन । आचरतील तैसा मी जाण॥ तयांचे मनोरथ करीन पूर्ण । दत्त अभिधान नाम धरिलें ॥१०॥ नामाऐसीच कृती । सुपजे कदा अदत्तवृत्ती । परि अनन्य आर्थिक वोळखोनि प्रीतीं । त्याचरीतीं मी तया ॥११॥ पूर्ण करावया मनोरथ । त्रिगुणात्मकें प्रगटलों दत्त । तुमचे हृदयींचें आर्त । मी समर्थ पुरविता ॥१२॥ ऐसी ऐकोनि अभयवाणी । जयजय शब्दें उठली ध्वनी । तो आनंद न समाये गगनीं । हृदयभुवनी कोंदाटला ॥१३॥ जेवीं चातक वेधलें चंद्रामृतासीं । कीं देवसुर त्या स्वर्गामृतासी । तेवींच श्रोते कथामृतासी । वेधले श्रवणासी प्रेमळ ॥१४॥ तयां प्रेमळांते देखोन । द्रवलें अवधूताचें मन । म्हणे करा जी कथामृतपान । करितों निरोपण सुंदर तें ॥१५॥ गत कथाध्याय शेवटीं । निवेदिली अज्ञानरहाटी । ते श्रोतीं सांठवोनि पोटीं । पुढच्या गोष्टी विचारा ॥१६॥ पुढें कः संसारः म्हणोन । मजमातेचा असे प्रश्न । तरी तेचि करितों निरोपण । श्रोते सावधान असावें ॥१७॥ अनादि जो क्रम । जो चालत आलासे उत्तम । तो मायावी संभ्रम । तेथें निगम वासनेसी ॥१८॥ तया वासनेचा उद्भव । आणि षड्विकारिक समुदाव । युक्त व्यवहार वैभव । लीला अभिनव विस्तार हा ॥१९॥ तेथें जन्मादि सुखसोहळे । तदुक्त मार्गीचे पुरविजे डोहाळे । सोपस्कारें वाढविजे कुळें । श्रेष्ठानुवळें आचरणा ॥२०॥ मृतादिकांचे विचार । शास्त्रानुसंगे कीजे प्रकार । शुद्ध चरणीं आचार । या नांव संसार बोलिजे ॥२१॥ शास्त्राचार वृद्धाचार रीती । जाणोनि अधर्मातें त्यागिती । सदाचरणें आचरती । संसार म्हणती या नांवें ॥२२॥ काया कष्टें तपधन जोडावें । पावतां फळ ये निजभावें । अविचारीं कर्वी न बुडवावें सारासार जाणावें संसार हा॥२३॥ विकृति विकाराचा योग । विवेकें राखिजे त्याचा संग । परमित नेमिल्या ऐसा भाग । तो तितुकाचि विभाग त्या दीजे ॥२४॥ ते न होती कदा विभक्त । परी त्यामाजी नसावें सक्त । त्यापासोनि राखिजे मन विरक्त । संसारीं उक्त प्रकार हा ॥२५॥ इंद्रियांच्या चंचल कृती । त्यां विघडोनि लाविजे सुपंथीं । सार जाणावया योजिजे वृत्ती । संसार निश्चिती

भुलले देह गेह कामिनीसी । धन धान्य संपत्तीसी । कितेक भुलले वैभवासी । राज्यपदासी पाहोनिया ॥३९॥
नाना कामें धामें व्यापार । भुलले पाहोनि कारभार । लोभ मोहें केले जर्जर । कर्तृत्व अनिवार करिताती ॥१४०॥
द्रव्य कांता राज्यपद । लाभ दिसती नानाविध । तयासाठीं अनेक छंद । घेती उपाध कळी करिती ॥१४१॥
घातपाताच्या नाना रिती । आशालोभें सर्व करिती । नाना जप अनुष्ठानें आचरती । मोलें विकिती कर्णेसह ॥४२॥
सुज्ञ ज्ञानी सत्य बोधिती । कीं हें आचरतां तुम्ही अनीती । पुढें बरवी न दिसे गती । दुःख फजिती भोगाल ॥४३॥
सत्य सांगतां निश्चयेंसी । कटु फार वाटे तयांसी । सन्मार्गवचनें विषाऐसीं । विष तें सुखासी पात्र तयां ॥४४॥
येथें दृष्टांत योजून । ऐका सांगतो सावधान । सर्पे डंसिलें एकालागुन । तेथें सज्ञान पावले ॥४५॥
तंव तें सर्पविष अंगीं चढत । दर्दरोनी मुंगिया धांवत । सुषुप्ती अत्यंत दाटत । जाणतें पुसत तयाप्रती ॥४६॥
त्याचे घुर्मित देखोनि नयन । म्हणती तुझी अवस्था कोण । दृढ हांके करितां पाचारण । बळें नयन उघडोनि पाहे ॥४७॥
पुसती वृत्ती कैसी झाली । येरू म्हणे निद्रा आली । मज घेऊं द्या आतां वहिली । बोबडीं बोली बोलत ॥४८॥
परीक्षक म्हणती चिकित्सा करा । एक म्हणे सर्पदंश खरा । एक म्हणती उभें करा । त्यासी विचारा अन्नाहार ॥४९॥
तयासि उभे जंव करिती । तंव तो धरिली न सोडी क्षितीं । बळेंचि तयासी उठविती । कानी पिटिती टाळी हांका
॥१५०॥ कांहीं एक घुर्मित बोले । म्हणे माझे पाय जड झाले । मुंग्यांनीं शरीर व्यापिलें । नेत्र उघडिले गुद्दुदती ॥५१॥
आतां मज लागू द्या डोळा । तुम्ही जा आपले स्वस्थळा । मज न जागवा ये वेळा । आनंद जीवाला वाटतो ॥५२॥
भ्रांती झोंपेची दाटली । जिव्हेनें न बोलवे बोली । हें ऐकोनिया सकळीं । परीक्षा आरंभिली तयाची ॥५३॥
कास्तियाचे शीतळ ताट । तें मागोन स्पर्शितां पोळली पाठ । म्हणें जळालो वदे गोष्ट । शाहाणे स्पष्ट सर्प म्हणती॥५४॥
एकें निंब वाटोनि पाजिला । म्हणे गोड पदार्थ हा चांगला । मागोनि गूळ मुखीं घातला । तेणें थुंकिला म्हणे कडू ॥५५॥
कोणी घालिती मिरच्या मीठ । तें चावितां न मानी वीट । म्हणे हे लागत फार चोखट । साखर कडवट जर हें ॥५६॥
अहो जया चावला एक फण । त्याची अवस्था हे कोण । सर्व असत्यच बोले मायण । चवीस दूषण हा लावी ॥५७॥
जया पंचफणीचा दंश झाला । तो अत्यंत भ्रांती पावला । परीक्षा दाविते तुम्हांला । विचारें दाखला ऐसाची ॥५८॥
माया आवरण अंधारी । विषय पंच फणा सर्प भारी । तेथें खेळतां हा निर्धारी । झालीसे परी अद्भुत ॥५९॥
तया सर्पाची झटपट बहुत । खेळतां देखोनि दंश करित । लोभ मोहाचे रोविले दंत । केला भ्रांत क्षणमात्रें ॥१६०॥
तुझें माझें म्हणतां । तया अहंकारें पावविलें घाता । माया निविडी दंश होता । जाली विगलिता शरीराची ॥६१॥
सर्पदंशाना ते काळीं । कामिनी कामाची पित्तें क्षोभली । तों खाज नेत्रा सुटली । विपरीत जाली बुद्धि तेणें ॥६२॥
विषयीं अत्यंत सक्त जाला । उन्मादें आचरे अन्य लीला । तेथें शिकवण देतां त्याला । निंदा द्वेषाला प्रवर्तनो ॥६३॥
ते निंदाद्वेष करितां । आपुली स्तुति वाउगिनां । तेणें कालिमा चढली दंता । पैसी विखारता पहा हे ॥६४॥
धन्य या विखाराची मात । सीपुत्रलोभें जाला भ्रांत । पैके पत्सनेच्या मुंग्या धांवत । कांहीं न मानीत वतणाचें ॥६५॥
तो सुज्ञ साधु योगिराज । तेथें पावले ते सहज । निरखोनि म्हणती हें काज । बरवें आज न दिसे याचें ॥६६॥

घातक चिन्ह वोळखोनी । वरवी परीक्षा मांडिली त्यांनीं । सुबुद्धि कांसे लावितां कानीं । तो झिडकावोनी नको म्हणे ॥६७॥ सुबुद्धि असतां शीतळ । तयालागीं ते उठती ज्वाळ । तंव दुसरा योग निर्मळ । भजन गूळ दीधला ॥६८॥ तो नावडे तयासी । कडू म्हणोनि थुंकी त्यासी । नाना विषय कडू देतां वेगेसी । लावितां मुखासी गोड म्हणे ॥६९॥ टाकोनि गोट भजन किर्तन । नावडेचि कांहीं पुराणश्रवण । हें प्राप्त होतां जाय मागोन । गुंततां कुसमुसोन चुळबुळी ॥१७०॥ नावडे तया किर्तनरस । नाच बहुरूपी भाळे भडव्यास । सारी नारी चोरी संगास । भंग मदिरा सुरस आवडे ॥७१॥ कामक्रोध क्षार मिरची । आवडीं सेवी न पाहे रुची । अधिकोत्तर प्रीती त्याची । मानी साची मिष्ट बहु ॥७२॥ वेदांतज्ञान शर्करा । देतां न करी अंगीकारा । मनापासोनि ओकारा । रस शृंगारा सेवीत ॥७३॥ ऐसी परीक्षा येतां कळोन । विषय पंचफणी दंश आला दिसोन । म्हणती या उठवा सज्ञान । न सोडी तें स्थान नुठेची ॥७४॥ स्वार्थ संपत्तीच्या योगें त्यासी । जडत्व आलें बहु चरणांसी । घुर्मित जाला नयनासी । झडपिला निश्चयेसी विखारें ॥७५॥ यायोगें गेला भुलोन । स्वसत्यत्व गेला विसरोन । नुघडती कदापि लोचन । मलतें वरळोन वदे कीं ॥७६॥ खरें मुळींचें हरपलें । खोटें तेंचि खरें भासलें । अंगीं नसतां लावोनि घेतलें । लोभें वाढविलें तर्कट ॥७७॥ संकल्पविकल्पें वाढला भेद । वासनायोगेंचि जाला बद्ध । कल्पनेचें भूतप्रसिद्ध । लावोनि बाध घेतला ॥७८॥ मीं कर्ता म्हणोनि कर्म केलें । तेंच कर्म भोगणें आलें । जैसें कृत्य तैसें फळें । हें तों न कळे अज्ञाना ॥७९॥ आशा लोभ मोह जाण । यांसी लोलिंग होतां मन । कल्पना वाढवी दारुण । मनोरथ पूर्ण व्हावया ॥१८०॥ धनकोश राज्यभार । मिळावे मजसी छत्रचामर । बळ पराक्रम कीर्ती थोर । भूप किंकर मजपुढें ॥८१॥ सुंदर कांता संतती । मिळावें यश बरावी जगतीं । मज ऐसा दुसरा क्षितीं । नसावा अधिपति म्यां व्हावें ॥८२॥ पूर्व कर्में जरी हें पावे । तरी भू सोडोनि लोकां धावे । स्वर्गपद प्राप्त व्हावें । यदर्थी करावे योग कांहीं ॥८३॥ त्या लाभलोभें हवीं भरे । नाना यज्ञकर्मातें आचरे । डोळे भरलेति पूर्ण धुरें । कर्म अविचारें अवलंबी ॥८४॥ केव्हढा उद्धवे जीवीं सोस । परी हें न कळे पदा नाश । सामुग्री सरतां भूमीस । गर्भवास घेणें कीं ॥८५॥ जिहीं देह यज्ञीं आपर्ले । तेचि सूडार्थ प्रवर्तते जाले । पाहिजे त्यांचें उसणें फेडिलें । भोग भोगविले भोगिजे ॥८६॥ विषयभ्रमें भोगिले भोग । परी ते भोग नोव्हेत जाणा रोग । जन्ममरणासी संयोग । हे उद्योग असती ॥८७॥ या जन्ममरणापासोनि सुटावें । या जगदीश्वरासि भेटावें । कधींहीं न जीवीं वाटावें । प्रेमें विनटावें विषयसुखा ॥८८॥ विषय तितुका विषची आहे । केलिया न अमृत होय । हीं न कळे जया सोय । अज्ञान होय या नांव ॥८९॥ हें विलोमिक दाविलें । येणें ज्ञानीं साशंकित जाले । परी अर्भका कळविलें । तुम्ही न दूषिलें पाहिजे या ॥१९०॥ आतां निवेदितों सज्ञानासी । लक्ष देइजे मम शब्दासी । काय म्हणूं या अज्ञानासी । समज यासी पडेना ॥९१॥ सत्य ब्रह्म सनातन । तेंचि विस्तारलें परिपूर्ण । पदार्थ मात्र नसे त्याविण । अवघा व्यापून तोचि तो ॥९२॥ धर्म कर्म अकर्म विकर्म । अधर्म धर्माधर्म । कृत्य अकृत्यादि वर्म । उगम निगम तोचि कीं ॥९३॥ गति सुगति अवगती । मति सुमती कुमति । देह इंद्रिय मनाच्या वृत्ती । कर्तृत्व कारणस्थिती तोचि पै ॥९४॥

म्हणिजे या ॥२६॥ सर्व श्रेष्ठ रूढिप्रकार । आचरणींच तें निवडिजे सार । सर्व साराचें जें निजसार । तोचि विचार जाणिजे ॥२७॥ नेमाऐसें सर्व कांहीं । होत असें साच पाहीं । सुखदुःखाचे प्रवाहीं । न मनोनि देहीं सावध ॥२८॥ आचरतां प्रपंचकारण । जाणिजे जीवांजीवींचे जीवन । देह सरतां राहिजे आपण । संसाररूप हे रक्षी ॥२९॥ रंग भोगिलेंसे दिसावें । परी तें अंगीं कांहीं नसावें । सर्वा ऐसें सर्वी वसावें । असोनि नसावें कोठेंची ॥३०॥ ऐसिया परी असतां । भय नाहीं जातांयेतां । हेंजि संसारीं धन्यता । संसार पाहतां ऐसाचि हा ॥३१॥ बंध:म्हणजे तो कोण ।:हा सोळावा असे प्रश्न । तरि तोहि सांगतो निवडोन । श्रोतीं सावधान परिसीजे ॥३२॥ अहो हा जन्मोनि प्राणी । आपुली आपण करितो हानी । माझें मी कर्ता या अभिमानी । पडिला बंधनीं संकल्पें ॥३३॥ पिता माता माझे सहोदर । अपत्य कांता माझें घर । मी कर्ता माझा संसार । ग्राम सुंदर हें माझें ॥३४॥ माझाचि वर्ण श्रेष्ठ असे । मजहोनि थोर कोण्ही नसे । मीच सर्वांमाजी योग्य दिसें । सभागी म्हणतसे आपुलिया ॥३५॥ एवं सभाग्यसंपन्न । आणिक असावा धनमान । विषयसुख मिळावें पूर्ण । करी यत्न यासाठीं ॥३६॥ राज्यपद प्राप्त व्हावें । स्वर्गपदादि मिळावें । पराक्रम योग सिद्धीस जावे । अभ्यासी मिळवावें मोक्षधन ॥३७॥ यासाठीं नाना संकल्प करी । व्रत तप दान मौन्य धरी । यज्ञादि आचरे नाना परी । फलइच्छा अंतरीं धरोनिया ॥३८॥ नीच कर्में होय कारण । ऐसें कोण्ही केलें जरी श्रवण । त्यासाठीं सोडी लज्जा भय मान । करी प्रयत्न बहुतची ॥३९॥ मनें संकल्प करावे । यदर्थ भलें कर्म आचरावें । अनुचित आलिया न भ्यावें । मागें न सरावें किंचित ॥४०॥ भोक्तृत्वा ऐसें घडोनि येतें । परी न सोडी तो प्रयत्नातें । पावे संकल्प बंधातें । न कळे त्यातें वर्म कांहीं ॥४१॥ परभाग्यातें पाहोन । विकल्पित करी आपलें मन । तदर्थ प्राप्तीलागून । संकल्प दारुण वेंची उगा ॥४२॥ धन पाहतां धन यावें । रूप पाहतां रूप व्हावें । यदर्थीं दृढ संकल्प करावे । वासनेंत गुंतावें या रितीं ॥४३॥ कल्पना संकल्प वासना । हेंचि मूळ असे बंधना । यदर्थीं दृष्टांतरचना । आली निरोपणा परिसिजे ॥४४॥ कोण्ही एक पुरुष । अलंकारीं नटला विशेष । उपाहनें नूतन चरणांस । घालोनि मार्गास जाय रजनीं ॥४५॥ तों ते शुद्ध पक्षींची यामिनी । खुली न राहिली चंद्र चांदणी । तें आनंदोनि तो मनीं । चाले हूडपणीं एकला ॥४६॥ सवें कोण्ही त्याचे नसतां । एकलाच मार्ग जाला क्रमिता । तों खडक माळभूमी पावतां । अद्भुत घात्ना वर्तली ॥४७॥ मुळीं होता निर्भय मनीं । तंव नवा जोड वाजे चरणीं । माळसंगें अचाट ध्वनीं । कर्कर कर्णी ऐकत ॥४८॥ प्रतिध्वनी माळयोगें । वाटे कोण्ही आले मागें । भय उद्भवलें ध्वनिसंगें । परम लगवगें चालत ॥४९॥ भयें चालतां चालवेना । कल्पना उठली त्याच्या मना । पाठीं लागले कोण कळेना । भीतिभावना दाटली ॥५०॥ धारिष्टें पाहे चालतां चाली । तंव आपुली देखे स्वसाउली । पाहोनि हुडहुडी हृदयीं भरली । म्हणे पावलों घालीं भुताच्या ॥५१॥ चालतां कांहीं पळवेना । शब्द वाजता राहीना । छाया दृष्टीची टळेना । वर्म कळेना तयासी ॥५२॥ ... चंद्र पाठीं जातसे । तंव छाया सन्मुख येतसे । यालागीं तो भूत भासे । भरलें पिसें नेत्र झांकी ॥५३॥ भयभीत मनीं घाबरला । अटवळोनी भूमीसि पडला । दातखिळी बैसली ते वेळां । करोनि ग्लेष्म पडे तो ॥५४॥

भूत हृदयांत भरलें । वाटे चहूंकडे व्यापिलें । उदय होतां कोण्हीं देखिलें । तेणें मिळविलें जनांतें ॥५५॥ शंका फोडूनी जन बोलती । परी हा सावध नोव्हे चित्तीं । नाना युक्ती तया करिती । परी तें भ्रांती जाईना ॥५६॥ गृहा आणिला उचलोन । माता पिता बोलती येऊन । युक्तीनें कांता करी भाषण । परी तो नयन उघडीना ॥५७॥ शोधुनी आणिले पंचाक्षरी । म्हणती भूतें झडपिलें भारी । नाना सांडणी सांडविती वरी । परी तो निर्धारीं उमजे ना ॥५८॥ कोण्ही म्हणती तया माळा । आहे जाज्वल्य भुतांचा मेळा । तेणें हा पुरता गिळिला । उपाय याला दिसेना ॥५९॥ तंव सद्गुरु योगिराज आले । तेणें परीक्षोनि पाहिलें । बोध विवेकें झाडिलें । अभयें निवारिलें भय दूरी ॥६०॥ कृपाकर फिरवितां । नेत्र उघडोनि पाहे सद्गुरुनाथा । चरणीं ठेवी दृढ माथा । परी अंतरीं व्यथा धुकधुकी ॥६१॥ देही होता सावध चित्त । भावना विचारितां निरोपित । ज्ञानसागर सद्गुरुनाथ । वोळखिले भूत कल्पनेचें ॥६२॥ सद्गुरु म्हणती येरूसी । नित्य येई दर्शनासी । जे व्यथा जाणवेल तुजसी । ते आम्हांसी सांग तूं ॥६३॥ स्वस्थळा गेला सद्गुरुनाथ । दिवा वागे हा सर्वांत । रजनीं कल्पना उद्भवत । जाची निद्रेंत भूत तें ॥६४॥ हे व्यथा सद्गुरूसी । निवेदिता झाला येरेंसी । म्हणे निद्रा लागतां भूत मजसी । छळी निश्चयेंसी काय करूं ॥६५॥ सद्गुरु पंचाक्षरी दुर्धर । म्हणती बापा ऐक विचार । भूत तुजसी येतां समोर । धरोनि धीर काज करी ॥६६॥ भुतें असतीं बहुत रीतीं । परी जें कां पीडितसे तुजप्रती । तें कळावया असे युक्ती । साधी निश्चितीं धैर्यें तूं ॥६७॥ रात्रीं निजतां नेमस्त । तेलकाजळ माखी हात । भूत सन्मुख येतांचि त्वरित । माखी निश्चित मुखीं त्याच्या ॥६८॥ ते आज्ञा वंदोनि शिरीं । रजनींत साधिली तेचि परी । आधीं उठोनि झडकरी । सद्गुरु मंदिरीं पावला ॥६९॥ सद्गुरुसन्मुख जावोन । नमूं धरी जंव चरण । सद्गुरु पुसती त्यालागून । निवेदिलें कारण केलें त्वां ॥७०॥ येरू म्हणे जी सत्य केलें । भुताचे मुखीं काजळ मर्दिलें । सद्गुरु म्हणती आम्हीं पाहिलें । भूत वोळखिलें निर्धारें ॥७१॥ येरू म्हणे तें कोठें आहे । सद्गुरु म्हणती दावितों पाहें । आदर्श आणोनि लवलाहें । म्हणती होय पाहता या ॥७२॥ करितां आदर्श अवलोकन । स्वमुख काजळें गेलें माखोन । तंव पुसनसे लाजोन । माझें दुश्चिन्ह मज कां जीं ॥७३॥ तंव सद्गुरु म्हणती मूर्खा । तुझीच तुजला उद्भवली शंका । भूतकल्पनेचें जालें देखा । विकल्पचिया दुःखा पावसी ॥७४॥ संकल्प विकल्प विदान । हेंचि बंधनासि कारण । जंव जंव लोभमोहीं वेते मन । जन्मादि बंध न वोळखे ॥७५॥ कोण मोक्ष हा कळावा । एतद्विषयीं प्रश्न सत्रावा । त्याचाही भाव बरवा । सांगतों परिसावा प्रीतीनें ॥७६॥ नरदेहीं येवोनि प्राणी । राहे सदा स्वहितविचारणीं । ज्ञान अभ्यासलक्षणीं । योग निर्वाणीं साधित ॥७७॥ नित्यानित्य सारासार । विवेकीं शोधिजे आत्मप्रकार । तत्त्वज्ञानें रंगवी अंतर । परात्पर रूप पाहे ॥७८॥ संकल्प विकल्प जे उठती । विवेकें उडवी तेथिंची भ्रांती । सदा सावधान ठेवी वृत्ती । चकवी आवृत्ती तोचि एक ॥७९॥ सद्गुरुचरणीं सदा शरण । बोध स्वीकारुनी साधी कारण । त्यागविले त्यागी अवगुण । सांठवी गुण स्वहितार्थ ॥८०॥ जन्मोनि साधिजे हें स्वहित । सगुणभक्तीसीं व्हावें रत । ईश्वर आहे सर्वगत । त्या पदीं नत होइजे ॥८१॥ सर्वां भूतीं साधिजे नमन । सर्वांतरव्यापक देवची जाण । ही भावना जडतां पूर्ण । भिन्नाभिन्न द्वैत विरे ॥८२॥

नाना कल्पना सरतां । देवभक्तचि उरे वार्ता । हृदयीं चढे सप्रेमता । पावे कोमलता अंतरीं ॥८३॥
नामस्मरणीं उल्हास । श्रवणीं सांठवी कीर्तनरस । वृत्तीसी होय उदास । लागे ध्यास आगळा ॥८४॥
ध्यासीं मन होता निमग्न । मग सहजची होय उन्मन । साक्षात्कार ठाके पुढें येऊन । पावे दर्शन सगुणाचें ॥८५॥
सगुणी उपासना ठसतां । ऐसीच दिसावी सर्वगता । ती केवीं पावे ऐक्यता । तरी सद्गुरु नाथा विनवावें ॥८६॥
सर्वात्मकीं सर्वेश्वर । तो प्राप्त व्हावया जोडिजे कर । ते आर्त भूत वोळखोनि अंतर । अध्यात्मसार बाणविती ॥८७॥
तया आध्यात्मिकाचें विवरण । करी कल्पनेचें खंडण । निर्विकल्प होतां शुद्ध मन । गुह्य धन दाविती ते ॥८८॥
सर्वात्मक जो सर्वेश्वर । कैसा व्यापला सर्वांतर । ते करविती दर्शन सत्वर । तो निर्विकार परमात्मा ॥८९॥
निरालंब निरंजन । तें अखिल ब्रह्म सनातन । तेथें कैंचें मीतूंपण । देहवृत्तिमान कांहीं नसे ॥९०॥
तें लक्षातीत अलक्ष । तोचि सर्वात्मक होय पक्ष । नित्यानंद भोगी असतां दक्ष । तोचि मोक्ष जाणिजे ॥९१॥
मुळीं पाहतां कनक । त्या कनकाचे अळंकार देख । रूपा आलेति अनेक । पाहोनि लोक भुलती ॥९२॥
रूपें नटले अलंकार । अलंकारींच कनक निर्धार । तेवींच हा जगदीश्वर । जगदाकार भरलासे ॥९३॥
अलंकार आणि कांचन । तेथें नाहींच द्वैतपण । तैसा हा सर्वेश्वर जाण । राहिला व्यापून सर्वांत ॥९४॥
श्रीसद्गुरुकृपा होतां । पावेल दृष्टी एकात्मता । निर्विकल्पसमाधि होय पावता । हेचि मोक्षता होय पैं ॥९५॥
सुख म्हणसी कोण । ऐक त्याचेंहि निरोपण । सत्य असत्य प्रकार दोन । तेही भिन्न सांगतों ॥९६॥
सर्व जन्मांतरींचें सुख । तो हा नरदेह असे देख । मायिक पदार्थीं मानी सुख । निवेदितो पृथक परियेसा ॥९७॥
निरोगी सुस्वरूप काया । कांता दिव्य भोगविषया । उपललना भोगावया । आणि भाग्योदया सुख मानी ॥९८॥
धन धान्य दास दासी । गज अश्व गाई म्हैसी । राज्य वैभव संपत्तीसी । छत्रचामरासी सुख मानी ॥९९॥
सत्ता बळ पराक्रम । यश कीर्ति लौकिक उत्तम । शेवटा जाय नेमिला नेम । लाभीं परम सुख मानी ॥१००॥
कन्या पुत्र जामात सुना । योग्यायोग्य लावण्यपणा । इच्छित पावला सन्माना । आदरकारणा सुख मानी ॥१॥
मिष्टान्नें भोजनासी । उत्तम षड्रस उदकपानासी । सुंदर शय्या शयनासी । मर्दनें देहासी सुख मानी ॥२॥
दिव्य चीर दिव्य अळंकार । जडित माणिक मुक्ताहार । रमणीक स्थळें मनोहर । होता उपचार सुख मानी ॥३॥
ऋतु ऐसे पावतां भोग । दृष्टीस पडतां नाना रंग । सुगंध द्रव्य होवोनि दंग । अर्जवितां जग सुख मानी ॥४॥
गीत संगीत रागरागिणी । अनेक वाद्यादि मंजुळ ध्वनी । हे नाद पडतां श्रवणीं । प्रियकर मानी सुखातें ॥५॥
नृत्यकळा समोर नाचतां । भाट वंदिजन वर्णितां । भांड विनोदें हासवितां । चमत्कार पाहतां सुख मानी ॥६॥
देतां घेतां गौरव करितां । द्युतीं जय पावे खेळतां । परवस्तु प्राप्त होतां । पदलाभ जोडतां सुख मानी ॥७॥
असो ही उदंड कर्मकहाणी । यालाभें परम सुख मानी । परी हें सुख नोहे जाण हानी । न कळे भुलोनी व्यर्थ गेला ॥८॥
धत्तुरासी म्हणती कनक । नामें स्वीकारितां तया देख । तेणें जें प्राप्त सुख । तेवींच आवश्यक हें जाणा ॥९॥
या भोगें भोगणें पतन । नरक अघोरींचें निमंत्रण । या भोगीं यमभूषण । करोनि दंडण पचवील ॥११०॥

प्रारब्धें तेथुनी सुटतां । लक्ष चौऱ्याशींचे फेरे माथा । नाहीं विचारिलें सुख भोगितां । म्हणुनी गोता चुक हा ॥११॥
तंव श्रोते मध्यगतीं । वक्तियालागीं प्रश्न करिती । तुम्ही भाग्यसुख वर्णिलें निश्चितीं । शेवटीं अवनती स्थापिली ॥१२॥
यदर्थ आमचें भापण । तें तुम्ही कीजे जी श्रवण । ऐसिया सुखीं सदाचरण । करितां पतन कैंचें त्या ॥१३॥
जाणोनिया विचार । सत्कर्मी होतां सादर । तया बाधील केवीं भय दुर्धर । न पडे अघोर नरकवासीं ॥१४॥
दान धर्म यज्ञक्रिया । घाट बांधिले देवालया । पांथिकासी करितां छाया । तेणें सुख तया होईल कीं ॥१५॥
व्रत तप जप आचरती । त्यांची साह्यता करी पुर्ती । आर्थिकाची पुरवी आर्ती । तो सुख निश्चितीं पावेल कीं ॥१६॥
स्वतः करी व्रताचरण । आदर सन्मानें पूजी द्विजगण । आवडीं दे मिष्टान्नभोजन । तो सुखसंपन्न होईल कीं ॥१७॥
विवेकें प्रजेतें पाळी । पीडा भय त्यांचें निर्दाळी । सदा कृपादृष्टीं न्याहाळी । तो सुखकल्लोळीं पावेल कीं ॥१८॥
अन्न वस्त्र द्रव्य दान । धातु रत्न मुक्त दान । गज अश्वरथ गोदान । देतां सुखवर्धन होईल कीं ॥१९॥
दास दासी शय्या भूदान । गुप्त प्रगट वस्तु दान । स्त्री पुत्र कन्या ग्रामदान । देतां सुख सघन होईल कीं ॥१२०॥
दया क्षमा शांती । प्रजा पाळी करोनि प्रीतीं । विपरीत भावना नुपजवी चित्तीं । तया सुखप्राप्ती होईल कीं ॥२१॥
अग्र आहार देवद्विजां । चालवोनि भावें करी पूजा । अद्वय भजे वृषगरुडध्वजा । सुख त्या सुतेजा होईल कीं ॥२२॥
मातापिता पूर्वजांसी । भावें अर्ची कुळदैवतांसी । तोषवी अतीत अभ्यागतांसी । सुख तयासी होईल कीं ॥२३॥
ऐसें अनेकापरी अर्चन । भावें करितां जो होईल सुजन । तयालागीं प्राप्तमान । सुख तें जाण होईल कीं ॥२४॥
परिसोनि श्रोत्यांची वाणी । वक्ता विनवी त्यालागोनी । जी तुम्ही प्रश्न केला चतुरपणीं । तो म्यां श्रवणीं सांठविला ॥२५॥
आतां याचें उत्तर । निवेदितो तुम्हां जोडोनि कर । क्षोभूं न द्यावें अंतर । श्रवणीं स्थिर असावें ॥२६॥
आपण जी जी केली कल्पना । हे शुद्धचि असे आचरणा । या पुण्यराशीचा करी जो भरणा । तो देवगणा मान्य कीं ॥२७॥ शिव इंद्र विधाता । देव अनेक देवता । तयांसि या पुण्यें संतोषतां । देती स्वपदता सेविती ॥२८॥
जीं केलीं सुकर्माचरणें । तत्पुण्यें तो स्वर्ग पाहणें । तें सरतां भूलोका येणें । जन्म घेणें कर्मापरी ॥२९॥
एकगुणें कर्म करावें । तें अनेक गुणें फळ भोगावें । सुख अथवा दुःख पावावें । कर्मणयातुर भावें करोनी ॥१३०॥
पुण्य अथवा पापासी । अथवा पुण्य पाप मिश्रतेसी । जैसीं आचरणें फळें तैसीं । भोगणें प्राणियांसी निर्धारें ॥३१॥
कामुक ज्या फळ असे करीं । तैसेंचि फळ तया अवधारीं । स्वर्ग भोग भोगोनि नाना परी । पुन्हा धरेवरी जन्मचि घेणें ॥३२॥ अथवा निष्कामें पुण्य आचरे । फळआशा कांहीं मनीं न भरे । तया वैकुंठकैलासीं आदरें । सन्मान खरे पावती ॥३३॥ तेथें मुक्ती असती चारही । सलोकता समीपता निर्धारीं । सरूपता सायुज्यता सुंदरी । आवडीतें वरी ते ठायीं ॥३४॥ इतुकेंही जरी जालें । तरी सुख वेगळेंचि उरलें । हे पुण्याऐसे उपभोग भले । तदर्थी दिल्हे ईश्वरें ॥३५॥
तेथील मर्यादा सरतां । जन्मचि घेणें लागे मागुता । पावे येवोनि भूपभाग्यता सर्वाधिपतिता सार्वभौम ॥३६॥
पद पावला जरी भूपतीचें । तेथें आचरण न्यायनीतीचें । साम दाम दंड भेदाचें । कर्तृत्व साचें त्या मार्गा ॥३७॥
तेथें लोभें विरोधविषय । स्वार्थार्थ करणें घडे उपाय । घात आघात नाना अपाय । विरोध होय बहुतची ॥३८॥

दोही विकल्प उठती। कल्पना वासना जाचिती। नीति अनीति घडोनि येती। उठे कुमती सुमती हरपे ॥३९॥
प्रजेपासोनि घडे अधर्म। तें रायामाथां बैसे कर्म। राज्यांती नरक केला नेम। निवडोनि धर्म निवेदिलें ॥११०॥
युगायुगीं भूप जाले। युगमानें करोन वागले। यज्ञ असंख्य योजिले। तेहि पावले गर्भवासा ॥४१॥
अचाट पुण्यातें आचरोन। स्वर्गपद पावले जावोन। भोग उपभोग तेथींचे घेवोन। पुनरा पतन घडलें त्यां ॥४२॥
तरी कैसेनि मोजावें हें सुख। जन्ममरण चुकेचि देख। हें इत्यादि वाखाणिलें मायिक। न मनूं आवश्यक सुख आम्ही ॥४३॥ जन्मकर्मा पासोनि सुटला। तो सुखिया आम्हां वाटला। त्या सुखाचा अद्भुत सोहळा। देवादिकांला प्राप्त नसे ॥४४॥ तें सुख योगी संतांसी। प्राप्त आहे निश्चयेंसी। ते कैसेनि पावे इतरांसी। तो योग तुम्हांसी सांगतो ॥४५॥
योगी ज्ञानी संत सज्जन। आत्मतत्त्वीं सावधान। सच्चिदानंदरूप लक्षोन। वसति निमग्न त्यामाजी ॥४६॥
चारी देह चोखाळिती। पांचवे देहीं त्यांची वस्ती। चारी अवस्था त्यजोनि जाती। पांचवी पावती योगयुक्तें ॥४७॥
दश देहा वोलांडोन। अकाऱ्यांत होती निमग्न। दश वाद्य वरते सारून। होती तल्लीन अकाऱ्यांत ॥४८॥
सप्त चक्रें ताळाताळ। तेथील निरखोनि सर्व खेळ। जें यां आठवें सहस्रदळ। आनंद कल्लोळ भोगिती तेथें ॥४९॥
त्या स्वस्वरूपामाजी रमती। सत्रावीचें पान करिती। तयां नाहीं अधोगती। सुख भोगिती ते योगी ॥१५०॥
जें अनंत सुखाचें बीज। तें सच्चिद्‌घन रूप सतेज। तन्निष्ठ मोक्ष सहज। योगिराज पावती ॥५१॥
जया या सुखीं सुरवाड। ते न धरिती चहूं मुक्तींची चाड। त्या ब्रह्मानंद सुखाचें घबाड। लाधली जोड अविनाश ॥५२॥ याहुनी जें इतर सुख। तितुकें भोगवी परम दुःख। या ब्रह्मानंदसुखाची तुक। अणुमात्र देख न ये कोण्हा ॥५३॥ या सुखदुःखाचें विवरण। तुम्हां दाविलें निवडून। परी कांहींएक निरोपण। दुःख कोण सांगू तें ॥५४॥
अनात्मरूपाचा विसर। अत्यंत विषयाचा भर। संकल्प विकल्प अनिवार। चिंता घोर भ्रम देहीं ॥५५॥
अष्ट विकृती विकार सहा। लोभ मोहो अनिवार पहा। यत्संगाचरणीं दुःख दाहा। भोगणें महा अनिवार ॥५६॥
हेंचि दुःखाचें मूळ। सार निवेदिलें निखळ। कुबुद्धि विस्तार हा कुश्चळ। परम अमंगळ दुःख हें ॥५७॥
यासंगें पापाचरण। यासंगेंचि गमनागमन। यासंगेंचि भक्षणाभक्षण। अविवेकें पूर्ण अनाचार ॥५८॥
या गुणेंचि विपरीत धर्म। या गुणेंचि सर्व अधर्म। या गुणेचि चुकलें धर्म। दुःख परम या गुणें ॥५९॥
येणें कुसंगें करोनी। प्राणी वर्ते पापाचरणीं। पडे नरकाचिया पतनीं। जन्ममरणीं गुंतला ॥१६०॥
दुःख वर्णितां नाहीं पार। जन्मदुःख अनिवार। कर्मपरीटेचा वेगळा विस्तार। करितां संसारदुःख बहु ॥६१॥
विपत्तिदुःख न सांगवे। संततिदुःख दुपक्षीं सोसावें। जरादुःख न भोगवें। मरणीं वदावें दुःख किती ॥६२॥
जातां दुःख मागिलिया। भोगणेंचि असे पुढलिया। पापकर्में यमालया। दुःख भोगाया जाणें की ॥६३॥
मूक्त अमूक्त कर्में घडती। त्यांची देणें तेथें भडती। अनिवार कठोर विपत्ती। दुःख भोगविती बहु पीडा ॥६४॥
नरकामाजी पचविती। कुंभीपाकीं टाकिती। सांडसे मांसातें तोडिती। दंत उपडिती वेसेची ॥६५॥
तीक्ष्ण रस घोनिती मुखीं। तेणें आरंबळे परम दुःखी। आंकडे लावोनि ओढिती नाकीं। नग्न फुंकी डागें अंगीं ॥६६॥

तप्त भुमीं लोळविती । असिपत्रीं चालविती । तप्तस्तंभ पोटाळिती । कर्णी भेदिती तप्त सळया ॥६७॥
हस्त पाद बांधोन । पर्वतावरोनि देति लोटून । सर्वेचि छेदिती करचरण । लिंग छेदून मुखीं देती ॥६८॥
मुखीं घालिती बळें विष्ठा । शरीरें विंधविती देवोनि कष्टा । दया नुपजे तयां दुष्टां । करिती चेष्टा अटिती ॥६९॥
काकचंचु नेत्र फोडिती । खग्वनरकामाजी बुडविती । घाणीं घालुनिया रगडती । ग्रीवा पिळिती अट्टहास्यें ॥१७०॥
सर्प विंचू इंगळिया । त्या येवीं टाकिती प्राणिया । त्या दंशें पीडिती काया । नुपजे माया तयांसी ॥७१॥
पहारा सळया तापविती । गुद उपस्थीं लोटोनि देती । क्षार विषकूपीं सडविती । चक्रीं फिरविती टांगोनि ॥७२॥
ऐसिया दुःखासी नाहीं पार । कृतिकर्माऐसे भोग निर्धार । यातना सरतां जन्म अघोर भोगविती साचार प्राणिया ॥७३॥
जन्ममरणाचा पडतां फांसा । तेथें कोठोनि घडे उसासा । येरयराचा पाहती तमासा । परी घातल्या कासा न सांडिती ॥७४॥ ऐसिया दुःखातें भोगितां । कोण्ही नसे सोडविता । कठिण हे दुःखअवस्था । नुमजे भ्रांता अजुनी ॥७५॥
एवं दुःखाचें हें निरोपण । केलें सावधानार्थ जाण । या परिहाराची खूण । तेंही विवरण निवेदिलें ॥७६॥
आतां कोण स्वर्ग म्हणोनिया । प्रश्नोत्तर करितों कळावया । साधनीं साधोनि उपाया । जाईजे ठाया त्यायोगें ॥७७॥
संत साधु योगीजन । यांचा संग साधावा पूर्ण । सेवा करोनि रात्रंदिन । करितां प्रसन्न स्वर्ग हा ॥७८॥
संतसंगीं असतां । श्रवणीं पडे हरिकथा । सहजीं पावे बोधता । विवेक हातां पैं चढे ॥७९॥
करितां संतांचें सेवन । होय संपूर्ण पापाचें दहन । इंद्रियांचे विषयगुण । जाती निवळोन बोधेंची ॥१८०॥
सत्संगीं होतां नीट । काया अलिंगनीं होतसे चोखट । मायिक पदार्थी येतसे वीट । अनुताप अचाट बाणतो ॥८१॥
राहतां सच्चरणीं देखोनि मिठी । द्वैत पळे उठाउठीं । पूर्ण वैराग्य उपजे पोटीं । ज्ञानीं दृष्टी भरतसे ॥८२॥
संतमूर्तीचें धरितां ध्यान । त्याचें चुकतसे जन्ममरण । अर्चोनि करितां तीर्थसेवन । अद्भुत ज्ञान ठसावे ॥८३॥
सद्भावें म्हणवितां संतांचे दास । तया नाहींच भवपाश । भक्तिभाग्य पावे बहुवस । प्रेम विशेष उद्भवे ॥८४॥
सत्संगावीण नावडे चित्ता । ऐसी वृत्ति जया बाणतां । तया मोक्ष घरीं आयता । होय येता संतकृपें ॥८५॥
संतांचें परम ज्ञान चोख । देहीं दाविती पाताळ भूलोक । एकवीस स्वर्ग अलोलिक । तेथील सुखभोग दाखविती ॥८६॥
पूर्णकृपें बाणविती ज्ञान । त्रैलोक्यादि करविती दर्शन । मग त्या अर्धपीठींचें पावन । तेथें नेऊन ठेविती ॥८७॥
स्वर्ग बापुडें तें काय । परी स्वर्गातें पावविती पाहे । अविनाशरूपीं तन्मय । वृत्ती लय करवीती ॥८८॥
वेदशास्त्रांची कर्मकारणें । पूर्वपक्षीक भोगवी बंधनें । जीवमात्राची रहाणीप्रकरणें । तैसींच आचरणें चालती ॥८९॥
उत्तरपक्षींचा भाग । तो तारक असे चांग । परी विस्तारिक प्रसंग । मुमुक्षां लाग लागेना ॥१९०॥
पठिकां साधेना हातवटी । न कळे काय वेदापोटीं । अभिमानेंचि करिती वटवटी । गुह्य गोष्टी कळेना ॥९१॥
तेथें अवळा मुमुक्षु अज्ञाना । कैसीं येथींच्या पावती ज्ञाना । साधोनि स्वहितसाधना । स्वर्गभुवना केवीं तें ॥९२॥
या जगदोद्धारासाठीं । संत योगी अवतरले सृष्टीं । गुरुत्वें देवोनि ज्ञानदृष्टी । गुह्य पोटीं भरविती ते ॥९३॥
प्रेम विनयता देखोन । सद्भावें देती कृपादान । आत्मरूपीं पाववून । अविनाशीं नेऊन स्थापिती ॥९४॥

यालागी स्वर्ग हाचि पाहि । हें वर्म जाणिजे देहीं । संतांवांचोनि थोर नाहीं । पदार्थ कांहीं त्रिलोकीं ॥१९५॥
संत सुखाचे सागर । संत ज्ञानाचे आगर । संत या जीवां तारूं थोर । होय भवपार यांचेनी ॥१९६॥
संत कृपादान होतां । वारे जन्ममरणव्यथा । ठाव नुरेचि दुरिता । मोक्षपंथा पाववितो ॥१९७॥
संत दीनांचे दयाळ । हृदयीं अत्यंत कोमळ । पुरविती शरणागतांची आळ । माउली स्नेहाळ हे खरी ॥१९८॥
उदार हे संत महंत । महंत तोचि स्वामी दत्त । तद्रूपीं हा सद्गुरु अनंत । त्या पदीं सुत विनटला ॥१९९॥
विनवी अनंताचा सुत । पुढील कथा रसभरित । ते निरोपील सद्गुरुदत्त । सांठवा हृदयांत सावधान ॥२००॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपुराणींचें संमत । परिसोत श्रोते भाविक संत । एकोनविंशोध्यायार्थ गोड हा ॥२०१॥

॥ इति एकोनविंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ३० वा ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ॥

जयजय सद्गुरु लंबोदरा । लावण्य रूप अतिसुंदरा । चतुर्दश विद्येच्या सागरा । अज्ञानहरा ज्ञानदीपा ॥१॥
जय मूलाधारनिवासी । दत्त विघ्नहरा अविनाशी । चतुर्दळकमळींचा तूं विलासी । बोळंगती पायासी ऋद्धिसिद्धी ॥२॥
तव शुंडा आरक्त वर्ण । रवि शशि वाम सव्य नयन । डाकिनी शक्तिसमवेत पूर्ण । मात्रागुण चार ते ॥३॥
चतुरांगुल दिव्य स्थान । फरशांकुश विराजमान । तडित्प्राय पीतवसन । मुक्ताभूषणमंडित माळा ॥४॥
ऋषि ईश्वर तुज आराधी । पाहोनि सदय तूं कृपानिधी । तोडिसी संकट आधिव्याधी । देसी बुद्धी सिद्धी विद्या ॥५॥
ऐसा सद्गुरु तूं दत्त विनायक । तुज आवडती विनय भाविक । त्यांची आळ तूं सुखदायक । करोनि कौतुक पुरवीसी ॥६॥
हें जाणोनि तव चरणीं । स्तवितों भावें जोडुनी पाणी । या ग्रंथीं वदविजे वाणी । साह्य होवोनी आपण ॥७॥
मी अन्यायी पतित । तुला जालों शरणागत । सांभाळिता तूं समर्थ । वदवी ग्रंथ अभयत्वें ॥८॥
तुझिया कृपाकटाक्षें करून । मागें करविलें निरोपण । तें परिसोनि निघाले सज्जन । वेधलें मन श्रवणीं पुढें ॥९॥
भाविक श्रोत्यांची कामना । तूं पुरवी दत्त-गजानना । चालवी रसाळ निरोपणा । हे विज्ञापना पायांसी ॥१०॥
दत्त अविनाश विघ्नहर । सदय उदार हा लंबोदर । आर्त भून बोळखोनि अंतर । वदनी उद्धार प्रबोधी कीं ॥११॥
श्रोतीं सावधान होइजे । अत्यादरें श्रवण कीजे । सार हृदयीं सांठविजे । पान कीजे कथामृत ॥१२॥
मागिले अध्ययाअंतीं । स्वर्ग नेम ऐकिला श्रोती । आतां नरक कोणा निश्चितीं । तेही प्रचीती निवेदितों ॥१३॥
पापी कुमनी दुर्जन । कामी क्रोधी मदमत्सरी जाण । दंभ अहंकारी द्वेषी पूर्ण । दुष्टसंगही नरकीक हा ॥१४॥
हिंसक निंदक घातक । मलिन कुमती दाहक । पाखांडी कुतर्की जल्पक । संग दुष्टक नरकीक हा ॥१५॥
गुरुतल्पक पितृद्रोही । जार चांडाळ निर्दय पाहीं । कपटी अनाचारी जीवघ्न तोही । नरकीक हाही संग जाण ॥१६॥
असत्यवचनी वादक । अविश्वासी लंपक । अभक्ष्य भक्षणी मद्यक । संग नरकीक होय हा ॥१७॥
प्रपंच परमार्थी नाहीं मन । कीर्तन नावडे पुराणश्रवण । भांड तमासे द्यूतीं सलग्न । तो संग जाण नरकची ॥१८॥
स्वधर्मकर्मी नाहीं निष्ठा । आचरती त्यांच्या करी चेष्टा । सुबुद्धा नायके भांडे श्रेष्ठा । वदनी विष्ठा नरकीक तो ॥१९॥
नीच धर्मी आचरतां । सुख वाटे ज्याच्या चित्ता । आपुली वाढवी श्रेष्ठता । परा निर्भर्त्सता होय तो ॥२०॥
वक्त अवक्तातें विसरती । नाना विषयभोग भोगिती । जार जनांची अत्यंत प्रीती । दुष्ट हे संगती नरकीक ॥२१॥
माता पिता गुरुद्वेषी । अणुमात्र न भजे त्यांसी । अन्हेरी देवतीर्थ द्विजांसी । तो संग नरकासी घालवी ॥२२॥
पराचें न जाणें जीवन । पीडा करी अति दारुण । तस्करविद्येमाजी प्रवीण । तो संग पतन करवी नरकीं ॥२३॥
संत साधु योगियांसी । कुचेष्ट-संवादें पीडी त्यांसी । विनापराध गांजी परांसी । संग नरकासी कारण हा ॥२४॥
छळक बुद्धी न सोडिती । अप्रतिष्ठेसी प्रवर्तती । उपमर्दें अपमानिती । जाणें नरकपंथीं संगे या ॥२५॥
मधुर कोणासी न बोलावें । कठोर वचनें हृदय भेदावें । वर्मिक शब्दे टोंचावें । कधीं न द्यावें सुख कोण्हा ॥२६॥

कार्यार्थीच व्हावें लीन । होतां कार्य फिरे परतोन । हें वकमैंदिक लक्षण । मरकस्यान याचि संगें ॥२७॥
मी कोण याती कोण वर्ण । कोण कैसें काय आचरण । सारासार विचारगुण । तेथें मन वैसेना ॥२८॥
मन इच्छेऐसें वर्तावें । आवडे तेंचि आचरावें । कवीं कोणाचें न मानावें । वचन मोडावें श्रेष्ठांचें ॥२९॥
असो हे दुष्टसंगती । किंचित् वर्णिली या ग्रंथीं । हाचि नरक ओळखा निश्चितीं । घालीं अधःपाती संग हा ॥३०॥
हेंचि नरकाचें मूळ । असंग लोभ मोह प्रबल । त्यांतें भिऊनी राहिजे सर्व काल । विवेकबळ विचारें ॥३१॥
आतां परपदाचें विवरण । तें परिसिजे सावधान । धन्य तुम्ही श्रोतेजन । आवडी पूर्ण श्रवणार्थी ॥३२॥
ज्याचिया सत्तामात्रें करून । इंद्रियां घडे चळणवळण । वावरे देहीं प्राणपवन । डोळे चैतन्य सर्व हें ॥३३॥
अंतःकरण मन बुद्धि सकळ । त्या सत्तेचि यांचा खेळ । अवघा पिंडब्रह्मांडगोळ । सर्वांचें मूळ तोच कीं ॥३४॥
नाना रूप लीला अनंत । त्यासी नाहीं पार अंत । सर्वांतर सर्वगत । वर्तोनि अलिप्त वेगळा ॥३५॥
कर्मे करवोनि कर्मातीत । व्यापोनि असे विभक्त । सच्चिदानंद सर्वातीत । निखिल अव्यक्त ब्रह्मत्वें ॥३६॥
इंद्रियें व्यापारें वर्तती । मन संकल्पें कृत्य करिती । नाना कर्मे आचरती । साक्षित्वें वस्ती तयांची ॥३७॥
तया नाहीं नामरूप । तें रूपातीत गा अरूप । त्याविण सर्व विरूप । त्याचे निरूप दृश्यत्वें ॥३८॥
तें गुणातीत निर्गुण । तें चौदेहापरतें जाण । चहूं वाचेहुनी असे भिन्न । परात्पर पूर्ण परंपद ॥३९॥
तें नित्यानंद सदोदित । अचळ अविनाश मुक्त । निरामय निरंजन मायातीत । या नांव निश्चित परंपद ॥४०॥
जें अगम्य अगोचर । निर्विकल्प निराधार । निर्मोह निरहंकार । तें निराकार परंपद ॥४१॥
जो चौशून्याचा शेवट । जें का उभवोनि भरी घोट । तें परंपद गा वरवंट । असे अवीट शुद्ध विमळ ॥४२॥
पदनिर्णय निवेदिला । तो तुम्हीं हृदयीं सांठविला । आतां अनसूयेचा प्रश्न मला । उपास्य मजला निवेदी ॥४३॥
माउलीचें मनोगत । जाणें श्रोतियांचे आर्त । पुरवावया उभयांचें मनोरथ । प्रश्नोत्तर दत्त कथितों मी ॥४४॥
देव उदंड असती । स्वर्गमृत्युपाताळीं वसती । जीवमात्र त्यांतें भजती । फळार्थ आदरती उपासना ॥४५॥
परी ज्या देवा उपासावें । कर्मीक फळ तेणे द्यावें । न अर्चितां पीडावें । जीव आटावें दुःखरूप ॥४६॥
जरी देव प्रसन्न होती । मायिक फळ नाशिवंत देती । अविनाश न देववे निश्चितीं । नाश याप्रती मुळींच ॥४७॥
हे नाशिवंत देव असावे । तरी अविनाशपद त्यांनीं द्यावें । तें न घडेची या देवे । म्हणोनि जाणावे मिथ्या हो ॥४८॥
सकळ जीव देवांची उत्पत्ती । लय पालक तिघांत शक्ती । ते सर्वांमाजी श्रेष्ठ असती । त्रिगुण म्हणती विचित्र ॥४९॥
सकळ देवांमाजी थोर । ते ब्रह्मा विष्णु महेश्वर । तयांचाही जो ईश्वर । तो सर्वेश्वर निराळा ॥५०॥
जया म्हणती मायातीत । निर्गुणी नाम निश्चित । जो असे सर्वगत । तो नित्य शाश्वत अविनाशी ॥५१॥
वेदशास्त्रें जया वर्णिती । उपनिषदें पुराणें गाती । जया वाखाणितां भागल्या श्रुती । सेवी मौनावती उगल्या ॥५२॥
जो सर्वात्मा सर्व व्यापक । सर्व देवदेवांचा देव देख । तया दावितां सद्गुरु एक । त्याचेनि मोक्षसुख पाविजे ॥५३॥
तयाचे शरण रिघोनी । पाविजे अविनाशपदस्थानीं । जन्ममरणाची अवंतणी । टाकिती सुहोनी गुरुराय ॥५४॥

स्वबोधें त्रिताप वारिती । निरसोनि टाकिती भवभ्रांती । स्वरूपीं तद्रूप करिती वृत्ती । पद पाववितो अविनाश ॥५५॥ हें पद नसे कोण्हाधीन । हो का मानव असुर देवगण । परी एका सद्गुरुवांचोन । स्वात्मधन सांपडेना ॥५६॥ यालागीं दृढ निश्चय । सर्व श्रेष्ठ उपास्य सद्गुरुपाय । तो जीवन्मुक्तीचा जाणें उपाय । परात्पर सोय साधवी तो ॥५७॥ नाना उपासना असती । परी या उपासनेची सरी न पवती । अनंत उपासनेचा अधिपती । सद्गुरु निश्चितीं जाणिजे ॥५८॥ सद्गुरुवांचोनि दैवता । नसे अनंत ब्रह्मांडें शोधितां । हेचि उपास्य जीवां समस्तां । कीजे दासता प्रेमभावें ॥५९॥ जया दृढ सद्गुरु औपासन । तो या त्रैलोक्यामाजी होय धन्य । होतां तयाचें दर्शन । पापदहन पुण्य जोडे ॥६०॥ सद्गुरुसेवेमाजी प्रेमें रत । त्याचें दर्शन हरी इच्छित । सकळ सिद्धि पादाक्रांत । वचन वांछीत सेवेसी ॥६१॥ काया वाचा मन प्राण । तन मन धन सत्य अर्पण । दिवारजनी गुरुसेवन । शुद्ध अंतःकरण करोनिया ॥६२॥ सेवा करितां नये मळ । कल्पनेचा होऊं नेदी विटाळ । गुरु आचरणीं तळमळ । नुपजे निखळ देहीं ज्याच्या ॥६३॥ तो धन्य या संसारी । तोचि मोक्षाचा अधिकारी । त्या मागें पुढें श्रीहरी । अंतर बाहेरी सांभाळी ॥६४॥ त्याची आज्ञा शिरीं वंदन । स्वयें करी कार्याकारण । फिटावया नोव्हे उत्तीर्ण । रावे आपण श्रीसह ॥६५॥ दोबटीं आपणची करी । कदा न सांडी तया दूरी । तया ठाव दे हृदयाभीतरीं । आपण त्या अंतरीं प्रगटची ॥६६॥ हे उपासकाची लीला । म्हणोनि गुरु तो सर्वांत आगळा । त्या उपासने पुरे सोहोळा । यदर्थ सकळां निवेदिलें ॥६७॥ आतां विद्वानाचें लक्षण । तेंहि करितों निरोपण । श्रोतें होईजे सावधान । कीजे श्रवण सप्रेमें ॥६८॥ वेदशास्त्रपुराण । श्रुतिस्मृतींचें अध्ययन । दशग्रंथादि व्याकरण । नाना पठण ग्रंथांचें ॥६९॥ स्वर मात्रावर्ण व्यंजनोक्ती । ऱ्हस्व दीर्घ लिंगें जाणती । अंतरबाह्यार्थ उमजती । कर्में आचरती तैसींच ॥७०॥ चौदा विद्या चौसष्टी कळा । यंत्रतंत्रादि मंत्रमाळा । असे उपासने कृती सकळां । ऐवतपाळा शांतविती ॥७१॥ योगयाग क्रिया । साधनें जाणती उपाया । जपानुष्ठानें वारिती भया । देती अभया प्रतापें ॥७२॥ साधोनिया शमदमा । आचरती त्या यमनियमा । जाणती सकळ क्रमविक्रमा । समाधि नेमा जाणती ॥७३॥ उचित समयीं भाषण । त्रास निवटोनि करिती रंजन । ऐसे गुणी असोनि संपन्न । निरभिमान वागती ॥७४॥ शांत दांत विरक्त । सदय उदार भेदरहित । निर्द्वंद्व निरहंकार निश्चित । महत्त्व न दावीत कवणासी ॥७५॥ षड्रिपूंचा लेश नाहीं । विकृति नुपजे कदा देहीं । समसाम्य सर्वां पाहीं । उपसर्गितां कांहीं डगेना ॥७६॥ ऐसें हें भाग्य निश्चितीं । परी विनय सर्वां भूतीं । तैसाचि लोभ आणि प्रीती । पर आर्ती सारखीच ॥७७॥ नाना वर्ण याती कुळ । विवेकें निरखी एक सकळ । हा शुचि अथवा चांडाळ । पाहतां मळ नुपजे मना ॥७८॥ सर्व विश्वात्मा ईश्वर । अभेदचि हें चराचर । ऐसें देहीं ज्ञान जया गंभीर । विद्वान निर्धार तोचि पैं ॥७९॥ अंगीं असोनि सर्वज्ञता । मिरवावी वाटे न धनार्था । विनयपदें होय मिरवता । धन्य विद्वत्ता त्याचीच ॥८०॥ लौकिकीं विद्या अभ्यासोन । धनालागीं वेंचिती प्राण । लोकां दाविती शहाणपण । तयां विद्वान म्हणों नये ॥८१॥ विद्या अभ्यास उदंड केला । ते अभिमानें न गणती कोण्हाला । घुसकुसनी वेर येरांला । विद्वान तयाला म्हणों नये ॥८२॥

विद्या अभ्यास सर्व करिती। अविद्यामाजी बळें फिरती। विपयार्थी सर्व संग्रहिती। वादा प्रवर्तती विद्वान नोव्हे॥८३॥
पढपट्ट करिती भाटीव। न सांपडे कदा अंतर ठेव। त्यांसी न घडे त्यांचा उपाव। सकळ हावभाव उदरार्थ॥८४॥
असो हे गुण उच्चारितां। दोष येऊं पाहे माथां। किंचित जाणविलें भावार्था। सत्यासि कोपतां नसावी॥८५॥
विद्याविनयसंपन्न। सर्वाभूतीं वृत्ती समान। द्वैत भेद नसे अभिमान। तोची विद्वान म्हणावा॥८६॥
मान अपमाने नाहीं चाड। सर्वापरीने सर्वांसि गोड। ऐक्य साधनीं ज्याची जोड। विद्वान निवड या म्हणिजे॥८७॥
विद्या गुणाची अहंता। अणुमात्र नुपजे ज्याच्या चित्ता। सर्वा भूतीं समता। पंडित विद्वत्ता त्या शोभे॥८८॥
अनेक विद्या अभ्यासोन। त्या विद्येचें सार कोण। त्याचेंच करोनि आराधन। साधी कारण विद्वान तो॥८९॥
सकळ विद्यांमाजी विद्यासार। अध्यात्मविद्या हे निर्धार। तेयींचा जाणे गुह्यविचार। विद्वान् चतुर पंडित तो॥९०॥
अध्यात्मविद्येचें अध्ययन। तेथें रमलें ज्याचें मन। गुह्य गुज पावला समाधान। तोचि धन्य विद्वान पैं॥९१॥
येथोनि मूढाचा प्रसंग। तोहि निरोपितों अव्यंग। श्रोते परिसिजे सांग। बीभत्स रंग तयाचे॥९२॥
प्रारब्धयोगाचा नेम। तदनुसार घडे कर्म। तें न जाणोनि वर्म। अहंभ्रम मूढ तो॥९३॥
प्रारब्धयोगें क्रम चालतां। अर्भक म्हणे मी कर्ता। बळेंचि घेतसे माथां। या नांव मूढता बोलिजे॥९४॥
सुमार्ग सांगतां कोण्ही। अविवेकें नाणी तें मनीं। मनःपूत करी करणी। जोडी हानी तो मूढ॥९५॥
आपुलें कुळ शील वर्ण थोर। नाचरे तो कर्मविचार। तें निंद्य परकर्म अंगीकार। मूढ निर्धार तो एक॥९६॥
भयमार्गी सांगे मला। ऐकोनि न घे संगाला। उन्मत्तपणें जाय एकला। मूढत्व त्याला सत्य साजे॥९७॥
आपुलेंच वर्णी थोरपण। उगेंचि परा लावी दूपण। गद्गदा हांसे करितां भाषण। चालतां भक्षण मूढ तो॥९८॥
उणें पराचें पाहावें। परएकांत श्रवण करावें। वर्मे पाहोनि खोंचावें। मूढ म्हणावें त्याची नरा॥९९॥
आपुला नेणोनि अधिकार। थोर वाद करी शिरजोर। घात पात इच्छी पामर। सदा अविचार मूढ तो॥१००॥
दुर्व्यसन दुरुक्ति दुष्कर्म। दुष्ट मार्गी वर्ते अधर्म। निर्भीड निष्ठुर लोभिष्ट परम। नावडे धर्म मूढ तो॥१०१॥
पूर्वकर्मे मृत्यु हानी। लाभ अलाभ येती घडोनी। तदर्थ शोक वाढणीं। तोचि अज्ञानी मूढ खरा॥१०२॥
पाहतां काया मायेची। शेवटीं परिणामीं जायाची। विपयिक करणें पूजा याची। नट वांयाची मूढ तो॥३॥
वरी केलें दीक्षाधारण। न करी विकृनिरिपुवारण। करी लौकिक कार्यकारण। न म्हणूं सज्ञान मूढ हा॥४॥
जें होणें तें प्रारब्धाधीन। पुढीलासाठीं प्रस्तुत आचरण। हें त्रिजन्मीक असोनि ज्ञान। मूढ यत्न प्रबळ प्रस्तुति॥५॥
मज राज्यवैभव संपत्ती। लौकिकीं जोडावी यशकीर्ती। स्वप्नींही न देखावी दुःखविपत्ती। प्रयत्न यदर्थी बहुसत्य॥६॥
याच जन्मीं या वेळे। प्राप्त व्हावीं इच्छित फळें। यदर्थी यत्न करी बळें। व्यर्थ शिणले मूढ हा॥७॥
असो हे मूढपणाची वार्ता। न सरेचि कांहीं याखाणितां। परी निरोपणें पुढील प्रश्नोत्तरता। म्हणोनि आवरिला पैं वार्ता॥८॥ अनसूया माता ज्ञानखाणी। तिचा प्रश्न कः संन्यासी म्हणोनि। तो निरोपितों अन्वयें यरोनी। श्रोतेजनीं परिसावा॥९॥ मुख्यीं चवदाचा कीजे नाश। लोभमोहाचा तोडिजे पाश। देहविषयीं होणें उदास। याने संन्यास म्हणावा॥१०॥

वरी भगवें फाडिलीं । अंतरभेग नाहीं गेली । दंडकासोटी विटंबिली । वासना मुंडिलीं नाहींच ॥११॥
शिखासूत्राचा केला त्याग । अंतरीं रुचती विषयभोग । भोग नव्हे हा रोग । दाविलें सोंग जगासी ॥१२॥
अंतरिंचा नाहीं दंडिलें । बाह्य केशातें मुंडिलें । वासनेतें वाढविलें भोळे नाडिलें अनुग्रहीं ॥१३॥
वस्त्रांवरी चढविला रंग । परी न गणती तो अंतरंग । व्यापारविषय करिती चांग । पडतां व्यंग सोसेना ॥१४॥
करिती काजकारण खटपट । शय्यासन बांधिती मठ । वार्ता बोधाच्या अचाट । अंतर थाट हा रणीक ॥१५॥
हा नोहे पां संन्यास । दुरोनि नमावें भगव्यास । आतां ये प्रकरणी इतिहास । किंचित तुम्हांस निवेदितों ॥१६॥
अंतरीं विरक्त असावें । मन वासनेतें मुंडावें । रिपु विकृतीतें दंडावें । द्वैत खंडावें भेदातें ॥१७॥
अध्यात्मज्ञानीं अभ्यास । निरालंबोपनिषदीं सौरस । वृत्ती असावी उदास । अंतर पाश खंडिजे ॥१८॥
आत्मअनात्मीं विचार । सप्त चक्रींचे भेद समग्र । वस्तु निरखोनि परात्पर प्रणवप्रकार जाणिजे ॥१९॥
प्रणतोस्मि नारायण । तो सर्वात्मकीं घेईजे वोळखोन । अपरोक्ष पाविजे ज्ञान । वृत्ती समाधान पाविजे ॥१२०॥
फळवासनेचा त्याग । स्वस्वरूपीं सदा भोग । निजात्मरंगीं रंगला रंग । हाचि योग संन्यास ॥२१॥
वृत्ती परब्रह्मीं मुराली । गती अगती सर्व खुंटली । रसीं वासना विटली । अरुची जाली सर्वार्थी ॥२२॥
जागृती स्वप्न सुषुप्ती । तुर्या वोलांडोनि चवथी । पांचवे ठायीं ज्याची वस्ती । त्याहोनि स्थिती तो योगी ॥२३॥
जो या राहे अभ्यासीं । तोचि वोळखावा संन्यासी । सदैव अद्वय मानसीं । त्या योगियासी वंदिजे ॥२४॥
तेथें भगवें नको मुंडण । न लगे कांहीं दंडधारण । सूत्रत्याग भस्मविलेपन । न लगे भ्रमण निवृत्ता ॥२५॥
या वस्त्रअलंकारभूषणीं । भय नाहीं तयालागोनी । ऐक्य जालें सर्वात्मकपणीं । भले राहणी आचरे तो ॥२६॥
मानापमान नाहीं ज्यास । सर्वांपक्षीं उदास । तोचि जाणावा निर्दोष । हाचि संन्यास निश्चयें ॥२७॥
आतां ग्राह्य तें काय करावें । या प्रश्नीं उत्तर परिसावें । तें श्रवणीं आदरें सांठवावें । श्रोतीं ध्यावें गुणासी ॥२८॥
येथें प्रवृत्ति निवृत्ति दोन । मार्ग असती भिन्न । दोन्ही राखिजे परीक्षोन । सांगतों निवडोन परिसिजे ॥२९॥
प्रवृत्ति म्हणजे लोकाचार । निवृत्ति म्हणजे आत्मविचार । एवं जाणावया प्रकार । जाणवितों सार विभक्तें ॥१३०॥
प्रवृत्तीचे ग्राह्य गुण । ऐकिजे जी सावधान । देश काळ वर्तमान । विवेकें आचरण आचरावें ॥३१॥
वस्तुभेद सेव्य सेवन । विचारूनी कीजे कार्यकारण । विहित अनहित जाणोन । मंगळ भोजन करावें ॥३२॥
प्रतिदेशीं अनाचार । एक दोन असती निर्धार । पदर्थी जाणोन कार्यसार । घेतां विचार राखिजे ॥३३॥
असो हें प्रवृत्तिसंपादन । आतां निवृत्तीची परिसा खूण । स्वकर्मी ग्राह्य असावें निपुण । स्वामीक लक्षण लक्षिजे ॥३४॥ अग्राह्यतें काय करावें । माया मोह विषय लोभ त्यजावे । सार स्वस्वरूपीं सावध असावें । स्वतत्वीं रमावें सर्वदा ॥३५॥ ग्राह्य अग्राह्य लक्षण । येथें निवडितां लागे दूषण । सर्व वस्तु कार्यकारण । असती पूर्ण निर्धारें ॥३६॥
परी प्रसंगोपात ग्राह्य करावें । अप्रासंगिक सर्वथा त्यजावें । हे विवेक विचार जाणावे । स्वअंगीं बाणावे प्रदास्न जें ॥३७॥
मान्य तें ग्राह्य कीजे । अमान्य तें त्यागिजे । या दोहींतें वोळखिजे । अंगीकारिजे यथा रीतीं ॥३८॥

देव द्विज गुरु गोसेवन । स्वकर्म दया धर्म पूर्ण । स्वकुल आहार व्यवहार कारण । ग्राह्य प्रमाण सत्संग ॥३९॥
कथापुराण भजन । श्रवण मनन निदिध्यासन । अतीत अभ्यागत गांजले जन । यांचे सेवन ग्राह्य पैं ॥१४०॥
तीर्थयात्रा पर्वकाळ । व्रतउद्यापनें मंगळ । यज्ञास न योग सुशीळ । विद्या सकळ ग्राह्य कीजे ॥४१॥
सदाचरण तापस । पांचही आश्रम विशेष । आत्मविचारणा ज्ञानरस । सेवनीं सुरस ग्राह्य कीं ॥४२॥
भक्तिभाव वैराग्य । अनुताप विरक्ती सांग । तत्त्वविचार समाधि अंग । विवेक संग ग्राह्य बरा ॥४३॥
पितृआज्ञा श्रेष्ठाचार । इंद्रियदमन मनावर । सुकर्ममार्ग धुरंधर । कीजे अंगीकार ग्राह्य हा ॥४४॥
प्रपंचसार जाणावें । परमार्थपर आचरावें । नम्र सर्वांभूतीं व्हावें । ब्रह्मैव पाहावें ग्राह्य हें ॥४५॥
निवेदिलें हें ग्राह्यसार । नाहीं वाढविला विस्तार । आतां अग्राह्याचा विचार । जाणवितों निर्धार उमजावया ॥४६॥
विकार आणि विकृति । कुभावना कुतर्क निश्चितीं । अहंबुद्धि लोभ मती । त्यजाया प्रीतीं योग्य ह्या ॥४७॥
द्वेष निंदा कुसंग । कुमंत्र कुतंत्र प्रसंग । अज्ञान मूढत्व विभाग । विपरीक रंग अग्राह्य ॥४८॥
चोरी जारी मारी भेद । अर्भक पाखांडादि वाद । मोहमायिक वा उगा खेद । अप्राप्य छंद अग्राह्य ॥४९॥
इंद्रियचेष्टा परकुचेष्टा । मूर्खत्व इच्छा मानप्रतिष्ठा । अत्यंत संशयें पावणें कष्टा । संतीं अनिष्टा अग्राह्य हें ॥१५०॥
मलिन अमंगळ अनाचार । नीचसेवा निंद्य आहार । वल्गना यात्रटपणा फार । अग्राह्य निर्धार सर्वापी ॥५१॥
सारी नारी लंपटपणा । श्रेष्ठ अवज्ञा अगम्यगमना । नष्ट भ्रष्टता वाउगी भ्रमणा । विक्षिप्तपणा अग्राह्य हें ॥५२॥
गुरुपितृअनादर । असत्य विचार व्यवहार । वर्म खोंच लोभ अपार । कलह थोर अग्राह्य ॥५३॥
हें ग्राह्य-अग्राह्य निवडिलें । सद्गुरु अवधूतें उपदेशिलें । हें जे अंगीकारितील भले । तेचि पावले सार सर्वे ॥५४॥
अवधूत सद्गुरुज्ञानसंपन्न । प्रबोधें करीतसे जगपावन । जया स्वहिताची चाड पूर्ण । तेणें हें श्रवण कीजे आधीं ॥५५॥
जो साची येथींचे उपाय । त्याची आधिव्याधी ताप जाय । गुह्य आपुलें प्राप्त होय । स्वरूपीं धाय धरणीवरीं ॥५६॥
दत्तें दत्त केली स्वामना । ती फावली योगी साधुसंतां । तेणें साधोनि पूर्ण परमार्था । ते सुख समस्तां वांटिती ॥५७॥
जो अनन्यभावें येतसे शरण । सदैव तयासी करिती पावन । न पाहतीं त्यांचे दोषगुण । करिती समान आपणासें ॥५८॥
न शोधिती त्याची वर्णयाती । सद्द बोळखिती भावभक्ती । क्षण न लागतां अंगीकारिती । प्रसाद देती सद्भावें ॥५९॥
ऐसे संत सदय उदार । सर्व संपन्न ज्ञानी गंभीर । लक्षोनि शरणागत पामर । देती अभयकर स्वलीलें ॥१६०॥
महामहंत हे योगीसंत । सद्भावें यासी शरणागत । होवोनि विनवी अनंतसुत । कीजे पारंगत मज दीना ॥६१॥
तुमचे लक्षोनिया चरण । तिष्ठे द्वारीं रात्रंदिन । देवोनिया कृपादान । वारा शीण सर्व माझा ॥६२॥
पाठीं लागलें भवभय । म्हणोनि केला चरणाश्रय । तुम्ही सर्वत्र देते अभय । सर्व उपाय तुम्हां हातीं ॥६३॥
यदर्थ विनवी मी संताला । कृपें निरखोनि अनंतसुताला । स्वमुखें वदोनि दास आपुला । लाविजे सेवेला पादपद्मीं ॥६४॥ तुम्ही संत श्रोत्यांचा उल्हास । देखोनि नोवला अविनाश । वर्षवोनि हा कथामृतरस । श्रोते सज्जनां संतोषविलें ॥६५॥ पुढिले प्रसंगीं अद्भुत । रस वाटवील तो स्वामी दत्त । तेथील अधिकारी तुम्ही संत ।

मजही पंक्तीन प्रसाद द्या ॥६६॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपद्मपुराणींचें संमत । श्रोते परिसोत संतमहंत । त्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥१६७॥

॥ इति त्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ३१ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ॥

जयजय सद्गुरु अविनाश दत्ता। महा समर्था भाग्यवंता। दीनजनपालका अनाथनाथा। त्रिगुणातीता सर्वज्ञा ॥१॥ जय अनंत वेषा तूं गुणवर्या। ज्ञानधना तूं प्रकाशसूर्या। अज अजिता तूं आर्या। कार्य अकार्या जाणता तूं ॥२॥ जयजय सद्गुरु अनंता। सर्व भरिता मायातीता। भवमोचका त्रितापहार्ता। वदवी ग्रंथा तुझा तूं ॥३॥ तुझे कीर्तीचें महिमान। चालवीं रसाळ निरोपण। कर्ता करविता लेखन। वार्ता श्रवण तूं होसी ॥४॥ तिसावे अध्यायाचे अंतीं। ग्राह्य अग्राह्य गुण निश्चितीं। आतां समाधीची वदा स्थिती। श्रोते श्रवणार्थी भुकेले ॥५॥ अवधूता तूं सतेज अंबुधर। पानार्थ वेधले श्रोते चतुर। घनमार्ग लक्षिती हे मयूर। गर्जोनि जळधर वर्षे तूं ॥६॥ जय जय स्वामी अविनाश दत्ता। सदय भाग्यवंत उदार दाता। हें ऐकोनी धांवला याचक श्रोता। मुखीं मनोरथ याचिया ॥७॥ अविनाश वस्तूंचें अवीट भांडार। तया नाहींच अंतपार। तेथील जाणतोसि तूं व्यापार। नाम सर्वेश्वर तुला साजे ॥८॥ जे जे इच्छा जया चित्तीं। ते तूं जाणसी निश्चितीं। सद्भाव देखोनि निगुतीं। करोनि प्रीती पुरविसी ते ॥९॥ जे भक्त भाविक प्रेमळ। तयांची पोटीं वाहसी कळकळ। माउली होउनी पुरविसी आळ। सत्य स्नेहाळ तूं खरा ॥१०॥ तूं नाशिवंताते नाशिसी। अविनाशपद स्वकृपें देसी। जन्ममरणातें मुकविसी। आत्मत्वें पाववीसी त्रुटिमात्रें ॥११॥ऐसा तूं उदार योगिराणा। होसी वंद्य तूं वेदपुराणा। तुझा महिमा न कळे कोणा। सद्गुणसंपन्ना गुरुदत्ता ॥१२॥ अनन्यभावें तव चरणीं। अनंतसुत लोटांगणीं। प्रार्थीतसे तुज करुणावचनीं। अर्थिक जनीं लक्ष दीजे ॥१३॥ श्रोते सज्जन सत्पात्र। श्रवणीं वाट पाहती पवित्र। प्रश्न अनसूयेचे विचित्र। वदे स्वतंत्र विवरोनी ॥१४॥ अनसूयेचे प्रश्न रत्नराशी। ते स्वप्रकाशें लेववी श्रोतियांसी। तव कृपेवीण निरोपणासी। रस निश्चयेसी उद्भवेना ॥१५॥ स्तुतिस्तवनाते परिसोन। ओळला अविनाश दयाघन। म्हणे निर्वेध चालेल निरोपण। कीजे श्रवण श्रोतेजनीं ॥१६॥ कः समाधिस्थ या प्रश्नबोला। ऐकोनि अविनाश आनंदला। वेगीं निरोपणी सरसावला। उल्हास सकळां देखोनी ॥१७॥ जेवीं उदया येतां निशापती। कुमुदिनी आनंदे विकासती। तेवीं श्रोतियांचे चित्तीं। आनंदें प्रीती उदेली ॥१८॥ कीं दाता दुर्बळासी बोल्लतां। तो संतोष न समाये त्याच्या चित्ता। जेवीं मिष्टान्नलाभ क्षुधिता। तेवीं सप्रेमता श्रोतियांची ॥१९॥ असो अवधूतकृपेचें हें निरोपण। येथें श्रोतीं होईजे सावधान। प्रश्नाचें होतसे विवरण। करा श्रवण सावकाश॥२०॥ सर्व गुणांचा अंगीकारू। चातुर्यकळा ज्ञान आवरू। शांत दांत विवेक विचारू। लौकिक संभारू मान प्रतिष्ठा॥२१॥ ऐसिया गुणें परिपूर्ण। यश कीर्ति वर्धमान। पराक्रम शक्तीचें आचरण। घालोनि आपण गाजे जगीं ॥२२॥ सर्व मार्गेसी विनटला। जगीं मान्यतें मिरवला। सतेजपणें अत्यंत तपला। योग्यता पावला दिग्विजयी॥२३॥ ऐसी योग्यता ज्ञान पावोन। ते अंग्यता जाय विसरोन। मनीं शांति विरक्ति धरोन। निरभिमान वर्ततसे ॥२४॥ त्यजोनिया लोभ अहंता। अंतरीची त्यागी मोहममता। समभावें पावे सर्व भूतां। द्वेष क्रोधता टाकोनी ॥२५॥ सकळ गुणांचा जो गुण। सकळ ज्ञानाचें जें ज्ञान। सकळ लक्षणांचें लक्षण। शोधी पूर्ण मानसीं ॥२६॥

सकळ गुजांचें जें गुज । सकळ बीजांचें जे बीज । सकळ तेजाचें जें तेज । शोधी तें निज स्वमानसीं ॥२७॥
जेवीं स्त्रिया भिजविती गव्हां । वजावाटीनें साधिती रवा । कीं क्षारेकरी शोधी वरवा । स्वहित अनुभवा तैसा हा ॥२८॥
विषयभोगीं होऊनि उदास । सर्वे भावें म्हणवी दास । धुंडी अविनाशपदास । भ्रमर मकरंदास तेवीं तो ॥२९॥
भूक भुकेनेंचि खाये । ताहान तान्हेलीच राहे । वृत्ति विरोनीच जाये । नाठवितां होय मी देहा ॥३०॥
तत्वमस्यादि लक्षण । महावाक्यादि विवरण । सारासार शोधी आपण । मीतपण न करोनि ॥३१॥
वैराग्यअनुतापें विरक्त । सर्व विषयपक्षीं तो अशक्त । अंतरनिष्ठ अनुरक्त । न म्हणोनि भक्त सेवीतसे ॥३२॥न दावी जगीं जाणपणा । न मिरवी थोरवीच्या कारणा । सहिष्णुता बाणवी आपणा । लावितां दूषणा न मळे मनीं ॥३३॥
आत्मअनात्मी विचार । मनीं नाणीच हें आपपर । सिद्धांत निरखी सर्वेश्वर । हा निर्धार जयाचा ॥३४॥
निरपेक्षता धरोनि मानसीं । स्वइच्छे वावरे अवनीसी । फिरे निर्विकल्प उदासी । ब्रह्मैव सकळांसी विलोकी ॥३५॥
आत्मविचार साधी साधन । तत्वीं तत्वांचें करी शोधन । निजात्मतत्वार्थाचोनि धन । मृत्तिका शेण मानी जीवीं ॥३६॥
आदर सन्माना नातळे । उठूं नदी विकृतिरिपूंचे उमाळे । उपसर्गितां कदापि न मळे । स्वस्वरूपीं खेळे सर्वदा ॥३७॥
इतर नावडती कदा भोग स्वरूपी लक्ष न ढगे करितां उद्योग । निशिदिनीं साधी निजात्मयोग कधींही वियोग होऊं नेदी ॥३८॥ आब्रह्मस्तंबपरियंत । वस्तुरूपेंचि सर्व देखत । तद्रूपींच रंगलें चित्त । जीवीं विपरीत न दिसे त्या ॥३९॥
सप्त चक्रांते भेदून । आठवे चक्री ते उन्मन । त्यामाजी तो जाय विरोन । नसे आठवण कांहींच त्या ॥४०॥
साक्षित्वें करोनि व्याप्ती । जगीं स्वानंदे विचरती । कर्मअकर्मातीत होती । आनंदे डुल्लती तद्रुपीं ॥४१॥
तयां सुखदुःख समान । लाभ अलाभ तैसीच हान । निर्भय अचळ समाधान । सप्रेम सुखसंपन्न सर्वदा ॥४२॥
सदा स्वरूपीं जागृत । निद्रा भासोनि ते उन्मत्त । उन्मनीसंगे ते सदा रमत । दिसती भ्रांत जगासी ॥४३॥
अखंड समाधि निर्विकल्प । नसे आसन मुद्रा खटाटोप । गौमुखी नेणती माळाजप । अमोघ तप तयांचें ॥४४॥
बाळ उन्मत्त पिशाचवत । कारणपरत्वें धारणा धरित । प्रगट दिसों न द्यावया जगांत । येणें आच्छादित राहती ॥४५॥
एवं अंतरबाह्य रंगला । अखंड समाधि बोलिजे याला । एवं पांच समाधींचा भाग नेमिला । तो याचि मेळा पावावया ॥४६॥ जेणें त्यागिली उपाधि । त्याची सरली आधिव्याधी । अखड हे साधिली समाधी । सुखें ब्रह्मपदीं नांदे तो ॥४७॥ सर्वीं व्यापोनि राहिला स्वतंत्र । तेणेंचि साधिलें इहीं परत्र । तोचि सर्वांतीत पवित्र । साक्षित्वें मात्र उरलासे ॥४८॥ स्वात्मतत्वीं वृत्तीरत । तोचि जाणिजे स्वयं मुक्त । तयाचे संसर्गें पतित । होती पुनीत अधम ते ॥४९॥
धन्य धन्य त्याची नवलाई । देव सुर ऋषी लागती पायीं । तो संपूर्ण सर्वा ठायीं । वर्णूं काई किती त्यातें ॥५०॥
ब्रह्मैववृत्ति उल्हास । यातेंचि म्हणावें परमहंस । त्याचे दर्शनें तुटती पाश । भवनाश कृपें त्या ॥५१॥
स्वरूपीं निमग्न जालें चित्त । देही असोनि देहातीत । अद्वय सदा आनंदभरित । तोचि अवधूत बोलिजे ॥५२॥
सदैव ब्रह्मी तल्लीन । सर्वां भूतीं तेंचि अवलोकन । तोचि जाणावा ब्रह्म पूर्ण । थोर त्याहून कोण्ही नसे ॥५३॥
अंतःकरण पादृव्यबुद्धी । साधिली न मोडेचि समाधी । त्यासीच म्हणिजे सत्तसंधी । अविनाशपदीं तो नांदे ॥५४॥

ससर्ववित् सर्व । हें पद साजे त्या अपूर्व । तया दर्शनें अनंत पर्व । घडला उर्ध्ववास देवीं ॥५५॥
हें समाधीचे लक्षण । तुम्हां सज्जना केलें निरोपण । ऐसे जया साधे साधन । तोचि पूर्ण पद पावे ॥५६॥
मातेसि म्हणे अविनाश । या रहणीं आम्हां उल्हास । म्हणोनि निवेदीं तुम्हांस । पुरवा आस एव्हढी ॥५७॥
तंव अनसूया म्हणे बाळा । कठिण साधणें ही कळा । साधील तो दैवागळा । सर्वोत्तम पुतळा तोचि तो ॥५८॥
हें साधावया साधन । अनंत जन्मींचें पाहिजे तपाचरण । तत्पुण्यें पावेल हें धन । समाधान समाधी हें ॥५९॥
हें एकेचि जन्में साधेना । ऐसें वाटतें माझिया मना । हें ऐकोनि योगिराणा । काय वचना बोलत ॥६०॥
अनसूयेचे प्रस्ताविक बोल । ऐकोनि दत्ता उपजे कळवळ । हास्यवदनें सकोमळ । वचन निर्मळ बोलती ॥६१॥
जी माते अनसूये । तूं बोलसी तें सत्यचि होय । येथेंचि असे जो निर्णय । निरोपितों होय सावध तूं ॥६२॥
माते येचि लाभासाठी । नरदेह हा नेमिला सर्वाशेवटीं । सकळ फळल्या तपाच्या कोटी । म्हणोनि गोष्टी जाली हे ॥६३॥
पापा दाहोनि पुण्य राहे । तेंच हा पावे नरदेहे । सर्व जाणपणा येथेंचि पाहे । बहु काय सांगूं तुज ॥६४॥
उत्तम नरदेहो पावतां । सर्वज्ञपणें हा होय जाणता । येर जन्मीं नसे योग्यता । साधी स्वात्मता हें नोहे ॥६५॥
माया मोह विषयादि सुख । लोभ ममता द्वेष देख । गृह दारा आप्तादिक । विकृति अनेक शोक भयें ॥६६॥
येर जन्माचे ठायीं । हें तंव असे सर्व कांहीं । परी परमार्था जाणावया ज्ञान नाहीं । अलभ्य नरदेही लाभ हा ॥६७॥
सर्व लाभांत लाभ नरदेहाचा । त्यांतहि विशेष आत्मज्ञानाचा । हा अलंकार जडावाचा । श्रीमत्प्रभूचा प्रियकर ॥६८॥
जें सर्व प्रियांचें प्रिय । जें सर्व श्रेयांचें श्रेय । नरदेहीं येवोनि तद्रूप होय । तोचि राय योगियांचा ॥६९॥
तो श्रेष्ठ सर्वांहोनी । साक्षित्वें राहिला विनटोनी । तोचि वंद्य वेदपुराणीं । परब्रह्मभुवनीं नांदतो ॥७०॥
धन्य धन्य त्याची माता । धन्यचि होय त्याचा पिता । धन्य त्याची कुळगोत्रता । धन्य योग्यता काय वर्णूं ॥७१॥
धन्य त्याचेनि हे सकळ । धन्य त्याचेनि भूमंडळ । धन्य धन्य तो पुण्यशीळ । परब्रह्मीं अढळ वास त्या ॥७२॥
माते त्याची वदतां मात । अंतर होतसे प्रेमभरित । तो समर्थांचा होय समर्थ । सकळ सामर्थ्यं पायीं त्याच्या ॥७३॥
यदर्थी माते तुम्हांसी । निरोपितों सत्य प्रबोधासी । हें बाणवोनि दृढ मानसीं । लोभमोहासी त्यजि माया ॥७४॥
श्रीमत्सद्गुरु अत्रिनाथ । यासी व्हावें शरणागत । त्याचिया कृपें निश्चित । पावसी अखंडित समाधी हे ७५॥
त्या कृपेचा पावतां लाभ । सरसावतील आनंदाचे कोंभ । मग तुझी तूंचि स्वयंभ । सर्वारंभ होसी कीं ॥७६॥
मग तूं-मी भेदा विसरसी । लीन होसी ब्रह्मसमरसीं । सर्वात्मकीं होसील सरसी । टाकसील आरसी होवोनी ॥७७॥
पिता माता पुत्रता । स्वकुळ विसरसी गोत्रता । अत्रि देवांची अत्रता । तुझी स्वतंत्र तुज दीजे ॥७८॥
अत्रि अवधूत अनसूया । मूळासरें एकची त्रया । येथें न धरी संदेहमाया । अविनाश ठाया पाविजे ॥७९॥
को ब्राह्मणः म्हणोन । हा तुझा निसावा प्रश्न । येथें कल्पना न करी माझें मन । ब्रह्मवित् ब्राह्मण सर्वही ॥८०॥
याचे वेगळेचि विचार । तें किंचित मी बोलतों सार । मूळ ब्रह्म हें निराकार । तेथोनि साकार एक तें ॥८१॥
ब्रह्मासि चेतना स्फुरले । तेथें चैतन्य ऐसें नाम पावलें । इच्छाशक्तीनें प्रगटविलें । नरनारी आकारलें महामाया ॥८२॥

त्या महामायेची विकृती । द्विविधा जाली ते निश्चितीं । पुरुष आणि प्रकृती । जाली स्थिती इच्छावसे ॥८३॥
महातत्त्व मायाउँम्कार । तेथोनि त्रिमात्रिक त्रिगुण विस्तार । त्रिशक्तिरु त्रिदेव साचार । त्रिगुण अहंकार जनन या ॥८४॥ शुद्ध निखिल ब्रह्म वेगळें । तन्मायाचि हे खेळ खेळे । तिनेंचि हे उद्भवोनि बाळें । कामें निराळें सोंपिलीं ॥८५॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर । हेचि त्रिदेव गा निर्धार । तिघां हातीं सविस्तर । सृष्टिव्यवहार चालविला ॥८६॥
उद्भवशक्ति ब्रह्मयाची । पालनशक्ति विष्णूची । संहारशक्ति रुद्राची । योजना त्यांची या रीतीं ॥८७॥
असो ब्रह्मापासोनि ब्रह्मदेव । त्यापासाव हा सृष्टिउद्भव । स्थावर जंगम काष्टपाषाणादि जीव । नाना अपूर्व विस्तारले ॥८८॥
ब्रह्मापासोनि हा ब्राह्मण । त्याचेचि उद्भव ते हे जीव पूर्ण । सकळ जीवांचें जीवन । तोचि व्यापुन उरलासे ॥८९॥
यदर्थ मजलागीं भासे । सर्वां ठायीं ब्रह्मत्व असे । त्याहून रिता ठाव नसे । चराचरीं वसे ब्रह्मत्व हें ॥९०॥
याची वर्णापासोन । निर्माण जाले चार वर्ण । तेथोनि वेदमर्यादा जाण । याती भिन्न क्रियायोगें ॥९१॥
हा योग मार्गे निवेदिला । परी किंचित कारणीं येथें घेतला । मूळ तेंचि अग्राला । पल्लवाला काय दुजें ॥९२॥
एकें वृक्षा विचारिलें । तो परीक्षोनि अचूक बोले । एके फांदीं पत्रपुष्पमूळा दाविलें । त्यांचीं स्थापिलें नामें कीं ॥९३॥
फळ मूळ पत्र शाखा । केवीं विभक्त बोलवती देखा । तेवींच हाही असे लेखा । कासया शंका व्हावी येथें ॥९४॥
परी माया मोह भ्रम थोर । त्यांत वेदें स्थापिले अधिकार । त्याहीवरी लाविला कर्माचार । अभिमान थोर माजला ॥९५॥
आचरणकर्मे भिन्न भिन्न । मताभिमानें द्वेष दारुण । लोभ मोहें विरुद्ध पूर्ण । कलह कारण स्पर्धा बहु ॥९६॥
विद्या धन विषय मद । त्यांसी न जाणतां जाले अंध । करिती संवादीं वादविवाद । अहंतें भेद वाढती ॥९७॥
मूळ वर्मातें विसरले । स्वहित लाभा नागवले । जन्मकर्म भोगितां भागले । परी न उबगले नरकवासा ॥९८॥
धर्म नेणोनि कांहीं । बुडती मृगजळमाया विकल्पडोहीं । ऐसियासी करावें कायी । बोधितां पाहीं न मानिती ॥९९॥
कटु तेंचि गोड म्हणती । गोड कटु म्हणोनि थुंकिती । सत्यासी अव्हेरोनि देती । असत्य स्वीकारिती बळेंची ॥१००॥
पाहतां पाहा हे नागवले । स्वहितार्थातें आंचवले । परात्परातें नाडले । वांयाची भ्रमले फेरीं हे ॥१॥
चुकवावा येथें जन्मफेरा । जोडावा परात्पर सोयरा । तें न करोनि येला माहेरा । काय या गव्हारां म्हणूं आतां ॥२॥
अनसूया म्हणे तिरस्कारें । योगींद्रा बोलसी उत्तरें । तरी त्यांतील वर्म कोणतें खरें । तेंचि बारे सांगे मज ॥३॥
वेदें मर्यादा लाविली । विभक्त कर्मे पृथक स्थापिलीं । तीं नाचरतां गा वहिलीं । थोर स्थापिली दोषवार्ता ॥४॥
स्वकर्माचरण श्रेष्ठ । ऐसें वेदे स्थापिलें स्पष्ट । नाचरतां म्हणती भ्रष्ट । म्हणती कनिष्ठ दूषिती ॥५॥
वर्ण याती न टेवितां । वर्णसंकर येतसे माथां । येणें होय द्वेष वाढता । केवीं स्वहिता सांग पावे ॥६॥
परिसोनि मातेची वाणी । गद्गदा हांसे मोक्षदानी । माते बोलसी कल्पना वेवोनी । तें मी मनीं जाणतों ॥७॥
स्वहितकारणासाठीं । वेदआज्ञे पडलीं संकटीं । विरुद्धें वाढें म्हणोनि पोटीं । कल्पना उठती जाली हे ॥८॥
तुझे कल्पनेचें निरसन । व्हावया करितों निरोपण । तूं सादरें करीं श्रवण । हृदयीं पूर्ण सांठवी ॥९॥
वेदें स्थापिल्या वर्णयाती । कर्म धर्म लाविले निश्चितीं । ते तुझेयाचे कल्पांतीं । निवेदिल्या रीतीं आचरावें ॥११०॥

त्यांतें नाणोनि दूषण । प्रपंचहीन भंगावा अणुप्रमाण । रक्षोनि लौकिकसंपादन । स्वहितकारण साधावें ॥११॥
तें वर्म म्हणसी जरी कोणतें । सावध होई सांगतों वृत्ते । येथें साह्य कीजे विवेकातें । आणि मनातें आकळिजे ॥१२॥
सद्गुरूसी जावोनि शरण । दृढ सेवावे त्याचे चरण । काया वाचा मन प्राण । सर्वस्व धन त्या अर्पी ॥१३॥
त्या सद्गुरूचा बोध । तो मनीं बाणविजे सावध । निरोपील जो मार्ग शुद्ध । तोचि प्रसिद्ध आचरावा ॥१४॥
तें सद्गुरुप्रासादिक ज्ञान । पावतां होईल तत्त्वदर्शन । तें सर्वात्मकीं राहिलें व्यापुन । त्याविण आन कांहीं नसे ॥१५॥
जें गुह्य दावितील नयनीं । तें आब्रह्मस्तंब राहिलें व्यापोनी । रिता ठाव त्यावांचोनी । मजलागोनी न दिसेची ॥१६॥
देहीं ते खूण पावतां । तद्रूप विलोकावें या भूतां । मग ते सहजची नासेल चिंता । निर्विकल्पता प्राप्त होय ॥१७॥
मग जें जें कर्म करी । तें ब्रह्मरूप होय निर्धारीं । प्रपंचाची नुरे उरी । परमार्थपरी सर्व ते ॥१८॥
येथें वर्ण याती न विघुडणें । नलगे प्रपंच हा सांडणें । अवघें ब्रह्मरूप पाहणें । अद्वय होणें मानसीं ॥१९॥
स्वस्वरूपीं सावध राहतां । कासया व्हावी विरुद्धता । अंतर दृष्टी दृढावतां मग बाधकता केवीं पावे ॥१२०॥
हाचि साधी आतां योग । तेणें तुटती सर्व रोग । ब्रह्मानंदीं साधी भोग । अंतरीं निःसंग होऊनिया ॥२१॥
योगारूढ होवोनि नीट । विषयपदार्थी मानिजे वीट । विवेकें मोडावी कचाट । होउनी धीट वागावें ॥२२॥
पाहे पां उदकावरी किडे खेळती । आनंदें करोनि मंडळें करिती । परी ते उदकीं कदा न बुडती । तेवींच निश्चिती वागणें
॥२३॥ नळिनी उदकामाजी पाहे । पर्जन्यउदक वरी वाहे । उदकीं राहोनि भिजेना हे । असक्त राहे या रीती ॥२४॥
ओघानुरूप कर्म होये । मी कर्ता हा सांटी अपाये । साक्षित्वें उगला राहे । ब्रह्मैव पाहे सर्वही ॥२५॥
पैल सर्व ब्रह्मेति । निर्णय शब्द बोले श्रुती । तद्रूप होतां हे वृत्ती । तेचि स्थिती ब्रह्मैव हें ॥२६॥
आदि मध्य अंतीं जाण । । अवघें ब्रह्मत्व राहिलें व्यापून । सद्गुरुकृपें तें निरखोन । घेई आपण होय तें ॥२७॥
सांडोनि सर्व कल्पना । विकल्प नाणोनि स्वंजी वासना । रिपुविकृति कामना । सांडोनि भ्रमणा स्थिर होय ॥२८॥
अमनस्क मन करोनि ठेवीं । चित्त चैतन्यीं मुरवीं । ब्रह्मानंदीं लक्ष ठेवीं । आत्मअनुभवीं रंग दे ॥२९॥
तीस प्रश्नांची निवृत्ती । हे निरोपिली माते तुजप्रती । उरलें दहा प्रश्न निगुतीं । तेही पुढती सांगेन ॥१३०॥
ऐसियापरी श्रीदत्त । मातेच्या निमित्तें जगा बोधित । हें अवधारोनि सावचित । साधा स्वहित आपुलें पैं ॥३१॥
अविनाश अनंत वेष धरून । निजबोध निरोपी मुमुक्षांलागुन । तो अंगीकारोनि होइजे संपन्न । निजात्मधन साधोनिया
॥३२॥ दत्तमाऊली हे कृपाळ । तया या दीन जनांची कळकळ । मावार्थ देखोनि पुरवी आळ । वारी तळमळ अंतरींची
॥३३॥ दत्त भावभक्तीचा भुकेला । अनन्य देखोनि पावे त्याला । जैसे मनोरथ जयाला । तैसाचि सोहोळा पुरवीत ॥३४॥
श्रोत्यांसि विनवी अनंतसुत । दत्त सद्गुरु हा समर्थ । संत सज्जनांमाजी हा रमत । लीला दावीत अनेक पैं ॥३५॥
संत श्रोते साधु योगी । सिद्ध रंगले अवधूतरंगीं । तत्प्रसादें निर्भय निःसंगी । आनंदें जगीं वागती ॥३६॥
दत्त कृपेची पावली कळा । तेणें भोगिती आनंदसोहळा । अविनाशरूप पाहती डोळां । प्रेमजिव्हाळा अखंड ॥३७॥
तुम्ही संत सौख्यसागर । तुमच्या भाग्यासि नाहीं पार । कोमल सदय तुमचें अंतर । दीन दातार तुम्ही की ॥३८॥

तुम्ही सर्वज्ञ संपन्न। जाणतां दीनाचें कारण। कृपादानीं तोषवून। करितां पावन अनाथा ॥३९॥
या कीर्तीचे वडिवार। ऐकोनि कर्णी अपार। याचकपणें धरोनि द्वार। उभा किंकर दानार्थी ॥१४०॥
तुम्ही उदार साधुसंत। आर्थिक विनवी अनंतसुत। माझे पुरवा जी मनोरथ। तुमचा अंकित म्हणवितों ॥४१॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रीनारदपद्मपुराणींचें संमत। पारिसोत श्रोते भाविक संत। एकत्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥४२॥

॥ इति एकत्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ३२ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीसद्‌गुरु दत्तात्रेयाय नमः ॥

ॐ नमोजी दत्तात्रेया । निरसी माझी अज्ञानमाया । त्रिविधताप लावी विलया । करी दया सद्‌गुरो ॥१॥ तुते नमोनि सर्व भावें । मज दीनानें अपंगावें । ग्रंथरचनीं सांभाळावें । मज त्वां निरवावें संतांतें ॥२॥ मी केवळ तुझें अज्ञान बाळ । माझी तुझ्याविण कवणा कळकळ । तूं माझी माउली स्नेहाळ । पुरवी आळ आवडीची ॥३॥ दत्ता तुझा म्हणवीं मी दास । तुझे चरणीं माझी आस । जीवें भावें धरिली कास । मज त्वां उदास न करावें ॥४॥ जो मनीं धरिला हेत । तो पूर्णकर्ता तूंचि दत्त । दीनजनांचे जाणसी हित । अनाथनाथ तूं होसी ॥५॥ स्वात्मप्रबोधें करून । करिसी जगतीचें उद्धरण । तुझे नाम पतितपावन । स्वानंद जीवन उदार तूं ॥६॥ प्रश्न अनसूयेचा निसावा । गताध्यायीं निरोपिला बरवा । श्रवणीं संतोषविलें सर्वां । आनंद जीवां तूं देसी ॥७॥ आतां प्रश्न दहा उरले । त्या श्रवणीं श्रोते आर्थिले । हे जाणोनि पाहिजे वदविलें । कृपाबळें आपुलिया ॥८॥ करवोनि कथामृतपाना । निरोपणीं रंगवी हे रसना । तोषवी श्रोतियां सज्जनां । ब्रह्मचिद्‌घना अविनाशा ॥९॥ परिसोनि विनित भाषण । अवधूत जाले सुप्रसन्न । अवधारोनि मातेचा प्रश्न । निरोपिती निवडून परिसीजे ॥१०॥ अविनाश वदे अनसूयेसी । उरले दहा प्रश्न निरोपितों तुजसी । तें सावधानें निजमानसीं । सांठवीं प्रेमेसीं आदरें ॥११॥ प्रथम विचारिलें त्वां आसन । तरी हे साधकां शुद्ध भूमि पूर्ण । द्वितीय तृणाचे होय जाण । विशेष दर्भासन त्यावरी ॥१२॥ मृगासन व्याघ्रासन । होय योगियां शोभायमान । काष्ठासन वस्त्रासन । प्रपंचिक जन त्यांलागीं हें ॥१३॥ ग्रंथवेद आणि रायासी । सिंहासन दिधलें त्यांसी । वृक्षासन योजिलें पक्ष्यांसी । शुद्ध सर्वांसी कंबळासन ॥१४॥ हीं आसनें सर्वां योजिलें । परि देहिक आसनें असती वेगळे । योगियां साधनीं त्यांत खेळे । नेम नेमिले च्याऱ्यांशी ॥१५॥ इत्यादि आसनें असती । परि एका आसनावीण शून्य दिसती । ते साधलिया हाता येती । लाभ निश्चितीं इच्छिले ॥१६॥ एकासनीं न बैसे मन । तरी कोण उपयोगी इत्यादि आसन । पंढा शूरत्न भूषण । अत्यंत करून व्यर्थ तें ॥१७॥ कीं स्त्रीवेष पुरुषा दिधला । वरी हावभावें मोही जनाला । केवीं कार्यार्थ नेये जाला । दंभार्था मिरवला व्यर्थचि कीं ॥१८॥ तेवि हें वरकांतीचे आसन । शृंगारयुक्त असते जाण । बहु बाढवितां घडे साधन । हें तों मजलागून दिसेना ॥१९॥ यदर्थी वैराग्य अनुताप उठतां । मना दीजे दृढासनता । अथवा विहार कार्य करितां । मनोनिग्रहता पाहिजे ॥२०॥ निश्चय होतांचि साचा । डग होऊं नेदी मनाचा । दृढावतां लाभ नेमाचा । अर्थसिद्धीचा होतसे ॥२१॥ *मन बैसतां दृढासनीं । मग हीं शोभती बरील लेणीं । मग अंतर्बाह्य बरवा भूषणीं । पदव्यापणीं मिरवेल ॥२२॥* आधीं मनातें स्थिर करावें । विवेकेंचि यातें आकळावें । दृढासन प्रथम हें साधावें । वर्म ओळखावें प्रथम हें ॥२३॥ हें न दृढावतां एक ठायीं । तरी न घडेचि कदा कार्य कांहीं । करोत केली तरी बंडाई । लाभ नाहीं सर्वथा ॥२४॥ असो आतां हा प्रश्नविस्तार । तुज म्यां निवेदिलें सत्य सार । आतां मुद्रा कोण तो प्रकार । तोही विचार परियेसी ॥२५॥ योगी आचरती मुद्राधारण । त्या दहा मुद्रा असती पूर्ण । त्यांचें मागां केलेंसें निरोपण । जालें श्रवण तुज माये ॥२६॥

अलंकार मुद्रा देहभूषणा । राजमुद्रा राजप्रकरणा । खूणमुद्रा कार्यकारणा । मुद्राधारणा तिलकांत ॥२७॥
ऐसी हे मुद्रेची परी । तुज निवेदिली निर्धारीं । परी मुख्य मुद्रा याहीवरी । ते अंतरीं निरखिजे ॥२८॥
सी मुद्रा अत्यंत सतेज । सर्व मुद्रेंसी त्याचें तेज । सर्वोत्पत्तीचें बीज । होय निज निर्धारें ॥२९॥
ते सद्गुरुप्रसादें करून । कीजेति गुह्य मुद्राधारण । मग सर्वात्मकीं येईल वोळखुन । तेथेंचि भिन्न राहिजे ॥३०॥
बिंबीं बिंबातें पाहिजे । बिंबोनि बिंबी हरपिजे । बिंबातीत स्वयें होईजे । पद हें पाविजे अविनाश ॥३१॥
एवं मुद्रेचें लक्षण । तुज म्यां केलें निरोपण । आतां कोण म्हणसी ध्यान । तेंही विवरण परियेसी ॥३२॥
जिकडे वेधलें हें मन । चित्त गेले संलग्न होऊन । यर वृत्ती गेल्या हारपोन । ध्यान हें जाण बोलिजे ॥३३॥
हा अनुभव सकळांसी । आहे माते जीवमात्रासी । जैसी तूं वेधलीस श्रवणासी । ध्यान यासीच म्हणावें ॥३४॥
कोणा ध्यान विषयाचें । काम भरें दासिकामिनीचें । प्राणधन काया वेंचिती साचे । भय लज्जेचें त्यजोनिया ॥३५॥
कोणाचें धनीं वेधलें चित्त । त्यासाठीं सर्वां लोलिंगत । कवडी कवडी वेंचित । ग्राह्याग्राह्यातें नोळखती ॥३६॥
कोण्ही कलत्रींच वेधले । मोहममतें भ्रमित जाले । अन्य कार्यातें विसरले । त्यांतच गुंतले दिवानिशीं ॥३७॥
कोण्ही अनेक अर्थी साधिती साधन । तेथेंचि रंगलें त्यांचें मन कोण्हीं दैवता यक्षिणी साधिती पूर्ण । कोण्ही सिद्धीस गुंतून वेधले ॥३८॥ कोण्ही क्रिया यज्ञयाग । कोण्ही आचरती नाना योग । कोणी साधिती अनेक प्रसंग । अनेक उद्योग ध्यानाचे ॥३९॥ इत्यादि ध्यानें मनाचीं । परी हीं विषयिक जाणिजे साचीं । काय धरोनि ही श्रमाचीं । स्वहित कामाचीं नोव्हेत हीं ॥४०॥ अन्वयें या साधितां साधन । जीवप्राणें धरितां ध्यान । येणें न तुटे भवबंधन । पाशासि दारुण गुंतवी ॥४१॥ ज्या ध्यानें हा भव अटे । ज्या ध्यानें भ्रम तुटे । ज्या ध्यानें माया निवटे । तें ध्यान गोमटें वेगळेंची ॥४२॥
ज्या ध्यानें होय शुद्ध वृत्ती । ज्या ध्यानें चुके आवृत्ती । ज्या ध्यानें पावे निवृत्ती । ती ध्यानगती वेगळीच ॥४३॥
ज्या ध्यानें तुटे अज्ञान । ज्या ध्यानें पाविजे ज्ञान । ज्या ध्यानें होइजे पावन । असे तें ध्यान वेगळेंचि ॥४४॥
तें ध्यान कोण म्हणसी । तरी आतांचि निरोपितों तुजसी । सावधान होवोनि मानसी । बाणवी मनासी आपुलिया ॥४५॥ आदौ सुश्रवणीं गुंतविजे मन । तदर्थ विवरणीं धरिजे ध्यान । भक्तिभावें सद्गुरुसि शरण । सेवेंत निमग्न मन कीजे ॥४६॥ तदाज्ञा वंदोनि शिरीं । योग साधावा निरोपिल्यापरी । ध्यानबाणवितील जे अंतरी । त्याचाच धरी निजछंद ॥४७॥ मना जडतां तो ध्यास । ध्यान ऐसें म्हणावें त्यास । सर्वमेव होतां तो भास । तें आम्हांस ध्यान गोड ॥४८॥
स्वस्वरूपीं जडलें मन । नावडे तया पदार्थ आन । तद्रूप दिसे ज्यास पूर्ण । या नांव ध्यान तें साधी ॥४९॥
आतां जप तो कोण जाणावा । हा प्रश्न तुझा बरवा । तो चक्रभेदीं म्यां अथवा । केला उगावा ऐकिला त्वां ॥५०॥
तो नाठवोनि प्रश्न केला । तो जगबोधार्थ माझ केला । स्वहितार्थ निरोपितों ये वेळां । भावें आकळा श्रवणरंध्रीं ॥५१॥
साडेतीन कोटी मंत्रावळी । असती या भूतळीं । तेचि स्वर्गे आणि पाताळीं । तिहीं स्थळीं भरलीसे ॥५२॥
या चौ वेदांपोटी । मंत्र असती औट कोटी । ऋषिमुखें प्रगटले सृष्टी । यांसी धूर्जटी जाणता ॥५३॥
त्या मंत्राचरणीं देवता । प्रसन्न होती गा बहुता । पूर्ण करिती इच्छिल्या अर्थां । करिती कोपता चुकल्या ॥५४॥

तयांचा कोप अनिवार । दाहिती किंवा भ्रम थोर। ते न वर्णवती प्रकार । भोगविती अपार विटंबना ॥५५॥
कितेक सुलभही असती । धीरें इच्छिलें फळ देती । परी न घडे भवहंती। स्वरूपस्थिती न पावे ॥५६॥
न खुंटवे त्यांचेनि जन्ममरण। अविनाशपद न देववे जाण। ईश्वरप्राप्तीचें कारण। न घडे त्यांकडोन मुक्तता ॥५७॥
यश कीर्ती आयुर । देववेल संपत्ति भाग्य कलत्र । कांता धन राज्यभार । बळशक्ति वर देतील ॥५८॥
चतुर्दश विद्या चौसष्टी कळा। दिव्यरूप देतील हेळा। स्वर्गादि संपत्ती सकळा। देवोनी सोहोळा पुरविती ॥५९॥
दासदासी वैभव । आप्तपरिवारादि समुदाव । पुरवितील अवघे इच्छितभाव । रंकाचा राव करतील ॥६०॥
पदें देवाचीं मागतां । तेंही देतील क्षण न लागतां । भूपद पाताळादि इच्छितां। वस्तु अमोल्यता पावविती ॥६१॥
गुप्त प्रगट अधरीं गमन । देह परदेह घडे धारण । सिद्धी ऋद्धि करितील सेवन । कृतीकारण इच्छेचें ॥६२॥
अनेक होईल सफळ वृष्टी। परी जन्ममरणा नोव्हे तुटी। परब्रह्मी न पावे दृष्टी। घोळवी कष्टी तो जप ॥६३॥
अनेक जपतप अनुष्ठान । हें तंव बद्धतेसी कारण। यदर्थ जन्मदातियें विचारोन । तारक योजून बोधिले ॥६४॥
गर्भागारीं असतां । द्विअक्षरें होय उच्चारितां । तें दिवानिशीं भरतां । संख्या नेमितां नेमिलो ॥६५॥
एकवीस सहस्त्र सा शते । प्रमाण होतसे पुरतें । तें प्रवाहरूपें वाहतें । खंड त्यातें असेना ॥६६॥
हें सर्व मंत्रांचें बीज । अखंट जपा चाले सतेज। जाणोनि संकल्पितां होय काज । हातां निज तेणें चढे ॥६७॥
त्या मंत्रीं होतां सावधता । तें प्रत्यक्ष ध्यानीं होती देवता । तद्रूपीं पूर्ण ऐक्यता । ध्यानीं विनय या भंगे ॥६८॥
म्हणोनि विश्वंभरे जाण। गर्भ नरकीं केलें रक्षण। सोडविलें त्या बंधापासोन। न लगतां क्षण मुक्त केला ॥६९॥
हा अनुभव सकळांसी। पूर्ण असोनि निश्चयेंसी। तैसाचि जरी राहता निजध्यासीं। मग तो अपायासी केवीं पडे ॥७०॥
परी प्रसुतिद्वारें बाहेर येतां। मायामोह जाला क्षळंबता। जाला बोधातें विसरता। पावला भ्रमता वायुसंगें ॥७१॥
विसरला मागील आठवण। भ्रमें कोहं शब्द राहिला पिटोन। स्वरूपस्थिती उडवावया पूर्ण। माया आपण वर पडे ॥७२॥
माया मुख आपुलें दावित। पल्लव घालोनि मोहें मोहित। शब्दनादें भ्रमवीत। बाळक आचकीत उगवलें ॥७३॥
होतां स्वरूपीं आठवण । तें न देखता दे रडोन। हाकुर शब्द करोन, । चुटक्या वाजवोन मुख दावी ॥७४॥
तें देखोनि विपरीत । तें बाळक पाहोनि हांसत । हें नोव्हे म्हणोनी रडत । माया कोंबीत स्तन मुखीं ॥७५॥
ऐसियापरी करोनि ममता। विसरवी बाळाची स्वरूपता। त्या स्वरूपाची साक्षता। श्रोत्यांसी आता निरोपितों ॥७६॥
अत्यंत रडतां बाळ । उचलोनि घेती उतावेळ । ते दीप दृष्टीसी पडतां तात्काळ । होय निश्चल त्या पाहे ॥७७॥
त्याकडे पाहोनि बोले गोष्टी । प्रभा देखोनि आनंदे पोटीं । तैसी पावे उठाउठी । करी खटपटी कवळाया ॥७८॥
त्या बाळकाचे मनीं । हारपली होती माझी धणी । तेचि होय काय म्हणोनी । नाचोनि वदनीं बोले त्या ॥७९॥
या खूणमुद्रेची वोळख । केवीं अवळा जाणती मूर्ख । तया बाळखेळाचे कौतुक । आनंदे मुख चुंबिती ॥८०॥
परी सुज्ञी जाणते विचक्षण । तत्पक्षींची जाणतां खूण । म्हणोनि केलें निरोपण । जा गोमि लक्षण घेईजे ॥८१॥
असो मासोमासीं विसरविती। बाळका मोहोनि खेळीं लाविती। आपुले प्रकार वागविती मायिक प्रीती लावोनिया॥८२॥

पांचवा मास भरतां । बाळस्वप्न त्या जाला विसरता । मायिक पदार्थी ऐक्यता । अधिकाधिक होऊं लागे ॥८३॥
खेळामाजीं बाळत्व गेलें । तुझें माझें हें अंगीं बाणलें । अभ्यासितां विषयीज्ञान पावलें । तारुण्य भरलें अंगीं त्या ॥८४॥
स्वहित कर्मा आंचवला । पडला विषयींचा घाला । सैराथ प्रपंचीं वाढला । अहर्निश गुंतला लोभांत ॥८५॥
लोभा होवोनी वरपडा । पायीं घालोनि घेतला खोडा । ते न जाणोनि जाला वेडा । वेंचू कवडा धांवे बहु ॥८६॥
भरला प्रपंचाचे सोसीं । कांहींच हित नाठवे त्यासी । गती केली कोसल्याऐसी । जन्ममृत्युपाशीं गुंतला ॥८७॥
विषय भोग भोगिता नाना । अधिकची वाढली वासना । अनिवार करितसे आचरणा । पेटोनि अभिमाना न मानी ॥८८॥
ऐसियापरी तारुण्य गेले । पुढें वृद्धत्व वेगीं पावलें । माझे माझे करितां वय चालले । सावध कदा काळें न होय तो ॥८९॥
अत्यंत पावली जरा । गात्रें कांपती थरथरा । तथापि म्हणतसे पोरा । संसार बरा सांभाळा ॥९०॥
संसारीं पडतां कांहीं न्यून । आपुले कासावीस करी प्राण । म्हणे असती मज आंगवण । दावितों करोन मूर्ख हो ॥९१॥
ऐसे प्रपंचीं जडले चित्त । विषयवासने भरिलें भरींत । तया कदापि न सांडित । ध्यास मनांत लोभार्थी ॥९२॥
एवं मायामोहीं लिप्त जाला । समूळ स्वहितातें मुकला । सोस करितां देह त्यागिला । पाहुणा पावला यमलोकीं ॥९३॥
केलिया कर्माचा झाडा । घेती जाचोनिया रोकडा । मारा प्राणी करी ओरडा । म्हणे मज सोडा कोण्ही तरी ॥९४॥
तेथें कोण्ही नसे सोडविता । कर्म ज्याचा तोचि भोगिता । विटंबना तेथील सरतां । लाविता पंथा चौऱ्याशींच्या ॥९५॥
तेथें अवघेंचि विस्मरण । एक शिस्नोदरपरायण । पाठीं लागलेंसें भ्रमण । सुखाचें स्वप्न दुःख सारें ॥९६॥
हें देखोनिया कळवळा । आला विश्वेश्वरा विश्वपाळा । म्हणे मुक्त्यर्थ नरदेह दिधला । तो न कळला पामरा या ॥९७॥
विषयीं भ्रमोनि दवडिला वांया । काय म्हणूं आतां ऐसिया । अनिवार सुचों नेदी माया । लावी विलया गुंतवी ॥९८॥
ही माया अत्यंत अनिवार । जीव तंव किंचिदज्ञ पामर । मोहपाशीं बांधोनि निर्धारें । करोनि वानर नाचवी ॥९९॥
इनें तो भुलविलें जीवासी । सुचों नेदी कांहीं त्यासी । अंतराय पाडिला मजसी । मूळ मंत्रासी लोपविलें ॥१००॥
आतां या जीवा सावधान । करील ऐसा उत्तम कोण । तो आगळा पाहिजे आपणाहून । बाणवितां खूण माझी त्या ॥१॥
माया मोह अज्ञान । या जीवाचें टाकी छेदून । बोधी माझें आध्यात्मिक ज्ञान । मद्रूपीं लीन करवी त्या ॥२॥
ऐसियासी श्रेष्ठपद । पाहिजे सर्वांहोनि अतिशुद्ध । ऐसें विचारोनि परमानंद । आनंदकंद काय करी ॥३॥
स्वयें हंसरूपातें धरिलें । कृपें विधीस उपदेशिलें । आनंद सांप्रदाया स्थापिलें । गुरुपद केलें श्रेष्ठ पैं ॥४॥
सर्वांहोनि हें आगळें जाण । या गुरुपदाचें महिमान । औट सांप्रदाय नेमून । जगदुद्धारण आरंभिलें ॥५॥
तारक सद्गुरु या जीवासी । ज्ञानबोधें जागवी जगासी । अनुताप उद्भवी मानसीं । सुचवी स्वहितासी साधावें ॥६॥
परिसोन मुमुक्षु येती शरण । तयां उपदेशी सद्गुरु आपण । तो बीजमंत्र सतेज जाण । करिता पावन जीवा या
॥७॥ आज्ञ ऐसें वर्तावें । न्यासपूर्वक मंत्र जपावें । अक्षरोक्त पुरश्चरण करावें । ज्ञान ऐकावें गुरुमुखें ॥८॥
सद्गुरु अध्यात्मज्ञान समज । करवितां देहीं पडेल उमज । मिथ्या मायिक भासे सहज । स्वहित गुज कळों लागे ॥९॥
सद्गुरु स्वरूपा देतील दान । हरपलें दृष्टीं दावितील धन । पाहतां [illegible]

ऐसा सद्गुरुमंत्राचा प्रताप । मूळ मंत्र फोग आपोआप । अंतरीं प्रगटेल ज्ञानदीप । आत्मीं स्वरूप बिंबेल ॥११॥ भवभयाची भीती । नी न राहेचि गा कल्पांतीं । होतां आत्मीं आत्मत्य निवृत्ती । अविनाश हातीं पद चढे ॥१२॥ अविनाशपदातें पावतां । तद्रूप होय तल्लीनता । जन्ममरणाची वार्ता । नुरे सौख्यता पावेल ॥१३॥ तें सौख्य सांगतांचि नये । मग जन्ममरणातीत तो होये । ऐसें या जपाचें सामर्थ्य पाहें । मी तेंचि ध्यायें माउली ॥१४॥ माते तूंतें निरोपिले वर्ण । परी पुनः शंका तुझी जाण । वर्णी वोळखावा तो कवण गुण । हें मज संपूर्ण सांगावें ॥१५॥ तरी वर्णी वर्ण कैसे असती । ते परीक्षा सांगेन तुजप्रती । आचरणीं वोळखिजे त्यांची मती । तेहि निश्चितीं सांगतों ॥१६॥ वर्णामाजी श्रेष्ठ ब्राह्मण । परी जैशा राहणी त्याचे आचरण । तोचि तयाचा जाणिजे वर्ण । असोनि ब्राह्मण कायसा ॥१७॥ एक वर्ण श्रेष्ठ म्हणोनि नमावें । आचरण त्याचें न पाहावें । ईश्वररूप तें सर्व भावें । न निंदावें कदापि तया ॥१८॥ क्षत्रियीं क्षत्रिय वोळखावा । तें नसतां वर्णाचि पाहवा । आचरणावरोनि जाणावा । रहणी परीक्षावा सत्य पैं ॥१९॥ तेवींच वैश्य शूद्र चांडाळ पाहीं । वर्णमात्र वेगळे ठायीं । अंतर आचरणा वोळखोनि घेई । सर्व देहीं यायोगें ॥२०॥ स्वधर्माचरणीं तो उत्तम । परधर्मी तो अधम । ब्रह्मीं निष्ठ तो सर्वोत्तम ब्रह्म । येर तो ब्रह्मनामा ॥२१॥ चांडाळवरी वर्ण आहे । तो आत्मविचारणीं सावध पाहे । तो वर्णामाजी श्रेष्ठ होये । तारक माये वंद्य तो ॥२२॥ जो भक्तिज्ञान पावला वैराग्य । आत्मविचारणीं रंगला चांग । परब्रह्मीं सदैव भोग । धन्य तो योग आम्हां प्रिय ॥२३॥ ज्याची स्वात्मस्वरूपीं जडली प्रीती । त्याची भलती असो वर्ण याती । तया स्वात्म मानी रमापती । तो या त्रिजगतीं धन्य होये ॥२४॥ वर्णव्यवहार अधिकारें । वेदाज्ञेंत राखिजे बरें । शिरोधार्य हे विचार खरे । राखिजे सारे जगरूढी ॥२५॥ पावलें परब्रह्मींचें ज्ञान । तरी प्रीतिलोभें कीजे भाषण । वर्णव्यवहाराचें आचरण । राखिजे पूर्ण जगार्थ ॥२६॥ या वर्णी वर्णाची वोळखी । तुज म्यां निरोपिली असे निकी । परीक्षिजे विचार विवेकी । अनुभवोनि राखीं जीवीं तूं ॥२७॥ आणीक एक नवलाई । चारी वर्ण असती देहीं । चांडाळादि सर्व कांहीं । तेवींच मात्राही असती ॥२८॥ यदर्थी पुरुषसूक्त भलें । या पुरुषवर्णनीं शब्द बोले । तें जाणोनि पाहिजे घेतलें । वर्म आपुलें स्नानादिकें ॥२९॥ सर्व याती वरल्या चांग । परी चांडाळ अनामिक मातंग । याचि देहीं यांचा संग । करोनि लाग वैसले ॥३०॥ हा विचार ब्राह्मणासी । कळों आला निश्चयेंसी । मग विस्मय करोनि मानसीं । विचार त्यासी योजिती ॥३१॥ पवित्र कार्जी नसावें निश्चिती । दवडिल्या कदा न जाती । हें वर्म जाणोनि चित्तीं । नेमिली युक्ती परिसा तें ॥३२॥ ब्रह्मकर्मी अनामिकासी । पवित्र योजिल निश्चयेंसी । प्रार्थना नेमिली मातंगासी । श्राद्धसूत्रासी अवलोका ॥३३॥ मुळींचेचि कौतुक आगळें । वर्णी सर्व वर्ण स्थापिले । जीवां वर्णातीत तत्त्व दिल्हे । नवल दाविलें पाहे पां ॥३४॥ ब्रह्मत्व राहिलें व्यापून । सेखीं सर्वातीत असे भिन्न । हें सकळांचें अधिष्ठान । कर्ता कारण करविता तो ॥३५॥ ब्रह्म जाणे तो ब्राह्मण । येर नांवाचे यातिवर्ण । येथोनि संपलें हें निरोपण । जागृति कोण परियेसीं ॥३६॥ स्वात्मस्वहित विचार । पाहे सदा अध्यात्मसार । दृग्दृश्यमहावाक्यादि प्रकार । तेचि निरंतर अनुभवी ॥३७॥

दृश्य पदार्थ निगुते । रंगोनि राहे अदृश्यातें । मोहमायालोभविषयातें । द्वैत द्वैतातें नातळे ॥३८॥ मानापमानीं नाहीं भर । नाठवी देही विकृति विकार । निरभिमानी सदा स्थिर । स्वरूपीं निर्भर निमग्न जो ॥३९॥ या नांव म्हणिजे जागृती । याची निद्रा म्हणसी कोणती । तरी ते उन्मनी निश्चितीं । स्वरूपस्थिती सर्वदा ॥१४०॥ सुखदुःख याचें कोण । लाभ मानी कोणतें मन । हानीचेंही प्रमाण । तेंहि निरोपण अवधारीं ॥४१॥ स्वरूपीं निमग्नता हें सुख । तया व्यत्यय तें दुःख । स्वरूपसाक्षात्कारींचा लाभ देख । मानी आवश्यक आंगळा ॥४२॥ विकृतिविकार उद्भवतां किंचित । याचिलागीं हानी मानित । मग ते विवेकें करी शांत । एवं जागृत या म्हणिजे ॥४३॥ आतां निद्रेचें लक्षण । तें ऐकें तूं सावधान । मायामोहीं व्यापले जन । गेले व्यापून सदृढ पैं ॥४४॥ नोळखीच जो स्वात्महिता । न जाणेचि कांहीं परमार्था । नाचरे स्वकर्म धर्मपंथा । निद्रार्णवी पुरता तो जाणा ॥४५॥ सत्कर्मीं नाहीं मन । लोभविषयीं गेला भ्रमोन । मी कोण नोव्हे आठवण । विसरला कारण निद्रिस्त तो ॥४६॥ सदा करी माझें माझें । नेणोनि वळे घेतो ओझें । तोडावे न वाटती लांझे । तेंचि झोंझे निद्रेत ॥४७॥ धुंदावला असे लोभ मोहे न वाटे तया आयुष्य जाये । न कळे शेवटीं काळ खाये । गाढ वाहे निद्रा कीं ॥४८॥ धन दारा प्रपंच वित्त । यासी जाला लोलिंगत । न कळे तया हा अनर्थ । निद्रागत म्हणोनी ॥४९॥ हे माझे सर्व असती । मीच पोसिता कीं यांप्रती । मी कर्ता होय निश्चितीं । पहा चावळती निद्रेत हे ॥१५०॥ मी शाहणा पंडित विचक्षण । मजऐसा जाणता कोण । थोरीव शोभे मजलागून । मूर्ख अहंपण निद्रा हे ॥५१॥ पढोनि सर्व विद्यावेद । जगा करिती विशेष बोध । विरुद्ध आचरोन वाढविती वाद । जाणते अंध निद्रिस्त हे ॥५२॥ सत्समार्ग सत्याचरण । सद्वृत्ती सत्य भाषण । हे त्यजोनि अनृतकारण । हेंचि अवलंबन निद्रेचें ॥५३॥ असो हें निद्रेचें बंड । वाढता वाढेल वितंड । कोपा चढतील उदंड । परि हें पाखांड नोव्हे कीं ॥५४॥ मायामोह अत्यंत घोर । निबिड तिमिर अंधकार । लोकप्रपंचीं निद्राभर । केलें जर्जर विषयलोभें ॥५५॥ येणें जीव वेडावलें । स्वहितार्थातें विसरलें । भ्रमभरे हे दुर्मिन जाले । पाहें नागवले सत्कर्मीं ॥५६॥ *आतां याचें सुखदुःख कोणतें । तेंहि निवेदितों तूतें । कोण मानी लाभहानीतें । तेंहि पुरतें परियेसी* ॥५७॥ विषयविलास काया चांग । पदार्थ भोजनीं उत्तम भाग । अलंकार वस्त्रें उपभोग । हा सुखयोग होय त्याचा ॥५८॥ रोगपीडा आणी घात । अपमान अलौकिक अनहित । जाली विघुडे जरी प्रीत । दुःख हें मानीत बहु जीवीं ॥५९॥ धन यांता यश कीर्ती । इच्छित वस्तु हातां येती । गजांतलक्ष्मी राज्यसंपत्ती । वाढतां संतती लाभ मानी ॥१६०॥ गेलें गतलें हारपलें । दंडविलें नागविलें मारलें । हानींचें भाग्य पाहतां गेलें । तें मनीं वागलें हानी ही ॥६१॥ त्या मनीं कधींही न वाटे । कीं मी आचरतों हें कर्म खोटें । विषय भोगितां दुःख मोठें । चुकलों वाटे स्वहिताच्या ॥६२॥ नरदेह हा अलभ्य लाभला । स्वहित न जाणतां वांया गेला । हा पस्तावा कधीं नुपजे त्याला । काय खराला म्हणावें ॥६३॥ प्रपंचीं बरपडा होत । वनिता नाचवी तैसा नाचत । परी कांहींच नुपजे स्वहित । म्हणोनि निश्चित निद्रा हे ॥६४॥ अविनाश बोले अनसूयेसी । चाळीस प्रश्न निरोपिले तुझे तुजसी । हें विचारोनि निजमानसीं । जागें स्वहितासी

आपुल्या ॥६५॥ नरदेह वारंवार । प्राप्त नसे निर्धार । दैवें लाधला स्वहितकर । काळ शिरजोर जपतसे ॥६६॥
जंव न जाला काळाधीन । आणि इंद्रियग्राम सावधान । तोंवरीच साधिजे साधन । प्राप्त बंधन होऊं नेदी ॥६७॥
जरी मुक्तता व्हावी जीवा । तरी कीजे सद्गुरुसेवा । अविनाशलाभ जोडिजे बरवा । आनंद अनुभवा आणिजे ॥६८॥
सद्गुरु साक्षात दैवत । त्यापदीं सर्व अंकित । त्याहोनि दुजा समर्थ । न दिसे निश्चितं मज कोण्ही ॥६९॥
जो का देव देवांचा । स्वामी अनंत ब्रह्मांडींचा । व्यापक जो सर्वात्मकाचा । अंकित गुरूचा तो असे ॥१७०॥
उदंड केले पाठ श्रवण । नाना योगादि केले साधन । जरी सिद्ध दैवतें केलीं प्रसन्न । परी न पावन जाला तो ॥७१॥
सद्गुरु समर्थ दयाघन । ते या पतिता करतील पावन । आपुलें बोधोनि ज्ञान । करतील संपन्न निजभावें ॥७२॥
आजवरी जें म्यां कथिलें । परी प्रत्यया तुज कांहीं न आलें । म्हणोनि मन माझें कळवळलें । युक्ती बोलें पुढतीं ॥७३॥
असे सद्गुरु माझा पिता । शरण जाइजे त्वां त्या समर्था । तें स्वकृपें उपदेशितां । हें तव हातां ज्ञान चढे ॥७४॥
त्या कृपेचें हें ज्ञान । तें तुज म्यां केलें निरोपण । तरी त्याची कृपा करितां संपादन । कळेल पूर्ण सतेज हें ॥७५॥
निरोपणीं तोषोनि अनसूया । सद्गद होवोनि वदे तान्हया । मज दावी त्या सद्गुरुपाया । करवीं छाया कृपेची ॥७६॥
पुढील प्रसंगीं निरोपण । गोड असे अमृताहून । तो आनंद करितां श्रवण । सुखावेल मन मुमुक्षूंचें ॥७७॥
अवधूत केवळ सुखमूर्ती । जीवांसि देतसे विश्रांती । प्रबोधें चुकवी आवृत्ती । अविनाश संपत्ती जोडवी ॥७८॥
दत्त सदय हा शांत । अवतरला पुरवावया मनोरथ । सदा संतांमाजीं डुलत । आनंदभरित मोक्षदाता ॥७९॥
यदर्थ संतांचें चरणीं । भावें करीतसें विनवणी । उभा याचकद्वार धरोनी । कृपादानीं तोषवा ॥१८०॥
मी अत्यंत पामर दीन । माझा तुम्हां संतां अभिमान । मज आधार तुमचे चरण । घावें सेवन तयींचें ॥८१॥
आवडीचे दानासाठीं । रिघालों शरण तुमचे पोटीं । कृपा करोनि उठाउठीं । अभयें निकटीं रक्षावें ॥८२॥
दयेचे सागर तुम्हीं संत । उदार आणि भाग्यवंत । हें देखोनि अनंतसुत । शरणागत आस पुरवा ॥८३॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपद्मपुराणींचें संमत । परिसोत श्रोते संतमहंत । द्वात्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥१८४॥

॥ इति द्वात्रिंशोध्यायः समाप्तः ॥

## ॥ अध्याय ३३ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीसद्गुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय सद्गुरु श्रीअनंता । अखिल अभंगा मायातीता । सर्वसाक्षी गुणातीता । तव पदीं समर्था प्रणम्य ॥१॥ तुझे जे सुकुमार चरणतळ । त्या तळीं माझें रुळे मौल । घर्पणें निवती देहिक खळ । करिनी छळ मजलागीं जे ॥२॥ तुझे चरणीचें तीर्थोदक । तें कलिमलतापासि दाहक । सर्वार्थी होय सुखदायक । कृपें आवश्यक प्राशवीं ॥३॥ सद्गुरु तूं केवळ आनंदराशी । सदय उदार तूं मानसीं । तिमिर अंधत्व हें नासिसी । ताप वारिसी स्वरूपें ॥४॥ अज्ञानत्व टाकिसी छेदून । प्रबोधें करिसी ज्ञानसंपन्न । भवभय वारिसी न लागतां क्षण । अभय वरदान तूं देसी ॥५॥ परमामृताची वाटी । माऊली तूं लाविसी ओठीं । अत्यंत कळवळा तुझे पोटीं । स्वरूपी दिठी ठसाविसी ॥६॥ एवं सर्व भाग्यें तूं संपन्न । शरणागता करिसी पावन । हे परिसोनिया महिमान । अनन्य शरण सुत हा ॥७॥ मतिमंद हीन असतां पामर । त्वां या दीनाचा केला अंगीकार । न पाहतां कांहीं अधिकार । करविसी वडिवार माये तूं ॥८॥ बाळहृदयींची आळ । जाणोनि पुरविसीं तूं स्नेहाळ । सेवा आज्ञापिसी निर्मळ । जीवीं कळकळ दीनाची ॥९॥ या जीवाचें करावें कल्याण । भवभयाचें करावें निवारण । प्रबोधें अज्ञानाचें खंडण । करावें पावन हें मनीं ॥१०॥ पदर्य श्रीअनंतगुरुराव । अवधूतरूपें दावी अवतारभाव । स्वतः सिद्ध करीतसे उपाय । लीलालाघव दावोनी ॥११॥ त्रिगुणात्मक धरोनि अवतार । स्वइच्छें गमे जगतीवर । करी जडजीवांचा उद्धार । रूपें अपार धरोनिया ॥१२॥ अद्वय अविनाश अचळ । जितेंद्रिय योगनिर्मळ । स्वतः सिद्ध आणि शांतशीळ । हृदयीं कोमळ दयाळ तो ॥१३॥ ऐसियापरी वावरोन । भाविकां बोधित स्वात्मज्ञान । करी जगताचें उद्धरण । हें महिमान तयाचें ॥१४॥ त्या जगद्गुरुकृपाळें । माझें अंतर बोळखिलें । प्रबोधोनि मज आज्ञापिलें । मूढा बोळविलें या ग्रंथीं ॥१५॥ करीं धरितां लेखणी । भावार्थ सुचविता होय मनीं । तेंच पत्रीं ठेवितों लेहुनी त्याची करणी तो जाणे ॥१६॥ येथें न्यून कीं हे पूर्णता । मी नेणेचि याची वार्ता । असे दत्तची सांभाळिता । मज ही लेखकता तत्कृपें ॥१७॥ हा कथार्थ अन्वयें । जाणता सुज्ञ श्रोता होये । त्या अवधानें रस वाढता होय । सिद्धीसि जाय ग्रंथ हा ॥१८॥ श्रोते तुम्हीं साधुसंत । ज्ञानी पंडित महंत । विचक्षण भाविक प्रेमळ बहुत । श्रवणीं चित्त सावधान ॥१९॥ तुम्हां समर्थांचिया चरणां । नमोनि करितों विज्ञापना । आजवरी सांभाळिलें मज दीना । श्रवण श्रवणा वोटवोनी ॥२०॥ तेवींच पुढतीं सांभाळावें । सादर श्रवणार्थी असावें । बोबडे बोल परिसावे । अंगीकारावें अनाथा या ॥२१॥ गतकथाध्यायीं अवधूत । अनसूयेचें प्रबोधिनां चित्त । परिसोनि जाली सद्गदित । म्हणे गुरुनाथ मज दावी ॥२२॥ म्हणे त्वां कथिलेंसि बा रे । तें म्यां श्रवण केलें खरें । विचारितां मायामय मिथ्या सारें । भ्रमें नावरे सत्य पैं ॥२३॥ त्वां इतुकें केलें निरोपण । परी मज न होववें सावधान । याचे असे कोणते कारण । तें मजलागून सांग आतां ॥२४॥ तंव अविनाश वदे माते । तुज झडपिलें पंचभूतें । विषय पचणी पावलीस ठकाते । तेणें भ्रमानें पावलीस तूं ॥२५॥ त्यांत निहती विकार । तेणें भ्रमित केलें फार । लोभ मोहो अनिवार । तोचि सांवर होऊं नेदी ॥२६॥

अधिकारपरत्वें काज केलें । ते सद्गुरुपदीं निवेदिलें । जैसें मतें अनुग्रहिलें । तेवींच विवरिलें पाहिजे ॥८३॥
उभय विज्ञापना परिसोनि । आनंदता जाला अत्रिमुनी । सद्गद होवोनि अंतकरणीं । अमृतवचनीं बोलत ॥८४॥
म्हणे वा रे त्रिगुणात्मका । तूंचि होसि रे दीनसखा । तुझी लीला ब्रह्मादिकां । न वर्णवे मुखा सहस्रासी ॥८५॥
तूं सदय उदार भाग्यवंत । अचल अविनाश शाश्वत । वेदां न कळे तुझा अंत । वर्णिता कुंठित पैं होती ॥८६॥
ऐसा तूं गा सर्वेश्वर । बहु कोमळ हें तुझें अंतर । करावया जगदोद्धार । धरिलासि अवतार सत्य हा ॥८७॥
सर्व सामर्थ्य तुझे अंगीं । असे निकड ऐसे प्रसंगीं । तें म्यां वोळखिलें अंतरंगीं । पूज्यमार्गीं मानिसी ॥८८॥
धन्य धन्य गा अवधूता । करावी साहित्याची सिद्धता । गुरुआज्ञा वंदोनि माथां । दावी कृत्या अलोलिक ॥८९॥
दत्त आज्ञेच्या सिद्धि दासी । सदा तिष्ठती सेवेसी । जाणोन वस्तु प्रसंगाऐसी । सर्व साहित्यासी निर्मिलें ॥९०॥
दिव्यासनें रंगमाळा । पंचामृतें शुद्ध जळा । दिव्य सुमनें परिमळा । पुष्पमाळा चंदनीं ॥९१॥
दिव्य फळें रसाळ । तांबूलपत्रें नारिकेळ । अक्षता कर्पूर दीप तेजाळ । अळंकार सुढाळ सुवर्ण ॥९२॥
दुग्धशर्करामिश्रित । पक्कान्नें सिद्ध घृतपाचित । अनेक खाद्य उत्तम बहुत । शर्करामिश्रित क्षीरापती ॥९३॥
दक्षिणेसहित सिद्धता । सिद्धी दाविती अवधूता । पाहोनि पाचारी पुरोहिता । ऋषी समस्तां ते काळीं ॥९४॥
दुर्वास चंद्र आपण । सेवे तिष्ठती तिघेजण । समस्तां देवोनि आसन । प्रार्थोनि नमन सारिलें ॥९५॥
ऋषिपत्न्यांते पाचारोनी । अनसूया बैसविली मंगळ स्नानीं । दिव्य शुभ चीर देवोनी । मंगळ भूषणीं शृंगारिली
॥९६॥ अवधूत विनवी मातेसी । नमोनि प्रार्थी गुरुवर्यासी । अवश्य म्हणोनि प्रेमराशी । श्रीगुरुचरणांसीं वंदिलें ॥९७॥
सद्गद वाहती विमळाश्रुधारा । प्रार्थिती जाली जोडूनि करा । जयजय सद्गुरु परात्परा । जन्मोद्धारा स्वामिया ॥९८॥
तूं सर्व साक्षी चैतन्यघना । जाणसी मम हृदयींची कामना । वेळ न लावीं दीनोद्धारणा । पतितपावना विनय मी ॥९९॥
जय जय सद्गुरु कृपा करा । सदय उदार तूं दीनसोयरा । दासीची पूजा ही अंगीकारा । तारा पामरा सुखकंदा ॥१००॥
ग्लांति परिसोनि मुनिराज । जाणीतला अनुताप सतेज । ऊठले साधावया दीनकाज । पादुका आत्मज सरसाविती ॥१॥
पादुका लेवोनि वेगां । चालतां पावले चौरंगा । अनसूया पाद प्रक्षाळी वेगां । परिमळ अंगा चर्चित ॥२॥
वाद्य वाद्यघोष वाजती । मार्जन उष्णोदकें करवीती । गंगोदकें अभिषेकिती । विप्र बोलती मंत्रघोष ॥३॥
शुद्धोदकें सरतां स्नान । उत्तरीय वस्त्रें कांती पुसोन । पादुका पदीं लेववून । पीत वसन समर्पिलें ॥४॥
धारण करोनि पीतांबर । आसनीं पावले मुनीश्वर । द्वादश तिलक मनोहर । प्रक्षाळिलें कर पुढती ॥५॥
ठेवून उदकें पूरितपात्रें । तैसींच ठेविली उपपात्रें । देखोनि आचमन केलें पवित्रें । कर उपवस्त्रें पुसिलें ॥६॥
उभयांमध्यें तें निर्मळ । ऋषि शृंगारिती अष्टदळ । पूजासामुग्री सिद्ध सकळ । दावी दयाळ अवधूत तो ॥७॥
द्यावया पूजाउपचार । दो बाजू दोघे कुमर । दुर्वास आणि अंबुवर । अविनाश समोर बद्धांजुळी ॥८॥
दत्त विनवी अनसूयेसी । आतां प्रणाम करावें सर्वांसी । मग नमावें सद्गुरुसी । त्यजुनी लज्जेसी सत्यभावें ॥९॥
यापरी दत्ते सुचविता । तदनुसारें नमी माता । सप्रेमें वंदोनिया गुरुनाथा । चरणीं लक्षता लाविली ॥११०॥

केवीं करितील अंगिकार। यदर्थ वृत्ती तदाकार। तंव बोलती धरामर। आसनीं सत्वर बैसावें ॥११॥
सद्गुरू आनंदें बोलती। चिंता न करी कांहीं चित्तीं। तुझे मनोरथ सर्व पुरती। आसनीं निश्चिती बैस आतां ॥१२॥
गुरुविप्र आज्ञा वंदोनी। अनसूया बैसली शीघ्र आसनीं। आरंभ केला द्विजगणीं। घोष वदनीं मंत्राचे ॥१३॥
स्मरोनि यां गजवदन। केलें शिवगौरीचें चिंतन। तेवींच वंदिला नारायण। सारिलें नमन हृदयस्थां ॥१४॥
प्रसंगीं लग्नकाळवेळ। पाहिजे योग ताराबळ। हे शुभ व्हाव्या सकळ। आठविला गोपाळ रमापती ॥१५॥
मग इष्टदैवता आणि कुलदैवता। तेवींच नमिलीं मातापिता। गुरुब्राह्मणादि समस्तां। नमोनि प्रयोगता आरंभिली ॥१६॥
कारणार्थ संकल्प करवोन। अक्षतोदक दिधलें सोडोन। तेथोनि आरंभिलें पूजन। तें सावधा परिसावें ॥१७॥
सकळारिष्टा करितां नाश। सफळ पूर्ण करी कार्यास। तो आरंभीं पूजिला विघ्नेश। स्तवोनि त्यास शांतविलें ॥१८॥
नंतर तीर्थानें प्रार्थोन। केलें कलशाचें पूजन। उपदेवता अर्चन। कर्में संपूर्ण अर्चिलें ॥१९॥
यापरी अर्चोनि सकळ। अक्षदोक्त जोडवी बद्धांजुळ। गुरुस्तवन करोनि निर्मळ। साधिलें सुढाळ आवाहन ॥१२०॥
आसन गुरुतें निवेदिलें। अष्टदळीं पात्र मांडिलें। चरणकमळ करीं धरिलें। प्रेमें प्रक्षाळिलें गंगोदकें ॥२१॥
सिंचन करवोनि पंचामृत। वरी अभिषेक करिती मंत्रोक्त। पंच प्रकार विभक्त। पूजा समर्पित सद्भावें ॥२२॥
मागुती त्या शुद्धोदकें। पदें प्रक्षाळिलीं आवश्यकें। स्वपंछवें पुसोनि नेटकें। नमितां अंबिके आल्हाद ॥२३॥
भाळीं कस्तुरी रेखिली। केशरउटी अंगीं चर्चिली। अक्षता निढळीं लाविली। परिमळ भाळी समर्पी ॥२४॥
वस्त्रें भूषणें लेववून। कंठीं सदले हारसुमन। तेवींच करी करभूषण। तुरा धारण मस्तकीं ॥२५॥
धूप, दीप नैवेद्य। समर्पिली हिरण्यदक्षिणा शुद्ध। प्रदक्षिणा करोनि प्रसिद्ध। होवोनि सद्गद प्रार्थीतसे ॥२६॥
जय श्रीसद्गुरु परमानंदा। सदय कोमळा आनंदकंदा। अखिल अभंगा ब्रह्मानंदा। मी तंव पदां विनटलें ॥२७॥
सकुमार तुझें चरणकल्हार। तेथें वेधलें माझें मनभ्रमर। सुकृतें विकसविसी सुंदर। घालीन गुंजार तेथें मी ॥२८॥
तूं दाता होसी समर्थ। मी याचक वृत्तें दान मागत। जाणसी माझें मनोगत। पुरवी अर्थ गुरुराया ॥२९॥
कामना जाणोनिया मनाची। आळ पुरविजे दीनाची। गुरुराया तूं मूर्ती करुणेची। उपेक्षा पतिताची न करा हो ॥१३०॥
जीवेंभावें म्हणविते दासी। तव पद झाडीन मुक्त केशीं। किती तरी अंत पाहसी। प्राण कंठासी दाटला ॥३१॥
सद्गदें कंपित बोलतां। मात्र जाणवला सद्गुरुनाथा। अवधूत म्हणे जी समर्था। वेळ आतां न लावी ॥३२॥
सुलक्ष कसोटी कानस। लावोनि पारखिलें कनकास। हिरा गडलासे ऐरणीस। योग्य अंगिकारास होय तुम्हां ॥३३॥
परिसोनिया युक्त वाणी। अनसूया बैसविली करीं धरोनि। येरीं मस्तक ठेविला चरणीं। करी न्हाणी नेत्रोदकें ॥३४॥
प्रेमसागर जेव्हां फुटला। सद्गुरु आनंदें तैं दाटला। प्रेमानंद एकवटला। कृपेचा सुटला प्रभंजन ॥३५॥
या समयातें विलोकोन। वरी अवधूत घाली वसन। वाद्यगजरें टाळी पिटोन। करी तो भजन गुरुनामें ॥३६॥
अत्रिअनसूयेचे कर्णीं। बीज प्रेरीत तत्क्षणीं। कपाटें दिधलीं मुरडोनी। स्वरूपसंधानीं विवविली ॥३७॥
ते तद्रूपी होतां तल्लिन। मनचि तें झालें उन्मन। नाहीं देहाची आठवण। मीतूंपण मावळलें ॥३८॥

येणें तुज मायिक प्रीती । जडली ते न सुटे कल्पांतीं । हे घालवितील तुज अंतीं । करवितील फजिती पाहे पां ॥२७॥
यांसंगें असे दुःख भोगणें । जन्मफेरापंक्ती घेणें । न चुके नरकींचें पचणें । कैंचें सुटणें तेथोनिया ॥२८॥
त्या दुःखाचे सागरी । बुडतां नरकाचे कुहरीं । कोण्ही सोडविता नसे निर्धारीं । यम प्रहारी जाणिजे ॥२९॥
आप्त स्वजन पुत्र । उपेगा न येती कोण्ही मित्र । भोग भोगणें तो स्वतंत्र । पावतां परत्र एकले ॥३०॥
सुखाचे येंयील सांगाती । दुःख ज्याचे तेचि भोगिती । एकलेंचि जाणे लागे पंथीं । येयेंची प्रीती येथींची ॥३१॥
हे सोयरे आप्त परम । यांचेनि नोहे परिणाम । हो का पुत्र भ्रतार संभ्रम । होता होम फिरती ॥३२॥
प्राणी जाता यमालया । दुर्धर कुटांविती देवोनि काया । दया नुपजे त्यां निर्दयां । वर्म ठायां पीडिती ॥३३॥
भयवार्ता हे परिसोन । कंपित जालें तिचें मन । देहीं उदासता पावोन । तळमळ दारुण उदेली ॥३४॥
नेत्रीं वाहती अश्रुधारा । अंगीं कांपे थर्थरा । जीव होतसे घाबरा । अंतरी दरारा भवभीती ॥३५॥
अनुतापें देह तापला । उबग प्रपंचीं वाटला । अत्यंत गहिंवर दाटला । सागर फुटला नावरे ॥३६॥
सद्गदित बोले वचन । म्हणे मज सोडवील आतां कोण । यम नेईल पाश घालोन । व्यथा दारुण करील की ॥३७॥
म्हणे रे बाळा अवधूता । कोण उपाय करूं आतां । अविनाश म्हणे गुरुनाथा । शरण जातां भय वारे ॥३८॥
तंव अनसूया धांवे उठाउठीं । कीं जेवीं लागलें भय पाठीं । दत्तगळां घालोनि मिठी । काय गोष्टी बोलत ॥३९॥
म्हणे वारे ऐक आतां । मज तो दावी भवत्राता । त्यापदीं ठेवीन दृढ माथा । प्रार्थिन स्वहिता आपुल्या ॥४०॥
चाल त्वरा सत्य करी । पळ जातें मज युगापरी । घालुनी त्या पायांवरी । तार वारी अंतरींचा ॥४१॥
पूर्ण पावली मुमुक्षुता । हें कळों आलें श्रीदत्ता । म्हणे माते चाल आतां । सद्गुरुनाथा भेटवितों ॥४२॥
उत्साह उद्गार आनंद वेळा । देखोनि पूर्ण प्रेमाचा जिव्हाळा । तोचि मुहूर्त सर्वांगळा । अनुतापकळा सतेज ॥४३॥
धन्य पावला हा सुदिन । देखोनि हर्षलें दत्താचें मन । मातेलागीं करीं धरून । अत्रिसन्निधान पावला ॥४४॥
देखोनि आसनीं मुनिवर । अवधूतें केला नमस्कार । तेवींच अनसूया चरणांवर । सप्रेमें शिर समर्पी ॥४५॥
अश्रुधारा वाहती नयनीं । दंडप्राय पडली चरणीं । रोमांचित काया थर्थरोनी । न बोलवे वदनीं शब्द नीटें ॥४६॥
अष्टभाव देहीं दाटले । कांहींच शब्द न बोलवे बोलें । तैं मुनींद्रा आश्चर्य वाटलें । मन कळवळलें देखोनी ॥४७॥
सर्व ज्ञाता तो संपन्न । स्वामी अत्रि दयाघन । अंतर तिचें वोळखोन । काय वचन बोलती ॥४८॥
अहो सौभाग्यसरिते कल्याणी । चंपककळिके पद्मनयनी । चातुर्यशुभांगे गजगामिनी । चपळ सौदामिनी राजसे ॥४९॥
गुणवर्धने सुपुत्रिके । प्राणप्रिये सत्य धार्मिके । शोक करिसी कवण्या दुःखे । भ्रमरी पादुकें जालीसे ॥५०॥
कोण भयानें पावोन । दृढ धरिलेसी तुवां चरण । उठीं तो अर्थ करी निवेदन । तुझें शीण निवारूं ॥५१॥
भयें तिज दाटला गहिंवर । न बोलवे कांहीं उत्तर । करुणार्णव तो विधिकुमर । देऊनी स्वकर उठवी निज ॥५२॥
उठवोनिया ती वेल्हाळी । दृढ धरिली हृदयकमळीं । कृपादृष्टीं तीतें न्याहाळीं । करें कुरवाळी सप्रेमें ॥५३॥
नाभी नाभी म्हणोनी । शांतवी मस्तकीं कर ठेवोनी । म्हणे सकुमारे बोलें वचनीं । संकोचित मन न करीं तूं ॥५४॥

सुप्रसन्न अभयवाणी । परिसोनि भावें जोडी पाणी । विनविती जाली सद्गदवाणी । मोक्षदानी मां पाहि ॥५५॥
जयजय स्वामी अनाथनाथा। सद्गुरु कृपाळा समर्था। तूं त्रिविधतापाचा होसी शास्ता। दीन स्वहिता जाणसी ॥५६॥
जय सदय उदार सर्वेशा । सर्वाधिष्ठ तुझी प्राज्ञा । अचळ अभंगा गुणज्ञा । शरण मी सुज्ञा तव पदां ॥५७॥
जयजय सद्गुरु परात्परा । पतित अनाथ मी दातारा । अंगीकारोनि भवभयवारा । चरणीं थारा मज देईं ॥५८॥
मी अत्यंत हीनदीन । पापी दुर्बुद्धी मलिन । त्रिविधतापें तापलें पूर्ण । गेलें भ्रमोन मायामोहीं ॥५९॥
विकृतिविकारें मज वेढिलें । लोभआशेनें पीडिलें । विषयव्यालें डंखिलें । येणें नाडिलें सर्वस्वीं ॥६०॥
यांचिया संगें करोन । वाटे नरकीं घडेल पतन । यमपाश पडतील दारुण । करितील दंडण निष्ठुरें ते ॥६१॥
केलें कर्म भोगविती । रवरवकुहरीं पचविती । जाचोनि जन्मगारीं लोटिती । फेरे फिरविती लक्ष कोटी ॥६२॥
तेथें मजलागीं सोडविता । कोण्ही नस गुरुनाथा । यदर्थीं चरणीं ठेविला माथा । तुजविण त्राता कोण्ही नसे ॥६३॥
सर्वभावें जालें शरण । आतां न पाहे दोषगुण । अंगीकारोनि करी पावन । भवभयवारण करी माझें ॥६४॥
तुम्ही न करा जरी अंगीकार । तरी मज दीना कैंचा आधार । चिंतार्णवीं बुडालें धांव सत्वर । देवोनि कर तारीं मज ॥६५॥
म्हणाल आप्तसखे गणगोत । ते जाणतील तुझें हित । शोक करिसी तूं किमर्थ । करितील सद्गत सर्व ते ॥६६॥
ये विषयीं विज्ञापना । परिसिजे माझी दयाघना । हे लौकिकीं सव विचारणा । नावडे मना माझिया ॥६७॥
यांचिया कारणें मुक्तता । कधींही न पावे जी सर्वथा । हे सेवितील आपुल्या स्वहिता । यांचेनि व्यथा न चुके ती ॥६८॥
हे अवघे सुखाचे । कोण्ही न होती निदानींचे । चोरें टाळितील भवाचें । काय यांचे न होय कीं ॥६९॥
भवभयातें वारितां । तूं होसी तिमिरछेदता । तूंचे मायामोह नाशिता । पावन पतिता कर्ता तूं ॥७०॥
हें धर्म जाणोनि दयाळा । शरण जालें चरणकमळा । मज आपंगीं ये वेळां । हृदयकोमळा सुखाब्धे ॥७१॥
परिसोनि अनसूयेची विनवणी । पाहे दत्ताकडे तो मुनी । तैं अवधूतें जोडोनि पाणी । अमृतवाणी शब्द वदे ॥७२॥
जी स्वामी गुरुवर्या । प्रकाशरूपा ज्ञानसूर्या । कृपाचि कीजे दीनकार्या । तुझी हे भार्या उद्धरी तूं ॥७३॥
धर्म अर्थ काम मोक्षासी । अधिपति तूं सद्गुरु होसी । नाणोनिया द्वैत मानसीं । शरणागतासी तारिजे ॥७४॥
अनुतापें हीं काया तापली । अनन्य वृत्ति उभारली । बीजप्रेरणीं वाफ भली । वेळा उदेली शुभ हे ॥७५॥
आतां सदयें उदार व्हावें । बीज कर्णद्वारें प्रेरावें । कृपामृतें तें तूं सारावें । अभयें रक्षावें क्षेत्रातें ॥७६॥
ही पिकायोग्य असे धरणी । सफळित फळेल उत्तम कणी । विलंब न होता ये क्षणीं । कीजे पेरणी स्वामिया ॥७७॥
तव दासें क्षेत्र यजवून । मुळींच आड मोडा टाकिल्या काटोन । प्रबोधें तया हुंनोन । चोख करोन ठेविलें ॥७८॥
आतां स्वामिया करोनि दया । पावन करोनि दीजे अभया । अत्यंत विकळ जाली काया । जाणसी उपाया शांतवी
॥७९॥ या जन्ममरणापासोन । यांचवी देई दिव्य ज्ञान । दिव्य देवोनि रसायन । रोग संपूर्ण संहारी ॥८०॥
नाशिवंताते नाशी । करोनि पद दीजे अविनाशी । सोपिजे स्वात्मिक धनासी । उन्मनीं मनासी मुरडवी ॥८१॥
न घडावी पुनरावृत्ती । हेंचि वाटलें माझिया चित्तीं । यदर्थ प्रबोधे उपरती । वाणवोनि प्रीतीं उद्धवली ॥८२॥

सद्गुरु कृपेचा अभयकर । पावतां वृत्ती जाली स्थिर । ऋषी पाहती चमत्कार । आनंद थोर उदेला ॥३९॥
लोटल्या जाल्या चार घटी । मक्षिका शर्करी पडली मिठी । तेविंच स्वरूपीं हे गोष्टी । जडली पाठीं परतेना ॥१४०॥
ऋषी म्हणती नवलाव । हा आम्हीं देखिला अपूर्व । धन्य या श्रीगुरुपदीचें वैभव । करी नाटव क्षणमात्रें ॥४१॥
अविनाश परमानंदें डुल्लत । चंद्र दुर्वास हर्षभरित । लीला सद्गुरुची अद्भुत । जीवन्मुक्त करिती हे ॥४२॥
ऋषिललना उग्याचि पाहती । विस्मय मानोनि थकित होती । केवीं कैसी जाली हे गती । अवव्यांप्रती कळेना ॥४३॥
अवधूत म्हणे योगींद्रा । इच्छा पुरली कृपासमुद्रा । आवरीं आतां हे मुद्रा । सूर्यचंद्रा प्रगटवी ॥४४॥
स्तब्ध बैसले ऋषिगण । येथील क्रम होणें अजून । समीप पातला मध्यान्ह । देणें भोजन ऋषिवर्यां ॥४५॥
शब्द परिसोनि दत्ताचा । अत्रि सावध झाला साचा । योग पाहिला अनसुयेचा । विचार स्वरूपाचा दृढ दिसे ॥४६॥
अत्रि विचारी मानसीं । हें विंबोनि गेली निजरूपासी । सावधान करावीं तरी कैसी । चित्त विपर्यासी पावेल ॥४७॥
म्हणोनि जाला सचिंत । तें जाणता जाला अवधूत । सर्व कळा ज्याच्या अंकित । पादाक्रांत योग हे ॥४८॥
जो सकळांचा नियंता । ज्याचेनि ही सर्व सत्ता । जो होय करोनि अकर्ता । त्यासि हे चिंता कायसी ॥४९॥
चिंता कैची चिंतामणीसीं । कल्पना न बाधी कल्पतरूसी । रोगबाधा अमृतासी । सूर्य अंधःकारासी अडेना ॥१५०॥
तेंवि अविनाशदत्तातें । संकट नसे कांहीं त्यातें । मार्ग दावावया जगातें । दावी योगातें आचरोनी ॥५१॥
योग आचरोनि योगरहित । हा सर्व होय मायातीत । अनादिसिद्ध अखंडित । साकार मंडित उद्धरणा ॥५२॥
असा तो होवोनि सकृप । पावला मातेच्या समीप । देवोनि चळेची चेप । उडविली झोंप मानेचीं ॥५३॥
स्वलीलें करी सावधान । माता उघडोनि पाहे नयन । तत्काळ वंदिले सद्गुरुचरण । आनंदे गगन कोंदाटलें ॥५४॥
सद्गुरु म्हणती अनसूये । पाहणें रूप पाहिलेंसि काये । येरी म्हणे सांगतां नये । तेज न समाये ब्रह्मांडीं ॥५५॥
सद्गुरु म्हणती सावधान । राखी दृढ हे अनुसंधान । तुझें तुज दाविलें धन । होसील निधान अभ्यासें ॥५६॥
स्वामी स्वरूपीं सुखी होतें । कासया आणिलें मज मागुतें । दत्त म्हणे वो माते । न सोडी त्यातें जवळींच ॥५७॥
स्वरूपीं अनुभवोनि केली पावन । तापनिवटोनि धरिला शीण । दवडोनि भ्रम आनंदघन । सुखसंन पैं केलें ॥५८॥
अविनाश बोले वो जननी । पावली सर्व सुखाची खाणी । जे म्यां बोधिलें मागां निगेपणीं । तें अनुभवोनी घेई आतां ॥५९॥ सद्गुरु दयाळ समर्थ । तेणें पुरविलें तुझे आर्त । पूर्ण झाले माझे मनोरथ । ज्ञान समस्त फळलें आजी ॥१६०॥
श्रीगुरुरायें दिधलें बीज । तो मंत्र नित्य जपे सतेज । एकाग्र बैसोनि पाहे निज । साधी काज आपुलें ॥६१॥
चार देहीं तूं नेमस्त । त्या मस्तकीं ठेविले हस्त । चार शून्यें लोटोनि आंत । जावोनि पांचव्यांत बसावें ॥६२॥
चारी अवस्थापैलकडा । पांचवा लाभ साधी रोकडा । येथें न लागेचि आडामोडा । मनी निवाडा मीनतां ॥६३॥
मीनामाजीं मिनोनि जावें । तारा धरोनि लक्षी लक्षावें । दीप्तीतारानीळमुक्ता सांडावें । पुष्पीं मरावें वनकाच्या ॥६४॥
जेविं तुळ तेवीं तुळेल । पाहिलेंसि तेचि भासेल । तेथें स्थिरावता दिसेल । झमक सुनीळ बिंदु तो ॥६५॥
अनसूया म्हणे बा रे । त्वां चक्रभेद निवेदिले खरे । ते मी साधीन पुरस्कारें । गुरुदातारें दाविले जें ॥६६॥

सद्गुरु म्हणती पुरे आतां अप्रयासें पावसी ह्यातां । दत्तें पूर्वीच केली बोधता । उरली पूर्णता करवीली ॥६७॥ आतां कांहींच उरली नसे उरी । परी दृढत्व बाणविजे अंतरी । वस्तु व्यापक चराचरीं । सबाह्य अंतरी निरखिजे ॥६८॥ या पाहणीं दिसें पाहतां । तोंचि कर्ता आणि करविता । सर्वत्र असे त्याचे माथां । कासया चिंता वाहावी ॥६९॥ तो राहिला साक्षी होऊन । तेविंच बाह्य पदार्थी राहिजे आपण । अंतरस्थातें निरखोन । आनंदघन असावें ॥१७०॥ जोंवरी दृश्य पदार्थी आस । तोंवरी भवबंधाचा पाश । ते त्यागितां निर्दोष । सहजीं नाश भवबंधाचा ॥७१॥ जोंवरी संकल्पविकल्प जीवास । तोंवरींच असें गर्भवास । तो न उठतां मनास । जन्ममरणास मुकला ॥७२॥ जन्मकर्माची राहाटी । ते तंव असे कृत्यापाठीं । कृत्य मनाचिया उठीं । मन हें देठीं वृत्तीच्या ॥७३॥ इंद्रिय चरती विषयतृण । बोभाट आणिती पिटोनि रान । तें इंद्रिय मनाआधीन । अनिवार पूर्ण मनोवृत्ती ॥७४॥ असो उपदेशोनि तुज दिधलें ज्ञाना । त्यांही षोडशोपचारें केलें पूजना । परि एक उरलीसे कमना । करी गोदाना समर्पेसी ॥७५॥ नाशिवंत तें एक फळ । आणि व्यवहारिक दे मज पांगुळ । यासी देतां न लावी वेळ । ऋषिवर्य सकळ बोलं-बलें ॥७६॥ दत्तें पूर्वीच असे बोधिलें । तेणें अनसूयेसी ज्ञान आगळें । वरी गुरुरायें अंगीकारिलें । मग कां न कळे हा गुह्यार्थ ॥७७॥ म्हणे जी स्वामी गुरुराया । नाशिवंत फळ समर्पिली काया । कां गोदानें वेगळीं करावया । पाहिजे समर्पाया सांग पा ॥७८॥ इंद्रियांसहित मन । तेंहि तुज म्यां केलें अर्पण । वाचा पांगुळें व्यावहारिक धन । निराळें कोठून राहिलें ॥७९॥ तुम्ही दीनातें अंगीकारिलें । दीनें सर्वस्व समर्पिलें । मीपण तूपणी हारपलें । काय उरलें तळवटीं ॥१८०॥ आंखीं आंख उडाला । शून्य भाग तळीं उरला । तो ठायींच असे संचला । लाभ झाला गुरुकृपें ॥८१॥ परिसोनि बोलाची चातुरीं । अविनाशदेहीं उठे लहरी । सद्गुरु डोले चिदंबरीं । नमन करी अनसूया ॥८२॥ सद्गुरु होऊनी सुप्रसन्न । करिती अनसूयेचें पूजन । निढळीं कुंकुम रेखून । वस्त्रें भूषण देतसे ॥८३॥ येरी नेसतांचि अंबर । कंठींचा घालिती पुष्पहार । नारीयेळ तांबूल सुंदर । पसरितां पदर प्रसाद देती ॥८४॥ प्रसाद ओटीं पावतां । भावें चरणीं ठेवीं माथा । सद्गुरु देतसे अभयता । निर्विकल्पता पावो तुज ॥८५॥ पुनरा मंत्रघोषें करून । करविलें गुरुतीर्थाचें पूजन । तें तीर्थ त्रिमंत्रें पान । करविलें जाण अनसूये ॥८६॥ तें तीर्थ घेतलें तियांनीं । चवथी अनसूया ज्ञानखाणी आणिक विभागी नसती कोणी । सांप्रदायजनीं स्वीकारिजे ॥८७॥ येरां घेतां पुण्य असे । सांप्रदाया उचित दिसे । ध्या म्हणतां दोष दिसे । सुफळ होतसे आवडिचां ॥८८॥ यावरी उच्छिष्टप्रसाद । श्रीगुरुसेवनींचा अति शुद्ध । तो पावतां परम आल्हाद । वृत्ती अभेद पै झाली ॥८९॥ यापरी प्रसाद पावोन । शेवटीं केलें उत्तरपूजन । पूर्ववत मागुतीं सारोन । दीप नीरांजन लाविलें ॥१९०॥ नाना वाद्य वाजती गजर । ब्राह्मण करिती मंत्रोच्चार । आरत्या उजळिल्या अपार । गुरु सर्वेश्वर ओवाळिती ॥९१॥ कर्पूरदीप घृतज्योती । भावें श्रीवर्धन दीप लाविती । जयजयकारें टाळी पिटिती । पुष्पांजळी अर्पिती मस्तकीं ॥९२॥ प्रदक्षिणा सारोन । काया कुरवंडी करिती जाण । देऊनिया आलिंगन । सारिती नमन साष्टांगीं ॥९३॥ सांप्रदाय पुरस्सर स्तुतिस्तव । प्रार्थोनि करिती गौरव । नामोच्चारें अपूर्व । नमनीय आर्वेने नमिती ॥९४॥

त्यावरी घेवोनि अक्षता । टाकिती गुरुवर्यांच्या माथां । सद्भावें अर्चोनि समस्तां । दक्षिणे तुष्टना करविती ॥९५॥
चंदन लावोनि ललाटीं । सर्वांगीं शोभविती उटी । पुष्पहार घालोनि कंठीं । प्रणाम शेवटीं द्विजवरां ॥९६॥
धायनादि गोदानें । विप्रां दिधलीं सन्मानें । तैसीच सुवासिनींचीं पूजनें । करी आनंदानें अनसूया ॥९७॥
यापरी सकळां तोषविलें । तंव विप्रे मंत्रघोष केले । विप्रप्रसाद अक्षता ते वेळे । देतां पावले आनंद ॥९८॥
एवं सकळ पूजा अंतीं । द्विज यस्य स्मृत्या करविती । पुनरागमनाय च इति । गजवदना बोळविती देवांसह ॥९९॥
नंतर प्रसाद घेवोनि ताटीं । स्वानंदे दत्त सकळां वांटी । स्वाकारितां पडिली मुखी मिठी । आनंदे गोष्टी बोलती ॥२००॥
आनंदे उरकोनि विधी । उठली ऋषींची सर्व मांदी । माध्यान्हिक उरकावयाची संधी । जाणोनि प्रवृद्धी केली त्वरां
॥१॥ अनसूया होवोनि समोर । करी सकळांतें नमस्कार । प्रार्थोनि म्हणे दीनावर । कृपा अपार असावी ॥२॥
मागुनी जोडोनि पाणी । करी सकळांते विनवणी । आजी भोजनास यावें सर्वांनीं । अनमान कोणीं न करावा ॥३॥
भोजनार्थीं द्विजा गोडी । त्यावरी अनसूयेची आवडी । देखुनी अवश्य म्हणती गाढी । क्षुधा तांतडीं केरा पाक ॥४॥
अविनाश बोलत विनत वचनीं । त्वरें माध्यान्हिक यावें उरकोनी । येथें न लागे वेळ अत्रिअन्नीं । जाईल निवोनी नकरा ऐसें
॥५॥ अवश्य म्हणोनि द्विजवर । आपुले आश्रम पावले सत्वर । आसनगवाळें घेवोनि समग्र । स्नाना भार चालले ॥६॥
इकडे अविनाश कार्यकर्ता । तेथें कोण पदार्थां निवंता । सर्व सिद्धी वोळंगती समर्था । इच्छितार्था पुरवीती ॥७॥
हा जगद्गुरु पूर्ण दयाळ । यासी दासांची कळवळ । न इच्छितां पुरवी आळ । होय कृपाळ सदय हा ॥८॥
परमार्थकारणीं परम प्रीती । यदर्थां निवास याचा संतीं । प्रेमभाव जेथें भक्ती । ते आवडती अवधूता ॥९॥
जैसें प्रेमळाचें मानस । तैसाचि होतो तयास । पुरवी अंतरींची आस । जीवीं उदास होऊं नेदी ॥२१०॥
पुढील प्रसंगीं अवधूत । लीला दावील अद्भुत । तोषवील भोजनीं विप्र समस्त । पुरवील मनोरथ मानेचे ॥११॥
तुम्हां संतां त्याची सलगी । तो विलसे तुमच्या प्रेमरंगीं । हें परिसोनी लागवेगीं । चरणांलागीं शरण आलों ॥१२॥
संतसाधूंच्या चरणां । असे एक माझी विज्ञापना । समर्थे अंगीकारोनि दीना । चरणसेवना देइजे ॥१३॥
अनंतसुत संतांचा । अंकित म्हणवितसे साचा । प्रतिपाळ कीजे याचा । आधार चरणांचा तुमचा मज ॥१४॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रीनारदपद्मपुराणींचें संमत । श्रोते परिसोत भाविक भक्त । त्रयस्त्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥१५॥

॥ इति त्रयस्त्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ३४ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुदत्ताय नम ॥

जयजय सद्गुरु मंगलाधीशा । जय सच्चिदानंद अविनाशा । श्रीअनंता तूं अनंत वेषा व्यापक सर्वेशा नमो तुज ॥१॥
जय परब्रह्म परात्परा । जय सद्गुरु समर्था उदारा । करुणानिधे दीनोद्धारा । ज्ञानसागरा नमो तुज ॥२॥
जयजय सद्गुरु स्वामी दत्ता । तुझिये चरणीं अर्पिला माथा । कृपें तारी शरणागता । वारी चिंता अंतरींची ॥३॥
तूं करुणाघन आनंदराशी । सभाग्य संपन्न उदार होसी । मनोरथ आर्थिकांचे पुरविसी । कदा नुपेक्षिसी शरणागता ॥४॥
तूं होसी पतितपावन । धन्य तव कीर्तीचें महिमान । तें बाळमुखें करोन । वदविसी गुण आपुले ॥५॥
देवोनिया अभयकर । चालवी कथा गोड सुंदर । श्रोते बैसले श्रवणीं सादर । जाणोनि अंतर तृप्त कीजे ॥६॥
मातेचे पुरवावया हेत । सेवाभाव दाविसी तूं दत्त । तिचें करोनिया निमित्त । पुरविसी अर्थ जीवांचे ॥७॥
जीव हे कृपें उद्धरावे । मुक्त करोनि स्वपद द्यावें । आर्थिकांचे मनोरथ पुरवावें । इच्छोनि अवघें हें करिसी ॥८॥
त्रिगुणात्मक अवतार धरोनी । पुरविसी स्वभक्तांची आयनी । ते कीर्ति जगपावनी । श्रोतेजनीं परिसिजे ॥९॥
गत कथाध्याय अंतीं कथन । अनसूया विप्रां दे निमंत्रण । अवश्य म्हणोनि संध्यास्नान । करावया संपूर्ण पैं गेले ॥१०॥
जातां बोलिले ऋषीश्वर । क्षुधा प्रदीप्त जाली थोर । पूर्वान्हिका लागला उशीर । मध्यान्ह अवसर थोडा की ॥११॥
तरी वेळ न लावितां कांहीं । पाक सारिजे लवलाहीं । अवश्य म्हणतां ते समयीं । गेले ठायीं ऋषीश्वर ॥१२॥
जातां विप्रां विनविलें दत्तें । उशीर नसे पाकातें । त्वरें आटपोनि माध्यान्हिकातें । शीघ्र मागुतें येइजे ॥१३॥
हें परिसोन मुनिवर । स्नाना गेले ते सत्वर । माध्यान्हिकाचे प्रकार । आरंभिती साचार यथाक्रमें ॥१४॥
द्विज मार्गी लावोनिया । अनसूया आचरे गृहक्रिया । उदकपात्रीं भरोनिया । साहित्य समुदाया विस्तारिलें ॥१५॥
जो पदार्थ पाहिजे पाकासी । तो सिद्ध पुरविती वेगेंसी । न्यूनता कोठोनि येईल कैसी । उभा अविनाशी पूर्णार्थ ॥१६॥
केवळ अन्नपूर्णा अनसूया सती । ते सत्वरें आरंभी पाकनिष्पत्ती । षड्रस पक्वान्नें शीघ्रगतीं । जाली निर्मिती सतेज ॥१७॥
एका मागें एक । पदार्थपात्रें उतरी देख । ते घमघमीत अलोलिक । शाखा सकळिक रांधिल्या ॥१८॥
लेह्य पेय चोष्य खाद्य । भक्ष्य भोज्य ते प्रसिद्ध । षड्रस निर्मिले शुद्ध । अत्यंत स्वाद विशेष तो ॥१९॥
एवं षड्रसीं प्रकार केले । चतुर्विध अन्नातें निर्मिलें । लवणशाखा कोशिंबिरी आलें । पात्रीं भरिलें पृथक्त्वें ॥२०॥
यापरी पाक आटोपतां । माता जाणवीतसे दत्ता । आतां अवधी कासया लावितां । वेरा सिद्धता तिकडील ॥२१॥
पाकसिद्धी नयनीं पाहोन । तिघेही जाले सावधान । आपुलालीं कार्जे नेमून । आरंभिती कारण शीघ्रगती ॥२२॥
त्वरें उठोनि दुर्वास । शुद्ध करिता जाला भूमीस । निर्मळ संमार्जन विशेष । रंगमाळे संयुक्त जें ॥२३॥
चंद्रें काढिल्या रंगमाळा । श्री दत्तआसनें योजी सकळां । कर्दलीपात्र परिमळा । शीतळ जळा सिद्ध केलें ॥२४॥
गंध अक्षता सुमनहार । पादप्रक्षाळणीं ठेविलें नीर । इकडे षड्रस अन्नें परिपाक । रांधोनि सुंदर वाट पाहे ॥२५॥
अनसूया म्हणे त्वरा करा । वेगीं ऋषिवर्यां पाचारा । जावोनि चंद्र विनवी विप्रां । म्हणे आवरा चला वेगीं ॥२६॥

तें वर्म न कळे येरांसी । अविनाश म्हणे स्वस्थ मानसीं । भोजन कीजे कृपाराशी । घ्या पदार्थांसी आवडीच्या ॥८३
असो या आनंदसंवादे तृप्त जाली ऋषिवृंदें । अमृतोपयानाचेनि आच्छादें । झांकिली प्रसिद्धें उदरान्नें ॥८४
शेषभाग बळिदान । तेवींच येथें पितरार्पण । उरलें लवणीं घालोनि जीवन । उठले संपूर्ण द्विजवर ॥८५
तेवींच त्या सुवासिनी । उठल्या जाल्या तत्क्षणीं । उष्णोदक करप्रक्षाळणीं । सकळांलागोनी पाववितो ॥८६
करशुद्धी सकळांची होता । केली आचमनाची सिद्धता । तयज्ञीयस्य स्मृत्या । मुखशुद्ध्यर्थ तुळसीदल ॥८७
तंव तो चंद्र लगबगेंसी । बैसका घाली द्विजवरांसी । मध्यपीठ त्रिवर्गासी । आरुन वेगेंसी मांडिलें ॥८८
त्या आसनीं ऋषिजन । आनंदें बैसती जावोन । सर्वेचि येतां तिथे जण । सर्व अभ्युत्थान त्यां देती ॥८९॥ मध्यपीठ
मुख्य स्थानीं । भृगूसि बैसवी अत्रिमुनी । तेवींच नारदा सन्मानोनी । कृपासनीं शोभविलें ॥९०॥ उभयांसहित
बैसोनी आपण । कुशल विचारिती उभयांलागुन । म्हणती आजीचा धन्य सुदिन । आश्रम पावन केला जी ॥९१॥
आजि भाग्य उदेलें आमुचें । अकस्मात येणें जालें स्वामीचें । लाभ जोडले चरणाचे । फळ सुकृताचें लाधलों ॥९२॥
अत्रिमुखींची शब्दकुसरी । परिसोनि भृगु आनंदला अंतरीं । म्हणे नारदासवें निर्धारीं । दक्षिण सागरीं जातलों ॥९३॥
निघतां संकेत केला मानसीं । जातां जावें सिंहाद्रीसी । आवडी भेटोनि तुम्हांसी । क्रमें क्रमासी उरकावें ॥९४॥
तो योग अकस्मात । समाजीं घडला भाग्य बहुत । तव दर्शनें सुफलित । होतील मनोरथ आमुचें ॥९५॥
धन्य तुम्हीं साधु सुशील । शांत दांत भाविक निर्मळ । तपोधनामाजी भास्कर केवळ । दीनार्थी कोमळ धार्मिक ॥९६॥
धन्य तुमचें भाग्य थोर । त्रिगुणात्मक पावलां कुमर । तुम्हीं कीर्तीनें भरलें अंबर । पाहोनि अंतर सुखावलें ॥९७॥
भक्ति वैराग्य ज्ञान । येणें तुम्ही सदय संपन्न । आदिपुरुष अविनाश पूर्ण । तो वोळंगून राहिला ॥९८॥
तुम्ही ऐश्वर्याचे मेरू । तुम्ही मुमुक्षुजनांचे तारूं । स्वात्मस्वहिताचे भांडारू । तुम्हां सर्वेश्वरू सद्रूप ॥९९॥
जो करील तुमचें स्मरण । त्याचे दोष पळती रानोरान । दृष्टी अवलोकितां पुण्यवान । नमितां चरण मुक्त होय ॥१००॥
जेथें कृपानुग्रह होय देखा । तो पावेल सर्व सुखा । जन्ममरणाचा मिटे धोका । जोडेल सखा ईश्वर ॥१॥
तेवींच धन्य अनसूया । जे हे गुण प्रसवती माया । भावें विनटली तव पायां । हृदयीं दया सर्वा भूतीं ॥२॥
ती पतिव्रता शिरोरत्न । तव कृपें पावली आत्मज्ञान । तीं सौभाग्यसरिता निधान । पावली पूर्ण आत्मसुखा ॥३॥
ही पाहे जया अपांगपातें । तो पावे सर्व भाग्यानें । ही सदय गा सर्वांते । काहींच द्वैतातें नेणें ही ॥४॥
इसी धावया उपमा । पार्वती सावित्री उणी रमा । इचे भक्तित्व सर्वोत्तमा । अवतरोनि महिमा दावणें की ॥५॥
थोर प्रताप अलौलिक । त्रिदेव केलें जिनें बाळक । तेणें दुग्ध भिक्षेचें मानोनि सुख । लीला चोख वर्तती हे ॥६॥
सकळ देवांचे हे देव । जाणोनि वर्तती तुमचा भाव । सर्वात्मक जो वासुदेव । तो हा दत्तात्रेय योगींद्र ॥७॥
जो जगतींसी उद्भविला । जो वेदाज्ञा प्रतिष्ठिला । तो हा चंद्र विधाता । वृद्धीं सकुळता याचेनी ॥८॥
हा सर्वात्मकाचें मन । हा तिमिराचें करिता नाशन । हा तापाकरिता होय शमन । जीवां शांतवन याचेनी ॥९॥
याचें नाम अंबुधर । वनस्पति याचेनि थोर । याचेनि जीवजीवनें सागर । सुखें निर्भर असती ॥११०॥

जो भवभयहर्ता भवानीपति । जो तामस दिगंबर महामूर्ती । संहारकारक ज्याची शक्ती । तो हा निश्चितीं दुर्वास ॥११॥
जो तपोनिधी महाराज । जो महावैष्णव सतेज । जो पिनाकपाणी वृषभध्वज । ज्यासी अधोक्षज ध्यातसे ॥१२॥
तो हा कैलासवासी । प्रगट नामें दुर्वासऋषी । योगनिष्ठ तामस उदासी । वोळंगे तुम्हांसी भक्तीस्तव ॥१३॥
हे कूर्ती असती त्रिभाग । परी येरयेरांचें एकचि अंग । तो हा त्रिगुणात्मक योग । दत्त अभंग अविनाश ॥१४॥
हा सर्वातीत सर्वाधीश । परात्पर परब्रह्म परेश । जो धरिता अनंत वेष । तो रमेश होय हा ॥१५॥
धरोनि याही त्रिपुटी । प्रगटले हे जगदुद्धारासाठीं । सदय सरूप हा पोटीं । अद्भुत कोटी न वर्णवे ॥१६॥
यदर्थी सर्व भाग्यें धन्य तुम्ही । पाहोनि सुखी जालों आम्ही । अनंत लाभ लाभलों आश्रमीं । आनंदऊर्मी वदवेना ॥१७॥
तंव भृगूसि बोले मुनि नारद । तुमचे कृपेचा हा प्रसाद । व्हावया सकळांसी आनंद । तुमचेनि प्रसिद्ध प्रगटले ॥१८॥
आपुला कृपायोग समर्थ । त्याचा न कळे कोणासी अंत । स्वसत्तें कराल तेंचि होत । तुमची अद्भुत महिमा हे ॥१९॥
यापरी परस्परें संवाद । होतां जाला ब्रह्मानंद । तंव तांबूल घेवोनि आनंदकंद । दत्त सन्निध पावला ॥१२०॥
तांबूलपात्र पुढें ठेवितां । अत्रि भृगूसी जाला देता । तेव्हांच नारदा होय समर्पिता । विप्रां समस्तां दे दत्त ॥२१॥
तंव दुर्वास पात्रीं दक्षणा । घेवोनि पातला तत्क्षणां । उदकतुळसीपत्रयुक्त जाणा । देवोनि सूचना देवी पुढें ॥२२॥
पात्रीं स्वकरें उचलोन । भावें भृगूसी करी अर्पण । नंतर दुर्वासा आज्ञापोन । सकळ ब्राह्मण तोषविले ॥२३॥
विडे दक्षिणा संपतां । ब्राह्मण देती मंत्राक्षता । कल्याण हो पूर्ण मनोरथा । दीर्घायु सद्भाग्यता सौभाग्य हो ॥२४॥
वेदघोषें करोनि गर्जना । सुशब्द वोलोनि आशीर्वचना । अक्षता देती ब्रह्मनंदना । अत्रि द्विजगणा वंदित ॥२५॥
तैं अनसूयेतें पाचारिलें । येवोनि विप्रां भावें नमिलें । विप्रप्रसाद ते वेळें । मुनिवर्यें दिले तिजप्रती ॥२६॥
मागुती अनसूया सर्वां नमन । करितां देती आशीर्वचना । सौभाग्यफळ पावो पूर्ण । सदैव कल्याण पुत्रपात्रीं ॥२७॥
भृगु म्हणे पतिव्रते । गुणवर्धने ज्ञानसरिते । तव आचरणीं संतोष मातें । पावलों सुखातें तवाश्रमीं ॥२८॥
सौभाग्य संतती धन । पुत्रपौत्रीं हो कल्याण । सफलित हो तुज भक्तिज्ञान । तुज नारायण कृपा करो ॥२९॥
गुरुदेव द्विज अतिथींची । निर्दोष सेवा घडो साची । कामना पूर्ण हो तव मनींची । परात्परपदींची प्राप्ती हो ॥१३०॥
नारद म्हणे वो माते । हे सर्व आशीर्वाद फळो तूतें । नातळसी या जन्ममरणातें । अभयवरातें पावलीस ॥३१॥
यापरी होतां आशीर्वचन । तोषोनि वारंवार करिती नमन । तंव आज्ञा घेवोनि ऋषिगण । आपुलें स्वभुवन पावले ॥३२॥
तंव दत्त विनवोनि श्रीगुरूसी । आज्ञा मागे प्रसादासी । जा आनंदें घ्या लाभासी । वेळ यासी न लावा ॥३३॥
श्रीगुरुआज्ञा होतां । उच्छिष्टें काढोनि करिती सिद्धता । इकडे अनसूयामाता । स्त्रियां समस्तां तोषवी ॥३४॥
ऋषिऐसे सन्मान । देवोनि वोळविल्या आनंदें करोन । स्वयें पात्रें काढिली न लगतां क्षण । केलें पाचारण कुमरांतें ॥३५॥
दत्त दुर्वास चंद्रासी भोजनीं माता बैसवी त्यांसी । श्रीगुरुउच्छिष्ट प्रसादासी । सेविती मानसीं आनंदें ॥३६॥
अविनाश बोले वो जननी । अवेळ जाली तुजलागोनी । आपुले पात्र घेइजे वाढोनी । बैस भोजनीं सत्वर ॥३७॥
अनसूया म्हणे सकुमारा । राजसा तुम्ही भोजन करा । पाहोनि तुमच्या आदरा । मीही पुढारां बैसेन ॥३८॥

येचि रीतीं उल्हासें । तृत जाले प्रसादरसें । आचर साधोनि सनी वैसे । तांबूल देतसे अविनाश ॥३९॥
करोनिया तांबूल चर्वण । शयनीं पहुडले तिघेजण । उरकलें कार्य आनंदघन । पावलें मन संतोश ॥१४०॥
चौघे वामकुक्षी पहुडले । सुखासनीं निमग्न जाले । ऐसे सुखाचे सोहळे । दावी सलळें दत्त हा ॥४१॥
सुखनिद्रें समाधान । पावोनि उठले अवघेजण । उदकें नेत्र स्पर्शोन । केलें प्राशन जीवनातें ॥४२॥
नारद भृगु अत्रीसी । पुसोनि निघनी येगेंसी । दुर्वास दत्त चंद्रासी । विचारोनि अनसूयेसी चालले ॥४३॥
जातां नमन सर्व करिती । येरयेरांनें अलिंगिती । होवोनि सप्रेम बोळविती । यावें म्हणती दयाळा ॥४४॥
स्नेह कदा न सांडावा । लोभ अत्यंत वाढवावा । निरंतर घेईजे चरणसेवा । प्रसाद घावा कृपेचा ॥४५॥
भृगु म्हणे परस्परें । हें तों सारखेंचि असे खरें । काय वदावें विस्तारें । गोडी विसरे काय गुळा ॥४६॥
असो आतां लोभ करा । जा परतोनि आपुले घरा । ओळखी सर्वां मूर्तीं धरा । परां न विसरा जीवातें ॥४७॥
गेले सांगोनि खूण । अनुभवें पावले समाधान । अपुले स्वधामीं सुखसंपन्न । जाणोनि जीवन वर्तती ॥४८॥
अविनाश बोधाचा वोगरू । त्यावरी अत्रिगुरूचा कृपाकरू । अनसूयेचें नियवोनि अंतरू । केला परोपकारू जगींसी
॥४९॥ जगदुद्धारार्थ भला । दत्त अविनाश प्रगटला । आनंदसंप्रदाय वाढविला । उपदेश करविला प्रसिद्ध ॥१५०॥
हें भवभय लागवेगें । पेटलें होतें जीवामागें । तया तारूं धुंडोनि सवेगें । आपणचि अंगें नटला तो ॥५१॥
प्रबोधशस्त्र करीं घेवोन । अज्ञानतिमिर टाकिलें छेदोन । मलिन दुष्ट नष्टें दंडोन । द्वंद्वखंडण क्षणें करी ॥५२॥
मोह माया विकृति झाडी । त्यांत लोभ विकार तस्कर धाडी । ते अत्यंत जीवांतें पीडी । व्यसनीं गाढी गुंतवोनी
॥५३॥ हें देखोनि उपजली दया । प्रगटोनि तारूं जाला तयां । तत्काळ मुक्त केली अनसूया । यदुराया
सहस्रार्जुना ॥५४॥ जगद्गुरु दत्त सनातन । हा होय जगाचें जीवन । जे सांप्रदायी अनन्यशरण । तोडी
भवबंधन तयांचें ॥५५॥ दत्त दयेचा सागर । दावी मार्ग व्हावया उद्धार । ज्यासी जाणें असेल पैलपार । तेणें
विचार साधिजे ॥५६॥ तारक सद्गुरु संतराज । त्यासी शरण जावें सोडोनि लाज । सेवोनि कर्णीं सांठविजे
बीज । आपुले निज वोळखिजे ॥५७॥ श्रोतियां विनवी अनंतसुत । आलिया नरदेहीं पाविजे परमार्थ । हेंचि बोधी
स्वामी दत्त । म्हणोनि शरणागत भावें तुम्हां ॥५८॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । नारदपद्मपुराणींचें संमत । श्रोते
परिसोत भाविकभक्त । चतुस्त्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥१५९॥

॥ इति चतुस्त्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ३५ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ॥

जय अविनाशरूपा अनंता । सदय उदारा भाग्यवंता । भवभयहारका कृपावंता । श्रीसद्गुरुनाथा नमो तुज ॥१॥ तूं अनाथनाथ पतितपावन । होसि दयासागर ज्ञानघन । सद्गुरु तूं छेदिता अज्ञान । पापमोचन तव नामें ॥२॥ तव नामाचेनी प्रतापें । कलिकाळ थर्थरा कांपे । गूढ मार्ग होती सोपे । तुझिया जपें नाश दुरिता ॥३॥ तूं कृपें जया अवलोकिसी । भवबाधा न बाधी त्यासी । विनटतां तुझिया चरणांसी । तो मुक्तपदासी पावला ॥४॥ तूं देसी जया अभयकर । तो सहजीं पावे भवपार । तव ज्ञानबोध जया थोर । तो वस्तु परात्पर लाधेल ॥५॥ ऐसी तुझी अद्भुतलीला । श्रीसद्गुरु दीनवत्सला । कोणा न कळे तुझी कळा । दीनदयाळा स्वामिया ॥६॥ जयजय सद्गुरु आनंदकंदा । अनाथ मी विनटलों तुझिया पदां । स्वकृपें वदवी मतिमंदा । पुरवी छंदा अंतरींच्या ॥७॥ ऐसे कृपाबळें करून । ग्रंथीं होतसे निरोपण । तरी पुढील चालवी सुरस कथन । श्रोते श्रवण इच्छिती ॥८॥ या न चालवितां निश्चयेंसी । श्रोता उणीव आणील वक्तियासी । तो बोल लागेल तव ब्रीदासी । मज पामरासी कायसा ॥९॥ बरवें मार्गे करविलें निरोपण । आतां बुद्धी मंद राहिली होऊन । न सुचे कांहीं करितां लेखन । भ्रमित मन घोटाळे ॥१०॥ हें मर्म कळों येतां । स्वप्नीं निवेदिलें गुरुनाथा । या अन्वयाची तुम्हां चिंता । मी बोलता नसेच कीं ॥११॥ मी अंकित तव पदींचा । जीवेंभावें दास सद्गुरुचा । तरी अभिमान धरोनि ब्रीदाचा । वदविजे वाचा कथारंगीं ॥१२॥ यापरी विनंती करून । लक्षिले गुरुरायाचे चरण । रुचित बसलों होवोन । लेखणी ठेवून पत्रासह ॥१३॥ अंतरी सप्रेमें आठवितां । दया उपजली दीनानाथा । बाळकाची माउलीस चिंता । कृपावंता तैसीच ॥१४॥ देखोनिया अंतःकरण । ध्यानीं प्रगटले आपण । सकृपें म्हणती सावधान । चालवी निरोपण वदविता मी ॥१५॥ हे प्रासादिक अभयवाणी । सावध जालों परिसोनि श्रवणीं । करोनि प्रणाम श्रीगुरुचरणीं । पत्र लेखणी घेतली ॥१६॥ तंव मनीं उदेला उद्गार । श्रोत्यांसि प्रार्थवें जोडोनि कर । ने श्रवणीं असतां सादर । रस अपार वाढेल ॥१७॥ अहो जी श्रोते संतमहंत । ज्ञानी विचक्षण पंडित । तुम्ही सदय शांत दांत । सकळ ग्रंथार्थ जाणते ॥१८॥ तुम्ही महामान्य प्रौढ सज्ञान । ग्रंथरसाचे कर्ते पान । तुमचेनि वक्तिया भूषण । चालें निरोपण तुमचेनी ॥१९॥ तुम्ही महेशाच्या मूर्ती । मज सनकादिकची भासती । हें जाणोनि करितों विनंती । चरणांप्रती तुमच्या ॥२०॥ मी मतीमंद अज्ञान । केविं तुम्हांपुढें करूं निरोपण । तुम्ही जरी ध्याल सांभाळोन । तरि हें कथन चालेल ॥२१॥ जंबुकें आपुले पवाडे । काय दावावे सिंहापुढें । बृहस्पतीस ज्ञान दाविजे गाढें । मूर्ख वेडे तैसा मी ॥२२॥ मेरुपुढें मस्तक । दाऊं म्हणे आपुली तवक । सुभानूलागीं देख । खद्योत चमक दावी जेवीं ॥२३॥ तेवीं तुम्हांपुढें मी पामर । नेणोनि आपुला अधिकार । वक्तृत्व करूं इच्छी साचार । मूर्ख विचार हा माझा ॥२४॥ तंव श्रोते म्हणती सक्रिया । कां न्यून आणिसी आपुल्या ठायां । गुजवरी श्रीदत्ताची असे दया । लागे वदाया कथारस ॥२५॥ तव रसनेचा दाता । नो वेगळाचि असे वदविता । तूं निर्भय होवोनि बोले आतां । मीनि चिंता सोडोनी ॥२६॥

न धरीं कांहीं संकोच चित्तीं। वदे शब्द तुझे प्रिय लागती। कदा दूषित न व्हावें ग्रंथीं। धरोनि प्रीती रंगावें ॥२७॥
दत्तकथा अत्यंत पावन। तेथें गुंतलेति आमुचे श्रवण। तो रस करवीं आम्हां पान। आम्ही सावधान श्रवणार्थी ॥२८॥
देखोनि श्रोत्यांचें मानस। वक्ता पावला होय उल्हास। विनवोनि वदे सावकाश। कथा सुरस पान करा ॥२९॥
गत कथाध्यायीं निरोपण। अवधूतें तृप्त केले ब्राह्मण। भृगु नारदा तोषवोन। आले बोळवोन स्वधामीं ॥३०॥
येथोनि कथेचा नवलाव। तो श्रोतीं परिसिजे अपूर्व। दत्तलीला अभिनव। तोचि गौरव करूं आतां ॥३१॥
अवधूत केवळ सुखसिंधू। होय अनाथनाथ दीनबंधू। जेणें अनसूयेसी करोनि बोधू। पद ब्रह्मानंदू दिधलें ॥३२॥
तेणें निष्काम जाली ते निवृत्ती। सरल्या जन्ममरणाच्या आवृत्ती। स्वरूपीं निवटोनि वृत्ती। निरसली भ्रांती सर्वही
॥३३॥ मोहमाया गेली निरसोन। आशा लोभरहित जालें मन। उडालें प्रापंचिक भान। मीतूंपण विरालें ॥३४॥
धन्य सद्गुरु अत्रिनाथ। त्याचा पावतांचि वरदहस्त। ब्रह्मानंदीं अनसूया डुल्लत। स्वानंदें सेवीत गुरुपदा ॥३५॥
प्रसादें वारली तळमळ। अनसूया पोटीं जाली शीतळ। पावली सुख अविनाश अढळ। देखोनि दत्तदयाळ आनंदे
॥३६॥सुख संतोष मानोनि चित्तीं। अवधूत स्वइच्छें विचरती। पितृसेवें सादर होती। सिंहाद्रीस येती अस्तमानीं॥३७॥
चंद्र गृहस्थाश्रमी केला। दुर्वास तपियांमाजी भरला। मुनिपंथें योग साधिला। प्रतापी आगळा भोक्ता तो ॥३८॥
अवधूत दिगंबर मोक्षदानी। तो योगियांमाजी मुकुटमणी। न कळे कोण्हा त्याची करणी। वंद्य त्रिभुवनीं अत्रिनाश
॥३९॥ कवणे एके काळीं जाण। त्याचें घ्यावया दर्शन। सनत्कुमार सनकसनंदन। कपिल मुनीजन पावले ॥४०॥
नारद भृगु वैष्णव थोर। सप्तऋषींचे पावले भार। गार्गीसह सत्वर। येतां समोर देखिले ॥४१॥
योगी शुकादिक आले। सकळ दत्तें सन्मानिलें। अभ्युत्थान देवोनि बैसविले। प्रणाम जाले परस्पर ॥४२॥
त्या सिंहाद्री पर्वतीं। शोभा शोभविली वसंतीं। आश्रम देखोनि सुखावती। लाभ मानिती अनुपम ॥४३॥
सर्वां मनीं अर्थ थोर। पहावा स्वतंत्र कीं अवतार। प्रश्नीं शोधावा विचार। होतां उत्तर कळे पैं ॥४४॥
हें सर्वां मनीं बाणलें। परी वदन विलोकोनी मौनावले। हें वर्म नारदें जाणीतलें। परी तो न बोले कांहींच ॥४५॥
प्रश्न करावया उद्यवे हेत। बोलावया मुख अवलोकित। तंव प्रश्नरूपची अवधूत। पाहोनि थकित सर्व होती ॥४६॥
जैसी जया कल्पना पोटीं। तयां पडे तैसाचि दृष्टीं। कांहीं न वदवेचि गोष्टी। कल्पना निवटी पाहतां ॥४७॥
सज्ञान चतुर म्हणविती। पाहतां बोल न निघे निश्चितीं। तटस्थ जाल्या सकळ वृत्ती। जीवनीं विरती जळगारा ॥४८॥
ह्याचि मनामाजी धिवसा। दत्त कवण व्यक्ति आहे कैसा। ब्रह्मविचारणीं लालसा। परी सहसा न वदवे ॥४९॥
तें सर्वांचें मनोगत। जाणे स्वामी तो श्रीदत्त। परी आगळिक कदा न दावित। दावी इच्छावत रूप तैसें॥५०॥
पाहतां रूपीं न लगे लाग। इच्छेऐसे पुरती भोग। उणें न दिसे कोठें अंग। न फुटती माग शब्दाचे ॥५१॥
शब्दा मार्गची फुटेना। जडलें ध्यान तें तुटेना। सुब्धलें मन विटेना। संशय फिटेना अंतरींचा ॥५२॥
विरोनि गेल्या इंद्रियवृत्ती। पाहतां न हाले नेत्रपातीं। मानसीं आश्चर्य सकळांप्रती। धन्य विभूती प्रगट हे ॥५३॥
आपुले न पुरती मनोरथ। याशी करावी कोण युक्त। प्रसंग आरंभावा विपरीत। जेणें अर्थ साधेल ॥५४॥

दत्तरूपीं गुंतलें मन । तें दृष्टीसहित घेतलें फिरोन । आपआपणांमाजी भाषण । करिती सुजाण कळावया ॥५५॥ सनत्कऋषि आश्चर्य वदती । पदार्थमात्र कोठोनि होती । उद्भवोनि कोठे समावती । कोण अधिपती यत्कार्या ॥५६॥ तंव बोलती सनत्कुमार । मायेपासाव हे प्रकार । माया नियंता तो ईश्वर । जाणती निर्धार सर्वही ॥५७॥ तंव कपिलमहामुनी बोलती । ईश्वर म्हणावें कवणाप्रती । वोळखावया कवण स्थिती । हे निश्चितीं जाणाविजे ॥५८॥ परिसोनि मुनिवचनासी । सनकसनंदन बोलती त्यासी । निर्गुण निरामया निश्चयेंसी । म्हणती ईश्वरासी सत्य पैं ॥५९॥ निरुपम आणि निर्विकार । निरालंब निरंजन परात्पर । अनादि अगम्य साचार । तें ब्रह्म ईश्वर ईशत्वें ॥६०॥ तंव शुक सरसावोनी । काय वदता जाला वचनीं । एवढी थोरीव ईश्वरालागोनी । तो वर्ते गुणीं नवल हे ॥६१॥ अनेक अवतारांतें धरिलें । नाना चरित्रें असती दाविलें । गुण वेदश्रुतीनें वर्णिले । पुराणीं गाइले ऐकतां ॥६२॥ नारद म्हणे वो शुका । हा वचनार्थ तुम्हां ठाउका । भक्तिभाव जाणोनि निका । अवतारमालिका दावीतसे ॥६३॥ दुष्ट पातकांचा धरे भार । होतां पीडा सन्मार्गी अपार । तें न सहे अवतरे सत्वर । सामर्थ्य थोर प्रगटवी ॥६४॥ दुष्ट पातकी दुराचारी । कोपोनि तयांतें संहारी । स्वयें धर्मस्थापनेतें करी । आपुल्या तारी स्वजनातें ॥६५॥ भूमिभारातें सांडवोन । करी या जगतींचें उद्धरण । शरणांगता करी पावन । दावी महिमान चराचरीं ॥६६॥ गार्गी म्हणे बोलतां सारें । परी हे अवघे मायिक पसारे । येरयेरां देतां विसरे । न जाणा तुसारे जीवनींचें ॥६७॥ गोळा पान्याचा फुटला । नामें स्वाच विखुरला । तेवींच असे साकारला । स्वरूपें नटला अनेक तो ॥६८॥ एकाचा होतसे अनेक । अनेकींच असे एक । या एकाचेंचि कौतुक । तुम्ही सकळीक पाहतां ॥६९॥ पाहतां परी हें सर्व लटिकें । भोगितां परी दिसे नेटकें । दृश्य तितुकें विटकें । यासीच अटके जीव प्रीतीं ॥७०॥ प्रीती जेथोनि वाढे । तें असोनि नसे उघडें । तया जाणतांचि रोकडें । जन्ममृत्यु खुडे समूळेंसी ॥७१॥ मूळ असे ज्याचे त्यांत । जेवीं पाहे बीज फळांत । बीजापासोनि वृक्ष होत । वृक्षीं झोंबत फळ जेवीं ॥७२॥ आपणींच आपण आहे । सर्व होवोनि असक्त राहे । त्यावांचोनि जो न पाहे । तोचि होये तोचि तो ॥७३॥ गार्गीवचन सर्व तोपलें । हर्षे निर्भर मानावले । यावरी भृगु काय बोले । तेंचि संचलें अविनाशी ॥७४॥ तेचि हे साकार मूर्ती । दत्तदेव प्रगट दिसती । लक्ष लावोनिया निगुतीं । सप्रेमें चित्तीं ध्याइजे ॥७५॥ हा आनंदाचा आगरू । सर्वज्ञपणाचा सागरू । करावया जगदोद्धारू । सदय दानारू प्रगट जगीं ॥७६॥ अनंत पुण्य जया गांठीं । तोचि पावेल ही भेटी । पूर्वपुण्याची उजळली कोटी । म्हणोनि दिठीं पाहिलें या ॥७७॥ पाहतां ध्यान दिसे गोमटें । वेधल्या मन कदा न विटे । खरें पाहतां हरपे खोटें । भ्रांती फिटे अंतरींची ॥७८॥ पहा दत्त करितां अवलोकन । भ्रमर कमळापरी गुंतले नयन । मायिक पदार्थांची आठवण । विसरली भूकतहान कार्यकाजें ॥७९॥ जी जी सर्व अवश्य म्हणती । अत्यंत स्वरूपीं जडली प्रीती । मधुमाक्षिकेची जाली रीती । जडली वृत्ती उठेना ॥८०॥ नुठेचि कदा जडलें मन । इंद्रियां विरालें अंतःकरण । परि वाक्प्रसादा क्षुधित श्रवण । तें तों सर्वज्ञ जाणती ॥८१॥ यापरी संवाद होतां । अंतर्भाव जाणवला दत्ता । म्हणे यांचिया पुरवावे मनोरथा । निरोपणीं गुह्यता कळवोनी

॥८२॥ स्वहों सत्यं निरखोन । सस्मित केलें तेव्हां वदन । अहो जी म्हणे सावधान । सर्वी श्रवण देइजे ॥८३॥
वक्ता विनवी श्रोतियांसी । महत्कार्य वदे अविनाशी । तो रस सेवा निजप्रेमेंसी । एकाग्रमनेसी साधोनी ॥८४॥
दत्त वदे सुज्ञांप्रती । मी पुरुष ना प्रकृती । सान ना थोर निश्चिती । शिष्यत्व निगुती नसे तें ॥८५॥
नम्र नामी दाटा । लघो ना कांहीं वाटा । भयो ना मी जीवीं म्याडा । नोव्हे धडफुडा कांहींच ॥८६॥
मी अंध ना डोळस । मी कुव्हा न राजस । मी भास ना अभास । मी रस ना निरसवाकसा ॥८७॥
चालक ना मी पांगुळ । मुका नोव्हे मी वाचाळ । हीन ना मी सबळ । मरीव ना पोकळ मी कांहीं ॥८८॥
मी जड ना हाळवट । मी वांकुडा न नीट । मी आधीन ना पीट । वीट अवीट कांहींच ॥८९॥
मी रूप ना अरूप । मी तेज ना दीप । मी पुण्य ना पाप । दया न कोप वर्ता नोव्हे ॥९०॥
मी गुण ना गुणातीत । मी भेद ना अभेद निश्चित । मी वादी न वादरहित । मी लोभी न लोभांत वावरे ॥९१॥
मी वर्णी नोव्हे अवर्ण । नसे कुळ गोत्री न भिन्न । नसे होमिता न हवन । भोक्ता न भोजन मागविता ॥९२॥
मी नामी न अनामी । नोव्हे मी काम्य ना कर्मी । मी धर्मी न अधर्मी । सावध न ऊर्मी निद्रा ते ॥९३॥
कर्ता न मी करविता । आदि ना मज मध्यता । उगमी न मी अंतता । सक्त ना असक्तता दोन्हीही ॥९४॥
मी भाग्यी न अभागी । मी रंगी न अरंगी । मी संगी ना निःसंगी । भोगी न अभोगी पाहे पा ॥९५॥
मी नित्य ना अनित्य । मी शाश्वत ना अशाश्वत । मी गत कोठें न अगत । मी भरलो ना रिक्त कोठेंही ॥९६॥
रात्रीं ना मी दिवस । मी सुभानु न प्रकाश । मी चंद्र ना शीतांश । ग्रहगण तारांस असक्त मी ॥९७॥
मी भू ना भुवनातीत । नोव्हे पाताळ ना ताळमरित । नोहे स्वर्ग नाभीमंडित । नोव्हे नाभीमूल ना भूतादि ॥९८॥
आप तेज वायु पृथ्वी आकाश । तो मी नोव्हे सौरस । इंद्रिय प्राण मन बुद्धीस । नातळो निवास वेगळाची ॥९९॥
अस्तोदयां मी वेगळा । पर्जन्य तापा निराळा । सुकृत दुष्कृताच्या मेळा । असोनि खेळा अखेळीं ॥१००॥
मी ज्ञानी नसे न आज्ञान । मूर्ख ना मी सज्ञान । प्राज्ञ नसे मी अप्राज्ञ । अगुणी न गुणज्ञ गुणगर्भ ॥१॥
क्षर ना मी अक्षर । मी आप ना कांहीं पर । मी आप्त ना अनाप्त निर्धार । मी सर्वांतर सर्वात्मा ॥२॥
मी दूर ना समीप कांहीं । मी व्यापोनि वेगळाची पाही । मजवीण ठाव रिता नाहीं । मजवीण न कांहीं वेगळें ॥३॥
मी नेणोंची मातापिता । मज नसेचि बंधु चुलता । कोठेंनि कैंची भगिनी भ्राता । नसे कांता परिवार ॥४॥
मीच माझें सर्व असें । मीच अवघा व्यापक वसें । मीच पाहतां मज दिसे । मीच विलसें अनेक ॥५॥
आकारविकारादि मी जालों । व्यापोनि साक्षित्वें वेगळा ठेलों । ब्रह्मास्मि हें पद पावलों । तुम्हां धालों पाहोनि ॥६॥
माझी वस्तु तुम्हां हातीं । तुम्हांवीण कैंची मज विश्रांती । जैसी तुमची प्रेमभक्ती । तैसें मजप्रती होणें की ॥७॥
आपुले मीपणातें त्यजून । मज सलगीची साधितां खूण । तो प्रेमा मी देखोन । होय सगुण इच्छेऐसा ॥८॥
अवतारसंख्या चोवीस । हें स्थूळमान निवडिलें भजनास । परी मज प्रगटणें मानिकांस । वाव्या भेटी सनच्छंदें ॥९॥
त्या अवतारांची गणना । कधीं न जाली वेदपुराणा । गणांत बोलिले वचना । जाणतसां खुणा तेथींच्या ॥११०॥

नामरूपां नाहीं अंत । म्हणोनि नाम ठेविलें अनंत । यदर्थ तुम्ही सर्व अनंताआंत । त्यान्यतिरिक्त कांहीं नसे ॥११॥
तुम्हां वसणें मजमाजी असे । मी तुम्हांमाजी विलसे । रत्न कींकीळ वेगळी नसे । कांति असे सुवर्णी ॥१२॥
परिसोनि सद्गुरूचे बोल । सर्व स्वानंदें देती डोल । उठती प्रेमाचे कल्लोळ । बोलती बोल जय शब्दें ॥१३॥
परम आनंदकल्लोळीं । जयजयकारें पिटिली टाळी । वर्षो लागले प्रेमजळीं । अद्वयमेळीं मिसळले ॥१४॥
विसरोनिया देह अहंता । दत्तचरणीं ठेविती माथा । दत्तही सकळां जाला वंदिता । प्रेमें आलिंगिता होय सर्वां ॥१५॥
सम साम्य होतां अलिंगन । मीतूंपण गेलें हारपोन । जेवीं सागरीं विरालें लवण । समाधी समान दाटली ॥१६॥
हृदयीं दाटला अविनाशदत्त । तेणें वृत्ति जाली देहातीत । तंव नारद म्हणे हे विपरीत । येथेंचि मात होऊं पाहे ॥१७॥
मुनी म्हणे करावें सावधान । म्हणोनि आरंभिलें गायन । आतां भक्तियोगें सप्रेम गुण । समाधीन श्रवण दत्त करी ॥१८॥
परिसोनिया करुणास्तव । सावध जाले दत्तदेव । तया सरसें पाहती सर्व । कळा अपूर्व दाविली ॥१९॥
जागृतीसि येतां वृत्ती । सर्व सुखानंदें डोलती । म्हणती धन्य अविनाशमूर्ती । द्यावया विश्रांती प्रगट जीवा ॥१२०॥
जाणोनि जगाचें जीवन । कृपें वोळला हा दयाघन । याचें नाम अविनाश पतितपावन । जगदोद्धारण कर्ता हा ॥२१॥
हा परब्रह्मची केवळ । कोमल हृदयीं दयाळ । दर्शनेंच निवटती ताप सकळ । पद दे निर्मळ शरणागता ॥२२॥
हा सर्व सुखाचा होय दाता । होय शरणागताचा श्रमहर्ता । यत्कृपें दुःख वारे चिंता । पुरवी आर्त अंतरींच्या ॥२३॥
हा षड्भुज त्रिगुणात्मक अवतार । हा सर्वाधीश समर्थ थोर । देव मानव याचे किंकर । याचा कृपाकर वांछिती ॥२४॥
यदर्थीं साधकां निरोपण । करिती शुकसनकसनंदन । सनत्कुमार गार्गी कपिल आपण । वदती वचन भृगु नारद ॥२५॥
ऋषी योगी महामुनी । तेही साधन साधकांलागोनि । निरोपिती आवडीं प्रेमेंकरूनी । जेणें मोक्षदानी सत्य पावे ॥२६॥
ब्रह्मा विष्णु महेश्वर । इंद्रादि देव नळ कुबेर । त्यांनीं केलीं स्तोत्रें अपार । तें साधकां सुंदर स्वहितार्थी ॥२७॥
कितेकीं निर्मिलीं स्तोत्रें । कितेकांचीं कवचें विचित्रें । कितेकीं पटळादि यंत्रें । कितेकीं मंत्रतंत्रें निर्मिलीं ॥२८॥
ऐसें नानापरी निर्मोन । श्रीदत्त केला सुप्रसन्न । त्याचे पाहोनि वरदान । केलें प्रेरण हितार्थ ॥२९॥
तें निरोपूं जरी श्रोतियां समस्त । तरी सागरातुल्य वाढेल ग्रंथें । म्हणोनी विस्तार न केला सत्य । सार भावार्थ जागविला ॥१३०॥ नाना साधनें प्रयोग असती । जाणते सर्व त्यांते जाणती । इच्छिलें अर्थ आचरणें पावती । परी सुफल होती दत्तकृपें ॥३१॥ ती कृपा प्राप्त व्हावया । कारण योजिलें शोधोनिया । तें निरोपितो श्रोतियां । साध्य व्हावया साधकां ॥३२॥
श्रीमद्दत्तमाला सुंदर । त्यामाजी मुख्य मंत्र असे सार । तो ग्रहण कीजे साचार । विधिपुरस्सर घ्याइजे ॥३३॥
श्रीसद्गुरूसी जावोनि शरण । तो मंत्रराज करावा ग्रहण । न्यासयुक्त क्रम घ्यावा उमजोन धारण ध्यान आसनादि ॥३४॥
अश्वत्थ तुळसी औदुंबर । आवळी वट किंवा पिंपर । रम्य वन गंगातीर । देवमंदिर गुरुआश्रम ॥३५॥
हीं अत्यंत निर्मळें असती अनुष्ठाना योग्य स्थळें । साधकें साधिजे त्रिकाळें । इंद्रियबळें निग्रहवोनी ॥३६॥
एकाग्र करोनी मनासी । तो मंत्र जपावा नेमेंसी । अक्षरयुक्त पुरश्चरणासी । दोनां अविनाशी दे भेटी ॥३७॥
हें सत्य सत्य त्रिवाचा । नेमून कथिला असे साचा । लाग येथें भाविकाचा । योग दांभिकाचा असेना ॥३८॥

विषयी पातकी दुर्मती नर । नाहीं निगुन्यासी अधिकार । हा शुद्ध सात्त्विकाचा विचार । फळें निर्धार तयासी ॥३९॥
यापरी साधकासी । साधन निवेदिलें निश्चयेंसी । साधी त्या हा अविनाशी । कृपाराशी वोळेल ॥१४०॥
परिसोनि सकळांची वाणी । दत्त बोले तैं आनंदोनी । आज्ञा प्रमाण मी मानी । पुरवीन धणी सकळांची ॥४१॥
या रीतीं होता अभयोत्तर । सर्वीं केला जयजयकार । धन्य हा अवधूत उदार । म्हणोनि गजर नामघोषें ॥४२॥
आनंद उल्हासें करून । सकळ वृत्ती जाल्या समाधान । अवधूतासी आज्ञा मागोन । आपलें स्वस्थानें पावले ॥४३॥
यावरी दत्त षड्गुणराशी । स्वइच्छें रमे अहर्निशी । पुढील प्रसंगीं जनासी । भेटेल पथिमेसी जायोनी ॥४४॥
ते कथा अति अपूर्व । लीला दावील अभिनव । ने परिसतां सुखावतील सर्व । अद्‌भुत लाघव संवादी ॥४५॥
दत्त योगियाचा राणा । याचा महिमा न कळेचि कोण्हा । हा पूर्ण करी सकळ कामना । अनन्य जना कृपें तारी ॥४६॥
दत्त संतांचा कुवसा पाही । सदा वास संतांठायीं । संता आवडी दत्तपायीं । भोगिती देहीं सुख संगे ॥४७॥
दत्त अविनाश निर्मळ । हृदयीं संत ध्याती प्रेमळ । तो संतां न विसंबे एक पळ । आनंदे दयाळ सांभाळी ॥४८॥
दत्त चैतन्याचा गाभा । सदा सत्कीर्तनीं असे उभा । दत्तकृपेची संतीं शोभा । प्रगटवी प्रभा निजलीलें ॥४९॥
लीलालाघवी हा दिगंबर । होय तुम्हां संतांचें माहेर । सदा सकृपें दातार । रंगवी अंतर तुमचें ॥१५०॥
तुम्हीं संत सद्रूप वैराग्यसागरी । केवळ प्रबोधरूपें ज्ञानतरणी । प्रेमभक्तीच मुगुटमणी । अविनाश लेणीं लेववितें ॥५१॥
तुम्हीं संत श्रोते उदार । धीर गंभीर कृपासागर । तुमचे दातृत्वासी नाहीं पार । कीर्तीनें अंबर भरलेंसे ॥५२॥
तुम्हां संतांच्या पदांसी । सिद्धि मोक्षगति होवोनि दासी । ते न स्वीकारोनि अविनाशी । जडला प्रेमेंसी धन्य तुम्हीं ॥५३॥
जे चिंतामणीचेनि नोव्हे प्राप्त । कल्पतरु द्यावया नोव्हे समर्थ । जे कामधेनूचेनि न पुरती अर्थ । ते तुम्हीं संत पुरवीतां
॥५४॥ तुमचें सामर्थ्य शक्ति गहन । उपमे वाटती सर्व हीन । जेवीं रवीपुढें खद्योत दीन । खगीं श्येन ज्या रीतीं ॥५५॥
तुमचें सामर्थ्य अति थोर । अनुपम असे निर्धार । तुम्हीं सद्भाग्यनिधि अपार । केला रमावर अंकित ॥५६॥
तुमचा प्रताप अत्यंत गा दृढा । देवाधिदेव केला वेडा । पाचारितां प्रगटे लांकुडां । मागा पुढां सदा राहे ॥५७॥
इच्छेऐसा तो होवोनी । सदा वावरे तुमचे वचनीं । आपुली थोरीव विसरोनी । करी भूलोनी मलकार्य ॥५८॥
धन्य धन्य तुम्ही संतमूर्ती । धन्य तुमची लीला कीर्ती । ते परिसोनिया प्रीतीं । याचक निश्चितीं धांवलो मी ॥५९॥
अनंतसुत संतांचा किंकर । भावें विनवी जोडोनि कर । कीजे पामराचा अंगीकार । सेवा निरंतर घेइजे ॥१६०॥
इति श्रीदत्त प्रबोधग्रंथ । यासी नारदपद्मपुराणीचें संमत । श्रोते परिसोत भाविक भक्त । पंचत्रिंशोध्यायार्थ गोड
हा ॥१६१॥

॥ इति पंचत्रिंशोध्यायः समाप्तः ॥

## श्रीदत्तात्रेयषोडशावतारजयन्तीनां नामकालादिदर्शकं पत्रकम् ॥

| अवतारानुक्रमः | नाम | | मासः | पक्षः | तिथीः | वारः | नक्षत्रं | यामः | मुहूर्तः | दानं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | योगिराजः | ... | कार्तिकः | शुक्ल | १५ | बुधः | कृत्तिका | प्रथमः | प्रथमः | नारीकेलफलम् |
| २ | अत्रिवरदः | ... | ,, | कृष्ण | १ | गुरुः | रोहिणी | ,, | द्वि. | कदलीफलम्* |
| ३ | दत्तात्रेयः | ... | ,, | ,, | २ | भृगुः | मृगशीर्ष | ,, | सूर्योदये | इक्षुः † |
| ४ | कालाग्निशमनः | ... | मार्गशीर्षः | शुक्ल | १४ | बुधः | रोहिणी | द्वि. | द्वि. | पञ्चामृतम् |
| ५ | योगिजनवल्लभः | ... | ,, | ,, | १५ | गुरुः | मृगः | चतुर्थ | सूर्यास्ते | मौक्तिकम् |
| ६ | लीलाविश्वंभरः | ... | पौषः | ,, | ,, | बुधः | पुष्यः | प्र. | सूर्योदये | अन्नम् |
| ७ | सिद्धराजः | .. | माघः | ,, | ,, | गुरुः | मघा | द्वि. | द्वि. | पुस्तकम् |
| ८ | ज्ञानसागरः | .. | फाल्गुनः | ,, | १० | रविः | पुनर्वसुः | प्र. | सूर्योदये | मन्दिरम् |
| ९ | विश्वंभरोऽवधूतः | ... | चैत्रः | ,, | १५ | भौमः | चित्रा | द्वि. | प्र. | गौः |
| १० | मायामुक्तोऽवधूतः | ... | वैशाखः | ,, | १४ | बुधः | स्वातिः | ,, | मध्याह्ने | दध्योदनम् ऽ |
| ११ | मायायुक्तोऽवधूतः | ... | ज्येष्ठः | ,, | १३ | भृगुः | स्वातिः | प्र. | प्र. | मधु |
| १२ | आदिगुरुः | ... | आषाढ | ,, | १५ | मंदः | उत्तराषाढा | ,, | द्वि. | सुवर्णम् |
| १३ | शिवरूपः | ... | श्रावणः | ,, | ८ | चंद्रः | स्वातिः | ,, | प्र. | उदकम् |
| १४ | देवदेवः | ... | भाद्रपदः | ,, | १४ | भृगुः | शततारा | ,, | द्वि. | तांबूलम् |
| १५ | दिगंबरः | ... | आश्विनः | ,, | १५ | बुधः | अश्विनी | ,, | प्र. | वस्त्रम् |
| १६ | कृष्णश्यामकमलनयनः | ... | कार्तिकः | ,, | १२ | ,, | रेवती | ,, | सूर्योदये | रौप्यम् |

याम = प्रहर (तीन तासांचा) मुहूर्त = मिनिटें (अठ्ठेचाळीस). * केळें. † ऊंस. ऽ दहींभात.

# निवेदन

भगवान अनसूयानंदन दत्तात्रेय यांचेच केवल कृपेने तयार झालेला श्रीदत्तप्रबोध ग्रंथाचा ४ था भाग अध्याय २६ ते ३५ जनता जनार्दनाचे चरणी अर्पण करण्यास आम्हास फार आनंद होत आहे. मूळग्रंथाचा अर्धाभाग आता पुरा झाला असून पुढील अर्धाभाग शक्य तितक्या लौकर भाविकाना मिळावा या इच्छेने प्रयत्न चालू आहेत. या भागाची वर्गणी ही रु. १–५० पैसे ठेविली आहे. सर्व भाविकाना हा अप्रतीम ग्रंथ सुलभतेने मिळावा याच केवळ इच्छेने प्रेरित होऊन आम्ही या भागशः प्रसिद्ध होणाऱ्या श्रीदत्तप्रबोध ग्रंथाची वर्गणी इतकी अल्प ठेविली आहे. तरी अधिकात अधिक उपासकानी हा ग्रंथ आपले संग्रही ठेवून भगवान श्रीदत्तात्रेयांची उपासना वाढवावी अशी आमची नम्र प्रार्थना आहे. हा भागही अत्यंत सुंदरपणे छापून देण्यात श्रीसमर्थ प्रेस ठाणा व श्री रामदास मुद्रणालय दादर येथील प्रेमी मंडळींनी आपले कौशल्य प्रतीत केले आहे. त्याबद्दल त्यांचे आभार जेवढे मानावेत तेवढे थोडेच आहेत विशेषतः मालक श्री. स. पां. जोशी यांनी कोणत्याही अडचणींना न जुमानता हा संपूर्ण ग्रंथ लौकरात लौकर छापून देण्याचे आश्वासन दिले आहे व त्याप्रमाणे ते कार्य अंगीकारीत आहेत याबद्दल त्यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. श्री. जोशी यांचे ठिकाणी ही जी आत्मीयता या ग्रंथाबद्दल निर्माण झाली ती त्यांचेवर होणाऱ्या भगवान श्रीदत्तात्रयांचे कृपेचेच द्योतक होय अशी आमची पूर्ण खात्री आहे. आणखी एक विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे मूळ हस्तलिखित ग्रंथाचे प्राणपणाने जतन करणारे व श्री कावडीबुवांचे मंदिराचे विश्वस्त व वंशज माननीय श्री सुंदरनाथ माधवराव व श्री. जगन्नाथ माधवराव राजापूरकर यांचेही अनेक प्रकारें सहाय्य झाले आहे व होत आहे. प्रत्येक बारीक सारीक गोष्टींत त्यांचे आम्हास सहाय्य होत आहे. ही त्यांची मदत नसून परम भागवत कावडीबाबा यांचीच कृपेंगीची नजर आमचेवर आहे असे आम्हास आत्मविश्वासपूर्वक वाटते. अशा प्रकारे आमचे हे कार्य अधिक जोमाने व उत्साहाने पूर्ण व्हावे अशी त्या अत्रिनंदनांची प्रार्थना करून हे निवेदन संपविते.

श्रीनृसिंहजयंति, शके १८८६.

श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, मुंबई.

卐 सूचना—यापुढील ५ वा भागही शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध होईल. 卐




॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परमभागवत

श्री अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा

विरचित

# श्री दत्तप्रबोध

## भाग ५ वा

अध्याय ३६ ते ४५

# अर्पण-पत्रिका

परमहंस परिव्राजकाचार्य योगीराज

## ( श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज )

यांचे पवित्र चरणी

श्री दत्तप्रबोधरूपी कमलपुष्पातील पंचमदल अर्पण

## —: श्री गुरुस्तुती :—

जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा। जो नित्य राहे उदित प्रभात्मा। ज्ञाने जयाच्या नरहो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरु समर्थ ॥१॥ अखंड आत्मा अविनाशि दत्त। तया पदीं लाविति जे स्वचित्त। चित्तभ्रमा सोडविते कृतार्थ। तो पूर्ण आनंदगुरु समर्थ ॥२॥ जो जागृति स्वप्न सुषुप्ति साक्षी। जो निर्विकारें सकळां निरीक्षी। वोक्षी परी ज्या शिनसे निजार्थ। तो पूर्ण आनंदगुरु समर्थ ॥३॥ जळीं स्थळीं सर्वहि वस्तुमाजीं। व्यापूनि राहेचि तथापि गर्जा। जो ठेवि भावें नरहो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरुसमर्थ ॥४॥ जें दृश्य तें रूप नसे जयाचें। दृश्यांत राहे अविकारि ज्यांचें। स्वरूप तेंचि अविनाशि अर्थ। तो पूर्ण आनंद गुरुसमर्थ ॥५॥ दृश्यासि घेतां नच दिसे जें। स्वरूप तस्य प्रभुचें स्वतेजें। स्वयें प्रकाशे जगिं जो परार्थ। तो पूर्ण आनंद गुरु समर्थ ॥६॥ असोनि सर्वत्र गुरुप्रसादा। विना न लागे करितांहि खेदा। भेदाचि वार्ता करि जो अपार्थ। तो पूर्ण आनंद गुरुसमर्थ ॥७॥ अनन्य भावें भजतां अनन्य। लभ्य प्रभू जो नच होयि अन्य। संन्यस्त सर्वेषण तारणार्थ। तो पूर्ण आनंद गुरुसमर्थ ॥८॥ मागे तुकाराम तयासि दत्त। दे वासुदेवा करुनी निमित्त। हे स्तोत्र चिन्मात्र पदा समर्थ। घाया हराया सकळा ध्वनर्थ ॥९॥ गाणगापुरि अठराशें सत्तावीस शकामधीं। उदेलें स्तोत्र हें आधि व्याधि हारी हरी कुधी ॥१०॥

॥ अवधूतचिंतन श्रीगुरुदेवदत्त ॥

# ॥ श्री दत्त प्रबोध ॥

## ॥ अध्याय ३६ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

जयजय दिगंबरवेषा पांडुरंगा । त्रितापहरणा भवभंगा । कृपाकटाक्षें उद्धरिसी जगा । योगीअंतरंगा नमो तुज ॥१॥ विमल कोमलदल राजीवनयना । श्यामसुंदरा सुहास्यवदना । तडित्प्राय पीतवसनधारणा । पतितपावना तुज नमो ॥२॥ जय अविनाश अवीट अभंगा । सर्वज्ञ उदार निःसंगा । सद्गुरू कृपा करी मज वेगा । म्हणे तूं गुण गा निज वदनीं ॥३॥ त्वां या ग्रंथीं वदविलें कृपाबळें । तेवींच पुढें वदवीं रसाळें । श्रोतियां तोषविजे दयाळें । श्रवणीं रंगलें मन त्यांचें ॥४॥ जयजय सद्गुरु अनंता । तूं सर्वज्ञ संपन्न होसी दाता । दीन अंतरींच्या जाणसी अर्था । पुरविसी मनोरथा सकृपें ॥५॥ गतकथाध्यायपोटीं । वर्पल्या आनंदाच्या कोटी । शुकसनकादिक घेवोनि भेटि । आपुलें स्वपीठीं पावले ॥६॥ यानंतरें तो अवधूत । स्वच्छंदें विचरे आनंदभरित । कितेक काळ लोटतां निश्चित । पश्चिमपंथ पावला ॥७॥ द्वारकाप्रदेशीं जातां । दत्त पावले गिरिनाळपर्वता । विश्रांतीस शिखरीं पावतां । सिद्धां समस्तां जाणवलें ॥८॥ आला परिसोनि योगीराव । सर्व सिद्धांनीं घेतली धांव । नमोनि करिती तैं गौरव । तंव अपूर्व वर्तलें ॥९॥ जो आदिवैष्णव महाथोर । भूतपति परमेश्वर । जो कैलासनाथ उमावर । शिवशंकर योगिराज ॥१०॥ जो भोळा दिगंबर पन्नगभूपण । दशभुज पंचवदन । जया शोभे वृषभवहन । मौळीं धारण गंगा ज्या ॥११॥ जया रुंडमाळा शोभती । त्रिशूळनरकपाळ विराजे हातीं । कर्पूरगौरांगीं दिव्य विभूती । भव्य मूर्ती पुरातन ॥१२॥ नीलकंठ स्मशानवासी । शंख डमरू या वाद्यासी । ज्वाळा धगधगीत नेत्र तृतीयासी । अंबुधरेंसीं सुशोभित ॥१३॥ व्याघ्रांबर जयाचें आसन । गजांबर जयाचें प्रावरण । कौपीन फणीची धारण । पाणी जोडून भैरव पुढें ॥१४॥ रुद्राक्ष स्फटिक कंठीं माळा । जटा रुळती भव्य विशाळा । संहारशक्तीची अद्भुत कळा । भाविक प्रेमळां सकृप ॥१५॥ सकळ देव जयातें ध्यानी । वेद पुराणें शास्त्रें गाती । सिद्ध ऋषि तापसी स्तविती । आराध्यमूर्ती विष्णूची हे ॥१६॥ जो सर्वात्मा सर्वेश्वर । जो मायानियंता परात्पर । जो षड्गुणसंपन्न रमावर । तो हा शंकर ध्याय सदा ॥१७॥ नित्य ध्यास त्या रमाधवा । सद्गुरु शंकर भावें नमावा । प्रेमें अनुग्रह त्याचा घ्यावा । परी कोण करावा उपाव या ॥१८॥ त्यासी तरी माझें ध्यान । आवडीं करीतसे पूजन । यारूपें मागतां त्या अनुग्रहदान । न रुचोनि पूर्ण न दे तो ॥१९॥ मग मनीं विचारी कमळापती । सद्गुरुवांचोनि नाहीं गती । तरी यासी कांहीं करोनि युक्ती । अनुग्रह निश्चितीं सत्य घ्यावा ॥२०॥ जया स्वहित आपुलें साधणें । थोरीव आढ्यता त्यागिजे तेणें । कार्य सिद्ध होय जेणें । तेंचि करणें आवश्यक ॥२१॥ एवं निश्चय करोनि हरी । गर्भस्थ राहिले मत्स्योदरीं । केधवां पावेल त्रिपुरारी । ध्यास अंतरीं कृपेचा ॥२२॥ असो इकडे शूळपाणी । सिंधुतीरीं तपाचरणीं । बैसोनि आराध्य आराधी मनीं । समाधिस्थ ध्यानीं निमग्न ॥२३॥ हें गर्भस्थातें कळलें । मायवासनेतें चेतविलें । तिचेही मनीं हेंचि गमलें । शिवदर्शन जालें पाहिजे ॥२४॥ म्हणोनिया ती मीनी । शिवसन्निध रमे जीवनीं । आनंदें मूर्ति विलोकी नयनीं । लक्ष चरणीं गुंतलें ॥२५॥

तंव शिवयोगी ध्यानस्थ । भाषण न निघेचि किंचित । श्रवणार्थी गर्भिणीचा हेत । भावें ती भोंवत सप्रेमें ॥२६॥
शिवयोगी करितां ध्यान । तपासि जाले बहुत दिन । तंव हिमनगबाळी म्हणे अजुन । कैलासरमण न येती ॥२७॥
तंव मानसीं शोधोनि अंबा पाहे । शिव सिंधुतटीं बैसला आहे । मग स्वयें आपण लवलाहें । दर्शना जाये सप्रेमें ॥२८॥
अतिप्रीतीं करोनि प्रार्थना । गौरी वंदिती जाली चरणा । तंव शिवें उघडोनि नयना । देखिली स्वललना पुढती ॥२९॥
आनंदयुक्त देखोनि शंकर । प्रेमें इभमाता जोडी कर । उभी राहोनिया समोर । प्रार्थी मधुर नम्रत्वें ॥३०॥
अजी करुणा करा दिगंबरा । नीलकंठा कर्पूरगौरा । वृषभध्वजा गंगाधरा । सर्वेश्वरा नीलग्रीवा ॥३१॥
स्मशानवासी कैलासनाथा । व्याळभूषणा भस्मोध्दूलिता । अंबुधरा षण्मुखताता । स्वामी समर्था शंकरा ॥३२॥
परिसोनि गिरिजेचें स्तवन । शिव भोळा झाला प्रसन्न । म्हणे काय इच्छितें तुझें मन । मज तें निवदनें करीं आतां ॥३३॥
अपर्णा बोले दयानिधी । सर्व देव नमिती तुमच्या पदीं । तुम्ही कोणा स्तवितां एकांतसंधीं । तें मज आधीं निरोपा ॥३४॥
शिव म्हणे वो दाक्षायिनी । जो सर्वात्मक मोक्षदानी । मायातीत जो निरंजनी । त्यालागी मनीं मी ध्यातों ॥३५॥
जो चित्तचालक चैतन्यघन । जो अविनाश निरामय निर्गुण । जो अचल अभंग सनातन । जडलें ध्यान मज तेंचि ॥३६॥
जो मायानियंता ईश्वर । पाळी सत्कृपें जो चराचर । जो सकळांचा आधार । तो परात्पर भजतों मी ॥३७॥
जन्मोनि त्यातें जाणावें । निजहृदयीं त्या ओळखोनि ध्यावें । तरीच सार्थक होय बरवें । सुखचि भोगावें तत्संगें ॥३८॥
तया जाणावयाचे ज्ञान । तें सद्गुरुमुखें करावें श्रवण । स्वतत्त्व आपुलें पावून । सुखसंपन्न होइजे ॥३९॥
तया ज्ञानप्रबोधें । तुटती सकळ सहज द्वंद्वें । सुखावसील ब्रह्मानंदें । जगीं अभेदें वागसी ॥४०॥
सद्गुरुकृपेचें ज्ञान नाहीं । तो जाणावा केवळ पशुदेही । जन्मोनि वांया गेला पाहीं । तो न तरे डोहीं भवाच्या ॥४१॥
गुरुविमुख जो प्राणी । तो खरच केवळ जन्मोनी । स्नान कीजे त्या दर्शनीं । पापखाणी तो जन्मभोगी ॥४२॥
अनेक साधनीं तो तपला । उदंड अभ्यासें ज्ञान पावला । अत्यंत मान्यतेसी जरी आला । सेखीं वांया गेला गुरुहीण ॥४३॥
अभ्यासज्ञानें जाला अभिमान । तेणें छेदउच्छेदीं भरलें मन । आशा लोभ महत्त्व अज्ञान । दूषिनें नागवण पावला ॥४४॥
ज्ञानें ध्यानातें पावावें । ध्यानरूप आपण व्हावें । अविनाशपदीं सुख भोगावें । तें न घडावें काय यातें ॥४५॥
ऐसियासी हेंचि कारण । न गेला तो सद्गुरूसि शरण । येर विद्येचा जडला अभिमान । अपरोक्षज्ञान कैंचें त्या ॥४६॥
अपरोक्षज्ञान पाहिजे ज्यासी । तेणें शरण जावें सद्गुरूसी । त्याची कृपा होतां निश्चयेसी । मग अनुभवासी पाविजे ॥४७॥
सद्गुरुप्रसाद पूर्ण पावतां । मग देहीं नुरे कांहीं चिंता । पावे देहीं निर्विकल्पता । आनंद चित्ता पूर्ण बाणे ॥४८॥
येरीकडे जीवनीं । परिसोनि सुखावे ती मीनी । उमा हृदयीं सद्गद होवोनी । लागे चरणीं शिवाच्या ॥४९॥
म्हणे जी आदिनाथा शंकरा । पतितपावना दीनोद्धारा । शरण चरणासी दातारा । मज अंगीकारा दयानिधे ॥५०॥
माझा स्वामी सद्गुरु तूंचि समर्थ । मी तव पदीं जालें शरणागत । तरी होवोनि कृपावंत । आपणोनि त्वरित उद्धरी ॥५१॥
तारक उपदेश कीजे श्रवणीं । ज्ञानप्रबोध कीजे मोक्षदानी । स्वरूपीं दृष्टी मिळवोनी । अद्वय लेणीं लेववी ॥५२॥
त्रिविधतापें तापलें प्रबळ । तूं सहर्षे करी मज शीतळ । वारोनि अंतरींची तळमळ । पद दे अढळ अविनाश ॥५३॥

तूं सच्चिद्घन आनंदमूर्ती । जाणसी शरणागताची आर्ती । ते तूं स्वकृपें करिसी पूर्ती । गुणकीर्ती धन्य तुझी ॥५४॥ तूं पतिताचा पावन । तूं अनाथनाथ कैवल्यनिधान । तूं या जीवांचें जीवन । म्हणोनि शरण तव पदीं ॥५५॥ यापरी अपर्णेची विनंती । परिसोनि द्रवली सांबमूर्ती । सद्गद देखोनि तिची वृत्ती । हृदयीं प्रीतीं कवळी तिज ॥५६॥ येरी दृढ सप्रेमें धरी चरण । तंव शिव देतसे अभयदान । मन उत्साह मुहूर्त पाहून । एकांत निरखोन उपदेशी ॥५७॥ स्वबीज कर्णीं प्रेरिलें । ते तत्काळ हृदयीं प्रवेशलें । तेणें शीतळत्व अंगीं पावलें । ताप निवारिले क्षणमात्रें ॥५८॥ वरी वेदांतज्ञानाचा प्रतिबोध । अध्यात्म निवेदी शिव प्रसिद्ध । भावना जडतां अभेद । वृत्ति शुद्ध पै जाली ॥५९॥ मायिक गेलें हारपोन । सत्य पदार्थी जडलें मन । षट्चक्रभेदाचें निरोपण । होतां उन्मन मन जालें ॥६०॥ हुंकार द्यावया शिवासी । सावधता नसे तैं उमेसी । हें जाणवलें मीनगर्भस्थासी । हुंकारें अर्थासी तो साक्षी ॥६१॥ श्रीशंकर करितां निरोपण । हुंकार दे विष्णु आपण । उमेसवें अनुग्रह पावोन । करी श्रवण आध्यात्मिक ॥६२॥ स्वरूप साक्षात्कार अनुभव । निरोपितां श्रवण करी सर्व । तंव ऊर्ध्व विलोकी उमाधव । देखिलें अपूर्व लक्षणें ॥६३॥ अपर्णेची तों वृत्ति विराली । हुंकार वटिका नाहीं खंडली । दुजा कोण देतो ये स्थळीं । म्हणोनि चंद्रमौळी विस्मित ॥६४॥ पुनरा करितां निरोपण । तों हुंकार निघे जळांतून । मग अंतरीं पाहे विचारोन । तंव तो नारायण मीनगर्भी ॥६५॥ मग त्या मीनीतें पाचारिलें । स्वकृपें तीतें अवलोकिलें । गर्भनिधान प्रगटलें । चरण वंदिलें तयानें ॥६६॥ तेंनररूप अत्यंत लावण्यमूर्ती । केवळ धरे उतरला गभस्ती । तेणें करोनिया शिवस्तुती । तोषविली वृत्ती सद्गुरूची ॥६७॥ शिव भोळा उमारमण । मत्स्येंद्रनाथ ठेविलें नामाभिधान । स्वकृपें भूषणत्राणा देवोन । अद्भुत ज्ञान बाणविलें ॥६८॥ मस्तकीं ठेवोनि अभयकर । योगमार्ग निवेदिला सुंदर । आपण ऐसा करोनि योगेश्वर । जगदोद्धार करी म्हणे ॥६९॥ शंकरें जाणितलें चित्तीं । हा विष्णुशिष्यत्वें आला सेवेप्रती । माझा सद्गुरु निश्चितीं । सत्वार्थयुक्ती हे कली ॥७०॥ तरी याचें न घेतां सेवन । यासी योगमार्गी चावें जडोन । कांहीं कार्य आज्ञापोन । घडे भ्रमण हेंचि कीजे ॥७१॥ बाणाभूषणें मंडित । नाम दिधलें मच्छींद्रनाथ । सांगे कर्णीं गुह्यमात । सदा योगांत रमावें ॥७२॥ स्वइच्छें क्रमावी अवनी । निर्ग्रह कीजे भीक्षाटणीं । कृपा करावी दीनजनीं । अद्वय नयनीं पाहावें ॥७३॥ मातें कधीं न विसरावें । रात्रंदिन मनीं स्मरावें । स्वस्वरूपीं निमग्न व्हावें । आनंदें भरावें विश्रांत ॥७४॥ योगियें बहुकाळ नसावें स्थिर । जळस्वरूप असावें चर । जीवीं जाणावें परोपकार । विरक्त अंतर असावें ॥७५॥ कनक कामिनी मोह ममता । हे कधींही नाणावी चित्ता । निरंजनीं वास कीजे निरुता । स्वात्महिता साधिजे ॥७६॥ यापरी बोधितां वेगेंसी । तंव मच्छींद्र नमी शिवपदासी । आज्ञा वंदोनि योगाभ्यासी । साधावयासी चालिला ॥७७॥ गिरिकंदर वनोपवन । शोधीत चालला आनंदस्थान । जेथें मन जालें सुप्रसन्न । तेथेंचि आसन घातलें ॥७८॥ श्रीसद्गुरु शिवयोगिराज । तेणें तारक जें प्रेरिलें बीज । तें जपतां जाला सतेज । गुह्य गुज गुप्त हृदयीं ॥७९॥ आहारनिद्रा त्यजोनी । वाचा न गुंतवी येर भाषणीं । निग्रह सदा इंद्रियदमनीं । ध्यानीं मनीं गुरुरूप ॥८०॥ चौऱ्याशीं आसनांचे पंथ । आज्ञापिल्याऐसेचि साधित । अंतर्बाह्य शुद्धी नित्य । करी कृत्य यमनियमीं ॥८१॥

नित्य प्रणवसाधनीं ध्यास । प्राणापान जिंकी सुरस । कुंडलिनी चेतवोनि विशेष । जाळी मळास अंतरींच्या ॥८२॥
तेणें पंथ करोनि सुभट । राहूं नेदीच कोठें आडे बेट । मग पश्चिममार्गे साधी नीट । वेंधे घाट स्वर्गाचे ॥८३॥
जे स्थळीं जों जों दैवतें । तोपर्यंत सन्मानोनि त्यांतें । साधोनि तेथींच्या व्रतें । अति अतीतें जाय पुढें ॥८४॥
मग स्वर्गपंथातें क्रमोन । लोक केले अवलोकन । तेथील दैवता अर्चोन । वरप्रदान घेतलें ॥८५॥
प्राण अपानीं साधोनि आढी । मन पवनाची घातली जोडी । येरापायीं घालोनि बेडी । स्वर्गशिडी वेंधला ॥८६॥
स्वर्गातीत जें स्थळ । तें अत्यंत असे निर्मळ । निरूपम आणी विशाळ । सर्वां मूळ तें स्थान ॥८७॥
तेथें योगिया पावला । तें वाद्यघोष वाजों लागला । धांवोनिया सिद्धींचा पाळा । आड्वा जाला तयासी ॥८८॥
प्रसादवाणी त्या वदती । परी तें नावडे योगियाचित्तीं । लोलिंगन न करोनि वृत्ती । गमनगती साधी पुढें ॥८९॥
परत्या सारोनि सिद्धी । अवघड मार्ग बळें साधी । अत्यंत अडचणीची संधी । तेथेंचि रोधी प्राणपवनु ॥९०॥
ब्रह्मरंध्र जया म्हणती । सूक्ष्म करी तेथें गती । माजी संचरोनि पाहती । अनुभवप्रचीती ज्याची त्या ॥९१॥
असे अंतरींचे प्रकार । ते तों जाणती योगीश्वर । मी काय वदूं पामर । वेदा पार न लगेची ॥९२॥
तें श्री शंकरकृपें करोनी । मच्छींद्र पावला स्वस्थानीं । ओंमात्रची मांडणी । पाहतां उन्मनी लाधला ॥९३॥
जें संतयोगियांचें गुज । जें मुनिसिद्धसाधकांचें निज । जें अनंत ब्रह्मांडींचें बीज । पाहतां सतेज सुखावला ॥९४॥
त्या स्वानंदसुखाभीतरीं मी तूंपणा कैंची उरी । असो जिरवोनि आनंदलहरी । परते बाहेरी योगी तो ॥९५॥
यापरी नित्य अभ्यासीं । योगी राहे दिवानिशीं । सकळ सिद्धी होवोनि दासी । नित्य सेवेसी निश्टी ॥९६॥
योगियांमाजी सुंदर । जाला मच्छींद्र धुरंधर । स्वइच्छें रमे अवनीवर । जगदोद्धार करावया ॥९७॥
[illegible] पुरें ग्राम पट्टण । फिरतां करी भिक्षाटण । हृदयीं ध्यायें उमारमण । जाणे कारण दीनांचें ॥९८॥
[illegible]ागनाचें जाणोनि आर्त । स्वयें पुरवी मनोरथ । येचिविषयी कथार्थ । श्रोते संत अवधारा ॥९९॥
[illegible]च्छींद्रनाथ करितां फेरी । पावला उत्तम महानगरी । भिक्षा करितां घरोघरीं । अलख उचारीं शब्द तो ॥१००॥
तंव एक समाग्याची कांता । शब्द ऐकती जाली अवचिता । भिक्षा घेवोनि त्वरें येतां । मच्छींद्रनाथा पाहिलें ॥१॥
आकर्णपर्य विशाळ नयन । स्वरूपें लावण्य सुहास्यवदन । कर्णी कुंडलें दैदीप्यमान । भस्मलेपन सर्वांगीं ॥२॥
मस्तकीं मुगुट जटाभार । सिंगी पुंगीसयली सुंदर । तुंबी किंगरी मंजुळ स्वर । गाय प्रियकर शिवलीला ॥३॥
मुद्रें कंकण करभूषणें । स्फटिक रुद्राक्ष कंठाभरणें । कटीं आडबंद परिधानें । तोडर बाणें पदकमळीं ॥४॥
त्रिशूळ डमरू विराजित । आरक्त बिंदु भृकुटी शोभत । शांत दांत हर्षभरित । नेत्रीं पाहतां देखिला ॥५॥
तंव ती अर्धभूत कामिनी । भिक्षा घालोनि लागे चरणीं । मच्छींद्र म्हणे वो जननी । कोण मनीं इच्छा वदे ॥६॥
सद्गुरु देखोनि योगीश्वर । सद्गद हृदयीं जोडी कर । उभी राहोनिया समोर । बोले मधुर अबला ते ॥७॥
अहो जी दयानिधि कृपासागरा । पतितपावना योगीश्वरा । विनंती दीनाची अवधारा । उदारधीरा गुरुवर्या ॥८॥
तुम्हचिया कृपें करोनी । सर्व भाग्य असे सदनीं । भ्रतार सदय ज्ञानखाणी । धर्मपरायणी सद्बुद्धी ॥९॥

पदार्थमात्र भांडारीं । उणें तवं कृपें नसे मंदिरीं। उभयप्रीत परस्परीं । पीडा शरीरीं असेना ॥११०॥
सौभाग्य ऐश्वर्य कल्याण । तव प्रसादें असे पूर्ण । परी शून्य एकावीण । म्हणोनि चरण धरियेले ॥११॥
दृष्टीवांचोनि विशाळ नेत्र । कीं नासिकेवांचोनी वक्त्र । ध्वनिवांचोनि जैसें श्रोत्र । तेवीं मंदिर आमुचें ॥१२॥
सर्व सुख आम्हासि पाहीं । परी उदरीं संतान नाहीं । यायोगें दुःखित देहीं । यदर्थ पायीं शरण तुझ्या ॥१३॥
तूं सर्वज्ञ साधु दीनदाता । आमुचे भाग्यें पावलासि आतां । कृपें वारी अनाथ चिंता । पुरवीं हेता आमुच्या ॥१४॥
परिसोनि साध्वीची करुणवाणी । नाथ संतोषला अंतःकरणीं । प्रसाद विभूती तिजलागोनी । कृपा करूनी देतसे ॥१५॥
स्वमुखें तिसी निवेदिती । कीं प्रवाहकत्वे दीनार्ती । ही सेविजे प्रसादविभूती । फळ निश्चितीं पावसी तूं ॥१६॥
यासी न करी तूं अनमान । पुत्र पावसी परम निधान । द्वादशवर्षी परतोन । येथें येईन भेटवी तो ॥१७॥
अवश्य म्हणोनी चरणीं माथा । ठेवितां योगी दे अभयता । सुफळ वदोनी होय जाता । आनंद चित्ता सतीच्या ॥१८॥
दानपात्री प्रसाद घेवोनी। वेगीं प्रवेशली आपुले सदनीं। प्रसाद ठेविती जाली जपोनी । स्वरूप मनीं लक्षीतसे ॥१९॥
तंव एके दिवशीं सहज । मिळाला साजणींचा समाज । येरयेरीं करोनि चोज । आपुलालें गुज बोलती ॥१२०॥
सुखदुःखाचा सोहळा । वाखाणिती सर्वेहि बाळा । तंव मुग्धा म्हणती हे वेल्हाळा । होय विकळा बाळावीण ॥२१॥
तंव ती बोले वो साजणी । हेचि चिंता होती मनीं । परी एक योगी येवोनि आंगणी । प्रसाद देवोनी मज गेला॥२२॥
अभयवरदें दिधली विभूती । कीं तुज होईल फलप्राप्ती । ती मज पाहणें प्रचीती । ऐकोनि हांसती ललना त्या ॥२३॥
म्हणती बाई योगी कोण । कैसें होतें त्याचें चिन्ह । येरी वर्णिनी जाली भूषण । करिती श्रवण युवती त्या ॥२४॥
मस्तकीं शोभे जटाभार । कर्णी कुंडलें मुद्रा देदीप्य थोर । भस्मचर्चित दिव्य शरीर रुद्राक्षहार स्फटिकादि ॥२५॥
नाना रंगी शोभे कंथा । सिंगी पुंगी सैली अतीता । तोडा शोभे कलगी माथां । किंगरि वाजवितां गायमुखें ॥२६॥
झोळी फावडी तुंबी सुंदर । कौपीन अडबंदकटीं नागर । ब्रीद भूषणें पायीं तोडर । भ्रुकुटीं शेंदुर मध्यस्थळीं ॥२७॥
यापरी तो योगिनाथ । उभा आंगणीं मंजुळ गात । तया मी नमस्कारितां सत्य । म्हणे अपेक्षित माग तूं ॥२८॥
मग म्यां त्यातें प्रार्थिलें । अर्थ मनींचे निवेदिलें । विभूति देवोनि तो वरद बोले । फळ चांगलें पावसी ॥२९॥
ते विभूत ठेविली जपून । त्या आज्ञे ऐसें मी ते सेवीन । तंव अभंकांनीं हें परिसोन । काय वचन बोलती ॥१३०॥
कपटी कानफाटे मोंदू असती । साबरी विद्येतें बहु जाणती । विभूति देवोनि मोंदिता । स्त्रीधन नेती उडवोनी ॥३१॥
शुनी मक्षिका वांदरी । मोहोनि परस्त्रियांतें करी । दिवा वागवी तैस्यापरी । भोगार्थ नारी रजनींत ॥३२॥
पुनरा कदा न सोडिती । मोहोनि मार्गे हिंडविती । कैंचें ऐश्वर्य विलासप्राप्ती । श्रम भोगविती जीवातें ॥३३॥
यासाठीं तूं न धरी विश्वास । सेवितां मुकसी प्रपंचास। बरवें न भक्षिलें विभूतीस । सांडी निःशेष आशा ती ॥३४॥
ऐकोनि कामिनींचें वचन । भयाभीत जालें तिचें मन । म्हणे बरवें सावधान । मजलागून तुम्हीं केलें ॥३५॥
मी अर्थभूत बाई भोळी । न जाणे कपट चेटक टवाळी । तुम्हीं सांभाळिलें ये वेळीं । बुडतां जळीं तारिलें ॥३६॥
स्त्रिया म्हणती ते विभूती । आश्रमीं न ठेवी तूं निश्चितीं । अग्नींत टाकी त्वरित गतीं । विलंब याप्रती न करावा ॥३७॥

देवें चिंतामणी लाधला। अभाग्यें पाषाण म्हणोनि फेंकिला। कल्पद्रुम आंगणीं उगवला। उपटोनि टाकिला निर्दैवें ॥३८॥
अकस्मात परीस लाधला करीं। खापर म्हणोनि झोंकी दुरी। कामधेनु येतां घरीं। लोटी बाहेरी ताडोनी ॥३९॥
तेवीं नाथप्रसाद युवती। वळें अग्नींत टाकविती। अभाग्या कैंचि भाग्यप्राप्ती। दुर्धर गती कर्माची ॥१४०॥
असो कृत्य करोनि सर्व ललना। पुसोनि जाती आपुल्या स्थाना। येरी पस्तावा पावोनि मना। कुरंगनयना आहाळे ॥४१॥
नाना कल्पना मानसीं। आठवितां निद्रा न ये निशीं। आल्या काय वदूं योगियासी। तळमळ जीवासी है फार ॥४२॥
अहो रजनीं करीं चिंता। तंव उदयासि पातला तो सविता। प्रपंचविधी आरंभितां। आली कार्यता प्रथम ती ॥४३॥
मंदिर सर्व प्रभातें झाडिलें। रक्षा केरपात्रीं भरिलें। नेवोनि उकरड्यांत ओतिलें। विधि सारिले पंचासी ॥४४॥
नित्यानित्य गृहकारण। सारोनि करी पुराणश्रवण। अतीत अभ्यागतपूजन। पतिसेवन प्रेमभावें ॥४५॥
गृह आंगण गोठणींचा। कर्दम निघे जो केराचा। तो त्याग करितां साचा। उकरडा त्याचा वाटला ॥४६॥
तो त्या उकरड्याआंत। प्रसादगर्भ वाढे सत्य। द्वादश वर्षे आलीं भरत। ठायीं न पडत धर्म कोण्हा ॥४७॥
येरीकडे महायोगी। मच्छींद्रनाथ हा निःसंगी। वावरे भूमीं स्वानंदरंगीं। असोनि जगीं अलिप्त ॥४८॥
तो महाराज तपोधन। भ्रमतां केली तेणें आठवण। प्रसादपुत्रा यावें भेटोन। आला म्हणोन ते ठायीं ॥४९॥
ग्रामांत करितां फेरी। येवोनि पावला ते मंदिरीं। आलख म्हणोनी सवाल करी। वाजवी किंगरी गीत गाय ॥५०॥
तया गीताची ध्वनी। सावकारपत्नी आयके कानीं। करीं भिक्षा ती घेवोनी। पावली आंगणीं त्यापाशीं ॥५१॥
तया ललनेतें पाहतां। योगी बोळखोनि होय बोलता। भेटीस आणी वेगीं सुता। संख्या भरतां मी आलों ॥५२॥
तंव ती बोले योगियासी। बाळक पोटीं नसे मजसी। काय दाऊं आणोनि तुजसी। भिक्षा वेगेंसी घेई का ॥५३॥
परिसोनि अबलेच्या बोला। योगिनाथासी विस्मय जाला। प्रसाद वांया केवीं गेला। विसर पडिला काय इतें ॥५४॥
..ठय देखोनि पुसों इज। बोलतां कळेल अवघें गुज। प्रसाद पावल्या राही वांझ। कल्पांतीं काज न घडे हें ॥५५॥
योगी म्हणे सतीसी। त्वां बोळखिलें नाहीं मजसी। द्वादश वर्षे झालीं आठवि मानसीं। पुत्रफळासी मागीतलें ॥५६॥
तें त्वां तुज प्रसादविभूती। सकृपें दिधली निश्चितीं। तो आठव करोनि चित्तीं। वार्ता मजप्रती सत्य वदे ॥५७॥
ऐकोनि योगियाचें वचन। जालें पूर्वींचें तिज स्मरण। अपराध घडला मजपासोन। काय भाषण करूं यातें ॥५८॥
अपराधें उपजलें भय। सद्गद नेत्रीं जळ वाहे। न चले बोलाचा उपाय। धरिले पाय योगियाचे ॥५९॥
तंव तिचा पावला भ्रतार। तोही नाथासि करी नमस्कार। उभा राहिला जोडोनि कर। पुसे विचार काय आज्ञा ॥१६०॥
योगी बोले तयासी। पुत्रार्थ प्रसाद दिधला तव कांतेसी। द्वादश वर्षे जालीं तयासी। आलों भेटीसी तयाच्या ॥६१॥
तो पुत्र न भेटवी तुझी कांता। भाषणही न करी पुसतां। मौन चरणीं ठेविला माथा। विपरीत वार्ता दिसतसे ॥६२॥
सत्य वदा मातें वचन। असत्य वदतां शाप देईन। मग भ्रतार बोले कांतेलागोन। सत्य संपूर्ण निवेदी ॥६३॥
सत्य स्वामीपाशीं बोलतां। आपणांसि नाहीं भयचिंता। कळवी जे तया झाली वार्ता। पडूं सर्वथा न लागी ॥६४॥
मग जोडोनि द्वयपाणी। काय वदती जाली ते क्षणीं। सत्य प्रसादविभूति स्वामींनीं। कृपा करोनी दीधली ॥६५॥

मंदिरीं प्रसाद ठेवितां प्रीतीं । तों गृहा आल्या बहु युवती । तयांसी हें गुह्य सांगतां निश्चितीं । भ्रंश चित्तीं पातला ॥६६॥ नाना भय घालोनि पोटीं । विभूति सांडविली उठाउठीं । परिसता योगी क्रूर दृष्टि । करोनि ह्राटीं पेटला ॥६७॥ मच्छींद्र होवोनि क्रोधायमान । काय बोले तयांलागोन । प्रत्यक्ष चिंतामणी दिधला आणोन । निर्दैवें फेकुन दिधला ॥६८॥ आवडीनें कल्पतरु आणोनि लाविला । तो तुम्ही मूर्खपणें उपटोनि टाकिला । अमृतघट तुम्हां आदरें दिल्हा । विषमासें सांडिला त्विरीत ॥६९॥ असे तुम्ही मूढ शतमूर्ख । सुख तेंचि मानिलें दुःख । रोगिया न रुचे दिव्य पाक । थुंकोनि देख सांडिती॥७०॥कर्महीनातें काय म्हणावें । परी मी पुसतों तेंचि सांगावें । तें अनुभवीं जाणवेल बरवें । चमत्कार पहावें नेत्रीं या ॥७१॥ जे म्यां दिधली विभूती । ते सांडिल्याचें स्थळ निगुतीं । शोधोनि सांगावें मजप्रती । दावीन प्रचिती क्षणार्धें ॥७२॥ तुम्हीं मानिलें सर्व फोल । परी न होती माझें असत्य बोल । त्यागिलें दावा मजसी स्थळ । अणुमात्र काळ न साहें ॥७३॥ ऐसा संवाद होतां थोर । तवं जनलोक मिळाले अपार । म्हणती पाहूं आतां चमत्कार । कलह विचार होय हा ॥७४॥ तंव भ्रतार वदे कांते । त्यागिलें स्थळ दावी योगियातें । येरी वदे त्या रक्षेतें । टाकविलें जळते चुलीमाजी ॥७५॥ ती रक्षा आणि केर । भरोनि सांडिलें उकरड्यावर । गोठाआंगणींचा कर्दम थोर । तोही अपार टाकिला ॥७६॥ टाकिल्या दिवसापासून । आजी द्वादश वरुषें भरलीं पूर्ण । ऐकतां योगी क्रोधायमान । अर्भकेंस्थान दावी म्हणे ॥७७॥ योगि देखोनि कृतांतवत । उभय जाले भयकंपित । उभयपक्षीं जन वदत । म्हणती अनर्थ वाढविला ॥७८॥ कोणी योगिया धिक्कारिती । ढोंग माजविलें उगे म्हणती । काय होणें तुझेनि निश्चितीं । जा जा म्हणती कानफाट्या ॥७९॥ एक म्हणती ह्या बायका । थोर ढालग,जा निःशंका । पुरुषां न विचारोनि देखा । मार्ग अनेका वर्तती ॥८०॥एक म्हणती भ्रतार हीन। तेथें स्त्रीराज्याचा थोर मान । मग भ्रतार पुसे कोण । सौभाग्यवर्धन दाविती ॥८१॥कोणीं म्हणती ही मोठी पतिव्रता । काय म्हणोनी इसी दूषितां । चावट्या मिळाल्या परकांता । इतें स्वहिता मुकविलें ॥८२॥कोणी म्हणती सत्य सत्य । हा योगी दिसतो बहु समर्थ । पुरवावया जगाचे अर्थ । प्रगट फिरत भूमीं या ॥८३॥ एक म्हणती पुरे स्तुती । ऐसे भोंदू बहु फिरती । अबला अज्ञाना देवोनि विभूती । भाळोनि नागविती दुपारां ॥८४॥ योगियें परिसोनि भाषण । मनीं म्हणे हे त्रिविधजन । यांचे मुखीं लागतां जाण । स्पर्धा दारुण वाढेल ॥८५॥ अनुभवावीण विश्वास । कधींहि न ठसे या जनास । म्हणोनिया योगी वदे उभयांस । मज त्या स्थळास दाविजे ॥८६॥ मग जनांसह उभय चालती । नाथजीस तो उकरडा दाविती । मच्छींद्रनाथ मुखें गीत गाती । किंगरी वाजविती सिंगीपुंगी ॥८७॥ सभोंवतें पहाती अवघे जन । तंव योगी आलख गाजवी गर्जोन । आदेश ऐसें बोलतां वचन । नवल गहन वर्तलें ॥८८॥ उकरडा वाढला जो विशाळ । त्यावरून शब्द निघे कैसा मंजुळ । तो कर्ण देवोनि जन सकळ । होवोनि निश्चळ ऐकिती ॥८९॥ जेवीं संकटीं उपजे आकाशवाणी । ते ऐकिजे जेवीं सुरांनीं । तेवींच तेथें नवल कर्णीं । सकळ कानीं सांठविती ॥९०॥ योगी मच्छींद्रनाथ म्हणतां आदेश । ध्वनि उमटे आदिनाथ आदिगुरू आदेश । एवं त्रिवार उभय ध्वनीस । ऐकतां सर्वांस आश्चर्य ॥९१॥ योगी आज्ञापी तें जना । आरंभ कीजे येथें खनना । वर्ष द्वादशाचा बाळक जाणा । लावण्य शाहाणा निघेल ॥९२॥ जन खोदावया लागले । उष्ण उकरडां खत पीकलें । तंव तेथें कौतुक देखिलें । चडळ निघालें

विस्तीर्ण ॥९३॥ तें कठिण उचलोनि काढितां। तंव प्रकाश उजळला अवचिता। अंतरीं विलोकोनि पाहतां। गर्भी योगिनाथा देखिलें ॥९४॥ बैसलासे अधरासनीं। पद्माकृतीतें साधोनी। नेत्रपातीं निबिड लावोनि हृदयस्थानीं हनुवटी ॥९५॥ मस्तकीं शोभती कुरळभार। रूपें उदय पावला जेवीं भास्कर। मृत्तिकास्पर्श नसे अणुमात्र। पांहती सर्वत्र लोचनीं ॥९६॥ जेवीं व्यासकांतेचे उदरीं। गर्भी शुक वाढे निर्धारीं। द्वादश वर्षे भरतां पुरीं। बोधितां बाहेरी प्रगटे तो ॥९७॥ तेवींच हा योगिराज। भूगर्भी वाढला सतेज। अतिलावण्य तेजःपुंज। पाहतां चोज सकळांसी ॥९८॥ सद्गुरु मच्छींद्र दयाघन। सिंगी वाजवी मंत्र जपोन। तेणें तो होवोनि सावधान। समाधी प्रासोन ऊठला ॥९९॥ मच्छींद्रनाथें विचार केला। गोरजरक्षेंत हा जन्मला। येणेंचि योग्य हा नामाला। तेंचि त्याला पाचारूं ॥२००॥ पसरोनिया कृपाकटाक्ष। आव बच्चा म्हणे गोरक्ष। येरू गर्भीच होता दक्ष। धांवोनि प्रत्यक्ष जडे पायीं ॥१॥ अतिआनंदें करून। प्रेमें येरयेरां जालें आलिंगन। विस्मित जाले अवघे जन। आनंदें गगन कोंदलें ॥२॥ प्रत्यक्ष विष्णूचा अवतार। तो हा योगीनाथ मच्छींदर। त्याचा विभूतिप्रसाद हा सुंदर। गोरक्ष शंकर प्रगटला ॥३॥ शिवाचे दास्य करावयासी। मत्स्यगर्भी अवतरला हृषिकेशी। शिवें ओळखोनि बोधिलें त्यासी। लाविला योगासी जगदोद्धारा ॥४॥ शिव म्हण हें माझें होय ध्यान। याचें कदा न घ्यावें सेवन। सेवाधर्मासी योग्य आपण। म्हणोनि कारण इच्छी तो ॥५॥ वक्ता विनवी श्रोतियांसी। हेंचि इच्छा होती शिवमानसीं। तंव हा योग अनायासीं। सांपडला शिवासी दास्यार्थे ॥६॥ आधींच विभूति श्रीशंकर। त्यावरी मच्छींद्रविभूति कृपाकर। चुकवोनि गर्भवासाचा कर। भूमि पुरस्कर अधर तो ॥७॥ निःसीम घडावें सद्गुरुसेवन। म्हणोनि अयोनि जन्मले आपण। त्वरें धांवोनि धरिले चरण। दिलें अलिंगन गुरुनाथें ॥८॥ सद्गुरु सच्छिष्या जाल्या भेटी। वर्षल्या आनंदाच्या कोटी। पुढील कथा अत्यंत गोमटी। सेविल्यासि खोटी अमृताच्या ॥९॥ महाराज सद्गुरु शिव आदिनाथ। तेवींच विष्णु हा मच्छींद्र समर्थ। शंकर स्वयें गोरक्ष सत्य। लीला अद्भुत पुढें त्यांची ॥२१०॥ क्रमें क्रम निवेदितां। भेटी होईल स्वामीदत्ता। फिटोनि देहींची अहंता। होईल ऐक्यता उभयतांची ॥११॥ दत्त अविनाश दिगंबर। तो व्यापक व्यापला सर्वांतर। संतसमाजीं कृपाकर। जगदोद्धार सदा वसे ॥१२॥ हे कीर्ती परिसोनि श्रवणीं। मी दीन रंक आलोंसे धांवोनी। अनन्यभावें विनटलों चरणीं। मज संतजनीं आपंगिजे ॥१३॥ संतीं करितां अंगीकार। मग न करीच कोणी अव्हेर। तुमचा होतांचि कृपाकर। न ठेवी दूर माधव तो ॥१४॥ तुमचिया पदआश्रयें। वाणी कथा ही वदती होय। न्यून अधिकाची सोय। संतराय जाणती ॥१५॥ मी नोव्हे या ग्रंथाचा कर्ता। दत्तचि येथें बोलवितां। हें वर्म ठावें तुम्हां संतां। सुतनिमित्ता अनंताचा ॥१६॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ ॥ सदा परिसोत भाविक भक्त ॥ षट्त्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥२१७॥

॥ इति षट्त्रिंशोध्यायः समाप्तः ॥

## ॥ अध्याय ३७ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ।

जयजय सद्गुरु अज्ञानमोचका । जय श्रीदत्ता भवभयहारका। जयजय अनंता ज्ञानदायका। दीनपालका नमो तुज ॥१॥ जय विमलरूपा सद्गुरुनाथा । जय आनंदविलासिया स्वामीसमर्था । जय उदारधीरा कृपावंता । मज अनाथा पाव वेगीं ॥२॥ जयजय त्रिगुणात्मका गुरुराया। मी शरण जालों तुझिया पायां । आपुलें वत्सावरी करोनि दया । लावी गुण गाया आपुले ॥३॥ जय त्रिगुणात्मका अमूर्तमूर्ती। तूंचि वदविता होय कीर्ती। देवोनि हृदयीं सर्व स्फूर्ती। वाढवीं ग्रंथीं रस फार ॥४॥ गतकथाध्यायीं निरोपण । मच्छींद्र गोरक्षजन्मकथन । गुरुशिष्याचें आलिंगन । पाहोनि जन आनंदले ॥५॥ तें परिसतां श्रोतियासी । आनंद जाला निजमानसीं । पुढती आज्ञापिती वक्त्यासी । याचि कथेसी श्रुत करी ॥६॥ मागां ऐकोनि निरोपण । जीवीं जालों आनंदघन । पुढील कथा करावी श्रवण । अनुसंधान उभयांचें ॥७॥ जी स्वामी तुम्ही श्रोतेसंत। साधु अनुभवी योगी महंत । ज्ञानी विचक्षण भाविक पंडित। तुम्हा प्रणिपात पैं माझा ॥८॥ अहो जी आदरें श्रवणीं तुम्ही सादर । तेणें ग्रंथीं वाढे सुंदर । स्वरूपें सुचवितां वारंवार । वक्तिया अपार सुख तेणें ॥९॥ तुमचिया श्रवणाचीन आधारें । ग्रंथीं वाढती कथांकुरें । म्यां काय वदावें लेंकुरें । बोलविता पुरस्कारें तुम्ही कीं ॥१०॥ साभेड माझे बोबडे बोल । माउलीपरी मानितां रसाळ । वसंतसंगें बोले कोकिळ । तेवीं वसंतकाळ तुम्ही माझे ॥११॥ तुम्ही श्रवणीं सादर नसतां । प्रश्न मातें जरी न करितां । मग कैसेनि वाढे कथा । हे तों समर्था तुम्हां ठावें ॥१२॥ तुम्हीं श्रोतीं प्रश्न करोनी। मज बोलविलें या बोबडे वाणीं। ध्यास जडविला सुदृढ मनीं। आतां पूर्णपणीं सांभाळा॥१३॥ जेवीं आजवरी पाळोनि लळा । ग्रंथीं बोलविलें जी दयाळा । तेवींच पुढें रसागळा । वदविणें कळा तुमची ॥१४॥ श्रोते म्हणती हे स्तुती । पुरे वाखाणिसी किती । आम्हां श्रवणीं अत्यंत प्रीती । चालवी निगुती निरोपण ॥१५॥ अवश्य म्हणोनि वक्ता नमी । विनवी श्रोतियां सावध कर्मी । गुरुशिष्यांचे संगमीं । आनंद ऊर्मी सकळांतें ॥१६॥ सभोंवता जन लोकराळा । नवल कौतुक पाहती डोळां। म्हणती अद्भुत योगियाची कळा । देखतां बाळा ठकली ते ॥१७॥ पाहा लावण्य सतेज कुमर। अजानुबाहु मुख सुंदर । आकर्ण नेत्रकमळाकार । भव्य प्रभाकर दुसरा ॥१८॥ अहा अभाग्यें काय केलें । लाभतें फळ गमाविलें । पुनरा यातें कैसेनि मिळे । योगी बळें नेईल त्या ॥१९॥ प्रबुद्ध जन म्हणती गोष्टी । पुरे करा ह्या आतां चावटी । स्तब्ध मौन धरा पोटीं । पहा दिठीं काय पुढें ॥२०॥ तंव मच्छींद्र बोले गोरक्षासी । जोग किंवा भोग घेसी । हें सत्य सांग आम्हांसी । काय मानसीं आवडतें ॥२१॥ गोरक्ष केवळ शंकर । त्यासि नावडती विकार । म्हणे जी स्वामी जाणतां निर्धार । काय अंतर चोखाळितां ॥२२॥ मज विषयाची नाहीं गोडी । असे जोगाची पूर्ण आवडी । पदसेवेची जोडीन जोडी। नको मज बेडी सर्वथा हे ॥२३॥ तुझे साक्ष करोनि चरण । हें यथार्थ बोलिलों वचन । सकृपें मातें अंगीकारोन । सेवादान पूर्ण दीजे ॥२४॥ स्वामी मच्छींद्र गुरुनाथा। आणीक नावडे माझिया चित्ता। तुझिये चरणीं ठेविला माथा। न करीं परता आतां मज ॥२५॥ यापरी विनवितां सद्गुरूसी । सप्रेम जाला निजमानसीं। जळधारा वाहती नेत्रांसी। मिठी पायांसी दिधली ॥२६॥

म्हणे सद्गुरु तूं बापमाय । इष्टमित्र तूंचि सखा होय । माझा आधार तुझे पाय । करणें उपाय सर्वही ॥२७॥ नाना भातुकें दावोन । परनें न जाय मातें टाकोन । तूं मज दीनाचें होसी जीवन । तव पदार्पण सर्व मी ॥२८॥ गोरक्षाची परिसोनि विनंती । सद्गुरु मच्छींद्र सद्गद होती । सर्व जनांच्या नेत्रपातीं । जीवनें वाहती एकसरा ॥२९॥ धन्य धन्य म्हणती हा कुमर । प्रगटतांचि धन्य हे उद्धार । गुरुपदसेवनीं इच्छा थोर । अन्य विचार न रुचे या ॥३०॥ अनंत पुण्यराशी ज्या गांठीं । तरी हा पुत्र संभवे पोटीं । येरांच्या न लाभे ललाटीं । निश्चय गोष्टी हे खरी ॥३१॥ निरोगी काया पाटव्य रूपता । सुशील लावण्य अंकित कांता । सत्पुत्र पोटीं गुणवंता । अगाध पुण्यता तें लाभे ॥३२॥ असो पुण्य नवतें उभयां पदरीं । म्हणोनि हानिचा लाभ गेला दूरी । यापरी बोलती परस्परीं । लालसा अंतरीं सकळांच्या ॥३३॥ येरीकडे योगिराणा । वोळखी गोरक्षाच्या मना । उठवोनि देत अलिंगना । कुरवाळी वदना तयाच्या ॥३४॥ तें मच्छींद्रयोगी त्याप्रती । तात्काळ चर्चवी विभूती । झोळी फावडी देवोनि हातीं । आलख गर्जविती निजमुखें ॥३५॥ तेचि समयीं त्यालागून । देता जाला वाणभूषण आलख पुनरा गाजवोन । निघती तेथून उभयतां ॥३६॥ तो योगी निघतां सत्वर । एकचि जाला हाहाकार । उभय धांवोनि जाती समोर । ग्लांति अपार करिती शोक ॥३७॥ हे अनाथनाथ कृपावंता । सदयहृदया नुपेक्षीं आतां । आम्हां दीनांची चिंता । कोण निवारितां तुजवीण ॥३८॥ सत्य तुझे आम्ही अपराधी । जालों ऐकोनि दुर्बुद्धी । हीन प्रारब्धाचे सांपडलों संधीं । काढोनि कृपानिधी सांभाळीं ॥३९॥ नको पाहूं गुणदोष । सत्य शरण जालों तव पदास । आमुची न करावी निरास पुरविजे आस स्वामिया ॥४०॥ समर्थाचें वचन एक । तें असत्य व्हावें देख । आम्ही अन्यायी प्रापंचिक । जाली चूक सांभाळा ॥४१॥ जगीं समर्थाची गाजली वाणी । पाहिलें नेत्रीं ऐकिलें कानीं । अर्पित संकल्प नेतां परतोनी । वचन हानी येतसे ॥४२॥ अहो जी सद्गुरु दातारा । अन्याय आमुचे क्षमा करा । वचनासाटीं जगदोद्धारा । देई कुमरा आम्हां कृपें ॥४३॥ ऐसी नानापरी विनवणी । करोनि मस्तक ठेविती चरणीं । सद्गद नेत्रीं वाहे पाणी । पल्लव पसरोनी दीनवत ॥४४॥ अत्यंत उभयतांची देखोनि ग्लांनी । गोरक्ष विनवी सद्गुरुप्रती । स्वामी दया करोनी यांवरती । मग निर्वेध पंथीं चलावें ॥४५॥ उभय दीनता पाहोन । मच्छींद्र काय बोले वचन । हा कुमर न मिळे तुम्हांलागोन । जा जा परतोन आश्रमा ॥४६॥ ऐसें कठिण उत्तर ऐकतां । सद्टचरणीं लागले उभयतां । माया नुचलिती धिक्कारितां । म्हणती पतितां आपंगी ॥४७॥ दृट अनन्यता देखिली मूर्ती करुणेची कळवळली । उचलोनि हृदयीं तेव्हां धरिली । दृष्टी न्याहाळी कृपेची ॥४८॥ मच्छींद्र म्हणे जाय माते । सुलक्षण पुत्र दिधला तूतें । येयोनि नवमास भरतां पुरतें । पावसी फळातें सत्य तूं ॥४९॥ गोरक्ष म्हणे वो माउली । तुझी कामना सुफळ जाली । आतां न बोले कांहींच बोली । जाय उगली आश्रमा ॥५०॥ हेचि बांधी शकुनगांठी । दिव्य पुत्र होईल पोटी । आड़ेपेडीं प्रपंचहाटी । भाग्यकोटी । मेळविल ॥५१॥ वचनीं धरिजे विश्वास । म्हणवा मच्छींद्रनाथाचे दास । तेणें पुरेल तुमची आस । अंतीं शिवपदास पावाल ॥५२॥ यापरी वरातें देवोन । उभयही पावले अंतर्धान । विस्मय पावोनि अवघे जन । म्हणती धन्य लीला ही ॥५३॥ सर्व उभयांसह परतले । आनंदें स्वआश्रमा पावले । याचे गुण वर्णिते जाले । ध्यान लागले योगियांचें ॥५४॥

नाथ प्रसादवाणी पूर्ण । पुत्र जाला सभाग्यालागोन । मग विधासें भक्ती जडले जन । करिती पूजन अतिथींचें ॥५५॥
येरीकडे योगिनाथ । भ्रमतां नित्य क्रमिती पंथ । गोरक्ष सेवेमाजी तिष्ठत । अत्यद्भुत सप्रेमें ॥५६॥
नित्य करितां गुरुसेवन । कधीं कुसमुसों नेदी मन । जेथें तेथें आपण । आज्ञा प्रमाण मानीत ॥५७॥
ओझें वाहोनिया माथां । होय गुरुसंगें चालता । विश्रांतीस श्रमोनि बैसतां । आसन अतौता विस्तारी ॥५८॥ सद्गुरु
चालता होती श्रमित । म्हणोनि स्वकरें पदां चुरित । तृषा लागल्या जीवन देत । मध्यान्हीं मागत भिक्षेतें ॥५९॥
सद्गुरुसी घालोन स्नान । स्वकरें करी पादपूजन । त्यानंतर घाली भोजन । जवळी बैसोन आदरें ॥६०॥
मुखशुद्धी त्यातें देवोनी । मग पहुडवी शय्यासनीं । आपण बैसे पदसेवनीं । निद्रा नयनीं लागे तों ॥६१॥
निद्रा लागतां स्वामीसी । आपण सेवी शेषप्रसादासी । पावे म्हणे सद्गुरुरायासी । निश्चय मानसीं हा नित्य ॥६२॥
यापरी करितां नित्य सेवन । सद्गुरु होती आनंदघन । गोरक्ष सन्मुख कर जोडोन । पाहे निरखोन गुरुपदा ॥६३॥
सहज स्वभावें गुरुनाथ । नाना भाष्य शब्द बोलत । तो बोधचि भावोनि मनांत । सांठवी हृदयांत विचारें ॥६४॥
जरी सद्गुरु क्रोधें भरला । तरी विनीत होवोनि बोले बोला । दिवानिशीं जपे आज्ञेला । नाणी कंटाळा सेवेसी
॥६५॥ ऐसे होतां बहुत दिवस । परी अनुग्रह कदा नेदी त्यास । गोरक्ष मनीं हेचि आस । पावन पतितास करावें
॥६६॥ तों अकस्मात एक दिनीं । आनंदमय सद्गुरु आसनीं । सुप्रसन्न बोलती वाणी । इच्छा मनीं काय ते ॥६७॥
आनंदें बोलतां गुरुराय । गोरक्षें धांवोनि धरले पाय । म्हणे तूं माझी होसी माय । बाळसोय जाणसी ॥६८॥
अज्ञाना जरी आज्ञापितां । तरी पावन करावें या पतिता । अंगीकारोनि कृपावंता । तिमिर अंधता निरसावी ॥६९॥
तूं सद्गुरु सर्वाधीश । मज गुह्य तारक करी उपदेश । अंधकार निवटोनि करवी प्रकाश । आपुलें आपणा समज आणी
॥७०॥ परिसोनि गोरक्षाची विनवणी । अंतरहेतु घेतला ओळखोनी । म्हणे यथार्थ बोले हा वचनीं । परी परीक्षोनी
पाहावा ॥७१॥ सोनें तापवोनि पाहावें कसीं । हिरा पाहिजे घण ऐरणीसीं । मोहोरा गुंडाळोनी सुतेसीं । अग्निसंगेसी
शोधितो ॥७२॥ पात्र पाहावें जीवनीं । द्रव्य घ्यावें सुलाखोनी । तेवींच शिष्य कसोनी । परीक्षोनी घेइजे ॥७३॥
परीक्षोनि नाणें घेतां । तया न वाटे कदा चिंता । अलंकारीं चढे योग्यता । व्ययअव्ययिता निर्भय ॥७४॥
म्हणोनि यातें आतां कसावें । कसीं उतरतां पावन करावें । प्रस्तुत उत्तर न देतां बरवें । मौनचि धरावें हें युक्त ॥७५॥
गोरक्षा न देतां उत्तर । उठोनि मार्गी लागे योगेश्वर । तयासंगे गोरक्ष सत्वर । घेवोनि संभार चालिला ॥७६॥
उल्लंघित पर्वत कानन । अन्य देशा करिती गमन । महाक्षेत्रें पुरें पट्टण । तीर्थें संपूर्ण हिंडती ॥७७॥
तीर्थ आणी क्षेत्रमहिमा । ऐकोनि जाती त्या धामा । स्नान दर्शन करोनि नेमा । आदरें उत्तमा भेटती ॥७८॥
योगी सिद्ध अनुभवी संत । मुनी वैष्णव आणी महंत । यांचें आवडी दर्शन घेत । पुढें क्रमित मार्ग दोघे ॥७९॥
भूमंडळींचीं उत्तम स्थानें । नूतन आणि पुरातनें । गुप्त प्रगट अवघीं मानें । शोधोनि दर्शने पै घेती ॥८०॥
ऐसे फिरतां बहु दिवस । गोरक्ष सादर नित्य सेवेस । सेवा करितां दिवसेंदिवस । अति उल्हास मानसी ॥८१॥
तंव कोणा एके दिनीं । ग्रामप्रदेशीं उतरले माध्यान्हीं । मच्छींद्र म्हणे गोरक्षालागुनी । लावी धुनी ये ठायीं ॥८२॥

क्षुधा लागली मज फार । तूं भिक्षेसी जाय आतां सत्वर । अवश्य म्हणोनि नमस्कार । करोनि संचार पुरीं केला ॥८३॥ गृहोगृहीं तेव्हां फिरत । आलखशब्दानें जागवीत । झोळी भिक्षा आलीया घेत । पुढें जात त्वरेनें ॥८४॥ तंव एक ब्राह्मणाचे सदनीं । पितृतिथी होती त्या दिनीं । श्राद्धकर्म संपादोनी । प्रसाद सेवनीं बैसले ॥८५॥ तेथें गोरक्ष अकस्मात । आलक पुकारोनि भिक्षे तिष्टत । तंव भाविक असे गृहस्थ । आज्ञापीत पत्नीसी ॥८६॥ भोजनसमयीं अतीत आला । यथासांग भिक्षा देइजे त्याला । येरी परिसोन पतिच्या बोला । बोले यतीला उभे जी ॥८७॥ जें पाकीं जालें सिद्ध अन्न । तेंचि पात्रीं विस्तारिलें पूर्ण । स्वकरें केलें तया अर्पण । भावें नमन पैं केलें ॥८८॥ भिक्षा करितां स्थळोस्थळीं । भरली गोरक्षाची तेव्हां झोळी । मग परतोनि तये वेळीं । सद्गुरुजवळीं पावला ॥८९॥ भिक्षा खालतीं ठेवोन । मच्छींद्रनाथासि घातलें स्नान । नेमाऐसी पूजा करोन । करवी भोजन भिक्षेचें ॥९०॥ भोजन करितां वाडेंकोडें । भक्षणीं रुचले त्यांन वडे । ते उकडीचे तळिले सुरवाडे । तेंचि आवडे मच्छींद्रा ॥९१॥ म्हणे गोरक्षा सुजाणा । आजीची भिक्षा रुजली मना । येथें पदार्थ असती नाना । परी आला ध्याना वडा हा ॥९२॥ पोटभरी भक्षावे हे वड । परी त्वां आजी आणिलेसि थोडे । केवीं तृप्तीचे पुरे कोडे । कीं भक्षूं निवाडे यथेष्ट ॥९३॥ तंव गोरक्ष विनवी सद्गुरुनाथा । काय उणे असे या पदार्था । उदईक आणीन समर्था । पुरवीन मनोरथा स्वामींच्या॥९४॥ वचनें नाथ संतोषले । तैं भोजनीं तृप्त जाले । करप्रक्षाळोनि बैसले । मुखशुद्धीस दिधलें गोरक्षें ॥९५॥ वेगीं घालोनि शय्यासन । सद्गुरुनाथा करवी शयन । निद्रा लागतां त्यालागोन । प्रसाद सेवन करी प्रेमें ॥९६॥ निद्रा सद्गुरुची सरतां । उदक प्राशनार्थ होय ठेविता । पुढें सद्गुरु निरोपी वेदांता । करी प्रबोधता शिष्यासी ॥९७॥ बोध सद्गुरुचे श्रवण करी । विचारें अर्थ अंगीकारी । दिनरजनीं यापरीं । जागे अंतरीं सर्वदा ॥९८॥ असो सरतां अवघी रजनी । प्रभातें स्नानादि कर्में सारोनी । सद्गुरु बैसले आपुले ध्यानी । आपण रक्षणीं बैसला ॥९९॥ ध्यानविसर्जन होतां । होय गोरक्षासी आज्ञापिता । भिक्षेलागी जाय आतां । आणी पदार्था कालच्या ॥१००॥ येरें करोनि नमस्कार । झोळी किंगरी घेतली सत्वर । वेगीं प्रवेशता जाला पुर । मनीं विचार करीतसे ॥१॥ घरोघरीं हिंडावें भिक्षेसी । तरी कोणी न घालिती वटकासी । कालचे सदनीं निश्चयेंसी । जातां आम्हांसी मिळेल ॥२॥ हाचि करोनि निर्धार । न फिरे कांहीं कोणाचें द्वार । त्या भाविकाचें शोधीत घर । आलख पुकार करी तेथें ॥३॥ गृहस्वामी नव्हता सदनीं । मंदिरीं होती गृहपत्नी । तिनें आलख ऐकोनि कानीं । भिक्षा घेवोनी पावली ॥४॥ येरू म्हणे वो माते । ही भिक्षा देसी कासयातें । मज आज्ञापिलें सद्गुरुनाथें । आणी वटकातें म्हणोनिया ॥५॥ तंव ती माउली काय बोले । पितृश्राद्ध काल जालें । तदर्थ वटक होते केले । ते तुम्हां दिधले योगिया ॥६॥ ते वारंवार न होती । ऐसी असे आमुची गृहरीती । आजि कोठोनि यावया मिळती । भिक्षा निश्चितीं घेइंजे ॥७॥ गोरक्ष म्हणे वटकावांचून । माते भिक्षा मी न घे आन । येरी म्हणे श्राद्ध टिकाण । पाहे प्रयोजन होय जेथें ॥८॥ गोरक्ष म्हणे येर ठायीं । कोण देतें आम्हांसि बाई । दयावंते तूंचि देई । दुवा घेई आमुचा ॥९॥ बाई म्हणे सर्वथा । वटक न होती योगिनाथा । आणीक मागसी पदार्था । तो मी आतां तुज देतें ॥११०॥

येरू म्हणे यो न नको कांहीं। तूं वटकचि आम्हांतें देईं। घेतल्यावीण कदाही। जाणार नाहीं मातें मी ॥११॥
तंव ती जाली क्रोधायमान। म्हणे जोगड्या हा निर्धार कोण। भलतेंचि मागसी हट्ट करोन। आणूं कोठून तुजसाठीं॥१२॥
येरू म्हणे तूं होसी माता। कळेल तैसी करीं त्वरता। बाळकाचे मनोरथ पुरतां। मग तो सरता होईल कीं ॥१३॥
येरी म्हणे ऐसें हट्ट करणें। हें तंव योगियासि लाजिरवाणें। रसनेंद्रिय लोकविणें। धिग् जिणें या योगा ॥१४॥
अंबे कळेल तें त्वां शिक्षावें। परी आधीं करोनि वटक द्यावे। कालच्याहोनि सुंदर करावे। अरुवार वरवे झोळीभर ॥१५॥
येरी म्हणे सोडिली लाज। फवत्वा कोठोनि देऊं तुज। शंका न धरितां मागसी मज। नोव्हे सहज पदार्थ तो ॥१६॥
गोरक्ष म्हणे जें मागसी। तें मी जननी देईन तुजसी। जाय पुरवी हेतूसी। अतियेगेंसी माउलिये ॥१७॥
तंव माय बोले विप्रकांता। तूंचि होसी दीन मागता। कळली तुझी औदार्यता। न करी चावटता जा वेगीं ॥१८॥
योगी म्हणे बोलिलों देईन। तें सत्य सत्य माझें वचन। परी वटक घेतल्यावांचून। जातां प्राण नव जावे ॥१९॥
तें ते विप्राणी कोपली। म्हणे पाहूं दे कैसें तुझी सत्य बोली। मागेन तें दे ये वेळीं। मग झोळी भरीन वटकें ॥२०॥
गोरक्ष म्हणे तुझिये बुद्धी। कोण पदार्थ तो मागें आधीं। येरी भरली होती क्रोधीं। कोठोनि शुद्धी विचारा ॥२१॥
माग म्हणतांचि ते वेळां। अविचारें बोले ते बाळा। म्हणे दे तुझा मज डावा डोळा। काढोनि सगळा करामीं ॥२२॥
येरें न लावितांचि वेळ। नखें ओढोनि काढिलें बुबुळ। म्हणे पसरोनि घेई करतळ। न लावीं वेळ आतां तूं ॥२३॥
तें बुबुळ करीं पाहोन। द्विजकांता जाली कंपायमान। म्हणे केवढें धारिष्ट याचें दारुण। केलें वचन सत्य कीं ॥२४॥
आतां येईल मम भ्रतार। त्यासी कळेल समाचार। तोही अनर्थ करील थोर। जगही अपार निंदील ॥२५॥
इकडे अतीत-नेत्रांतुनी। रुधिर वाहे भिजे अवनी। येरी घाबरी अंतःकरणीं। लागे चरणीं योगियाच्या ॥२६॥
म्हणे अपराध मज घडला। व्यर्थचि छळिलें म्यां तुजला। क्षमा करीं दीनदयाळा। पूर्ण कृपाळा महाराजा ॥२७॥
गोरक्ष म्हणे तूं न करीं खेद। भय टाकोनि होय सावध। त्वरें वटक करोनि देईं शुद्ध। येथें विरुद्ध नसे मनीं॥२८॥
येरी मंदिरीं प्रवेशोनी। साहित्य घेतलें त्वरें काढोनी। उकडीचे सुंदर तळोनी। पात्र भरोनी आणिले ॥२९॥
झोळी भरोनि वटक देतां। योगी संतोष पावला चित्ता। सुवाच्य वदोनि जाला जाता। अति अतौता मार्ग क्रमी ॥१३०॥
पुरवावया सद्गुरूची कामना। काढोनि दिधलें वाम नयना। कांहीं दुःख न मानोनि मना। आनंदें दर्शना जाय गुरूच्या ॥३१॥ विप्रकांतेनें त्रासविलें बहुत। शब्द कुशब्दे अंतर न भेदत। हृदयीं तो सदा शांत। हर्षयुक्त सोसोनी ॥३२॥
कठिण वचनातें न बोलोनी। कार्यार्थ साधिला नेत्र देवोनी। श्रीगुरुदास्यार्थी लागोनी। देह झिजवोनी लावीतसे ॥३३॥
वामनेत्र करें झांकिला। वेगें सद्गुरुपाशीं पावला। पात्रीं वटक वाढिता जाला। भोजनीं बैसला गुरुराव ॥३४॥
आजीचे सुंदर जाले वडे। म्हणोनि सेविती वाडेंकोडें। गोरक्ष म्हणे नसती थोडे। स्वामी निवाडें सेविजे ॥३५॥
तंव सद्गुरु मुखाकडे पाहती। तो वामनेत्र दडपिला हातीं। काय जालें सद्गुरु पुसती। उत्तर व्याघ्रती न दे तो ॥३६॥
पुनरपि पुससी गोरक्षासी। वामनेत्र कां झांकिलासी। विचारितां तूं न बोलसी। काय नयनासी सांग झालें ॥३७॥
तथापि नेदी त्या उत्तरा। म्हणे स्वस्थ स्वामी भोजन करा प्रारब्धें पीडा होत शरीरा। कोण विचारा मानी त्या ॥३८॥

तंव नेत्रकर सद्गुरुंनीं काढिला । पटली खास रक्तें भरला । देखोनि म्हणे गोरक्षाला । केलें डोळियाला काय सांग ॥३९॥
अन्यथा न बोले वचन । सत्य जालें तें सांग प्रमाण । श्रीगुरुआज्ञा वंदोन । जालें वर्तमान निवेदी ॥१४०॥
कालचे घरीं गेलों भिक्षेसी । वडे मागितले द्विजपत्नीसी । ते म्हणे आजिचे दिवशीं । वडे तुम्हासी न मिळती ॥४१॥
मी बोलिलों वडे घेईन । तेव्हांचि मी परता जाईन । माझा निग्रह दृढ देखोन । कोपायमान ती जाली ॥४२॥
म्हणे अतिता तुज लागलें वेडें । फुकटाचे न होती ते वडे । मग मी बोलिलों तिजपुढें । मागसी आवडें देईन तें ॥४३॥
ती होती क्रोधायमान । म्हणे देईं तुझा वामनयन । म्यां तात्काळ दिधला काढोन । स्वामिकारण जाणोनिया ॥४४॥
मग लगबगें ती उठली । वडे करोनि झोळींत घाली । ते घेवोनि उतावेळीं । स्वामिजवळी पावलों ॥४५॥
आतां स्वस्थ भोजन करावें । लागेल तितुके वडे घ्यावे । सद्गुरु म्हणती बरवें । वचन मानावें एक माझें ॥४६॥
वड्यासाठीं वामनयन । तुवां दीधला काढोन । तैसा सव्य दे मजलागोन । तरीच भोजन करीन मी ॥४७॥
गोरक्ष म्हणे जी सद्गुरुमुद्रा । आम्हां वंद्य ही तुझी आज्ञा । अवंद्य करावया प्राज्ञा । नाहीं गुणज्ञा सहसाही ॥४८॥
तुझाचि प्राण वाचा मन काया । देतां कोण वागवी भया । उशीर काढितां कासया । घे लवलाह्यां नेत्र हा ॥४९॥
क्षण न लवतां ते वेळां । नखें वोढोनि काढिला डोळा । देवोनि जोडी करकमळा । म्हणे कृपाळा जेवी आतां ॥१५०॥
रुधिर भडभडा वाहत । हें देखोनी मच्छींद्रनाथ । म्हणे हा गुरुदास होय अंकित । पाहिलें चित्त कसोनिया ॥५१॥
सद्गुरु पूर्ण दीनदयाळ । गोरक्षा वळला तो कृपाळ । कृपाकर फिरवोनि तात्काळ । दृष्टी निर्मळ दिल्ही त्या ॥५२॥
गोरक्षें पदीं ठेविलें शिर । तो सद्गुरु वोळला कृपासागर । तें उपदेश देवोनि सत्वर । अभयकर दीधला ॥५३॥
बीजमंत्र देवोनि कानीं । गुह्य बिंबवलें तयाचे मनीं । तों तात्काळ पावली उन्मनी । अविनाश देखणीं देखोनी ॥५४॥
धन्य धन्य तो सद्गुरुराव । तोचि जाणे हा उपाव । सदृढ देखोनिया भाव । सुख अपूर्व दिल्हें त्या ॥५५॥
तेणेंचि सुखें सुखावतां । विरोनि गेली मागील वार्ता । स्वात्मस्वरूपीं जाला रमता । नये परता माघारी ॥५६॥
मायिक सर्व मावळलें । रूप सरोनी अरूपा गेलें । अवघें निरामय होवोनि ठेलें । जेवीं विरालें सैंधव जळीं ॥५७॥
जंव सद्गुरु पाहे सावधान । तंव तें शिष्याचें कल्याण । त्याचि सुखें सुखसंपन्न । आनंदघन मानसीं ॥५८॥
मग रचोनी उपाय । देहीं आणिलें सद्गुरुरायें । येरें तात्काळ धरिले पाये । म्हणे गुरुमाय धन्य तूं ॥५९॥
माझें मीपण अवघें नासिलें । आपलें तूंपण त्वां मातें दीधलें । ब्रह्मरूप हें सर्व भरलें । अलक्षा बाणविलें लक्षांसी ॥१६०॥
तंव सद्गुरु म्हणती आतां । तूं योगमार्ग साधी पुरता । तेणें सर्व येईल हातां । नाणी विकल्प मानसीं ॥६१॥
नैराश्यवृत्तीनें फिरावें । एकाग्र एकांतीं साधन साधावें । भिक्षेसि कांहीं कदा न सोडावें । रिपु दंडावे अंतरींचे ॥६२॥
ब्रह्मरूप अवघें आहे । परी तूं विचारें शोधोनि पाहे । अद्वय अभेद होवोनि राहे । मुखीं गाये गुणकीर्ती ॥६३॥
एकापासोनि जाले अनेक । अनेकींच असे एक । एक तो तूं अनुभवीं देख । तर्कवितर्क न चले त्या ॥६४॥
तर्कवितर्कातें न धरी । अध्यात्मज्ञानातें अवधारी । तत्त्वज्ञानातें अंगीकारी । आपुले अंतरीं शोधोनी ॥६५॥
शोध आपुला आपणांत । नाहीं ग्रंथीं वाचकांत । पाहतां नांदे सर्वांत । सेखीं सर्वातीत होय ॥६६॥

होय तो ना जाय कोठें। रंगला ना तो विटे। त्रिगुणें ना तो अटे। भरला दिसे दिठावेना ॥६७॥
ठावें हें सद्गुरुवांचोनी। वाणी दुजा न करीच कोणी। जरी शोधिलें वेदपुराणीं। तरी काहाणीच ते होय ॥६८॥
होय खरी अनुभवा नये। अनुभवदाता सद्गुरु होय। हे आदिनाथें सांगता सोय। धरिले पाय तयाचे म्यां ॥६९॥
तो आदिनाथ श्रीगुरुशंकर। मज तेणें दिधला कृपाकर। तो तुज निवेदिला गुह्यसार। शोधोनि अंतर सप्रेमें ॥१७०॥
तुज म्यां जो बोधिला विधी। तदनुसारें कं योग साधी। गोरक्ष मस्तक ठेविला पदीं। कृपानिधी म्हणोनिया ॥७१॥
यापरी गोरक्ष पावन केला। प्रसाद माळ टोपी दे मेखळा। सैली तुंबी त्रिशूळा। कटी अचळा सिंगीपुंगी ॥७२॥
कान फाडोनि मुद्रा घली। विभूतिवटवा दे झोळी। पात्र सुंदर करकमळीं। सेंदूर भाळीं भस्मलेप ॥७३॥
कुबडीसटका मृगाजिन। स्फटिक रुद्राक्ष लेववी भूषण। पायीं तोडरजोडे संपूर्ण। वीरकंगण बहुधातें ॥७४॥
यापरी वाणे बहुभात। सक्रोधें दे मच्छींद्रनाथ। मजहोनि शतगुणें हो समर्थ। कीर्ति त्रिभुवनांत गाजो तुझी ॥७५॥
यापरी देतां वरदान। गोरक्ष सद्गुरुपदीं करी नमन। गुरुरायें देवोनि अलिंगन। वदे कल्याण सर्वदा हो ॥७६॥
असे गुरुशिष्य उभयतां। पावते जाले आनंद चित्ता। म्हणती चला पुढें आतां। पश्चिमपंथा विलोकीत ॥७७॥
मार्गे चालतां देख। तंव दीन गरीब भेटलें एक। अत्यंत भोळें दिसे भाविक। नसे तवक चालावया ॥७८॥
तया पुसती दोघेजण। तूं आहेसी कोठील कोण। येरू म्हणे मी सर्वहीन। नामें दीन सांगतों ॥७९॥
बाळपणीं मेलीं मातापिता। मज नाहीं बंधु चुलता। तैंपासोनि आहे फिरता। नित्य मागता पोटभरी ॥१८०॥
तंव ते म्हणती तयाप्रती। तूं राहें आमुचे संगतीं। येरू म्हणे माझ्या चित्तीं। करावी विनंती हेंचि होतें ॥८१॥
तंव स्वामींनीं जाणोनि अंतर। करूं म्हणतसां अंगीकार। तरी मी दास सेवेसी सादर। अतितत्पर राहीन ॥८२॥
मग तयातें प्रीतीं आपंगिलें। मार्ग क्रमीत तिघे चालिले। मध्यान्हीं सुस्थळीं उतरले। आनंदें बैसले त्रिवर्ग ॥८३॥
तंव तो अनन्यस्तसंगीं। कार्य जाणोनि वर्ते प्रसंगीं। भिक्षे जातां गोरक्षयोगी। झोळीलागीं आपण घे ॥८४॥
भिक्षा मागोनि दोघे येती। सद्गुरुसेवा क्रमें करिती। हाही जाणोनि रहणी स्थिती। वर्ते प्रीतीं तैसाची ॥८५॥
नित्य नित्य पाहोनि क्रम। अंगीकारी तो गुण उत्तम। सेवेचे न मानी कदा श्रम। करी निःसीम आवडीने ॥८६॥
नित्यहोनि चौगुणें। परम प्रीतीनें सेवा करणें। मच्छींद्र गोरक्षा लागे सांगणें। शांतपणें वागे निका ॥८७॥
अचुक सेवा अत्यंत प्रिय। स्वबुद्धीं अंगें करिता होय। तंव गोरक्षा म्हणती गुरुराय। चरवट होता पोर हा ॥८८॥
गोरक्ष म्हणे जी सद्गुरुनाथा। तव कृपायोग हा होय समर्था। सेवा पाहोनि माझिया चित्ता। होय उल्हासता बहु फार ॥८९॥
सेवेमाजीं अतितत्पर। भाविक सतेज बुद्धी सुंदर। शुद्ध याचें दिसतें अंतर। न दीजे अंतर गुरुवर्यें ॥१९०॥
परी कोण्या नामें यातें बाहिजे। हें सद्गुरुनाथें आज्ञापिजे। तंव समर्थ बोलती सहजें। नाथ बोलिजे चर्पट हा ॥९१॥
ते दिवसापासून। चर्पटनाथ करिती पाचारण। सेवेमाजी राहे जपोन। उभयां समान मानीत ॥९२॥
सेवा करितां बहु दिवस। तोषले उभयांचें मानस। तंव गोरक्ष विनवी श्रीगुरुस। पावन चर्पटास करावें ॥९३॥
सद्गुरु दयार्णव तुष्टला। अनुग्रहीं चर्पट पावन केला। कान चिरोनी मुद्रामाळा। घालोनि वाणविला भूषणीं ॥९४॥

वाणा शिंगरी झोळी देवोन । चर्पटचौरंगी केलें नामधारण । वीजाहोमादि सारोन । प्रसाद भोजन पावले ॥९५॥ त्यावरी तीर्थे करीत । देखिला अबूचा पर्वत । सिद्धाश्रम देखोनि शुचिष्मंत । मच्छींद्रनाथ काय बोले ॥९६॥ म्हणे गोरक्षा सुजाणा । येथें करीं तूं योगसाधना । सिद्ध होतील सर्व कामना । मानी आज्ञा हे माझी ॥९७॥ परिसोनि सद्‌गुरूची वाणी । गोरक्ष सप्रेमें लागे चरणीं । अनन्यभावें जोडोनि पाणी । करी विनवणी नाथाची ॥९८॥ जी स्वामी सद्‌गुरुराया । मज तुम्हीं योजिलें या ठायां । जीवीं वाटलें सांडिली दया । अंतराय पायां पडूं पाहे ॥९९॥ सद्‌गदित तेव्हां कंठ दाटला । म्हणे कां उपेक्षितां दीनाला । माझा कंटाळा तुम्हां आला । म्हणोनि निवडला हा हेतु ॥२००॥ गोरक्षाचें देखोनि मानस । बाष्प दाटलें सद्‌गुरूस । म्हणे निर्मळा तूं उदास । न करीं मानस आपुलें ॥१॥ माझें वचन तूं परियेसीं । लोभ मोह नसावा योगियासी । निःसंग राहावें निरामयासी । स्वधर्मयोगासी आचरावें ॥२॥ हें तुज अद्यापि नसे ठावें । म्हणोनि आज्ञापिलें बरवें । आळस न करोनि त्यां साधावें । वचन मानावें आमुचें ॥३॥ मी तूं तेथें भेद कैचा । अवघा संशयो येथें मनाचा । तो उडावया श्रम साचा । क्रम योगाचा साधी येथें ॥४॥ योगसिद्ध या जें होसी । द्वैतभेदातें हारपसी । तुझा तूंचि होवोनि राहसी । सर्व देशीं ऐक्यत्वें ॥५॥ पावतां अविनाशपदा । तुटेल कल्पनेची आपदा । मजचि पाहशील सर्वदा । न करी खेदा मानसीं ॥६॥ निश्चळ मानस करोनि राहे । योग साधोन सिद्ध होय । अंतर्बाह्य मातें पाहें । न धरीं संदेह मनीं कांहीं ॥७॥ श्रीगुरुबोधातें परिसोन । अनन्योक्तीं धरिलें चरण । म्हणे स्वामी आज्ञा प्रमाण । परी दर्शन केव्हां घडे ॥८॥ मच्छींद्र बोले गोरक्षासी । आम्ही हिंडतों तीर्थवासी । तूं पावतां पूर्ण योगासी । शोधीत आम्हांसी येईजे ॥९॥ आमची चिंता तूं न करीं मनीं । सेवेसी चर्पटचौरंगी सद्‌गुणी । कांहीं खेद न करीं मनीं । भेटी परतोनी होतील ॥२१०॥ यापरी बोधोन गोरक्षातें । मग आसनीं बैसविलें त्यानें । लावोनिया योगधारणातें । आपण तीर्थातें निघती ॥११॥ पुढें तीर्थीं करितां भ्रमण । मलयाळदेशीं करितील गमन । तेथें गोरक्ष भेटतील येवोन । दावितील महिमान अद्‌भुत तें ॥१२॥ हे रहणी सांप्रदाया । लिहिली ग्रंथीं शोधोनिया । विस्तार वाढला म्हणोनिया । न यावा श्रोतियां कोप येथें ॥१३॥ आवडीं वर्णितां दत्तमहिमेसी । कर्मेचि आली हे ओघासी । गोड वाटली प्रबोधासी । म्हणोनि यासी विस्तारिलें ॥१४॥ सेवा आचरणीक गुण । विशेषात्मकें आला दिसोन । यदर्थ पूर्वअनुसंधान ठेवोन । हेंचि कथन चालविलें ॥१५॥ पुढील प्रसंगाचे पोटीं । गोरक्षकानीफाच्या होतील भेटी । ती कथा रसाळ गोमटी । केवळ कोठी अमृताच्या ॥१६॥ कथारहस्य अति सुंदर । बोलवीतसे दत्तदिगंबर । त्याचेच कृपेचा आधार । येऱ्हवीं पामर केवीं बोलें ॥१७॥ वायु आधारें वावडी उडे । तो नसतां सब्रासह पडे । काष्ट पुतळा रणीं भिडे । कळीक निवाडें वेगळा कीं ॥१८॥ तेवीं दह हा दारुवत । येथें चाळिता तो अविनाशदत्त । यंत्रध्वनी मंजुळ बहुत । परी तें वाजत परबळें ॥१९॥ हें वर्म तुम्हां संतां । कळतसे सर्वांपरी समर्थां । तेथें काय मिरवूं मी अहंता । ज्याची सत्ता तो जाणे ॥२२०॥ तुम्ही साधु दीनदयाळ । रससिद्ध करवोनि सेवितां निर्मळ । नोव्हे माझिया बुद्धीचें हें बळ । कृपाकल्लोळ तुमचा ॥२१॥ मी पतित अपराधी दीन । अर्भक मलिन अज्ञान । परी याचें बोलिलों तुम्हां शरण । कीजे पावन मज संतीं ॥२२॥

परिसोनिया दीनवचना । तुम्हां संतांसी आली करुणा । अपंगोनि दिधलें कृपादाना । अपराध नाना न पाहतां ॥२३॥
करोनिया अंगीकार । माझा संतीं घेतला भार । उभवोनि स्वकृपेचा उद्गार । ग्रंथ सुंदर चालविला ॥२४॥
यदर्थ हेंचि विज्ञापना । संतीं साह्य व्हावें न्यूनपूर्णा । आपुल्या सांभाळोनि दीना । सद्रसीं हे रसना रंगविजे ॥२५॥
अक्षय्य मन राहे तुमच्या पदीं । आन कांहीं न वागो बुद्धी । हेंचि दीजे कृपानिधी । पाववा सिद्धी या ग्रंथा ॥२६॥
काया मन वाचें साचा । दास अंकित मी संतांचा । अनंतसुत विनवी वाचा । भाग सेवेचा मज धावा ॥२७॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । यासी शिवपद्मपुराणींचें संमत । श्रोते परिसोत भाविक भक्त ॥२२८॥

॥ इति सप्तत्रिंशोऽध्यायः समाप्तः ॥

## ॥ अध्याय ३८ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय श्रीसद्गुरुस्वामी दत्ता । अज अव्यया मायातीता । अनामा निःसंगा शाश्वता । अनादि अनंता तुज नमो ॥१॥ सर्व व्यापका सनातना । पूर्ण ब्रह्मा चैतन्यघना । जय चित्स्वरूपा निरंजना । प्रकाशगहना नमो तुज ॥२॥ जय त्रिभुवनपाळका त्रिगुणात्मका । त्रितापहारका सुखदायका । जय तिमिरनाशना दीनपाळका । भयनिवारका नमो तुज ॥३॥ जय सद्गुरु अनंता दिगंबरा । अखिल अभंगा दीनोद्धारा । तव पदीं भाळ सर्वेश्वरा । ठेवोनि दानारा विनवितों ॥४॥ मी नोव्हे जाणता सज्ञान । पढीक नोव्हे विचक्षण । तार्किक नसे प्रौढपण । केवळ हीन अबुझ की ॥५॥ असोनि ऐसाही मूढ । परी तूं अंगीकारोनि पुरविसी कोड । बोबडे शब्द मानिसी गोड । जोडविसी जोड आवडीची ॥६॥ सद्गुरुमाये जें आवडे तुजसी । तेंचि बाळकाअंगीं बाणविसी । चोज करोनि वाढविसी । महा मानासी आपुल्या ॥७॥ तुवां आपुल्या कृपें करून । चालविली सुरस कथा पावन । मच्छींद्रगोरक्षांचें व्याख्यान । साधका साधन बोध निका ॥८॥ गत कथाध्यायाचे अंतीं । गोरक्षा देवोनि योगस्थिती । मच्छींद्र यात्रे पुढें जाती । श्रवण श्रोतीं हें केलें ॥९॥ येथोनि श्रोते सावधान । निवाडें श्रवणा देईजे श्रवण । श्रीदत्त करवी निवेदन । करा पान कथारस ॥१०॥ तुम्हां श्रोतियांची आवडी । देखोनि निवेदनीं वक्तृथा गोडी । दत्तप्रबोधींची जोडा जोडी । अति तातडी करूनिया ॥११॥ मच्छींद्र आणि चर्पटचौरंगी । मार्ग क्रमति चालले वेगीं । सर्व चालती प्रेमें योगी । परी हे निःसंगी सर्वदा ॥१२॥ आनंदे पाहती देव तीर्थास । ठायीं ठायीं करिती निवास । यापरी फिरतां बहु दिवस । म्हाळ देशास पावले ॥१३॥ द्वादश म्हाळ द्वादश स्थान । अत्यंत रहणी विलक्षण । तेथें स्त्रीराज्य अवघें परीपूर्ण । पुरुषदर्शन न घेची ॥१४॥ तेथें वायुसुताचा भुभुःकार । तेणें वीर्यहीन पुरुष निर्धार । स्त्रिया द्रवती अपार । कन्यापरिवार तेणें तो ॥१५॥ स्त्रिया पुरुषातें बहु जपती । ध्वनिपासाव प्रयत्नें रक्षिती । अलभ्य पुरुषाची त्यां प्राप्ती । होचि विपत्ती तयातें ॥१६॥ तेथें दैवतें तीर्थें अपार । दर्शना जाती योगेश्वर । परी स्त्रिया तेथील अनिवार । मोहिती नर विपयार्थ ॥१७॥ त्या देशाचे निकट । पावले मच्छींद्र आणी चर्पट । तेथें वार्ता हे ऐकिली अचाट । म्हणती अरिष्ट दिसतसे ॥१८॥ मग विचार करोनि मानसीं । आज्ञापिती चर्पटचौरंगीसी । तुवां राहावें ये स्थळासी । आम्ही निश्चयेंसी जातों पुढें ॥१९॥ पुढील देश अत्यंत कठिण । तो आम्ही येतसों पाहून । तुवां करोनि भिक्षाटण । धरोनि स्थान राहिजे ॥२०॥ चौरंगी म्हणे जी नाथा । तुमची आज्ञा वंद्य माथा । जावोनि त्वरें येईजे समर्था । मज अनाथनाथा नुपेक्षिजे ॥२१॥ मच्छींद्र म्हणती सावध राहें । मी परतोनि सत्वर येतों पाहें । ऐसें बोलोनि लवलाहें । जातां होय त्या स्त्रीपदा ॥२२॥ ग्राम पुरें महापट्टण । पाहोनिया तीर्थीं न्हाय आपण । आवडी घेतसे देवदर्शन । परिसोनि महिमान पुढें चाले ॥२३॥

माध्यान्हीं फिरोनि घरोघरीं । भिक्षा आणोनि सेवन करी । गाये घेउनी किंगरी । जागृत अंतरी सर्वदा ॥२४॥ यापरी करितां भ्रमण । मुख्य पावला तो स्त्रीपट्टण । तंव तें देशाधिपतीचें अधिष्ठान । परदेशी येऊन राहिला ॥२५॥ तंव पुरद्वारीं रक्षक नारी । त्यांनीं भव्य पुरुष हा देखिला नेत्रीं । त्वरें जाऊनि राजमंदिरीं । सांगती हेरी योगियाची ॥२६॥ दिव्य पाटव्य स्वरूपें आगळा । योगी पावलासे आपुल्या स्थळा । हें परिसोनिया राणी प्रेमळा । चाले उतावेळा भेटीसी ॥२७॥ बहु समारंभेंसी येऊनी । स्तवी योगिया मधुर वचनीं । आणिल्या शिबिकें बैसवोनी । आदरें सिंहासनीं पूजियेला ॥२८॥ निश्चानित्य आर्धिकोत्तर । सेवा करोनि मोही अंतर । कामजिव्हेची हे मगरी थोर । पडतां अनिवार मिठी न सुटे ॥२९॥ विषयदरीची हे केवळ नाहारी । बळ झडपोनि जीवें मारी । मोहकाननींची अस्वली खरी । प्राणांतें हरी गुदगुलोनी ॥३०॥ हे विषयशिखा दारुण । जाळितां न म्हणे अश्वत्थचंदन । दाहोनि टाकिते पुण्यकानन । कीं खंडण कुऱ्हाडी करी ॥३१॥ एवं हे स्त्रियांची जाती । दृष्टीं पुरुषा व्यसनीं पाडिती । जळापरी शोषोनि घेती । सेखी अधःपातीं पाडिती पुरुषा ॥३२॥ स्त्रीसंगे बहुत नाडले । तपऐश्वर्या आंचवले । प्रस्तुत मच्छींद्रनाथा गोविलें । मोहिनी टाकिलें पाहतां ॥३३॥ विषयीं दाविता भ्रमोन । केला प्रेमळेनें अंकित दीन । गेला योगातें विसरोन । जाला आधीन तियेच्या ॥३४॥ ऐसे लोटले बहुदिवस । तें गुज न कळे चौरंगीस । पाहे सद्गुरुची बहु वास । चातक चंद्रास जयापरी ॥३५॥ इकडे प्रेमळा आणी मच्छींदनाथ । सुखसंतोषे आनंदे रमत । तों तिचे उदरीं जाला सुत । नामविख्यात मेनी त्याचे ॥३६॥ प्रेमळा गुणवंती चतुर । पूर्वीच स्वामीचा घेऊनी विचार । पैरें निवेदिलें शिष्य थोर । दोघे अगोचर असती ॥३७॥ प्रेमळा विचारी स्वमनीं । ते दोघे नेतील यालागोनी । यदर्थ आपुले राज्यस्थानीं । पुरुष कोण्हीही न यावा ॥३८॥ हे आज्ञा देवोनि दूतिकेसी । नगरीं प्रवेशों न देती पुरुपासी । रक्षक जागती अहर्निशीं । न कळे कोण्हासी वर्म तें ॥३९॥ तंव कानीफा शिष्य जालंदराचा । तो पंथ क्रमीत आला यात्रेचा । तया शोध मच्छींदराचा । होता साचा किंचित ॥४०॥ तो परिसोनि वार्ता । देश त्यागोनि होय जाता । भयें योगीपाळा होय फुटता । अनेक पंथा सैराटती ॥४१॥ तंव पंथ क्रमीत जातां योगी । मार्गी भेटला चर्पटचौरंगी । तेणें विचारितां त्यालागीं । वार्ता निःसंगीं सांगती त्या ॥४२॥ परिसोनि गुरुचे वर्तन । मुखेंदु गेला तैं उतरोन । अहा नाथ हे गती कोण । म्हणोनी स्फुंदन मांडिले ॥४३॥ भेटी जातां ठीव नाहीं । ऐसियासी करावें कायी । उपाय करितां गोरक्ष तोहीं । योगा ठायी बैसविला ॥४४॥ त्यासी कळतां वर्तमान । ऐकतांचि येईल धांवोन । नाना उपायातें करोन । येईल घेवोन गुरुवर्या ॥४५॥ मग जो योगी जाय वायव्यपंथी । तयालागी चर्पट विनविती । जालें श्रुत करा गोरक्षाप्रती । जरी ते भेटती तुम्हांते ॥४६॥ यापरी बहु योगीजनां । चौरंगी करी विज्ञापना । परिसोनि त्यांचा करुणा । भेटल्या सूचना करूं म्हणती ॥४७॥ तंव तो गोरक्ष योगिराज । तेणें योग साधिला सतेज । बहुकाळ करुनी बोज । सारिलें काज सर्वसिद्धि ॥

श्रीसद्‌गुरुचा वरप्रसाद । तेणें फळलें तप जाला आनंद । सद्‌गुरुभेटीचा धरूनी छंद । म्हणे मी पद लाहें केव्हां ॥४९॥
बहु दिवस जाले गुरुरायासी । नेणें फिरती कोण देशीं । कधीं पाहीन त्यांच्या चरणांसी । भेटवी मजसी कोण तया ॥५०॥
कोण सांगेल मज शुद्ध वार्ता । मी धांवत जाईन तया पंथा । पाहोनि चरणीं ठेवीन माथा । निरसेल चिंता तैं माझी ॥५१॥
सद्‌गुरुभेटीसाठीं विव्हळ । होऊनी गोरक्ष करी तळमळ । म्हणे युगापरी जात हे पळ । केधवा दयाळ भेटतील ॥५२॥
शोधीत यावें म्हणोनी । जातां आज्ञापिती मजलागुनी । तरी शोधा निघावें येयोनी । उगे अनुमानीं न पडावें ॥५३॥
मानसीं करोनि हा विचार । गोरक्ष निघता जाला सत्वर । सवें योगी चालती अपार । तीर्थें समग्र धुंडिती ॥५४॥
करूं तीर्थांचें जरी वर्णन । तरी हा ग्रंथ वाढेल गहन । भेटीची त्वरा गोरक्षालागून । म्हणोनि कथन राहविलें ॥५५॥
मागें दत्तयात्रेसमयीं । तीर्थें वर्णिलीं ठायीं ठायीं । यदर्थ न वर्णी येथें कांहीं । कथा त्वराही निरोपितों ॥५६॥
किरणवेष्टित जैसा भास्कर । कीं तारांगणी शोभे हिमकर । तेवीं वेष्टित योगेश्वर । तळपे सुंदर गोरक्ष तो ॥५७॥
मार्गी चालतां योगियांसी । म्हणे केधवां पाहिन सद्‌गुरूसी । प्रेमाश्रु वाहती नेत्रांसी । सद्‌गद मानसीं सर्वदा ॥५८॥
योगी म्हणती धन्य प्रेमळा । धन्य हृदयीं गुरुभक्तीचा जिव्हाळा । होसी भावाचा पुतळा । दैवागळा तूं धन्य ॥५९॥
जो सद्‌गुरुसेवनीं अत्यंत रत । प्रेमळ वैरागी विरक्त । सात्विक निग्रही वचनी सत्य । कल्पनारहित शुद्ध साचे ॥६०॥
त्याच्या पुण्यासि नाहीं पार । तोचि केवळ होय योगेश्वर । ऋद्धिसिद्धी जोडोनि कर । उभ्या समोर तिष्ठती त्या ॥६१॥
कृतांत त्याची वाहण वाहे । देवेश देव आज्ञा लाहे । त्रिदेव होवोनि सर्वदा साहे । धरोनि बाहे चालती ॥६२॥
गुरुभक्तांमाजी तूं निधान । तुजऐसा न देखोंचि आन । तुझें होनाचि दर्शन । दुरितां नाश जीवींच्या ॥६३॥
तूं जिकडे कृपें अवलोकिसी ते तत्काळ होती तुजऐसी । सच्छिष्यपणा साजे तुजसी । सुलक्षण होसी सर्व गुणें ॥६४॥
तंव गोरक्ष म्हणे योगिराया । स्तुतिसंवाद येथें कासया । केधवां भेटेन सांगा गुरुवर्या । ठेवीन पायां भाळ कधीं ॥६५॥
सद्‌गुरूचे गुण वर्णित । सद्‌गद होवोनि आठवित । भेटल्या मार्गी शोध करीत । क्रमीत पंथ चालिले ॥६६॥
उल्लंघुनिया देशपट्टण । पर्वत दरी निबिड कानन । पूर्व मार्गातें लक्षोन । शोधीत गमन करितानी ॥६७॥
वायव्य स्थानापासाव । उत्तर आणी शोधिली पूर्व । सागर पाहोनि योगिसमुदाव । परतले सर्व तेयोनि ॥६८॥
मध्यदेश अवघा शोधितां । गिरिगुव्हा तमियां पाहती । यापरि योगी धुंडिती क्षिती । हिंडतां उल्लंघिती पंथ बहुन ॥६९॥
पुढें चालतां पाहती दुरी । तंव महाक्षेत्र ते अवंतीपुरी । श्रीशिवमहांकाळनगरी । पाहतां अंतरीं सुखावले ॥७०॥
बाह्य प्रदेशीं रमणीय स्थळ । भूप आरामबाग विशाळ । फळपुष्पीं दाटला प्रबळ । तळवटीं निर्मळ वाहे क्षिप्रा ॥७१॥
परम आनंदाचें तें स्थान । तेथें गोरक्ष उतरला येवोन । समोंवते घालोनि आसन । योगीजन बैसले ॥७२॥
समूहेंसी घेतां विश्रांती । तों दक्षिणमार्गें योगी येती । तेहि येवोनि समीप उतरती । आदेश करिती येरयेरां ॥७३॥

पुसती सांप्रदाय गुरुस्थान । म्हणती सांगा नामाभिधान । कोठोनि येणें कोठें गमन । गोरक्ष आपण विचारी ॥७४॥
तंव योगी सांगती वृत्तांत । महायोगींद्र जालंदरनाथ । त्याचे शिष्य हे कानिफा निश्चित । जगीं विख्यात नाथपंथी ॥७५॥
अवनीचीं तीर्थें पहावया । भ्रमण होतसे योगिराया । सद्गुरु भेटी इच्छोनिया । पूर्वठायां हे जाती ॥७६॥
आपण आलांति कोठून । सांगा सांप्रदाय नाम खूण । गोरक्ष म्हणे सावधान । करा श्रवण सांगतों ॥ ॥७७॥
श्रीदत्त उपदेशी मच्छिंद्रनाथ । मी दास त्याचा असें अंकित । गोरक्षनामें हें निश्चित । उभय पंथ एकची ॥७८॥
परस्परें होतां श्रवण । गोरक्षकानिफासी जालें आलिंगन । आसनीं बैसती आनंदघन । योगीजन समोंवते ॥७९॥
समोंवतीं आम्रवृक्ष लवले । पक्क फळें वरी दाटले । योगी देखोनि आनंदले । सेवनीं लाळुचलें मन त्यांचें ॥८०॥
गोरक्षें चोळखोन मानस । वचन बोले तैं कानिफास । सामर्थ्यें उतरोनिया फळांस । देवोनि सर्वांस तृप्त करा ॥८१॥
तंव कानिफा म्हणे गोरक्षा । तुमचे गुरूची विशेष दीक्षा । तेच आणिजे प्रत्यक्षां । धक्का वृक्षां न लावितां ॥८२॥
उत्तर परिसोनि कानिफाचें । आपुलें सामर्थ्य दाविती सांचें । पक्क फळें तैं वृक्षांचें । उतरी न कांचें सर्वथा ॥८३॥
सर्व योगियां फळें वांटिती । देखोनि नवलाव सर्वां चित्तीं । यथेष्ट आवडी सर्व भक्षिती । सेवितां तृप्ती सकळांतें ॥८४॥
सकळां तृप्ती जाल्यावरी । गोरक्षा कानिफातें विनंती करी । हीं सजीव फळें करोनिया सत्वरी । लाविजे वरीं स्वस्थानीं ॥८५॥
तंव कानिफा म्हणे योगिया । तुम्हीच जाणां हे क्रिया । आम्हां हा योग व्हावा कासया । सिद्धि उपाया न मनों आम्ही ॥८६॥
उतरले तुम्हीं ज्या रीतीं । तेथेंच लावोनि दीजे निश्चितीं । हे सिद्धिबळाची योगयुक्ती । आम्हांप्रती मानेना ॥८७॥
गोरक्ष म्हणे जालंदर । गुरु तुमचा तो असे थोर । त्याचा तुम्हांसी कृपाकर । असोनि विचार ऐसा कां ॥८८॥
हें सामर्थ्य नसतां अंगीं । कासया म्हणवावें उगेंच योगी । भूषण मिथ्या मिरवावें जगीं । काय उपयोगी हे दीक्षा ॥८९॥
सद्गुरुदीक्षा सामर्थ्य प्रबळ । पहा कैसे तें तुम्ही सकळ । यापरी बोलोनि उतावेळ । आंठोळ्या फळ मेळविल्या ॥९०॥
जीवन गोरक्षें शिंपोन । पूर्ववत फळें केलीं संपूर्ण । आज्ञा देतां त्यांलागोन । वृक्षीं जावोन झोंबलीं ॥९१॥
योगी आणी बनकर । यांसी दाविला चमत्कार । पाहतां आश्चर्य सकळां थोर । धन्य योगीश्वर म्हणती हा ॥९२॥
गोरक्ष म्हणे कानिफासी । आपुलें सामर्थ्य न दाविलें आम्हांसी । नसल्या पुसोंचें सद्गुरूसी । धरून दीक्षेसी काय केलें ॥९३॥
कानिफा शांतीचा पुतळा । म्हणे उणीव बोलतां वेळोवेळां । आम्हां न मनों हे सिद्धीची कळा । वसतां बळा पराच्या ॥९४॥
आम्ही न सेवूं कदा या योगासी । आम्हां वास्तव्य तो अविनाशी । एक जाणों सद्गुरुपदासी । नाथ जालंदरासी प्रीतिनें ॥९५॥
तुम्ही म्हणवितां सद्गुरूचे दास । विरक्ती दाउनी फिरतां उदास । धरोनि लौकिकाची आस । सामर्थ्य जगास दावितां ॥९६॥
जया स्वात्मसाधनाची चाड । तया लौकिकीं अनावड । स्वस्वरूपाची जो जोडतो जोड । अन्य गोड त्यां नाहीं ॥९७॥
तुमचा गुरु मच्छिंदर । आम्ही त्याचा जाणतों प्रकार । कामिनीसंगें जाला पामर । काय बडिवार सांगूं त्याचा ॥९८॥

म्लुब्ळदेश हा पिंजरा । त्यांत गुंतविलें मच्छींद्रकीरा । विषयसुखाचा भक्षी चारा । वर्ते सुंदरा अंकित तो ॥९९॥ गुरु भुलला कामिनीस । तुम्हीं अंगिकारिलें सिद्धीस । मिथ्या कां म्हणविता उदास । नाहीं नैराश्य जालां कीं ॥१००॥ परिसोनि उणीवेचा संवाद । गोरक्ष मनीं पावला खेद । परी धैर्य धरोनि म्हणे निषेध । आम्हां शब्द लावीतसां ॥१॥ दीप परातेंच करी उजेड । आपुले तळवटींचा न जाणे निबिड । तैसी तुम्ही दावितां बाड । कोण पाड गणीं याचा ॥२॥ जालंदर तुमचा गुरुनाय । त्याची तों जाणों आम्ही मात । स्त्री उपदेशितां पावला घात । वर्णा किमर्थ थोरीव हे ॥३॥ गौडबंगालदेशीचा भूप । गोपीचंदनामें लावण्यरूप । तो होवोनिया सकोप । खाणोनि कूप गाडिला ॥४॥ ज्याचा होवोनि करिसी बडिवार । तो कूपीं रायें टाकिला जालंदर । राजमाता मैनावती सुंदर । न कळे हा प्रकार तिज कांहीं ॥५॥ त्याचे शिष्य तुम्ही कानिफा । होवोनि कायसा त्यासी नफा । पेरोनि राहिला बांझ वाफा । पडतो या तर्फा सावरीचा ॥६॥ ऐसें गोरक्ष बोलतां कठोर । परी कानिफाचें शीतळ अंतर । संवादीं जाला लाभ थोर । आनंदे उत्तर वदे तो ॥७॥ म्हणे गोरक्षा सुजाणा । उठ दे दे आलिंगना । आजी मी पावलो लाभ दुना । अमृतवचना ऐकोनी ॥८॥ मज निरोपिली सद्गुरुवार्ता । तेणें निरसली माझी चिंता । शोधोनि भेटेन अनाता । अनाथनाथ गुरुवर्या ॥९॥ शांतियुक्त परिसोनि वचन । गोरक्ष देत तया आलिंगन । म्हणे तूं होसी परिपूर्ण । पाहसी चरण श्रीगुरूचे ॥११०॥ म्यां योग दावोनि निंदिलें । परि कानिफा शांती तुझी न ढळे । परस्परां लाभला भलेंभले । बोलतां बोलें न बोलवे ॥११॥ उभयां सप्रेमें होतां भेटी । द्वैत गेलें उटाउटी । आनंदमेळें सांगती गोष्टी । गुह्य पोटीं सांठविती ॥१२॥ येरयेरां कळवोनि वृत्त । कानिफा आज्ञा मागे त्वरित । अवश्य म्हणे गोरक्षनाथ । साध्य कार्यार्थ आपुला ॥१३॥ गौडबंगाला देशीं जावें । शोधोनि सद्गुरूसी काढावें । परमानंदें करोनि भेटावें । अनन्यें सेवावें पाय त्याचे ॥१४॥ आम्हीही आतां येथून । म्लुब्ळदेशीं करितों गमन । नाना प्रयत्नें करोन । येतों घेवोन गुरुवर्या ॥१५॥ यापरी परस्परें वंदोनी । निघनी अलखनामें गर्जोनी । कानिफा पूर्वपंथ लक्षोनी । जाय निघोनी सत्वर ॥१६॥ मार्गे दक्षिणपंथें मच्छींद्रसुत । निघे योगीभारासमवेत । हृदयीं आठवोनि सद्गुरुनाथ । नमोनि क्रमीत मार्गासी ॥१७॥ येथोनि कथेचा रस । पुढील प्रसंगीं अति सुरस । तो श्रोते जनीं विशेष । सेविजे सावकाश प्रीतीनें ॥१८॥ देशांतर सर्व शोधोन । गोरक्ष घेईल गुरुदर्शन । तो चमत्कार विशेष पूर्ण । करवील निरोपण श्रीदत्त ॥१९॥ दत्त सनातन निश्चळ । सदय उदार पूर्ण दयाळ । याचिया कृपेचा कल्लोळ । ग्रंथ रसाळ वाढे हा ॥१२०॥ ग्रंथरूपें दत्त दिगंबर । करावया प्रगटला जगदोद्धार । यानें निरखितां कृपाकर । देवोनि भवपार करीतसे ॥२१॥ करी अज्ञानाची धुनी । पढिये सोडवी तापापासोनी । ज्ञानप्रकाश कृपें करोनि । रम्मी मनीं प्रबोध हा ॥२२॥ सदय हा दत्त दयार्णव । उपासकाचा जाणे भाव । इच्छेऐसें पुरवी सर्व । चरणीं ठाव

प्रीतीं दे ॥१२३॥ देहींच असे हा देवदत्त। यासी जाणती साधुसंत। तरी त्यांसीच जावें शरणागत। ते निश्चित भेटविती ॥१२४॥ दत्त आणि साधुजन। येथें मुळींच नाहीं भेदभाव। त्यांचे धरोनि राहतां चरण। सहज कल्याण जीवाचें ॥१२५॥ साधु केवळ हे ईश्वर। सदय कोमळ उदार धीर। शांत सभाग्य ज्ञानसागर। गति परात्पर समदृष्टी ॥१२६॥ साधु शांत वैराग्यसंपन्न। साधु पतिताचे पावन। साधु भक्तीचें भूषण। साधु निजप्राण दत्ताचे ॥१२७॥ म्हणोनिया संतचरणीं। भावें जावें लोटांगणीं। ते तोषवितील कृपादानीं। अभयपाणी देवोनिया ॥१२८॥ संतांचें अभय होतां। ग्रंथवृक्ष जाला हा वाढता। याची व्हावया सुफळता। चरणीं माथा अर्पण ॥१२९॥ जी स्वामी संतराया। हेचि विनवणी तुमच्या पायां। ग्रंथ हा परिपूर्ण कराया। सामर्थ्य दीना या असेना ॥१३०॥ तुम्हीं जरी कृपा कराल। तरिच ग्रंथ सिद्धीस जाईल। येऱ्हवी मी काय बोलूं बाल। तुमचा लडिवाळ म्हणवितों ॥१३१॥ मज दीनाचा हेत। पूर्ण करावया तुम्हीं समर्थ। तुमचे कृपेवीण अर्थ। न घडे परमार्थ निश्चयें ॥१३२॥ यालागीं वारंवार। तुम्हां प्रार्थी जोडोनि कर। ग्रंथीं साह्यता निरंतर। करोनि उद्गार देइजे ॥१३३॥ अनंतसुत संतांचा। दास म्हणवी कायावाचा। प्रीतीं प्रतिपाळ कीजे याचा। अभिमान श्रीदाचा तुम्हां संतां ॥१३४॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रवणींच पुरती मनोरथ। सदा परिसोत भाविक भक्त। अष्टत्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥१३५॥

॥ इति अष्टत्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ३९ ता

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ।

जयजय दत्त आनंदवर्धना । ज्ञानदीपा । निरंजना । स्वप्रकाशका पावना । भ्रमछेदना नमो तुज ॥१॥
श्रीदत्त हे जगत्पाळा । अविनाशरूप तूं कृपाळा । सिद्ध योगी मुनींद्र भूपाळा । तव पदकमळा प्रणम्य ॥२॥
जयजयाजी पुंडरीकाक्षा । अज अजिता सर्वाध्यक्षा । पतितविनयता आणोनि लक्षा । कृपा कटाक्षा प्रतिपाळी ॥३॥
दत्ता तूं दीनाची माउली । कृपें वत्सातें सांभाळी । तुजवीण पुरविता आळी । तिहीं स्थळीं नसेचि कीं ॥४॥
तूं उदार सदय दाता । तूं शरणागताचा होसी त्राता । तरी सांभाळ कीजे अनाथनाथा । वदवीं ग्रंथा तुझ्या तूं ॥५॥
मागें अष्टत्रिंशपर्यंत । कथारस वदविला गोड बहुत । तेथें निवाले श्रोते संत । आनंदभरित मानसीं ॥६॥
आतां पुढिलिया कथारसीं । वेध लागला श्रोतियांसी । तृप्त करितां तूंचि होसि । निरोपणासी वदवोनिया ॥७॥
गताध्यायींचे अवसानीं । कानिफातें मार्गी लावोनी । योगियांतें सवें घेवोनी । गोरक्ष तेथोनी निघाले ॥८॥
हें तंव श्रोतीं केलें श्रवण । उदा श्रवणीं व्हावें सावधान । येथें दत्तचि वक्ता निरोपण । करा पान तो रस तुम्हीं ॥९॥
योगीसमूह सांगातीं । गोरक्ष चालिले दक्षिणपंथीं । देव तीर्थक्षेत्रें अवलोकिती । ध्यास चित्तीं सद्गुरुचा ॥१०॥
आनंदें करूनि मार्गी चालतां । योगियां निरोपी प्रबोधकथा । नाना देश उल्लंघोनि जातां । योगी पंथां भेटती ॥११॥
तया योगियांसि भेटोन । पुसती देशिक वर्तमान । त्यांचें परिसोनि निरोपण मार्ग क्रमोनी जाती पुढें ॥१२॥
चालतां योगी आणिक पावले । ते गोरक्षनाथें देखिले । उभयभेटीं आनंद जाले । त्यांनीं वर्णिलें चर्पटा ॥१३॥
योगी म्हणती जी गोरक्षा । तुम्हांऐसीच चर्पटाची दीक्षा । श्रीपुरीं मागूनि भिक्षा । लक्षी अलक्षा सुलक्षण ॥१४॥
हृदयीं मच्छींद्रसद्गुरुचा ध्यास । गोरक्षा तव भेटीची त्या आस । तरी तुम्ही जावोनि त्यास । भेटोनि उल्हास पाववीजे
॥१५॥ जेवीं इच्छोनि रामदर्शन । राहिला भरत वीतरागी होवोन । तेवींच चरपट देखिला आपण । तूं त्या भेटोन तोषवी
॥१६॥ तंव गोरक्ष म्हणे योगीयांसी । चरपट गुरुबंधु होय आम्हांसी । बहु दिवस लोटले भेटीसी । शोधीत त्यासी पावलों
॥१७॥ तों त्याचें वर्तमान । तुम्हीं आम्हां केलें श्रवण । तरी त्वरें भेटूं त्यासी जाऊन । चिंता निवारण करूं त्याची ॥१८॥
यापरी बोलोनि योगियां । पंथीं लागले आपुलालिया । त्वरें श्रीनगरा जावोनिया । भेटले तया चरपटा ॥१९॥
देखोनिया गोरक्षयोगी । त्वरें धांवला चरपटचौरंगी । चरणीं जडला लागवेगीं । प्रेम अंगीं दाटलें ॥२०॥
सद्गद बाष्प वाहती नयनीं । तेणें होय अभिषेक चरणीं । तें गोरक्ष ती पूजा मानी । करें उचलोनी आलिंगी ॥२१॥
उभयांसी आनंदें जाल्या भेटी । मग बोलती प्रेमें गुजगोष्टी । द्वादश संवत्सराची रहाटी । निवेदी चरपटी गोरक्षा ॥२२॥
चरपट विनवी गोरक्षासी । सद्गुरु गुंतले म्लेच्छदेशीं । तेथील अधिपत्य प्रेमळेसी । तिनें स्वामीसी भ्रमविलें ॥२३॥
त्यांहीं प्रयत्न बहुत केला । नगरीं प्रवेश न घडे पुरुषाला । ते दिवसापासोनि या स्थळा । वास केला निर्धारीं ॥२४॥
तेथील स्त्रिया काममत्त । पुरुषा भुलवोनि करिती अंकित । मागुता नोव्हे तो मुक्त । होवोनि रत शोषिती ॥२५॥
तो देशचि अवघा स्त्रियांचा । उद्भव न घडे कांहीं पुरुषाचा । पदर्थ अंगीकार करिती पराचा । विवाहप्रीतीचा संलग्न ॥२६॥

नसतां पुरुष ते कुमारी । मिळतां पुरुष होय नारी । वृद्धत्वीं वैधव्य निर्धारीं हेचि परी त्यांची असे ॥२७॥
असो प्रेमळा तेथील पट्टराणी । ती मान्य त्या देशस्थानीं । तिनें पराक्रमें करोनी । स्वामीसि मोहोनि ठेविलें ॥२८॥
नगरप्रदेशीं रक्षण । ठेविलें असे रात्रंदिन । माजी प्रवेशों न देती पुरुषांलागोन । करितां प्रयत्न न चाले ॥२९॥
ती प्रेमळा लावण्यसुंदरी । सद्गुरु असती तिचे मंदिरीं । त्यांतें येऊं नेदीच बाहेरी । लुब्धली भ्रमरी पदकमळीं ॥३०॥
यापरी तो बोलतां । गोरक्ष म्हणे न करीं चिंता । सत्वर आणूं सद्गुरुनाथा । चाल आतां सवें तूं ॥३१॥
मग गोरक्ष आणि चौरंगी । सवें घेवोनि आणिक योगी । निघते जाले लागवेगीं । वाजविती सिंगी तेधवां ॥३२॥
श्रीपुर सोडोनि त्वरें । चालिलें मल्लाळदेशीं प्रवेशले । नाना तीर्थ क्षेत्र देव स्थळें । नेत्रीं विलोकिलें अनुपम ॥३३॥
फिरोनिया ग्रामांतरें । गुप्त शोधिती परस्परें । परी कोणी या अनुच्चारें । सहसा उत्तरें न बोलती ॥३४॥
असो यापरी फिरतां । पट्टस्थानीं पावले अवचितां । परी रीघ न घडे सर्वथा । मानसीं चिंता दाटली ॥३५॥
तंव गोरक्ष चतुर सुजाण । सर्व गुणें मंडित पूर्ण । रूप अत्यंत लावण्य । विचारें कारण शोधिलें ॥३६॥
जेणें घडे आपुलें हित । तो अवलंब करावा निश्चित । ते प्रगट न करोनि ठेविजे गुप्त । हाचि सिद्धांत असे कीं ॥३७॥
म्हणोनि गोरक्ष ते वेळीं । अर्थप्राप्तीसी मार्ग न्याहाळी । तंव अकस्मात तये स्थळीं । नवल जवळी देखिलें ॥३८॥
पत्रापात्रा अति सुंदर । हिंडत असती देशांतर । सकळ स्त्रियांचाचि परिवार । करणें संचार नगरीं त्या ॥३९॥
हें गोरक्षें देखोनि नयनीं । योगियांसि म्हणे राहा या स्थानीं । मी जात असें स्वकारणीं । तव जवें ययाना तुम्ही कोठें ॥४०॥ ऐसें निवदोनि त्यांसी । आपण त्यागोनि जाय वाण्यासी । शुद्ध दीन होवोनि वेगेंसी । भेटे पात्रासी जावोनि ॥४१॥
जेणें त्यांचे होय मनरंजन । तैसेचि दावी स्वतःस्वगुण । परम सुखावलें पात्रांचें मन । प्रेमें आनंदोन राहे म्हणती ॥४२॥
तूं गुणी दिससी चतुर । मृदंग वाजविसी गति फार । येणें गीतीं स्फुरण थोर । निश्री अंतर मोही परां ॥४३॥
हा श्रेष्ठ गुण होय तुजपाशीं । पाहतां आनंद न माये मानसीं । तव गुणें द्रव्यराशी । मिळतील आम्हांसी ये ठायीं ॥४४॥
परी पुरुषप्रवेशाचें संकट । काय करावें न फुटे वाट । येथी स्वामिणीचा दुर्धर हट्ट । पुरुषा स्पष्ट येऊं नदी ॥४५॥
तंव गोरक्ष म्हणे न धरा चिंता । कारण योजितों आपुल्या अर्था । येरी पुसती योजिसी कोणता । तो अतौता निवेदीं तं ॥४६॥ येरू म्हणे तुमचीं भूषणें । तीं मज द्या तुम्ही लेववून । मी स्त्रीवेषातें धरोन । साधीन कारण सर्वस्वें ॥४७॥
हें वागलें पात्राचित्तीं । स्त्रीरूपें गोरक्ष नटविती । आधींच सुंदरपणाची दीप्ती । त्यावरी शोभती अलंकार ॥४८॥
जैसें भस्मासुरापासून । सोडवावया पंचवदन । मोहिनीरूपें हरी प्रगटोन । असुरां मोहून मारिलें ॥४९॥
तेवीं गोरक्षनाथें केलें । स्त्रीरूप तात्काळ धरिलें । नगरीं पात्रांसह प्रवेशलें । वास्तव्य केलें सुस्थानीं ॥५०॥
दूतिका प्रेमळेसी जाणविती । सुलक्षणी पात्रा पावल्या वस्ती । तंव ती म्हणे सभेप्रती । पाचारा निश्चिती आदरें ॥५१॥
आज्ञा वंदोनि वेगेंसी । दूती जाती तयांपाशीं । म्हणती पाचारिलें सभेसी । आज रजनीसी नृत्यातें ॥५२॥
येरी अवश्य म्हणोन । पावल्या होतां अस्तमान । छत्रसन्मुख आदरें नमोन । साज संगीन योजिला ॥५३॥
सारंगी आणी सारमंडळ । मृदंग आणी वाजे टाळ । स्वर आलाप कंप रसाळ । गीत मंजुळ आरंभिलें ॥५४॥

शक्तयुक्त करितां साम । रागउपराग यथा क्रम । हावभाव कटाक्ष उत्तम । दावोनि प्रेमरंग बहु ॥५५॥
अत्यंत मृदंगाचे मोहोर । सारंगी वाजे शब्दाकारें । सार मंडळसा प्रकारें । बत्तीस तारे वाजे तो ॥५६॥
धृपदें गीती तिल्लाणे ख्याल । वाजे टाळ चंग कर ताळ । तेणें मोहिली सभा सकळ । न कळे वेळ जाली किती ॥५७॥
सभेमाजी सर्व नारी । प्रेमळा त्यांत मुख्य सुंदरी । ते पारिपत्याची अधिकारी । राज्यांतरी आपुल्या ॥५८॥
मुख्य सिंहासनीं विराजमान । मच्छींद्र बैसविला तपोधन । वस्त्र अलंकारें मंडित पूर्ण । जवळी अज्ञान मेनीनाथ ॥५९॥
जवळी बैसली प्रेमळाराणी । वंदीजन उभे जोडोनि पाणी । छत्रें ढाळिती दुतिनी । तांबूल चर्वणीं उभयां दे ॥६०॥
गातीं सर्वांचें लागलें लक्ष । हें लक्षितां जाला गोरक्ष । म्हणे सद्गुरु सन्मुख प्रत्यक्ष । आगमनीं साक्ष पुरवूं त्या ॥६१॥
मृदंगाचे ध्वनी आंत । सूचना सद्गुरुसी जाणवीत । ते परिसा तुम्ही साधुसंत । वाजवी गत कुशलत्वें ॥६२॥
चलो मछिंदर गोरख आया । सन्मुख दर्शन तेरा पाया । सिंगी मृदंग नाद बजाया । कीजे दया नाथजू ॥६३॥
क्षणाक्षणा वाजवी गत । म्हणे मच्छींद्रा होय सावचित । सन्मुख उभा दास अंकित । दर्शन इच्छित गोरक्ष हा ॥६४॥
मृदंगनादीं उमटली ध्वनी । ते पडली मच्छींद्राचे कानीं । सभोंवता पाहे विलोकोनी । पुरुष कोण्ही दिसेना ॥६५॥
ध्वनी परिसोनि चाकाटला । समस्या परी पाहों लागला । विचारें मनीं शब्दशोध केला । तो उमटला मृदंगी ॥६६॥
हें जाणोनि लवलाहीं । म्हणे प्रगटोनि गोरखा भेटी देईं । गोरक्ष धांवोनि जडला पायीं । भूषण घाई त्यागूनिया ॥६७॥
स्वरूप करितांचि प्रगट । मच्छींद्रनाथें दिधली भेट । प्रेमळा म्हणे अवचट । पायीं कोण हा धीट पावला ॥६८॥
तूं कोण रे कोण म्हणतां । गोरक्षें चरणीं ठेविला माथा । पाणी जोडोनि जाला बोलता । धन्य माता तूं होसी ॥६९॥
काया वाचा मन प्राण । तुवां मम स्वामीचें केलें सेवन । उपभोग भोगविले संपूर्ण । घडलें अर्चन थोर तुतें ॥७०॥
मी तरी सद्गुरु मच्छींद्राचा सेवक । तेव्हां तुझा सत्यच बालक । गोरक्षनाम माझें देख । आज्ञाधारक उभयांचा ॥७१॥
जैसें तुझें हें लाडकें बाळ । तैसाच मी तुझा लडिवाळ । सदय तूं उभयांसि कोमळ । करीं प्रतिपाळ प्रेमळे ॥७२॥
गोरक्ष बोले विनय उत्तर । परी प्रेमळेसी न रुचे निर्धार । सखेदें संतप्त अंतर । क्रोध निर्भर दाटला ॥७३॥
ईर्षेस चढो स्वामी भ्रुकुटी । म्हणे तुज जालीवोनिया भेटी । आतां जाय परतां उठाउठी । न वदोनि गोष्टी येथवा ॥७४॥ गोरक्ष म्हणे वो माते । कोप किमर्थ करिसी मातें । येणें पावसील श्रमातें । क्रोध कामातें न ये कीं ॥७५॥
मी आलों सद्गुरुसाठीं । त्यांत तुझीहि जाली मज भेटी । प्रेमें चरणा देतां मिठी । आनंद मज पोटीं न समाये ॥७६॥ कांहीं न घडतां अपराध । वृथा कां माउली करिसी क्रोध । विवेकें हो तूं सावध । द्वैतभेद सांडी तूं ॥७७॥
मी तंव अनन्यभावें शरण । तरी मज तूं देईं कृपेचें दान । न करीं न करीं माझें हेळण । सेवेंत वागेन तव आज्ञें ॥७८॥
प्रेमळेमनीं उपजलें भय । म्हणे तूं येथें कदा न राहे । आलिया मार्गें शीघ्र जाय । राहतां अपाय पावसी तूं ॥७९॥
देखोनि प्रेमळेचें निष्ठुरपण । गोरख बोले काय वचन । सद्गुरूसी करीं मम स्वाधीन । जातो येथोन क्षणांत ॥८०॥
जरी मच्छींद्रनाथा न देसी । तरी मी नव जाय निश्चयेंसी । बहु भय मातें दाविसी । तरी मी काळासी न भीच ॥८१॥
हे सोडोनिया गुरुचरण । मी एकला न जाय परतोन । गुरु माझें संपत्तिधन । ठेविलें चोरून त्वां येथें ॥८२॥

तुज जरी त्यातें ठेवणें। तरी सत्य आलें मज राहणें। त्यावीण न घडे माझें जाणें। जीवीं धरणें ही बोली ॥८३॥ मग मच्छींद्र बोले प्रेमळेसी। दवडितां नच जाये तो निश्चयेंसी। सिद्ध करील बोलिल्या बोलासी। न छळी त्यासी उगी तूं ॥८४॥ तुझी मजवरी बहुप्रीती। तेवींच असे माझिया चित्तीं। ते न मोडावया हेचि युक्ती। सांगतों प्रीतीं अवधारीं ॥८५॥ लावितां गोरक्ष हा न जाय। केले न तोपती या अपाय। तरी राहूं दे येथें निःसंशय। सेवील पाय उभयांचे॥८६॥ नाथाचें परसोनि वचन। तैं प्रेमळा बोले गोरक्षालागून। जरी राहसील सेवा करोन। तरी ठेवीन तुज येथें ॥८७॥ गोरक्ष म्हणे वो माते। अंतर पडो नेदी सेवेतें। वचनाऐसीं करीन कृतें। न मागें तूतें धड गोड ॥८८॥ बोल प्रेमळेसी मानले। सेवेसि गोरक्षा ठेविलें। येरू म्हणे बरवें जालें। उपाव भले करूं आतां ॥८९॥ मग उभयांची सेवा। गोरक्ष करिता जाला बरवा। वाढवी प्रेमा नित्य नवा। सुख जीवां उभयांच्या ॥९०॥ हे लक्ष्मीनारायण। भावोनि करी त्यांचें पूजन। पडो नेदी सेवेसि न्यून। आज्ञा मान्य करी त्यांची ॥९१॥ कल्पना नाणोनि मनांत। निर्विकल्पें सेवा करित। परी प्रेमळा मनीं तळमळत। शुद्ध चित्त नसे तिचें ॥९२॥ तथा क्रोधभरें दुःखित मानसीं। भलतेंचि कार्य सांगे गोरक्षासी। परी वीट तो नाणी चित्तासी। करी कार्यासी आज्ञापित ॥९३॥ मळमूत्रादि वस्त्रें धुवोन। आणी शुभ्र पाटव्य करोन। अंगीं आलिया न सांगे शीण। रात्रंदिन सेवेंत रत ॥९४॥ एकांत साधल्या सद्गुरुसी। प्रार्थुनी म्हणे चला देशीं। भेटीदेवोनि चर्पटासी। दीन जनांसी उद्धरावें ॥९५॥ वाट पहाती योगीजन। त्यांसी द्यावें जी दर्शन। भाविक लक्षिती चरण। तयांसी पावन करावें ॥९६॥ आपुला सोडोनिया योग। समर्थें अंगिकारिला येथें भोग। परी भोग नोव्हे हा होय रोग। करावा भंग विवेकें ॥९७॥ तुम्ही ज्ञानसिंधुप्रकाश सूर्य। सर्व सिद्धांमाजी आर्य। सर्व गुणें अंगीं चातुर्य। स्वहित कार्य जाणते ॥९८॥ तुम्हां वक्तृत्वा न तुळे बृहस्पती। तपतेजा हीन गभस्ती। ऐश्वर्या न तुळे उमापती। धन्य त्रिजगतीं तुम्ही थोर ॥९९॥ ऐसिया समर्थापुढें। काय दाहाणी व गर्जूं पवाडे। जेवीं काडवात सूर्यापुढें। तैसेंचि मूढें जाणविलें ॥१००॥ मी तव चरणींचा दास। तूं पुरविता होसी आस। हें जाणोनि समर्थास। करुणारस गाइला ॥१०१॥ हे परिसोनि दीनाची प्रार्थना। सद्गुरु दयाळा येऊं दे करुणा। जाणोनि येरूही कारणा। कृपें अभयदाना देइजे ॥२॥ मच्छींद्र म्हणे गोरक्षनाथा। म्यां जाणीतलें तुझिया अर्था। परी मनींची न सुटे ममता। प्रेमळा सर्वथा निघों नेदी ॥३॥ स्त्रीपुत्रलोभाची प्रीती। तोडितां होईल विपरीत गती। जातां दुःख प्रेमळेचित्तीं। बाळ खंती करील कीं ॥४॥ तैसेंचि जावें जरी उठोन। तरी मी प्रेमळेच्या वचनाधीन। तिचिया निरोपावीण। सहसा प्रयाण घडेना ॥५॥ येन्हवीं मज सकळांची खंती। रात्रंदिवस वाटे चित्तीं। तळमळतों परी न सुटे गुंती। काय याप्रती करूं सांग ॥६॥ प्रेमळा देई जरी सुटका। तरि निघावया न लगे घटका। प्रेमळेचा नेम नेटका। करवेना तुटका माझेनी ॥७॥ हें सद्गुरूचें वचन। गोरक्षें करूनिया श्रवण। म्हणे आतां विपरीत कारण। दावूं करोन अर्थसिद्धी ॥८॥ ती नेमे आज्ञेऐसी। सेवा करी दिवसनिशीं। साधावया निजकारणासी। सावध मानसीं सर्वदा ॥९॥ जेवीं कच गुरूचा सुत। संजीवनी साधावया नेमस्त। शुक्रआश्रमीं सेवा करीत। अति विनीत होवोनिया ॥११०॥

तेवीं प्रेमळेपासून । सद्गुरु मच्छिंद्र व्हाया स्वाधीन । यदर्थीं यागे आज्ञा प्रमाण । चुकों कारण नेदीच ॥११॥ सेवा देखोनि सरसी । प्रेमळा सांगे सखियांसी । तुम्ही मोहा गे या गोरक्षासी । गुरुपदासी पाववा गे ॥१२॥ ती आज्ञा मान्य सकळां । गोरक्षा अर्जविती वेल्हाळा । मृदुभाषणें हास्यलीला । कामकळा चेटविती ॥१३॥ कोण्ही सेवा करूं धांवती । आसनें वसनें भूषणें देती । मिष्टान्नें पात्रीं वाढविती । नमोनि प्रार्थिती कोण्ही एक ॥१४॥ कोणी करूं धांवती पादसेवन । कोण्ही करूं इच्छिती पूजन । कोण्ही मेवा देती आणून । कोण्ही उदकपान करा म्हणती ॥१५॥ कोण्ही तांबूल देती प्रियकर । कोण्ही गुंफोनि आणिती पुष्पहार । कोण्ही देती रत्नालंकार । कोण्ही कनकांबर वोपिती ॥१६॥ नानापरींचे उपभोग । दावोनि करिती कामिनी लाग । म्हणती दयाळा देईं संग । निववीं अंग आलिंगनीं ॥१७॥ तूं सकुमार आकर्णनयन । कनककांती सुहास्य वदन । सेवा करितां पावलासि शीण । स्वकरें निवारण करूं तो ॥१८॥ तुझें सकुमार मुखकमळ । तेथें भ्रमरी आम्ही लुब्धलों सकळ । तें हास्यें विकासतां दळ । सेवूं परिमळ तेथींचा ॥१९॥ अनंत पुण्य आमुचे गांठीं । तेंच या चरणा जाली भेटी । तेथें घालावी दृढ मिठी । हा हेतु पोटीं आमुच्या ॥१२०॥ म्हणोनि शरण जी जीवेंभावें । तुम्हां आलों अंगीकारावें । अंगसंगें सुखवावें । आनंदें राहावें सद्गुरूसह ॥२१॥ आपण न करावी कांहीं चिंता । सर्व उपचारीं असे सिद्धता । लागेल पदार्थ पुरवूं समर्था । अर्पोनिया माथा सत्य पदीं ॥२२॥ परी या दीनावरी करोनि दया । कृपायोगें दीजे अभया । विनटलों पदीं योगिराया । गुणालया आपंगी ॥२३॥ कामानळें तापलें शरीर । तूं रतिसुखघन वर्षे तुषार । तेणें निववीं आमुचें अंतर । जोडोनि कर विनवितों ॥२४॥ ऐसा नानापरी त्या ललना । मोहित बोलती कोमळ वचना । जेवीं शुक्रकन्या गुरुनंदना । सेवी कामना पूर्णार्थ ॥२५॥ परी कच जेवीं न मानी मात । तेवींच हाही गोरक्षनाथ । विषयभोगीं लोलिंगत । नोव्हेचि चित्त कदापि ॥२६॥ शुक छळावया देवांगना । नाना परीच्या करी यत्ना । परि तें न रुचे त्याच्या मना । करुनी नमना माय म्हणे ॥२७॥ तेवींच युवती कामें वेढिती । परी गोरक्ष निष्काम निश्चितीं । म्हणे माई हो न छळा मजप्रती । लडिवाळ निश्चितीं तुमचा मी ॥२८॥ विषयसुख हें नाशिवंत । आम्हां नाहीं त्याचा स्वार्थ । तुम्ही कां श्रमतां उग्याच व्यर्थ । न घडे हित त्यामाजी ॥२९॥ माय बाप बंधु बहीण । हे मज दिसती अवघे जन । दृश्य अदृश्य दोन्ही लक्षण । गुरु संपूर्ण भरलासे ॥१३०॥ भिक्षान्न आणी गुरुसेवा । याहून नावडे मज मेवा । नमन माझें सर्व जीवां । याची भावा जाणतों ॥३१॥ जेणें ज्या योनीसी जन्मावें । तेणें तेथील भोग भोगावे । हे इतरातें न रुचावें । हें वर्म जाणावें चतुरानीं ॥३२॥ कामविकारी ज्या नारी । त्या आम्हां रीसापरी । खरासीच आवडे खरी । वानरा वानरी युक्त कीं ॥३३॥ आम्हां धन आणी शेण । हिरा गारगोटीसमान । कासया दावितां भूषण । तुमचें गोडपण तुम्हांसी ॥३४॥ आम्ही योगी अमंगळ । समान मळ आणि परिमळ । नेणों उष्ण कीं शीतळ । कटु गूळ क्षार नेणों ॥३५॥ जो रुचेल पदार्थ ज्यासी । तोचि अर्पावा तयासी । बहु काय बोलूं बोलासी । आपुले मानसीं समजावें ॥३६॥ यावरी आग्रह जरी कराल । तरी आपुल्या सुखा नागवाल । खरखपंथाप्रती जाल । अनर्थ घ्याल करोनिया ॥३७॥ यापरी गोरक्षाची वाणी । पडतां कामिनींचें श्रवणीं । उग्याचि स्तब्ध जाल्या मनीं । वर्तलें जाणोनी निरोपिती ॥३८॥

परिसोनि प्रेमळेनें मात । म्हणे हें दिसतें विपरीत । यायोगें घडेल घात । ऐसें निश्चित वाटतें ॥३९॥
प्रेमळा पडली संकटडोहीं । म्हणे यासी करावें काई । सखिया म्हणती ते समयीं । सेवाचि घेई निकुरें तूं ॥१४०॥
सेवा करितां जाजावेळ । उबगोनि मार्गें उगा जाईल । याचि वर्माचें येथें बळ । उपाय सकळ येर वांया ॥४१॥
प्रेमळेनें धरोनि मानसीं । उसंत घेऊं नेदी त्यासी । आधिपत्य दिल्हें सर्वांसी । काम घ्यावयासी त्या हातीं ॥४२॥
तंव सर्वी चहूंकडोन । कामें सांगावीं त्यालागून । तितुकींही गोरक्ष करी जपोन । लक्षुनी चरण सद्गुरूचे ॥४३॥
तंव कोणे एके अवसरीं । उभयतां पहुडले मंचकावरी । अज्ञान मेनीनाथ शेजारीं । निद्रेभीतरीं निमग्न ॥४४॥
मागील रजनीचा अवसर । तंव जागृत जाला तो कुमर । म्हणे झाडा दाटला ऊठ सत्वर । रडे फार त्या नेटें ॥४५॥
तंव प्रेमळा म्हणे गोरखा । अरे बा बाळासि बाहेर ने का । झाडा फिरवी यासी देखा । उचली आवांका न धरवे ॥४६॥
गोरक्षें धावोनि तात्काळ । वेगीं जावोन उचलिला बाळ । उकरडां नेवोनी उतावेळ । क्रोध सबळ त्या केला ॥४७॥
तया आरंभिल्या दापचेष्टा । म्हणे मूत किंवा करी विष्टा । दोन्ही करितां बरव्या नष्टा । मारीन काष्ठा झोडीन तुज ॥४८॥
क्रूर बोलतां वाणी । बाळ दोन न करी संकोचोनी । दचके उभा राहे उठोनी । गोरक्ष नेवोनी घाली तया ॥४९॥
मंचकीं गेल्या करी रुदन । म्हणे झाडा आला गे दाटोन । येरी गोरक्षा सांगे पाचारोन । झाडा फिरोन आण यासी॥१५०॥
मागुतीं तया तेचि गती । ऐसी मांडिली तयाची विपत्ती । न कळे कांहींच मातेप्रती । बाळचित्ती बहु पीडा ॥५१॥
आतां सेजे पहुडविला । यायूने पोटशूळ उठला । तेणें बहु आक्रंदला । कोप आला मातेसी ॥५२॥
सुखशय्येचा प्रभातवेळ । तें तो करी बहु कोल्हाळ । पुसतां म्हणे न साहे कळ । झाडा सबळ लागला ॥५३॥
गोरक्षा ने यासी ऊठ । उचलितां न धरवे त्याचेनि नेट । तेणें उचलितां झटपट । झाडा सपाट त्या झाला ॥५४॥
तेणें बाळाचें भरलें वसन । अंगही भरलें संपूर्ण । येरें तैसाच आणोन । भरला म्हणोन सांगितलें ॥५५॥
मागुतीं प्रेमळा बोले गोरक्षासी । धुवोनी चोखट सुकवी त्यासी । नरक काढोनि वेगेसी । शुद्ध भूमिसी करावें ॥५६॥
गोरक्षें अवश्य म्हणोनी । नरक टाकिला तेव्हां काढोनी । भूमी वेगीं शुद्ध करोनी । बाळ घेवोनी चालिला ॥५७॥
गांवाबाहेर सरिता । तेथें होय बाळ नेता । शिळेवरी जाला आपटिता । प्राण जाता पैं जाला ॥५८॥
त्वचा शिरा मेद मांस । अस्थी वेगळ्या केल्या सुरस । क्षाळोनि टाकिलें रक्तमळास । स्वयें स्नानास सारिलें ॥५९॥
धेवोनिया पांची प्रकार । आणि बाळाचे नगअंबर । वाळें घालोनिया समग्र । आपण समोर पावला ॥१६०॥
नित्य कृत्याचें काज । आपण आचरता जाला सहज । भावें नमोनि गुरुराज । पूजा सतेज विस्तारी ॥६१॥
वस्त्र पात्रें सिद्ध करोनी । स्नान करवीं उभयांलागूनी । बैसवोनि आपलाले आसनी । कर जोडोनी राहिला ॥६२॥
उभयांचें अर्चन सरतां । देवनैवद्य जाला उरकिता । तैं पाचारिते जाले सुता । मेनीनाथा आवडीं ॥६३॥
पाचारितां बाळ न ये । माता म्हणे तो कोठें आहे । गोरक्षासी म्हणे त्यासी पाहे । आणी लवलाहें प्रसादा ॥६४॥
गोरक्ष म्हणे प्रेमळेसी बाळ घातला सुकावयासी । येरी म्हणे काय बोलसी । विचार मानसीं न करितां ॥६५॥
गोरक्ष म्हणे प्रभातें । तुवाच आज्ञापिलें मातें । धुवोनि सुकवी बाळातें । मग आम्हातें देइजे ॥६६॥

ती आज्ञा वंदोनि शिरीं । बाळ चोवट घुतला निर्धारीं । सुकूं घातला उपरी वरी । मत्याने नीरीं वाहविलें ॥६७॥
येरी म्हणे दिवस घटिका चार । आला तरी काय सुके सकुमार । जा आणी त्यासी सत्वर । वेळ फार जाली कीं ॥६८॥
ऐकोनि प्रेमळेचें वचन । गोरक्ष गेला उपरी चढोन । मेद मांस त्वचा अस्थी पूर्ण । शिरा घेवोन पावला ॥६९॥
शरिराचें पांच प्रकार । वस्त्र आणि अलंकार । ठेवी आणोनि उभयांसमोर । निवेदी समग्र पृथक्त्वें ॥१७०॥
तें देखोनिया विपरीत । प्रेमळे मांडिला आकांत । करें वक्षस्थळ बडवीत । वदनीं घालित मृत्तिका ॥७१॥
एकची जाला हाहाक्कार । फुटला तेव्हा शोकसागर । सकळांचे नेत्रीं वाहे नीर । पाहे चमत्कार गोरक्ष ॥७२॥
प्रेमळा म्हणे रे वैरिया । करोनी दाविली ही वरवी क्रिया । सूड घेतलासी निर्दया । नष्टा माया तुज कैंची ॥७३॥
मैंदा तुझें साधुपण । कळों आलें रें आम्हांलागोंन । उगा राहिलासी घात करोन । गला जळोन जोग तुझा ॥७४॥
तूं काळ कोठोनि आलासी । माझिया बाळा भक्षलासी । प्रसवोनि वांझ केलें मजसी । शिक्षा तुजसी लावीन ॥७५॥
मांगह्रदय तुझें कठोर । मारितां बाळ न भी अंतर । तूं हत्यार होसी निर्धार । मारीन सत्वर तुज आतां ॥७६॥
गोरक्ष म्हणे प्रेमळेसी । नाहीं जन्ममरण आम्हांसी । कैसी तूं कवणातें मारिसी । मिथ्या वदसी वां वाचे ॥७७॥
आम्ही मरणा-काळातें ग्रासिलें । रिपुविघ्नातें संहारिलें । आशालोभातें दवडिलें । कर्मा मुंडिलें सकळत्वें ॥७८॥
तूं केवीं करिसी आमुचा घात । आम्ही मुळींच असों घातातीत । बध्यतेचा मोडिला पंथ । आम्ही मुक्त सर्वदा ॥७९॥
तैं सकळ मिळोनी युवती । गोरक्षावरी जाजावती । नाना कुशब्दें ताडिती । वर्मी भेदिती एकसरा ॥१८०॥
बाळकाचा घेऊनि प्राण । बोलसी आगळें धीट होऊन । हे गोड न लगती वचन । दे - णोन राजसानें ॥८१॥
त्यावीण हा राज्यभार । शून्य दिसते अवघें मंदिर । चोरा आमुचा छत्रधर । दावीं सत्वर आम्हांतें ॥८२॥
मच्छींद्र म्हणे रे सुता । कां प्रवर्तलासी बाळघाता । आमुचे जीवीं जडली व्यथा । दुःखदाता जालासी ॥८३॥
करविला योगाचा अभ्यास । तें फळ आणिलें काय उपेगास । करोनि बाळकाचा नाश । जोडिलें यश हें काय ॥८४॥
गोरक्ष म्हणे जी गुरुनाथा । आपणची मागें बोललां होतां । कीं मेनीनाथाची न सुटे ममता । हाचि गुंता बहु मज ॥८५॥
तो मेनीनाथ तुम्हां सांडोनी । आनंदें पावला परमुवनीं । आतां ममता मिथ्या मनीं । कां धरोनी शोक करां ॥८६॥
ममता अनायासें तुटली । येयोनि मुक्तता तुम्हां जाली । आतां उभयतां ये वेळीं । चला सुस्थळीं मजसवें ॥८७॥
मनीं न वाहोनि चिंता । आनंदें असावें उभयतां । मौनभागें सेवा करितां । संप्रदाय समर्था सेवितील ॥८८॥
प्रेमळेसि होता मोहपाश । तो तिनेंच त्याचा करविला नाश । आतां उभयतां सावकाश । आचरा योगास आनंदें ॥८९॥
परिसोनी गोरक्षाचें वचन । प्रेमळा बोले क्रोधायमान । भलें भोंदू दोघे जण । घातक पूर्ण निर्दयी ॥१९०॥
माझें मज बाळ द्यावें । मग उभयतां येयोनि जावें । पापिष्ठा मुख न दावावें । काळें करावें आपुलें ॥९१॥
त्या सकुमार बाळासाठीं । माझा जीव होतो कष्टी । तेथें तुझ्या ह्या दांभिक गोष्टी । ऐकोनि पोटीं आग उठे ॥९२॥
अहा मेनीनाथा राजसा । मज तूं टाकोनि गेला कैसा । तुजसाठीं जाला जीव पिसा । प्राण सरसा सांडीन ॥९३॥
भेटीस येतील प्रजाजन । भेटी त्यांच्या घेईल कोण । काय सांगूं त्यांलागुन । काय वदन दाखवूं ॥९४॥

सायास करोनि बहुत । तूं मज जालासि गा प्राप्त । त्या लाभाचा केला घात । हो निःपात तयाचा ॥९५॥
आतां तुजऐसें निधान । मज प्राप्त होईल कोठून । मी परदेशी गा तुजविण । दावीं वदन एकदां ॥९६॥
अहा मेनी म्हणोन । करें बडवी आपुलें वदन । शीर धरेवरी आपटोन । निचेष्टित होवोन पडतसे ॥९७॥
सखया वेगीं सांवरिती । अट्टहास्यें मोहें आरडती । मच्छींद्र जीवीं तळमळती । दुःखें आरंबळती सर्वही ॥९८॥
प्रेमळा म्हणे गोरक्षा लागोन । जा परता न दावी वदन । तंव तो म्हणे मी गुरुवीण । सहसा येथून नव जाये ॥९९॥
तंव सख्या बोलती गोरक्षासी । दे आमुच्या मेनीनाथासी । मग तूं सुखें नेई सद्गुरुसी । आडवें तुजसी न येऊं ॥२००॥
प्रेमळा म्हणे बाळा यावें । आनंदें आपुल्या गुरूसी न्यावें । यशध्वजा उभारावें । कीर्तीनें भरावें त्रिभुवन ॥१॥
गोरक्ष म्हणे कार्याअंतीं । जन सर्व फिरोनी पडती । प्रेमळा म्हणे कल्पांतीं । असत्य निश्चितीं बोल नोव्हे ॥२॥
मच्छिंद्र म्हणे ते वेळां । असत्य न वदे ही प्रेमळा । दावी मेनीनाथा बाळा । आनंदसोहळा प्रगटवी ॥३॥
तंव गोरक्ष प्रार्थी सद्गुरूसीं । तुझी लीला तूं जाणसी । मी नेणें कर्तव्यपणासी । आपुल्या ब्रीदासी सांभाळीं ॥४॥
सद्गुरु तूं गा पतितपावन । सदय उदार सर्वज्ञ पूर्ण । तुझें अभयकल्याण । निमित्तासी कारण केलें मज ॥५॥
तूंचि येथें कृपा करिसी । तरी उठावया वेळ न लगे बाळासी । जें मुखें आज्ञापिसी । तेंचि निश्चयेंसी घडेल ॥६॥
एवं विनवोनि अस्थि नाडी । मेद मांस त्वचा सांवडी । मिश्रित करोनी तांतडी । लवडसवडीं वस्त्र झांकी ॥७॥
सद्गुरूचरणातें लक्षोन । उदक सिंचिलें अभिमंत्रोन । विभूति त्यावरी टाकोन । सिंगी वाजवोन ऊठ म्हणे ॥८॥
तैं निद्रीस्ताचें परी । मेनीनाथ उठला झडकरीं । धांवोनि गोरक्षाचे चरण धरी । म्हणे कां माघारी आणिलें ॥९॥
सुखसागरीं आनंदभरित । तुवां टेविलें होतें निश्चित । आतां येथें आणोनि परत । दुःखसागरांत लोटिलें ॥२१०॥
गोरक्ष म्हणे न करीं चिंता । शरण जाय ह्या मच्छींद्रनाथा । त्याची कृपा तुज होतां । पावसील सौख्यता अभयत्वें ॥११॥ तें परिसोनि मच्छींद्रपायीं । मेनीनाथ जडला ते समयीं । म्हणे मी अनन्य दास तुझा पाहीं । अभय देईं गुरुवर्या ॥१२॥ त्याची विनयता देखोन । सद्गुरु देती अलिंगन । वरदहस्त माथां ओपून । केला स्वाधीन प्रेमळेच्या ॥१३॥
त्या आनंदासी नाहीं पार । सर्वही करिती जयजयकार । गोरक्षपदीं लोटल्या समग्र । वांटिती साखर प्रेमाची ॥१४॥
प्रेमळा म्हणे योगिराया । मज अनाथावरी केलीस दया । काय उतराई होऊं पायां । केलीस छाया पूर्ण कृपें ॥१५॥
नेणोनि तुझिया सामर्थ्यासी । वृथा गांजिलें म्यां तुजसी । तूं केवळ ईश्वर होसी । कौतुक आम्हांसी दाविलें ॥१६॥
तें कौतुक पाहोनि डोळां । आनंद झाला जीवीं सकळां । परी अज्ञान आम्हीं अबळा । गांजिलें तुजला बहु फार ॥१७॥
म्हणोनि प्रार्थितों पुरुषोत्तमा । आल्या अपराधाची करी क्षमा । मूर्ख मलिना आम्ही रामा । चुकलों वर्मा तारीं तूं ॥१८॥
गोरक्ष म्हणे वो माते । क्षमापद हें सद्गुरुतें । सेवकत्वचि शोभे मातें । हें कां तुम्हांतें न कळेची ॥१९॥
त्या मच्छींद्रासी होवोनि शरण । मागणें तें मागा कृपादान । तो सर्व योगें उदार पूर्ण । करील पावन अनन्यातें ॥२२०॥
मानोनि गोरक्षाची सूचना । सरळ नमिती मच्छींद्रचरणा । करूनी षोडशोपचारें पूजना । करिती प्रार्थना सप्रेमें ॥२१॥
जी स्वामी अनाथनाथा । दीनोद्धारणा कृपावंता । तव पदीं शरण जालों समर्था । तारीं आतां पामरांतें ॥२२॥

अनंत अपराध आम्हीं केले। स्वहितार्थ तुझें व्रत भंगिलें। दयाळा गुणदोषत्वा नाहीं पाहिलें। पूर्ण केलें मनोरथ ॥२३॥ तूं सदय आणि कृपासागर। हें जाणोनि प्रार्थितों वारंवार। अज्ञान दीन आम्हीं पामर। करी उद्धार आमुचा ॥२४॥ ऐसी परिसोनि विनयवाणी। कृपें द्रवला मोक्षदानी। म्हणे हा मेनीनाथ तुम्हांलागोनी। ज्ञान बोधोनी उद्धरील ॥२५॥ राजछत्र सिंहासन। सर्व भोग भोगील सुलक्षण। सकळ योग साधोन। सांप्रदाय भिन्न वाढवील ॥२६॥ वचन स्वीकारिती अवळा। तंव नार्यें अंकीं घेतलें बाळा। सिंगी सयली घालोनि गळां। आणी मेखला बाणविली ॥२७॥ लेवविले वस्त्रअलंकार। नूतन उभारिलें छत्रचामर। सुमुहूर्ते समर्पोनी राज्यभार। समारंभ थोर करविला ॥२८॥ सकळ स्वदेशी प्रजाजन। देती कारभार तेव्हां आणोन। युवराज्य प्रेमळेनें सोपोन। नीतिकारण निवेदिलें ॥२९॥ सकळां तोषवोनि निश्चितीं। उपासना लावोनि स्थापिली भक्ती। आनंदल्या देखोनि युवती। येतों म्हणती आम्ही आतां ॥३०॥ गोरक्ष म्हणे प्रेमळेसी। आतां आज्ञा द्यावी जावयासी। परिसोनिया सद्गद मानसीं। गुंतली वचनासी न बोलवे ॥३१॥ म्हणे गोरक्षा लोभ सांडोन। स्वामींस जातोसि घेवोन। आतां पुनरा कैंचें दर्शन। प्रारब्धहीन आम्हीं कीं ॥३२॥ गोरक्ष म्हणे वो माये। स्वामीप्रसाद हा मेनीनाथ होये। याकडे पाहोनि स्वस्थ राहे। आठवोनि पाय स्वामीचे ॥३३॥ आम्हीं सदा तीर्थवासी। रमतां पावूं या ठायासी। आमुचा प्राण तुजपासीं। न विसंबों यासी क्षणमात्र ॥३४॥ यालागीं आम्हां येथें येणें। दर्शन लाधसील याचे गुणें। स्वामीवरदें काय उणें। आनंदे भोगणें निजभाग्या ॥३५॥ मेनीनाथाचा लोभ अंतरीं। तैसाचि माये असों दे मजवरी। द्वैत येथें कांहीं न धरीं। लेखीं सरी समान दोघां ॥३६॥ हेचि विनंती माते तुम्हां। मार्गस्थ। लाविजे वेगीं आम्हां। भंगो नेदी लोभप्रेमा। निवेदल्या क्रमा चालवी ॥३७॥ असो यावरी एकांतभुवनीं। प्रेमळा लागे मच्छींद्रचरणीं। सद्गद हृदयी गहिंवरोनी। नम्र भाषणीं प्रार्थिलें ॥३८॥ मच्छींद्र म्हणे वो सुंदरा। मज ध्यायें तूं सदा अंतरीं। तुजपासोनि नाहीं दूरी। भावापरी मी तया ॥३९॥ मद्विभूति हा मेनीनाथ। पुढें होईल हा विख्यात। यावरी माझा लोभ बहुत। तूंही अत्यंत वाढवीं ॥२४०॥ देशीक वाट पाहती जन। मालागीं गोरक्ष जातो घेवोन। तुम्हीं आनंदे राज्य पूर्ण। मम वचन मानोनी ॥४१॥ प्रेमळा विनवी जी नाथा। सेवे न्यावी कांहीं संपता। स्वामी म्हणे गोरक्ष ऐकतां। करील निर्भर्त्सना उभयांची ॥४२॥ मग प्रेमळेनें गुप्त धन। कनकविटा दिधल्या दोन। तें न कळतां गोरक्षालागून। झोळीत घालून दिधल्या ॥४३॥ सकळ नागरिक मिळोनि युवती। नमोनि करिती विनंती। लोभ असों द्या म्हणती। वाटे लाविती उभयांसी ॥४४॥ सद्गद होवोनि अवळा। मूर्ती न्याहाळिती वेळोवेळां। धन्य या योगियांची लीला। आनंद सकळां करविला ॥४५॥ तै मच्छींद्र म्हणे सकळांसी। आनंदे राहा आश्रमासी। वेळ होतो आतां आम्हांसी। पुढील मार्गासी उरकावया ॥४६॥ आज्ञा वंदोनी उभयांची। सोय धरिली निजआश्रमाची। विकळ वृत्ति प्रेमळेची। कीर्ती त्यांची आठवोनी ॥४७॥ मच्छींद्रगोरक्ष आख्यान। मुखें करिती सदा वर्णन। धन्य योगी हे जगपावन। मागुती दर्शन केव्हां घडे ॥४८॥ अद्भुत सत्संगाचा महिमा। भक्तिभाव जडला प्रेमा। त्या ध्यासेंची पावन रामा। सुख आरामा पावल्या ॥४९॥ हा सत्संग सर्वांत थोर। ताप निरसोनी निवे अंतर। मावळती सर्व विकार। भवभय समग्र नासिती ॥२५०॥

सत्संगें होय समाधान। सत्संगें मिटे अज्ञान। सत्संगें पापदहन। तुटे बंधन सत्संगें ॥५१॥
सत्संग होतां भ्रम जाय। सत्संगें निवटती अपाय। सत्संगेनी पवित्र। काय सत्संगेंचि होये लाभ बहु ॥५२॥
सत्संगें कुकर्मे नासती। सत्संगें सत्कर्मे घडती। सत्संगें भेटे श्रीपती। स्वात्मप्राप्ती सत्संगें ॥५३॥
सत्संग सर्वांतें तारक। सत्संग हा कल्याणदायक। सत्संगें सर्वदा सुख। निरसे दुःख सत्संगें ॥५४॥
जया सत्संगाची लाधली जोडी। तया दत्तप्रबोधीं उपजे गोडी। तो पावे परात्पर थडी। उभवी गुढी लोकत्रयीं ॥५५॥
सत्संगाचा लाभ जाला। तैंच दत्त कृपाळू पावला। अभयवरदें बोलवी बोला। बोल आपुला मूढमुखें ॥५६॥
रसने देवोनि स्फूर्तिरस। ग्रंथीं कथा वाढवी सुरस। सेवितिया गोडी विशेष। दिवसेंदिवस जडे प्रीती ॥५७॥
श्रीदत्तकृपा अलोलिक। वदविता ग्रंथीं तोचि देख। पुढिले प्रसंगीं कौतुक। कथा सुरेख हेचि हे ॥५८॥
संत सद्गुरु अनंत। त्यांचा किंकर विनवी सुत। सर्वांपुढें जालों नत। करा साह्यार्थ दासाचा ॥५९॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रवणेंचि पुरती मनोरथ। भाविक परिसोत श्रोते संत। नवत्रिंशोध्यायार्थ गोड हा ॥२६०॥

॥ नवत्रिंशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ४० वा

श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

नमो श्रीदत्तयोगिया । आनंदकंदा सदयहृदया । सर्वात्मका गुणवर्या । प्रणम्य पायां निजभावें ॥१॥ तूं अनादि योगी महासिद्ध । निर्विकार निरामय निर्द्वंद्व । जगदोद्धारार्थ हा प्रबोध । ग्रंथीं संवाद करवीसी ॥२॥ षड्गुणसंपन्ना गुरुदत्ता । तूं सर्वज्ञ गा ज्ञानदाता । जीव उद्धरावया समर्था । सिंहाद्रिमाथां प्रगट तूं ॥३॥ शरणागताचा देखुनि भाव । स्मरणमात्रे घेसी धांव । जाणोनि त्याचा अभिप्राव । हेतु सर्व पुरविसी ॥४॥ हा निश्चय परिसोनि श्रवणीं । म्यां संकटीं प्रार्थिलें तुजलागोनि । तें तूं तात्काळ प्रगटोनी । पुरविली धणी अंतरींची ॥५॥ होसी कृपाळु तूं दत्तराया । मज दीनावरी केलीस दया । लाविला दत्तप्रबोध वर्णावया । देउनि अभया निजदासा ॥६॥ गत कथाध्याय सरतां । तोषवोनी प्रेमळेच्या चित्ता । मच्छिंद्र गोरक्ष उभयतां । पुसोनि पंथा लागले ॥७॥ बाह्य देशीं बहुत काळ । गोरक्षआदि योगी सकळ । राहिले होते ठायीं निश्चळ । चौरंगी प्रेमळ त्यामाजीं ॥८॥ हे गुरुशिष्य दोघे जण । मिळाले योगियांमाजीं जावोन । चरपटें धांवोनि धरिले चरण । जालें आलींगन सकळांसी ॥९॥ अवघे मिळोनिया योगी । आनंदे लागले तेव्हां मार्गी । सेवा नित्य करी चौरंगी । श्रम अंगीं न मानी तो ॥१०॥ यापरी मल्याळ देश उल्लंघोन । मार्ग क्रमितां पावले गोकर्ण । तेथें महाबळेश्वरलिंग विराजमान । देव संपूर्ण तिष्ठती सदा ॥११॥ ते स्थळीं शोभा विशेष । पाहोनि आनंदले मानस । मच्छींद्र बोले चरपटास । तूं योगास साध येथें ॥१२॥ गोरक्ष वदे ते अवसरीं । चरपटा वचन अंगीकारीं । गुरुआज्ञा वंदोनि शिरीं । राहें निर्धारीं या ठायां ॥१३॥ चौरंगीनें करोनि श्रवण । म्हणे जी आज्ञा मजप्रमाण । निरोपिल्या रीतीं योग साधीन । न करीं अनमान सहसाही ॥१४॥ मग गोरक्षें सुमुहूर्त योजिला । तैं चौरंगी आसनीं बैसविला । सद्गुरु कृपाळू तें वेळां । बोधी तयाला योगयुक्ती ॥१५॥ लावोनिया योगमार्गासी । चरपट बैसविला निश्चयेंसी । सर्वे होते योगी तापसी । तेही मच्छींद्रासी विनवीती ॥१६॥ या चरपटाचे संगें करून । आम्हीही आचरूं योगसाधन । आनंदला मच्छींद्र ऐकोन । गोरक्षही पूर्ण सुखावला ॥१७॥ म्हणे येरयेरां सांभाळावें । योग युक्तीनेंचि साधावे । मन कोठें न दवडावें । साधनीं असावें निमग्न ॥१८॥ योग सिद्ध होतां पूर्ण । मागुतीं घ्यावें गुरुदर्शन । येर कोठें न करा गमन । बांधा वचन गांठीसी ॥१९॥ यापरी निवेदोनि त्यांसी । शिष्यगुरु निघती वेगेंसी । चरपट सद्गद मानसीं । नमीं चरणांसी सद्गुरुच्या ॥२०॥ स्फुंदस्फुंदोनि करी प्रार्थना । म्हणे उपेक्षोनी जातां मज दीना । पुढतीं केधवां पाहीन या चरणा । कृपाघना गुरुवर्या ॥२१॥ जैसी तूं श्रेष्ठ गुरुमूर्ती । तेवींच ज्येष्ठ बंधु गोरक्ष निश्चितीं । उभय जवळ नसतां मजप्रती । वाटेल खंतीं काय करूं ॥२२॥ उभयांचा प्रेमा मजवरी । असोनि जातां टाकोनि दूरीं । हे चरण निर्धारीं । केधवां तरी पाहीन ॥२३॥ मच्छींद्र म्हणे न करीं चिंता । सत्य तूं मज भेटसील मागता । साधी आपुलिया स्वहिता । न करीं वार्ता मोहाची ॥२४॥ गोरक्ष म्हणे निजमानसीं । भावें आराधी नित्य सद्गुरूसी । तया दर्शनेंचि सुखावसी । आनंदें राहसी अभय हे ॥२५॥ यापरी तयाते बोधवुनी । आणि योगिजनातें पुसोनि । उभयतां निघाले तेथोनी । रामेश्वर नयनीं पाहावया ॥२६॥

मार्ग क्रमिती अतित्वरां। चालतां पावले रामेश्वरा। देवक्षेत्र सागरा। पाहोनि मावारां निघती ॥२७॥
नाना तीर्थें क्षेत्रें पाहत। संत मुनि योगियां विलोकित। लक्षोनिया पूर्वपंथ। देश पर्वत उल्लंघिती ॥२८॥
अति दुर्घट मार्ग देखतां। कीं पर्वत दरी घोर असतां। मच्छींद्र पावोनि भयचिंता। होय बोलता शिष्यासी ॥२९॥
अरे ही भयानक दरी। पाहतां भय उपजे अंतरीं। तूं पुढें जाऊं नको दूरी। मजबरोबरी चाले उगा ॥३०॥
गोरक्ष म्हणे मच्छींद्रासी। कैंचें भय येथें आपणासी। निर्विकार निर्द्वंद्व असतां मानसीं। भय तयासी कैंचें मग ॥३१॥
नैराश्य निःस्पृह सर्वदा। तयासी कैंची भयबाधा। चित्त शुद्ध ज्याचें सदा। न झळंबे कदा भय कांहीं ॥३२॥
सर्वांभूतीं जो समान। कदा नेणें जो भेदभान। परधन कांता जया वमन। तया कोठून भयबाधी ॥३३॥
अहो या कारण भयाचें। तें तूं तंव जाणसी साचें। म्यां काय बोलावें वाचें। लक्षण तयाचें आगळिक ॥३४॥
परी किंचित बोबडे वचनीं। निवेदितों आतां स्वामिचरणीं। तें प्रेमें घेइंजे परिसोनी। वाढींवपणीं मी न बोलें ॥३५॥
लोभ आशा मोह ममता। काम क्रोध मद मत्सरता। दंभ आणी अहंता। कारण घाता असती हे ॥३६॥
द्वेष निंदा भेद वाद। वैरत्व घात विपाद। हाट आगळिक संवाद। घातक शुद्ध असती हे ॥३७॥
चोरी जारी चुगलपण। अभिलाष कपट कुटिल पूर्ण। तृष्णा कल्पना भ्रांतीक जाण। रूप गुणं अत्यंत ॥३८॥
इच्छा वासना भुली। हे गुण घालविती घालीं। यांची पडूं नेदी जो साउली। भय काळीं त्या नाहीं ॥३९॥
आपण तो वीतरागी। सदा फिरतो निःसंगी। सर्व जाणती हे जोगी। पूज्य जगीं सकळातें ॥४०॥
आपण निर्लोभ सर्वदाही। अवनीं वावरतां भय नाहीं। आनंदें चला लवलाहीं। सुस्थळ ठायीं निवासा ॥४१॥
यापरी करोनि भाषण। स्वच्छंदें करिती स्थिर गमन। ज्ञानचर्चा निरोपण। श्रवण पठण चालतां ॥४२॥
गोरक्षें निरोपिला संवाद। परिसोनि मच्छींद्र राहिला स्तब्ध। आपुले वित्त रक्षी सावध। नेदीच भेद लोभयोगें ॥४३॥
कनकविटांची झोळी। आपण वाहे कक्षास्थळीं। गोरक्ष असोनी जवळी। न वदे जाली जड घे तूं ॥४४॥
परी गोरक्ष सच्छिष्य उत्तम। जाणे सद्गुरुसी होती श्रम। त्या घावया सुखविश्राम। तो गुणधाम प्रार्थी तया ॥४५॥
म्हणे जी स्वामी सद्गुरुनाथा। श्रम होती तुम्हां चालतां। तरी झोळी मी वाहतों समर्था। ती द्या आतां मजपाशीं ॥४६॥
परी मच्छींद्र मनीं लोभ विशेष। झोळी न द्यावी वाटे त्यास। म्हणे तूं पावसी श्रमास। झोळी कासयास घेसी तूं ॥४७॥
येरू म्हणे सद्गुरुराया। तव कृपें न श्रमे माझी काया। अनमान न करीं द्यावया। पाव विसावया क्षणभरी ॥४८॥
शिष्याचा आग्रह देखोन। करी झोळी त्याचे स्वाधीन। परी अंतरींचें कारण। कदा बोलोन न दावी ॥४९॥
क्षणक्षणां दे घे झोळी। स्थिर न ठेवी कदा काळीं। उभयपक्षीं फिरवी पाळी। चालतां कुस्थळीं भय वाहे ॥५०॥
मागुतीं गिमिड कानन। देखोनि पर्वत दरी दारुण। म्हणे रे गोरक्षा हें विपिन। अति कठिण दिसतसे ॥५१॥
हें स्थळ दिसे भयंकर। येथें वसत असतील चोर। आपण दोघे कोण विचार। कैसे पार पडूं सांग ॥५२॥
गोरक्ष म्हणे जी स्वामिया। किमर्थ वाहतां येथें भया। तुमची असतां पूर्ण दया। तस्कर कासया पीडितील ॥५३॥
काय आहे आपणापाशीं। म्हणोनि भय वाहावें मानसीं। जो कोण्ही भेटेल मार्गासी। तो विनय पायांसी होईल कीं ॥५४॥

झोळी तुंबा किंगरी । कंथा सयली अंगावरी । वाणा पुंगी परोवरी । काय तस्करीं न्यावया ॥५५॥
हे तयांसी काय करावें । येणें काय त्यांचें उदर भरावें । तस्करभय मज न संभवे । आनंदें चलावें निजपंथें ॥५६॥
सिंह व्याघ्र वृक रीस । हे तंव मित्र असती आम्हांस । येर कोण गणी श्वापदांस । नाग सर्पास वृश्चिका ॥५७॥
तव दयेचें सामर्थ्य बहुत । पिशाच्च राक्षस पादाक्रांत । यक्षिणी डाकिनी भूत प्रेत । कोण मानीत मश्यका त्या ॥५८॥
नाणोनि कांहीं कल्पनेसी । स्वस्थ असावें सदा मानसीं । पंथ क्रमावा सावकाशीं । सुखसंतोषीं स्वानंदे ॥५९॥
वेदांतविषय आध्यात्मिक । मज तें ज्ञान बोधा चोख । मी तंव असे आर्थिक । कृपा आवश्यक कीजे जी ॥६०॥
मज कृपें ज्ञान बोधितां । सहज पंथ उरके चालतां । आनंद उपजविजे समर्था । दुश्चित वार्ता सोडोनि ॥६१॥
यापरी विनवी तो गोरक्ष । परी तेथें न लागे गुरूचें लक्ष । भयार्थ काननीं गुंतले अक्ष । कनकीं दक्ष रक्षणा ॥६२॥
तेणें न सुचे आन कांहीं । न बोलोन राहे उगला ठायी । चिंताचि भयें वाहे देहीं । स्थिर नाहीं मन तेणें ॥६३॥
गोरक्षें लक्षोनि गुरूसी । म्हणे कोण भ्रम पावला यांसी । कांहीं न बोधिती ज्ञानासी । शोधूं कारणासी या हेतू ॥६४॥
हेंचि गमे आतां मजलागीं । बहुकाळ होते स्त्रियांचे प्रसंगीं । तेथें विषयसुख लागलें अंगीं । रंगले रंगीं मोहाच्या ॥६५॥
तेथेंचि गुंतले घाटे मन । म्हणोनि न सुचे निरोपण । कीं एकाएकीं काढिले तेथोन । देखोनि विपिन भय चित्तीं ॥६६॥
तरी करावया चिंता निवटी । काढू आतां ह्याचि गोष्टी । मग जोडोनि करसंपुटी । मौळ पदतटीं ठेविला ॥६७॥
म्हणे जी सद्गुरू दातारा । माझी विनवणी अवधारा । काय वाटतें तुमच्या अंतरा । तें दीनोद्धारा निरोपिजे ॥६८॥
ऐसें बहुतापरी विनविलें । परी मच्छींद्र कांहीं न बोले । मग गोरक्षेंही मौन्य धरिलें । उगलाचि चाले सद्गुरुसवें ॥६९॥
उभयही तेव्हां मार्ग क्रमिता । योगें पावले शैल्यादि पर्वता । घोर निबिड कांतार अवचितां । चकित पाहतां मानसीं ॥७०॥
अतिपर्वत तो उंच विशाल । गगनचुंबित गेले द्रुम सकळ । माजी न दिसे सूर्यमंडळ । करिती कोल्हाळ वनचरें ॥७१॥
परम भयानक तें कांतार । माजीं विशाळ फिरती वनचर । धैर्यवंता न धरवे धीर । कांपे अंतर थरथरां ॥७२॥
तेथें तस्करांचा वास । मार्ग न फुटे एकट्यास । ऐशा अघोर ठायास । येणें उभयांस पैं झालें ॥७३॥
तया स्थळातें पाहोन । मच्छींद्र झाले कंपायमान । मुखें न बोलवे वचन । न चलती चरण चालतां ॥७४॥
मच्छींद्र चाले मंद मंद । तेवींच गोरक्षक उचली पद । मुखें न वदनी शब्द । जाणोनि छंद वर्ते तो ॥७५॥
गोरक्ष निर्भय मानसीं । आनंदरूप सदा संतोषी । कांहींच दुःख नेदी सद्गुरूसी । सादर सेवेसी वृत्ति ऐसा ॥७६॥
तंव मच्छींद्रें धरोनि अवसान । काय बोले तयासि वचन । वारे हें दिसतें कठिण स्थान । भय दारुण मज वाटे ॥७७॥
हीं निबिड स्थळें दिसती । सत्य येथें तस्कर असती । कोणी न मागे एक पंथीं । असेल भीती निश्चयें ॥७८॥
गोरक्ष म्हणे परिसा वचन । ज्यांचे गांठीस असेल धन । तयांसी भीती प्रमाण । वां हो आपण निर्भुजावें ॥७९॥
ज्याचे पदरीं असेल जर । तयामार्गेचि बहुत डर । आपण वित्तापासोनि दूर । असतां घोर कायसा ॥८०॥
आपण जोगी भिकारी । भिक्षा मागतों घरोघरीं । अणुमात्र संचय नसे पदरीं । काय तस्करीं न्यावें सदा ॥८१॥
गलित जीर्ण अंगीं वसन । काखेंत झोळी नेसलों कौपीन । वाणा अंगीं भस्मोद्धारण । पुसतें कोण वस्त्रांसि या ॥८२॥

आपण जोगी उदास। त्यजोनि यावरतीं आशापाश । हें पाहतांच कळतें जगास। कदा उपसर्गास न लाविती ॥८३॥
निर्भय मार्गी आनंदें क्रमावा। कळे तेथें पाविजे विसावा। प्रीतीं आदिनाथ स्मरावा । विकल्प नाणावा आन कांहीं ॥८४॥
मच्छींद्र म्हणे काय जल्पसी । भय तों असे सर्वांसी । हा विचार का न कळे तुजसी उगा जाचिसी कां व्यर्थ ॥८५॥
देखोनि सद्गुरुची कोपता। विचार पडला गोरक्षनाथा। म्हणे कोण स्वामीसी चिंता। भय भीतता न कळेची ॥८६॥
याचा शोध करावया । कांहीं पाहिजे केली क्रिया । ही भीती अंशावांचोनिया । नुपजे यावां सर्वथा ॥८७॥
मग चालतां मंद गतीं । गोरक्षें मांडिली तेव्हां युक्ती । श्रीगुरुसी करी विनंती । तुम्ही श्रमलेती बहु फार ॥८८॥
ओझें झोळीचें मज द्यावें। रिक्त पंथें आपण चालावें। निबिड कानन उरकावें। विश्रांतीं बैसावें रम्य स्थळीं॥८९॥
वचन मानलें सद्गुरुसी। झोळी दिधली गोरक्षासी। मार्गे पुढें चालती वेगेसी। कठिण पंथासी उरकिती ॥९०॥
पुढें मच्छींद्र लगबगें जाय। गोरक्ष मंद गतीं मार्गे राहे। दुरावतां गुरु स्थिर होय। झोळी पाहे सोडोनिया॥९१॥
वेगी पाहतां सोडोन। तो कनकविटा निघाल्या दोन। म्हणे हें सद्गुरुसी भय दारुण। आलें कळोन मजलागीं॥९२॥
गोरक्ष केवळ शंकर। नैराश्य निर्लोभ दिगंबर। तया नावडे संग्रहविचार। योगेश्वर निर्भय तो ॥९३॥
परधन आणि परकामिन। हे तंव तया वाटे वमन। निर्विकार वर्ते आनंदघन। सुखसंपन्न सर्वदा ॥९४॥
नैराश्यवृत्तीं निर्मळ। तेथें कैंचा बाधी मळ। गव्हळींच शोभे अवघा खळ। भास्करीं काजळ लागेना ॥९५॥
तैसा गोरक्ष कांचनीं। लोलिंगत कदा नोव्हे मनीं। तात्काळ विटा दिधल्या फेकोनी। दिल्हें दवडोनी भयावें ॥९६॥
टाकिलें घळे सद्गुरुसी। म्हणुनी उपाय योजिला त्यासी। पाषाणचिपा सम पाडेसी। झोळींत वेगेंसी बांधिल्या॥९७॥
मग झोळी उचलोनि त्वरित। अति लगबगें पंथ क्रमीत। जेथें होते सद्गुरुनाथ। पावला धांवत त्यापाशीं ॥९८॥
चालतां रम्य स्थळ देखिलें। विश्रांतीसी दोघे बैसले। तैं सद्गुरु गोरक्षासी बोले। मार्गे राहिले कवण काजा॥९९॥
येरू म्हणे शंका दाटली। म्हणोनि मातें वेळ लागली। आपण आलेति पावलापावली। विलंबता दिसली यायोगें ॥१००॥ तंव मच्छींद्र बोले वचन। भय सरलें कीं नाहीं येथून। गोरक्ष बोले कर जोडोन। भय टाकोन आलों पुढें ॥१॥
तंव सद्गुरु आनंदले। म्हणती आतां बरवें जाहलें। गोष्टी करिती आनंदमेळें। सुखकल्लोळें तें ठायीं ॥२॥
गोरक्षासी म्हणे ते समयीं। श्रमलासि मातें झोळी देईं। ऊठ पंथ क्रमूं लवलाहीं। अरळ संदेही नाणी तूं ॥३॥
झोळी देवोनि गुरुनाथा। उरकिते जाहले पुढील पंथा। तंव सात पर्व त्या पर्वता। पुनर निबिडता पावली ॥४॥
आणिक दचकलें गुरूचें मानस। मागुती पुसती गोरक्षास। भय आहे काय या स्थळास। मज उदास वाटतसे ॥५॥
गोरक्ष म्हणे भय सरलें। स्वामी तें तों मार्गे राहिलें। आतां कां वाहतां उगलें। मन मोकळें सुखें चला॥६॥
चढ उतरतांप वें पर्वताचे। अवघड रान दिसतां साचें। मन धुकधुकी सद्गुरूचें। बोले वाचें शिष्यासी॥७॥ अरे हे दुर्धर कानन। देखोनि भयाभीत माझें मन। केथवां जाईल उतरोन। हें मजलागून कळेना॥८॥ तुज तों न वाटे कांहीं भय। परी जैं घडोनि येईल अपाय। तेव्हां तूं करसील काय। मज तों उपाय दिसेना ॥९॥ जोंवरी न पावू विश्रांतिस्थळा। तोंवरी उठती हृदयीं भयाच्या ज्वाळा। उशीर न लागे येतां काळा। प्रसंगी पाळा कोणीकडे ॥१०॥

अरे संघ जरी असतां बहुत । तरि मनीं न होतो भयाभीत । एकटे मार्गी दोघे निश्चिंत । भय अद्भुत वाटते ॥११॥ गोरक्ष म्हणे गुरुराया । शपथ वदोनि विनवितों पाया । मागेंचि टाकोनि आलों भया । शिणवितां काया व्यर्थ का ॥१२॥ भय तें राहिलें अत्यंत दुरी । तुम्ही आनंदरूप असावें अंतरीं । मी मिथ्या न बोलें निर्धारीं । असत्य वैखरी झडेल ॥१३॥ ऐसा वाग्वाद करितां । मार्गी चालले उभयतां । तंव मच्छींद्र जाला झोळीविलोकिता । दिसे न्यूनता त्यामाजीं ॥१४॥ उणीव भासतां आली कल्पना । म्हणे दिसनसे विपरीत भावना । मग धैर्य न पावेचि मना । म्हणे पाहूं खुणा आपुल्या ॥१५॥ झोळी ठेवोनि खालुतीं । वेगीं सोडोनि पाहे ग्रंथी । तंव पाषाणचिपा लागल्या हातीं । विटा न दिसती कनकाच्या ॥१६॥ ठेविलें न पडतां दृष्टी । अहा म्हणोन कपाळ पिटी । कोण कर्म लागलें पाठीं । सोडिली गांठी अभागें ॥१७॥ आक्रोश हाहाःकार करी । अंग टाकी धरणीवरी । म्हणे कोण निर्दय आला वैरी । जेणें विटा चोरी नेल्या कीं ॥१८॥ कोण दुष्ट भवला चांडाळ । तेणें वित्त माझें नेलें सकळ । तंव गोरक्षें जोडोनि करकमळ । चरणीं मौळ ठेविला ॥१९॥ प्रार्थोनि म्हणे काय जालें । किमर्थ शोकातें आरंभिलें । तें मज पाहिजे आतां कळलें म्हणोनि विनविलें सदयासी ॥२०॥ मच्छींद्र म्हणे गोरक्षासी । प्रेमळेनें दिधलें कनकासी । हें उपेगी पडेल जीविकेसी । सांगे मजसी गुप्त ठेवा ॥२१॥ तें तुज मी न जाणवतां किंचित । दोन कनकविटा ठेवीं झोळींत । तयासी ओढवला घात । बहु अनर्थ जाला कीं ॥२२॥ आतां यासी काय करावें । कैसें पडेल मज ठावें । उभयांत तिसरें आसावें । तरिच पटावें त्याच्या गळां ॥२३॥ गोरक्ष म्हणे यथार्थ । आपण ही बोलिलेति मात । तिसरेंही होतें उभयांत । तेणेंचि विक्षिप्त तुम्हां केलें ॥२४॥ तिसरियासी दवडावें म्हणोन । म्यां बहुत केला प्रयत्न । परी तें अधिकची राहे लिगटून । पाठ पुरवून राहिले ॥२५॥ दोघे आपण आनंदराशी । तिसरें देखिलें बागुलासी । कवण कारण लागला संगासी । शोधीं त्यासी मी फार ॥२६॥ माझे स्वामीसी येणें पीडिलें । स्वात्मस्वहितातें नाडिलें । म्हणोनि माझें मन क्षोभलें । यासी दवडिलें पाहिजे ॥२७॥ कवण उद्भवाचें कारण । मी राहिलों त्यातें शोधून । काल झोळी पाहें जंव सोडून । तंव विटा दोन कनकाच्या ॥२८॥ पाहतां क्रोध आला मजसी । कीं हेंचि मूळ असे अनर्थासी । रोषें फेंकिलें तयांसी । दवडिलें तिसऱ्यासी त्यासवें ॥२९॥ म्हणोनि तुम्हां वारंवार । प्रार्थित होतों जोडोनि कर । कीं मागेंच राहिलें स्वामी डर । चलावें स्थिर आनंदें ॥१३०॥ परिसोनि गोरक्षाची मात । सद्गुरूनें मांडिला आकांत । म्हणे कैसा केलासि त्वां घात । देईं वित्त माझें तूं ॥३१॥ न जरी देसील माझें धन । तरी मी आतांचि सांडीन प्राण । ताडोनि घेईन पाषाण । हत्या घडवीन तुजलागीं ॥३२॥ गोरक्ष म्हणे जी नाथा । आपण ज्ञुज्ञ शिरोमणी असतां । कां धनमोहीं उगें पडतां । दुःख भोगितां किमर्थ ॥३३॥ पंचरा अनर्थ धनापाटीं । हे निवडिले असती येथें । तुम्ही जाणोनि होतां कष्टी । आश्चर्य गोष्टी नवल हें ॥३४॥ आशागर्भीचा लाभ पाठा । तेथें लोभ उपजला करंटा । तृष्णेनें मांडिला चहोटा । बारा वाटा तेणेंची ॥३५॥ तेथें कुतर्काचा बाजार । षड्रिपु तेथील सौदागर । अविवेक कर्ता वेव्हार । वस्तु घेणार मोह तो ॥३६॥ हेम मायामय असे सर्वही । अंगीकारितां सर्व दाहीं । येणें अणुमात्र सुख नाहीं । बुडवी डोही चिंतेच्या ॥३७॥ चिंता चिता समान । अधिक पाहतां एक व्यंजन । या सामर्थ्ये असे भिन्न । करी दहन कोण कैसें ॥३८॥

चिता मेळिया दग्ध करी । चिंता सजीवास जाळी अंतरीं । ते योगेश्वर त्यागिजे दूरी । चिदंबरीं वास कीजे ॥३९॥
हा मार्ग आपणातें नसावा । नैराश्ययोग सदा असावा । हा विवेक हृदयीं वसावा पाविजे विसावा निजहर्षे ॥१४०॥
मानूनिया अनुतापा । विवेकें निवटिजे लोभसंतापा । प्रगट कीजे योगप्रतापा । दर्शनें परतापा निवटिजे ॥४१॥
सावध होवोनि आपुले आपण । प्रसन्न कीजे आपुले स्वमन । तेणें सकळ सिद्धी कर जोडोन । आज्ञेप्रमाण वर्तती ॥४२॥
पदार्थमात्र इच्छित । तो सहजें होतो स्वामी प्राप्त । शोक सांडोनि व्हां सावचित्त । साधा अर्थ ऐशापरी ॥४३॥
आपण तों योगसंपन्न । शेण सोनें आपणा समान । कां खेद करावा त्यालागुन । घा सोडोन लोभमोहा ॥४४॥
तुम्हींच कांचन आणिलें । कांचनें काय तुम्हां घडिलें । भय मात्र उपमात्र उपजविलें । पिसें लाविलें तुम्हांसी ॥४५॥
ऐशा दुःसंगाचा संग । धरितां कांहीं न घडे उपेग । सद्बुद्धियोगा करी भंग । विपयरंग वाढवी ॥४६॥
यदर्थ स्वामी अवधारीं । कनक कामिनी त्यागिजे दूरी । वासना दंडोनि निर्धारीं । निरिच्छ अंतरीं राहिजे ॥४७॥
येणें न पडे कधीं अपाया । सर्व सिद्धी लागती पायां । कांहीं न करोनि उपाया । स्वरूपीं रूपा या जागृती ॥४८॥
नष्ट खंष्ट हें अमंगळ धन । येथें न लाविजे कदा मन । भिक्षा असे जीविकेलागोन । कोण कारण मंग त्याचें ॥४९॥
भिक्षा कामधेनुमाता । काय उणें जी ती दुभतां । पडों नेदीच ती निवंता । करी सांगता सर्वस्वें ॥१५०॥
दोष लागों नेदी पराचा । लेश जाऊं नेदी पदरींचा । संकल्प आणी विकल्पाचा । बोल त्याचा तुरवीच ॥५१॥
उभयपक्षीं पुण्यवर्धन । उभय पापा करी दहन । प्रसादसेवनें ते होती पावन । सर्वदा कल्याण सर्व पक्षीं ॥५२॥
ही गाउली अत्यंत थोर । स्रवेते नित्य दुग्ध अपार । सेवी त्यासी घडे निराहार । तृप्त अंतर करीतसे ॥५३॥
ही केवळ निर्दोष गंगा । सेवितां पातकें जाती भंगा । ऐशी असोनि आपुल्या संगा । अल्प रंगा मुलावें ॥५४॥
जें सर्व घातासि कारण । तें हें कनक अमंगळ पूर्ण । यासाठीं दिधलें त्यागून । भय निरसोन गेलें कीं ॥५५॥
सुज्ञ तुम्ही गुरुनाथा । सर्वाधिष्ट तुमची योग्यता । असोनि अल्पीं लोलिंगता । धरितां आतां काय म्हणूं ॥५६॥
मच्छींद्र म्हणे रे चावटा । बहुत जल्पोनि करिसी चेष्टा । मज शिणवोनि देसी कष्टा । सर पापिष्टा अधमा तूं ॥५७॥
माझेंचि दवडोनिया कांचन । मज कथिसी वैराग्यज्ञान । हे मूर्खा तुझी बुद्धी कोण । भोगविसी शीण गुरुतें ॥५८॥
म्यां प्रयत्नें जतन केलें । तें नष्टा त्वां निर्दाळिलें । मज तळमळावया लाविलें । अपेश वरिलें त्वां सत्य ॥५९॥
आजवरी करोनि सेवा । शेंवटीं दुःख दिल्हे माझ्या जीवा । वरवा साभिलासी दावा । तोडिला गोवा म्हणतोसी ॥६०॥
परी मी नायकें हें तुझें वचन । माझें मज दे कांचन । मी न सोडी घेतल्यावीण । काढीन प्राण त्यासाठीं ॥६१॥
उगलाचि आतां परत जाई । त्यागिलें ठायींचें घेवोनी येई । होतें तैसें माझें देई मग मी कांहीं न बोले तुज ॥६२॥
गोरक्ष म्हणे जी गुरुवर्या । कां क्रोध करितां किंचित कार्या । कनका काय उणे प्रकाशसूर्या । धरोनि धैर्या असावें ॥६३॥
कांचन पाहिजे तुम्हां किती । तें अज्ञापिजे सत्वर गतीं । तुमच्या कृपें निश्चितीं । उणें मजप्रती असेना ॥६४॥
मच्छींद्र म्हणे कांचन । मार्गी पडलें नाहीं जाण । बहुत श्रमती त्यालागोन । नाना प्रयत्न करोनिया ॥६५॥
त्यांसी तों न मिळे किंचित् । तुज होईल कोठोनि प्राप्त । मिथ्या जल्पूं नकों बहुत । माझेंचि वित्त मज देई ॥६६॥

हें परिसोनिया लवलाहें। गोरक्ष बोले वंदोनिया पाय। गुरुवर्या कौतुक पाहे। उणे काय कनकासी ॥६७॥
सन्मुख होतां थोर पाषाण। त्यावरी लघवी करी आपण। अंतर्बाह्य तो जाला सुवर्ण। पीतवर्ण लखलखीत ॥६८॥
पुन्हा सद्गुरुसी वंदी भावें। म्हणे लागेल तितुकें आतां घ्यावें। न पुरे तरी सांगावें। आणिक सेवें उमाची ॥६९॥
मच्छींद्रें देखोनि चमत्कार। परम सुखावलें त्याचें अंतर। म्हणे हा तो केवळ ईश्वर। नेणोनि फार छळिलें म्यां ॥१७०॥
अद्भुत या गोरक्षाची कळा। पाहोनिया निवालों मी डोळां। ब्रह्मांडींच्या वस्तु सकळां। तुष्टे बाळा देखोनी ॥७१॥
मच्छींद्र हर्षोनि मानसीं। प्रेमें कवटाळी गोरक्षासी। म्हणे बा रे व्यर्थ छळिलें तुजसी। पूर्ण होसी योगसिद्ध ॥७२॥
तुज पाहतां निवालें मन। नको नको मज तें धनकांचन। लोकोपचार दाविला वर्तोन। तुजही कसोन पाहिलें ॥७३॥
परी त्वां भ्रांती माझी फेडिली। लीला दावोनि हुंची तोपविली। कल्पना मुळासह उखडिली। शुद्ध केली अंतरकळा ॥७४॥
जें जें त्वां मातें निवेदिलें। सत्यचि आतां भासलें। लोभ आशेतें उडविलें। पाटव्य केलें मन माझें ॥७५॥
धन्य धन्य तुझें आचरण। धन्य कृती आणि तुझें कारण। धन्य तूं होसी सुलक्षण। धन्य महिमान तुझें कीं ॥७६॥
तूं योगियांमाजी धुरंधर। तुझ्या दर्शनें जगदोद्धार। तूं देसी ज्या कृपाकर। इच्छितां अमर होय तो ॥७७॥
पूर्ण कृपा शरणागतांसी। करितां होती ते तुजऐसी। तुज उपमा याचयासी। कोण्ही मजसी दिसेना ॥७८॥
गोरक्षें स्तुती परिसोनि। तात्काळ धरिले श्रीगुरुचरण। म्हणे मी पदींची वाहाण। केवीं गुण वर्णितसा ॥७९॥
जयजय सद्गुरू समर्था। कृपाघना जी अनाथनाथा। तुझा सेवक मी नेणता। नोहे जाणता सुज्ञ मी ॥१८०॥
मी हीन दीन सद्गुरुराया। लक्षोनि राहिलों तुझिया पायां। न जाणे कांहीं योगक्रिया। तुझीच दया साह्य मज ॥८१॥
सर्व कारणासी कारण। मुख्य तुझीच कृपा जाण। कर्ता करविता तूंचि पूर्ण। समर्था महिमान थोर तुझें ॥८२॥
सूर्यकिरण सूर्यकांतावरी। पडतां अग्नी पडे निर्धारीं। तो सूर्यकांत लावितां अंधारीं। शिखा अणुभरी प्रगटेना ॥८३॥
तेवीं माझेनि घडे काय। परी तव कृपें सर्व होय। कृपेवांचोनि घडल काय। सद्गुरुमाय समर्थ तूं ॥८४॥
परिसोनि शिष्याचें वचन। जालें सद्गुरूसी समाधान। परमानंदें दोघेजण। अवंतीस प्रयाण करतील ॥८५॥
लोकलीलामात्र। दावोनि विचरतीं योगिराज। दासत्वाचा योग सर्व। गोरक्ष अपूर्व उपदेशी ॥८६॥
धन्य सद्गुरु मच्छींद्र। आचरोनि दावीं लोकाचार। परीं ज्याचें शुद्ध अंतर। निर्विकार निःसंगे ॥८७॥
तेवीं गोरक्ष तो निर्मळ। गुरुआचरणचा नाणी मळ। सप्रेमें सेवा करोनि निश्चळ। योग सकळ साधिले ॥८८॥
धन्य हे सद्गुरुचे दास। तारक निश्चय या जिवांस। अनंतसुत त्यांसी विशेष। धर्म साधकांस श्रेष्ट हें ॥८९॥
अनंतसुत विनवी सज्जनां। पुढील प्रसंगीं गोड रचना। प्रीती श्रवण देइंजे श्रवणा। वदवी योगीराणा श्रीदत्त ॥१९०॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रवणेंचि पुरती मनोरथ। परिसोत। साधु सात्विक संत। चत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥१९१॥

॥ इति चत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ४१ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरवे नमः ॥

ॐ नमोजी दिगंबरा । विश्वनियंता तूं विश्वंभरा । हृदयकोमळा तूं उदारा । परात्परा परिपूर्णा ॥१॥
दीनानाथा दीनबंधू । पतितपावना कृपासिंधू । तव महिमा गा अगाधू । काय मी वदूं पामर ॥२॥
तुझे वर्णावया गुण । शिणला वाचें सहस्रफण । तेथें मज दीनाची मति कोण । यदर्थ शरण तव पायां ॥३॥
शरणागताचा हेत । तूं जाणसी गा निभ्रांत । तरी तो पूर्ण करावया सत्य । होसी समर्थ दातारा ॥४॥
स्वकृपें तूं साह्य होवोनी । हे रसना वदविसी कीर्तनीं । माझी नोव्हे ही करणी । रसज्ञ धणी तुझा तूं ॥५॥
तुझे नाम गा अविनाश दत्त । द्वय अक्षरेयुक्त प्रबोधग्रंथ । हा निर्मिसी जगदोद्धारार्थ । दयाळू समर्थ सदय तूं ॥६॥
कथारहस्यसागरीं । सांपडली गुरुदास्यलहरी । त्या चरित्राची नवलपरी । बोलविता जिव्हाग्री तूंच कीं ॥७॥
मच्छींद्र गोरक्ष आख्यान । सांप्रदाय जनमार्गपावन । यदर्थ ग्रंथीं निरोपण । चालविलें पूर्ण स्वामिया ॥८॥
तैसेचि पुढें या ग्रंथासी । सदया सत्कृपें चालविसी । श्रोतेजनां आनंदविसी । आपुल्या बोधिसी निजदासां ॥९॥
श्रीदत्ता तूं हृदयीं वसोन । देतोसी कथेची आठवण । तैशीच ग्रंथीं ठेवितों लिहोन । न्यून तें पूर्ण कर्ता तूं ॥१०॥
श्रोते श्रवणीं सादर । त्यांचे तृप्त करितां तूंचि अंतर । निमित्ता करोनि हा पुढें पामर । करविसी विस्तार अभयत्वें ॥११॥
अनंतसुत विनवी श्रोतियां । जी हे सर्व दत्तात्रेयाची दया । विस्तारिली मनोरथ पुरवावया । श्रवणीं सेवा या प्रीतीनें ॥१२॥
तुम्हां श्रोतियांलागीं भले । येथें षड्रस असती निर्मिले । चला सेवा या उतावेळें । सेविता पळे भवरोग ॥१३॥
जयातें जो रस पाहिजे । तयानें परिपूर्ण येथें सेविजे । अतृप्त कोण्ही न राहिजे । श्रवणीं सांठविजे रससुधा ॥१४॥
सुधा म्हणती अमृतासी । तरी तें नित्य पान देवांसी । परी जन्ममरण न सुटे तयांसी । हे जन्ममरणासी खुंटवी ॥१५॥
या कथामृताची साम्यता । कधींही न पवे त्या अमृता । त्याचेनि न देववे मुक्तता । भवभयव्यथा जोडवी ॥१६॥
हें शुद्ध जें कथामृत । सेविती त्या करी तृप्त । वारी सर्व घाताघात । करी मुक्त मुमुक्षां ॥१७॥
आवडीं सेवितांचि श्रवणीं । सर्व पातकां होय धुनी । पाटव्यता पावे इंद्रियांलागुनी । ठसावतां मनीं ज्ञान प्रगटे ॥१८॥
होतांचि ज्ञानाचा संचार । कळों लागे सारासार । विचारें ध्यास वाणे निर्धार । वृत्ती तदाकार होय येणें ॥१९॥
वृत्तीस ठसावतां तो रंग । इंद्रियचेष्टा पावती भंग । वाटे जोडावा सत्संग । अज्ञान अंग वितुळे ॥२०॥
अज्ञान नाशातें पावतां । सत्संगे जोडे समता । भिन्नाभिन्न नुरे वार्ता । स्वात्मपदार्था लाग करी ॥२१॥
स्वात्मतत्त्वीं जडतां मन । मग ते सहजची होय उन्मन । पद पावे निर्विकार निरंजन । मीतूंपण मग कैंचें ॥२२॥
तेथें भेद भान होती वाव । शमदमासी नुरे ठाव । स्वस्वरूप दाटे सर्व । विंब अपूर्व विंबे दिठीं ॥२३॥

हेचि सगुणाची भेटी। येथें वर्षती आनंदकोटी। तेथें न कीजे कदा तुटी। पडतां मिठी सुख पावे ॥२४॥
व्यापकत्व वस्तु हे जाण। यापासुनी सर्व कारण। भोक्ता भोगविता भोग पूर्ण। सर्व लक्षण येथेची ॥२५॥
जें जें असे त्रिपुटी। तें येथेंचि विलसे गोमटी। कर्म-अकर्माची राहाटी। वर्तवोनि शेवटीं वेगळेंची ॥२६॥
सर्व कर्मातें हा लक्षी। होवोनि राहिलासे साक्षी। नेमिलें प्रमाण राहोनि रक्षी। पाहतां अक्षीं अक्षय ॥२७॥
ऐशी असोनि अवस्था। कर्म पडे जीवाच्या माथां। याचें वर्म जरी शोधितां। अहं कर्ता हें मूळ ॥२८॥
मी कर्तेपणाचें भान। केवीं जाईल वितळोन। जैं पाहसी मूळ शोधून। मग कर्ता कोण सहज कळे ॥२९॥
परी हें जाणपणाचें ज्ञान। नोव्हे प्राप्त सद्गुरुवांचोन। त्यासी जावें आधीं शरण। तनमनधन अर्पावें ॥३०॥
त्याची करितां नित्य सेवा। तो उपदेश करील बरवा। तो बोध ठसवितां जीवा। येईल अनुभवा मग सर्व ॥३१॥
सद्गुरु संत दयाघन। यापरी साधी दृढ साधन। तें जरी म्हणसील कोण। तरी कीर्तनश्रवण सत्कथा ॥३२॥
सत्समागमीं करोनि वास। कथामृत श्रवणीं सांठविजे रस। तेणें स्वानंद सुख संतोष। पावे जीवास पद मुक्त ॥३३॥
सत्संग होता निश्चयेंसी। जीवमुक्त करी तो जीवासी। अमरत्व देवोनी त्यासी। जन्ममरणासी वारिती ॥३४॥
येच विषयीं सावधान। निरोपितों कथा कीजे श्रवण। अत्यंत असे ही पावन। गोड व्याख्यान भर्तृहरीचें ॥३५॥
अवंती क्षेत्र महासुंदर। दैवत महांकाळ श्रीशंकर। क्षिप्रातीर्थ पावन थोर। स्नानें संहार पापांचा ॥३६॥
तेथें वास्तव्य सर्व देवतां। आणि योगी सिद्ध साधु महंतां। काशीक्षेत्र न पुरे तुळितां। यथाधिकता त्या ठायीं ॥३७॥
गुप्त प्रगट तापसी। तेथें तपती दिवानिशीं। यात्रा पाहतां पंचक्रोशी। वैशाखमासीं आनंदें ॥३८॥
शिवरात्रपर्वणी अतिथोर। होतसे पूजा नामगजर। ते दिनीं करिती जागर। येती सुरवर दर्शना ॥३९॥
महासिंहस्थीचा मेळा। तो अद्भुत आनादि सोहळा। अपार जनलोक पाहती डोळां। भाविकां भोळ्या भेटतो ॥४०॥
आद्यंत ऐकावें कीर्तन। ऐसें इच्छी ज्याचें मन। तेणें अवंतीमाहात्म्य करावें श्रवण। कथा संपूर्ण त्यामाजी ॥४१॥
येथें वदूं जरी सविस्तर। तरी हा ग्रंथ वाढेल अपार। म्हणोनी भाव जाणविला सार। श्रोते चतुर जाणती ॥४२॥
या अवंतीक्षेत्रींचा भूपती। वासववसुत भर्तृहरी निश्चितीं। मंडित वैभव सर्व संपत्ती। सुंदर युवती पिंगळा ॥४३॥
स्वरूपें लावण्य गुणराशी। अत्यंत प्रेमी उभयतांसी। तिजवीण क्षण न गमे रायासी। संतोष मानसीं पाहतां तिज ॥४४॥
शृंगारोनी एकांतभुवन। अनुपम शय्या सिद्ध करवोन। स्वयें भर्तृहरी राव आपण। विलास नूतन नित्य करी ॥४५॥
कांता गौर शुभांगा। आकर्णनयन लाजवी मृगा। मुखपरिमळें भुलवी भृंगा। डोलवी पन्नगा अंगसुवासें ॥४६॥
गमनीं गज मंदावले। दशनीं अनारस कोंचले। कटी देखोनि हरी हारले। ऊरु चाकाटले नासिरा ॥४७॥
कुच अपवमंडित। केशर घनस्तनिका विराजित। तांबूल कंठाग्र दिसत। जिव्हा शोभत नाम येणें ॥४८॥

पतीच्या जें अंःकरणीं। वर्तें तैशीच ते जाणोनी। पतिव्रता लावण्यखाणी। मंडित जनीं नामख्याती ॥४९॥
अत्यंत प्रियकर रायासी। नित्य शृंगार नूतन तिसीं। स्वकरें लेववोनि अभरणांसी। चीरचंदनेसी अंजनें ॥५०॥
स्वइच्छें ऐसा शृंगार। करवोनि अंकी घे तिज नृपवर। निरखोन काव्य रची सुंदर। लाघव थोर त्यामाजी ॥५१॥
तिंचे ठाईं प्रेमा देख। ठेवोनि रचिलें शृंगार शतक। तें अद्यापि पठती जनलोक। चतुर सम्यक आवडीं ॥५२॥
रावही स्वरूपगुणें अतिउत्तम। विद्याबळ अंगी पराक्रम। सर्व जीवांचे वारी श्रम। करवी आराम सुखछाया ॥५३॥
न्याय विवेकें वागे सदा। कदाउल्लंघी वेदमर्यादा। साधु सज्जन विप्रपदां। नमे सर्वदा प्रेमभावें ॥५४॥
यज्ञ दान कार्य कर्म। आचरे पाहोनि धर्माधर्म। अपराधावीण न भेदी वर्म। वत्साकूर्म प्रजे तैसा ॥५५॥
धीर उदार गंभीर। युद्धी निपुण परमशूर। दीना सदय दुष्टां कठोर। कधीं ही अविचार आचरेना ॥५६॥
यापरी राजराजधानी। चालवी स्वबळें सुबुद्धी करोनी। स्वानंदे नांदे स्वस्थानीं। पिंगळा राणी समवेत ॥५७॥
ऐसाही राव असतां सुरत्न। परी तया मृगयेचें असे व्यसन। सेना समुदाय सर्व घेऊन। वनोवन हिंडावे ॥५८॥
तंव कोणे एके दिवशीं। राव निघाला मृगयेसी। काननी शोधितां अनायासीं। मृग भारासी पाहिलें ॥५९॥
पांचसात मृगी चरती। त्यांत एक मृग देखिला अवचितीं। रायें वेढोनि त्याप्रती। घाव निश्चिती घालूं पाहे ॥६०॥
निग्र ओढवलें जाणोनी। भयें चमकल्या त्या हरिणी। शस्त्र देखोनी दीनवाणी। राया लागोनी बोलती ॥६१॥
हे नरेंद्रा उदारा। समर्था सदया चतुरा। कां वधिसी आम्हां पामरा। अपराध शूरा कोण सांग ॥६२॥
आम्हीं काय तुम्हां त्रासिलें। कोण अर्थे सांगा उवगिलें। म्हणोनि अंतरी रुष्ट जाले। घाता प्रवर्तले आमुच्या ॥६३॥
रायें परिसोनि भाषण। मृगींसी बोले तैं आपण। हें आमुचें स्वाभाविक लक्षण। मृगया नेमून करावी ॥६४॥
तंव मृगी बोलती उत्तर। तुज मृगया करणें असेल जर। तरी या सर्वांचा संहार। एकदाचि निर्धारें करीं वेगें ॥६५॥
येराचें दुःख येरा। कधी न दाखवी गुणगंभीरा। वेगीं करूनिया त्वरा। उडवीं शिरां सकळांच्या ॥६६॥
राव म्हणे मी कामिनीसी। कधींही न वधीं निश्चयेंसी। हा नेम असे मजसी। कधी सरितेसी त्रासवीना ॥६७॥
सरितेमाजीं जळचर। त्यांचा मी न करीं संहार। स्त्रीनामें जीं वनचर। तयेंही कर बोढवेना ॥६८॥
मज तंव कारण पुरुषासी। संधान न साधीं ये राशीं। तुम्हीं स्वस्थ असावें मानसीं। मज तों मृगासी मरणें ॥६९॥
तंव मृगी विनविती राया। आम्ही या मृगाच्या सर्व जाया। यावीण ठाव नसे रमाया। करी दया तूं न मारीं ॥७०॥
राव म्हणे मृगयेवीण। मी कधीही न पावे सदन। नेमिलें कार्या आधीं करीन। डाव परतोन न फिरे कीं ॥७१॥
मृगी प्रार्थिती मागुती। आम्हा पतिव्रतेचा प्राणपती। तूं सौभाग्य रक्षीं भूपती। वैधव्यविपत्ती न दे आम्हां ॥७२॥
तया तूं चतुर सज्ञान। न वधीं जाणोनि तूं अज्ञान। विवेकवृत्ती रक्षीं गा यालागुन। यशधन सांचडी गा ॥७३॥

मृगिवचन अत्यंत सुंदर । परिसतां वाटे चमत्कार । म्हणे मी तों न सोडीं शिकार । बोडविला कर हटेना ॥७४॥
न मानोनि मृगींचें वचन । शस्त्रार्थे केलें मृगहनन । भूमीं मृग पाडिला देखोन । आल्या धांवोन नितंबिनी ॥७५॥
अहा स्वामी प्राणनाथा । आम्हां मोकलोनी कोठें जातां । मागें वांचोनि लाभ कोणता। आम्ही पतिव्रता म्हणवितों ॥७६॥
क्षण एक तिष्ठावें स्वामी । देह सांडोनि येतों आम्ही । आम्हां न साहवे वियोगऊर्मी । अनुतापहोमीं देह अर्पूं ॥७७॥
मृगींनीं मांडिला चमत्कार । सेनेसह पाहे नरेंद्र । उड्डाणें साधिती श्रृंगाग्र । फाटोनि उदर मरती त्या ॥७८॥
पतीश्रृंगाग्रा साधोन । देह समर्पोनि देती प्राण । एकही न उरली मागें जाण । सकळही अटोन पैं गेल्या ॥७९॥
आश्चर्य वाटलें भूपासी । पाहोनि चाकाटला मानसीं । म्हणे वनचरें आचरतीं धर्मासी । धन्यत्व त्यांसी किती वाणूं ॥८०॥
सर्व धर्म मानवासी । योग्य असती आचरावयासी । आचरावया ज्ञान येरांसी । नसे निश्चयेंसी हा नेम ॥८१॥
दया मानवा असोनी ज्ञान । परि धर्म आचरावया वाटतें कठिण । लोकां दाविती शाहणपण । स्वयें आचरणें नाचरती ॥८२॥
श्रेष्ठत्व अंगीं मिरवावया । येरयेरां सांगती क्रिया । परी स्वधर्म पाळावया । विरळाची समुदायामाजीं तो ॥८३॥
हे प्रत्यक्ष पाहतां वनचर । असोनि धर्म आचरला थोर । किंनी वर्णाचा वडिवार । नसोनि अधिकार साधिला ॥८४॥
राव संतोषला धर्म पाहोन । सर्व मृगकुळातें सांवरोन । सेनेसहित पावला सदन । मनीं गुण आठवीत ॥८५॥
मृगींसहित तो मृग । पिंगळेपुढें ठेविला सवेग । ते पाहोनी जाली दंग । म्हणे व्यंग दिसतसे ॥८६॥
रायें विपरीत केली करणी । येणें संकल्पा आली हानी । मग रायपुढें जोडोनि पाणी । करी विनवणी आदरें ॥८७॥
जी स्वामी प्राणेश्वरा । संकल्पा उणीव आणिली दातारा । कां आरंभिलें अविचारा । हें मज सुंदरा निरोपीं ॥८८॥
राव म्हणे तै पिंगळेसी । मी नाहीं आचरलों अधर्मासी । जालें वृत्त निवेदितों तुजसी । सादर श्रवणासी असावें ॥८९॥
वनीं जालें जें सकळ वृत्त । तें राव पिंगळेसी करी श्रुत । पतिव्रताधर्म पहात । पाहूनी वाटत आश्चर्य मज ॥९०॥
धन्य धन्य त्या पतिव्रता । प्राण सांडिला पती जातां । पिंगळा म्हणे प्राणनाथा । आश्चर्य मानितां नोव्हे हें ॥९१॥
येणें बळात्कारें करोनी । प्राण सांडिला देह नासोनी। नोहे हे पतिव्रतेची करणी । हालगजा कामिनी त्या होनी ॥९२॥
अहो या पतिव्रतेचा धर्म। वेगळेंचि असे तिचे वर्म। तुज मी निरोपितें तें वर्म। हा तों अधर्म निश्चयें ॥९३॥
येणें आत्महत्या सत्य केली । विरुद्ध धर्मशास्त्रीं हे बोली । पतिव्रतेची वृत्ती वेगळी । ते तुज नव्हाळी निरोपितें ॥९४॥
पतिरतन होतां श्रवण । उभाचि देह जावें सांडोन । संकल्पविकल्पाचें कारण । नाणोन गमन करावें ॥९५॥
पतिसन्निध जातां । देह सांडावा बोलतां । धन्य तेची होय पतिव्रता । नाशिया चिता आवडे तें ॥९६॥
रायें तें परिसोनि श्रवण । म्हणे ऐसी असेल तरी कोण । बैसीं उभा सांडवेल प्राण । नोहे भाग्य सुलभ हें ॥९७॥
पिंगळा म्हणे हें न घडे । तरी पतिव्रतापण कैसेनि जोडे । बळेंचि उभ्यानें देह पडे । धर्म गाढें भोगणें त्या ॥९८॥

वीरश्री नसतां अंगीं। उगाचि चढे रणप्रसंगीं। मार देखोनि तगमगी। मरतां भोगी गर्भवास ॥९९॥
या उभयांची एक वाटा। कृतकर्मे आला कुन्हटा। तेणें येऊं लागे उलटा। जन्म चहोटा भोगावया ॥१००॥
त्या जन्माची वोळखी। पतंगींच पाहावी निकीं। आपुले वाटत्वें दीपा तुकी। मरण अचूकी प्राप्त त्या ॥१॥
येणेंचि रोगें जावें यावें। परी मुक्तत्व त्यासी न पावावें। अनंत जन्मीं फेरे घ्यावे। सुख न साधावें त्या जीवा ॥२॥
राया यदर्थ हें कर्म। करोनि कासया भोगिजे श्रम। जेणें पावे सुख आराम। तोचि धर्म आचरावा ॥३॥
विपरीत नाचरोनी प्रसंग। तात्काळ घडावा योगायोग। तोचि मुक्ततेचा भाग। फावेल लाग ते धन्य ॥४॥
रायें परिसोनि हे मात। उगा मानसीं राहिला निवांत। गुह्य हृदयीं ठेवोन गुप्त। सेवकां आज्ञापित काज अन्य ॥५॥
सभोंवते सभाजन। उभे तिष्ठती कर जोडोन। अनेक कार्यांचें निवेदन। निवेदी प्रधान रायासी ॥६॥
तें श्रवणीं राव सांठवीत। पाहोनि विचारें आज्ञापित। पुरवी सर्वांचे मनोरथ। नीतिरीत विलोकोनी ॥७॥
दयामूर्तें प्रजा पाळणें। अपराध पाहोनि दंड करणें। यथान्यायें सदा वर्तणें। तत्काळ साधणें नेमें तो ॥८॥
पात्रापात्र विचार। पाहोनिया सारासार। राव आचरे निरंतर। स्वधर्मा अंतर पडों नेदी ॥९॥
तेवींच ती पिंगळाराणी। सदा सादर पतिसेवनीं। अन्य पदार्थ मना नाणी। लक्ष चरणीं पतीच्या ॥११०॥
उभयही आनंदघन। सदय करिती प्रजापाळण। वत्सापरी तयांलागोन। करी रक्षण लेखोनिया ॥११॥
ऐसे लोटतां कांहीं दिवस। राव गेला वनीं मृगयेस। तेथें पाहोनि मृगमृगींस। आठव चित्तास पैं जाला ॥१२॥
कीं आमुची पिंगळाराणी। मृगया कथितां बोलिली वचनीं। तें पाहूं आतां शोधूनी। येईल निवडोनि आपैसें ॥१३॥
मग रायें काय केलें। पहिल्या मृगातें सोडिलें। पुढें धुंडीत काननीं चाले। अकस्मात देखिलें वनसिंहा ॥१४॥
होवोनि त्याचे सन्निध। अंगें मांडिलें त्यासी युद्ध। शस्त्रपातें वर्मभेद। केला वध भूपें त्याचा ॥१५॥
मग पाचारोनि प्रधानासी। गुह्य वार्ता सांगे त्यासी। सिंहें मारिलें रायासी। हें राणीसी श्रुत करा ॥१६॥
सत्य वाटेल तिचिया मना। ऐसीच करूनी पाठवा रचना। पुढें न दीचे दुज्या कारणा। उदास भावना दाविजे ॥१७॥
जेणें कांतेचें गजबजे मानस। सर्वार्थें मनीं होय उदास। जेणें उतरे माझिया कसास। त्या विचारास योजावें ॥१८॥
राज-आज्ञा वंदोनि शिरीं। प्रधान तदर्थीं आरंभ करी। मारिल्या सिंहाचें सत्वरीं। रुधिर पात्रीं धरियेलें ॥१९॥
राजवस्त्र विचित्र भिजाविलें। अळंकार शस्त्र सर्वे योजिलें। कामिक जनां निवेदिलें। सिंहें मारिलें रायासी ॥१२०॥
राजभुवना जावोन। पुढें ठेवा वस्त्रें भूषण। निरोपाया परी वर्तमान। सद्रदें नटोन सत्यत्वें ॥२१॥
तेथें होईल कैशी गती। ते मुग्धाचि पाहा निश्चितीं। विनवोनि राजप्रियेप्रती। आज्ञा निगुती आणावी ॥२२॥
सत्य कळों नेदी जे कारण। असत्य डिंब वाढविजे पूर्ण। यापरी सर्व निरोपोन। सज्ज करोन लाविलें ॥२३॥

गज अश्व पदाती । सेनासमुदाय सर्वे चालती । घंटारव न योजिती । मंदगतीं चालतां ॥२४॥
पांवी न वाजवितां तुरे भेरी । भूपावीण निघाली स्वारी । पल्लव घेवोनी मुखावरी । केलें नगरी प्रवेशन ॥२५॥
विपरीत चरित्र देखोन । गजबजिले अवघे प्रजाजन । दुश्चित सकळांचें जालें मन । नगर शून्य पाहों लागे ॥२६॥
राजमंदिरां गेली मात । दूत आले धांवा फोडित । राव जाला वाटे शांत । दिसे विपरीत हें सारें ॥२७॥
मानीक मंदिरीं प्रवेशले । राणीवसामाजीं पावले । राजचिन्हें पुढें ठेविलें । जालें निवेदिलें सकळही ॥२८॥
ते वार्ता करोनि श्रवण । पिंगळा उठे शोधालागुन । भूपावृक्ष होता रोपण । तया अवलोकन पै केलें ॥२९॥
पाहतां ना दिसे कुचंबला । तो टवटवीत पिंगळेनें पाहिला । तेणें दुःख न वाटे तिजला । परी दूतांला पुसतसे ॥१३०॥
म्हणे सत्य वदावें वचन । न करा असत्य कदा भाषण । येरू सद्गदित होऊन । करिती निवेदन तोंचि पैं ॥३१॥
माते सत्य राव गेला । कळावया आणिली खूण तुजला । प्रधान रक्षणीं असे बैसला । यावें आड़ेला काय तें ॥३२॥
मागुतीं पुसे तयांसी । सत्य राव गेले कीं परलोकासी । तंव ते म्हणती तुम्हांसी । असत्य कासयासी वदूं माते ॥३३॥
हें परिसोनि मात । पिंगळा उभाचि देह सांडित । मुर्छी पडिली प्राणरहित । जाला आकांत देखोनी ॥३४॥
विपरीत वर्ततां विचार । एकाचि जाला हाहाःकार । शोकार्णवीं पडलें नगर । न घडे आवर दुःखासी ॥३५॥
सर्व शोकसिंधुमाजी बुडाले । पाहतांचि दूत त्वरें धांवले । जावोनि रायातें श्रुत केलें । नवल वाटलें सकळांसी ॥३६॥
राव धावराचि आला धांवत । मंदिरीं पाहिलें वनितेचें प्रेत । अंग धरणीवरी टाकीत । आक्रंदे आठवीत गुण तिचे ॥३७॥
अहा प्राणप्रिये सुंदरी । म्या विनोद केला तुझा निर्धारीं । यास्तव रुसोन गेली सदुरी । ये माघारीं भेटी दे ॥३८॥
तुजवीण शून्य दिसे हें मंदिर । काय करूं हा आतां राज्यभार । गोड न लागे वैभवपरिवार । वस्त्र अलंकार न रुचती ॥३९॥
कोण कुबुद्धी आठवली मजसी । तेणें अंतरलों मी तुजसी । आतां कोण करूं उपायासी । जेणें भेटसी प्राणप्रिये ॥१४०॥
अट्टहास्यें आक्रोश करित । पिंगळा पिंगळा म्हणोनि पाचारित । भूमी गडबडां लोळत । हृदय बडवीत निजकरें ॥४१॥
प्रधान सेवक धांवती । राया बळें सांवरिती । विवेकवळें आकळिती । राया चित्तीं न मनें तें ॥४२॥
भूमी आपटीतसे मौळ । क्षणक्षणां होतसे व्याकुळ । देखोनि रायाची तळमळ । सर्वही व्याकुळ त्याऐसे ॥४३॥
राव म्हणे रे जातो प्राण । पिंगळा भेटवा मजलागोन । शोक आकळोनि प्रौढ सुज्ञ । करितीं शांतवन रायाचें ॥४४॥
राव मोहें झाला भ्रमित । गोड न लगे कोणाची मात । दुःखें प्राणासी आटीत । मात न मानीत कवणाची ॥४५॥
सकळां मोडवलें संकट । रायाअंगीं भरला फाट । पुढें केउती करावी वाट । कार्य नीट न दिसे हें ॥४६॥
कितेक प्रबुद्धी करोनि विचार । सिद्धता पिंगळेची केली सत्वर । सर्व सौभाग्यतेचा प्रकार । केला धीर न धरितां ॥४७॥
शिबिकेवेगीं ती वाहिली । समारंभेंसी स्वारी निघाली । रायें तेव्हां हांक फोडिली । वरें बडविलें मुखातें ॥४८॥

पुढला तेव्हां शोकसागर । अवघे दुःखित नारीनर । उध्वस्त दिसों लागे नगर । भयंकर पाठीं लागे ॥४९॥
राव गडबडां लोळे धरणी । सेवक धरिती चहूंकडोनी । आक्रोशकोल्हाळें स्मशानीं । पावले येवोनी क्षिप्रातीरीं ॥१५०॥
इंधनराश्येची सिद्धता । करूनि ठेविलें वरी प्रेता । मंत्राग्नि देवोनी अतौता । पाळ्या भोंवता विलोकी ॥५१॥
पिंगळेचें देखोनि दहन । राव वरी साधूं पाहे उड्डाण । तेथें प्रधानादि सर्व जन । धरिती आवरून भूपातें ॥५२॥
मोक्ष होता महांडौंचा । सकळी योग आरंभिलें स्नानाचा । विधि विधान संकल्पाचा । तिळांजळीचा प्रकार ॥५३॥
सकळ कर्मा आवरिले । प्रेताग्नीतें शांत देखिलें । जावया आश्रमीं सिद्ध जाले । परी राव न हाले तिथुनी ॥५४॥
आक्रोशें राव बोले सकळां । तुम्ही जा रे आपुल्या स्थळा । माझी मी न सोडी पिंगळा । टाकीन ज्वालामाजीं देह ॥५५॥
तें देखोनि रायाचें विपरीत चिन्ह । सर्वही बोलती प्रार्थोनि । अजी या मृत्युलोकींचें कारण । उपजले मरण पावती ॥५६॥
राया चिरकाळ कोण राहिला । हा देखिलाना कोण्ही ऐकिला । तुम्ही हे जाणतां की भूपाला । विवेक मनाला कीजे जी ॥५७॥
गेले आणी बहुत जाती । राया किती करावी याची खंती । शोक वाहतां निश्चिती । भेटे पुढती न घडे हें ॥५८॥
नोहे राया अद्भुत गोष्टी । असे जन्ममरणाची राहाटी । आपणासही जाणें त्यापाठीं । माया खोटी अनिवार हे ॥५९॥
राया होवोनि सावधान । विवेकें आवरी आपुलें मन । करी आमुचे समाधान । आहे तुजविण कोण आम्हां ॥१६०॥
तूंचि आमुचा मातापिता । सांभाळीं वैभव आपुलें आतां । निरसी या प्रजेची चिंता । पाळी समर्था वत्सें तुझी ॥६१॥
तूं असतां आनंदघन । सकळ कामना होतील पूर्ण । राया उद्विग्न न करीं मन । घ्यावा आवरून शोक आतां ॥६२॥
ऐसें नाना परी शांतविती । परी कांहींच नुमजे भूपती । विरहे शोकाकुल वृत्ती । वचन कोणाप्रती न बोले ॥६३॥
पिंगळ्या पिंगळा मारी हांका । आणा भेटवा म्हणे लोकां । आवर न घडेचि त्याच्या शोका । पाहे टकमकां बावळा ॥६४॥
प्रधान म्हणे गा राया । धन्य धन्य हे तुझी जाया । तव हस्तें पावली उत्तम ठाया । धन्य क्रिया सतीची ॥६५॥
यदर्थ नं कीजे आतां शोक । विवेकें शांतवा विरहपावक । स्वधामीं चलावें आवश्यक । वाट सकळीक पाहती ॥६६॥
राया तूं होसी सज्ञान । पुढील विधींचें लक्षीं कारण । तिचे मुक्तीस्तव धर्मदान । होवोनि सावधान करावें ॥६७॥
या लोकींचा ऐसाचि विचार । अनादि असे हा श्रेष्टाचार । हे तूं जाणोनि प्रकार । विरहा आवर न करिसी ॥६८॥
तंव भर्तृहरी बोले प्रधानासी । तूं जाय घेवोनि सर्वांसी । मी आतां न यें निश्चयेसी । उगाच आग्रहासी न पडे तूं ॥६९॥
निग्रह रायाचा देखोन । प्रधानें बोळविले जन । कामीक कामा दिधले सोपोन । राहिला आपण रायासवें ॥१७०॥
तेथेंच शिबिरें उभविली । सर्व साहित्यें सिद्ध केलीं । विविध विधानें आरंभिलीं कर्मे सारिली सकळीक ॥७१॥
सर्व कृत्यांतें उरविलें । पुनरा रायातें प्रार्थिलें । परी राव कदापि न वळे । ध्यान लागलें पिंगळेचें ॥७२॥
अधिक करितां आग्रहता । राव जाला कोप करिता । करोनि सकळांची निर्भत्सता । म्हणे कां छळितां मज उगें ॥७३॥

मज न लगे छत्रसिंहासन । वैभव नको संपत्तिधन । पिंगळेसाठीं देह अधीन । परी मी परतोन न यें न यें ॥७४॥
तुम्ही परतोनि जा सदनांसी । सांभाळा आपुल्या वैभवासी । मी तरी जालों उदासी । नका मजसी छळूं आतां ॥७५॥
निग्रह देखोनि प्रधानजनीं । निघते जाले आज्ञा वंदोनी । सदा सावध राजरक्षणीं । दास सेवनीं ठेवोनिया ॥७६॥
रायें त्यागोनि विलास । रक्षा लावोनि सर्व अंगास । जेथें दहन जालें पिंगळेस । त्याचि स्थळास वास करी ॥७७॥
अवंतीक्षेत्रीं प्रजाजन । अवघे दुःखी रायावीण । कुडी जैसी प्राणहीन । तैसेंच शून्य दिसतसे ॥७८॥
तंव तेथें अकस्मात । गोरक्ष आणी मच्छींद्रनाथ । येवोनि निरामय वास करीत । योग आरंभीत आपुला ॥७९॥
अवरीं चढवोनि आसन । गोरक्ष जाले विराजमान । योगमुद्रा चढवोन । जालें तल्लीन सस्वरूपीं ॥१८०॥
यापरी नित्य आचरतां । जनीं प्रगटली हे वार्ता । दर्शना मेळा मिळे भोंवता । आनंद चित्ता सकळांच्या ॥८१॥
नित्य आवडी धांवती जन । आदरें करिती प्रेमें सेवन । तें आश्चर्य परिसोन । आला प्रधान दर्शना ॥८२॥
...नि योगियाच्या योगासी । विस्मय वाटला तयासी । परमानंदे नमोनि त्यासी । प्रार्थोनि गुह्यासी जाणवी ॥८३॥
स्वामी योगिराया । विनय जालों तुझिया पायां । आम्हां अनाथावरी कीजे दया । कृपेची छाया या वेळे ॥८४॥
... म्हणे आम्ही जोगी । सदा रमतो जी आत्मरंगीं तुमचें कार्य आमुचें प्रसंगीं । कोणतें वेगीं निवेदा ॥८५॥
.. प्रधानें जोडोनि कर । उभा राहिला गोरक्षासमोर । जी स्वामी परिसा सादर । तुम्हां सविस्तर कळवितो ॥८६॥
आमुचा राव भर्तृहरी । परलोक पावली त्याची अंतुरी । तिजसाठीं शोकसागरी । राव निर्धारीं बुडाला ॥८७॥
नाना परी आम्हीं प्रार्थिला । परी तो न मानी आमुच्या बोला । स्मशानीं तेणें वास केला । पिंगळा पिंगळा उच्चारी ॥८८॥
कांतेच्या विरहें करोन भ्रमित राव जाला पूर्ण । राज्यवैभव कार्यकारण । सर्व त्यागोन दीधलें ॥८९॥
बहु रीतीं प्रार्थिलें त्यासी । परी तो न करी विवेकासी । कोण सांभाळील या राज्यासी । दुःख आम्हांसी बहु फार ॥१९०॥
त्याचें करावया समाधान । प्रयत्नीं सरली आमुची आंगवण । म्हणोनि तुमचे धरिले चरण । बोधिजे पूर्ण रायासी ॥९१॥
आपण ज्ञानाचे सागर । सदय दीनांचें माहेर । अज्ञाननाशक भास्कर । प्रकाश थर सर्वज्ञ ॥९२॥
आपण महासिद्ध उदारू । केवळ भवसागरींचें तारूं । प्रबोधकर्ते गुणगंभीरू । शरणागता आधारू तुमचा ॥९३॥
राव गुंतला मायामोहीं । तो सावध नोहेच कांहीं । त्यासी बोध करा लवलाहीं । हें दान देईं आम्हांतें ॥९४॥
आमुची परिसोनि ग्लांती । कृपा कीजे तुम्हीं संतीं । सत्वबोधें बोधा भूपती । हेचि विनंति तुम्हांतें ॥९५॥
गोरक्ष म्हणे प्रधाना । तुवां बहुत केली प्रार्थना । कार्यार्थी केली सूचना । आली मना आमुच्या ॥९६॥
परी आमुचा बोध त्यातें जाला । तो कांहींही नाहीं परतला । दृष्टी पावतां अंधाला । त्याचा मोहिला चांचपट्ट ॥९७॥
ज्याची दृष्टी जाली चोखट । त्यासी दुखवूं म्हणाल जरी वाट । तरी तो ऐकेल काय तुमची गोष्ट । देईल स्पष्ट उत्तर कीं ॥९८॥

चविरा भलतैसें बोला । परी न धरी कीं अबोला । स्पष्ट श्रवणीय चांगला । तो चावटीला नायके ॥९९॥
मुका खुणेची मानावे । मौन्यचि कार्य साधी बरवें । त्यासीच वाचाळपण जरी फावे । मग तो खूणप्रभावें गोवें कां ॥२००॥
तेवीं प्रधाना प्रसंग । आम्हां भूपासी घडे चांग । तरी क्षणें फेडू त्याचा पांग । मोह अभ्यंग खांडवूं ॥१॥
जेथें राया घडे निवास । तें तूं स्थळ दावी आम्हांस । बोधावया तयास । उशीर कासयास पाहिजे ॥२॥
आम्ही करूं तेथें गमन । परी राया त्वां दावे सुचवोन । हें प्रधानें अभय परिसोन । प्रेमें चरण धरियेले ॥३॥
साधु दयाळू तारक । प्रत्यक्ष त्रितापसंहारक । शरणगता सुखदायक । कलिमलनाशक साधू हे ॥४॥
साधु पतिताचे पावन । अनाथाचे हे नाथ पूर्ण । साधु देवांचें अधिष्ठान । देवां देवपण त्यांचेनी ॥५॥
उदारधीर गंभीर । साधु केवळ ईश्वर । समसरिखें आपपर । जगदोद्धार करणें हे ॥६॥
न घडे तेंचि घडविती । ऐशी ज्यांची सामर्थ्य शक्ती । उद्धारावया ही जगती । प्रगट होती सगुणत्वें ॥७॥
आपुलें सामर्थ्य वेंचोन । शरणागतासी करिती पावन । आपणत्व देती त्यालागोन । अविनाशीं पूर्ण बिंबविती ॥८॥
म्हणोनी हा प्रत्यक्ष । शिवची प्रगट हा गोरक्ष । शरणागताचा वोळखोन पक्ष । अलक्षीं लक्ष लक्षवी ॥९॥
येच विषयींचें कथन । पुढील प्रसंगीं निरोपण । गोरक्ष लीला दावील गहन । बोधील मन रायाचें ॥२१०॥
संत साधु योगी महंत । येणेंचि रूपे हो देवदत्त । अभेदपणें वागे सर्वांत । पुरवीत आर्त सर्वांचे ॥११॥
तो याचे वसे सर्वदा । परी कळे त्या योगीवृंदा । कोठेनी ज्ञान मतिमंदा । त्या हृद्गदा जाणेल ॥१२॥
परी संतीं केली मज कृपा । तेणेंचि मार्ग जाला सोपा । उघडोनिया अज्ञानझांपा । आत्मरूपा दाविलें ॥१३॥
आत्मींच आत्मीरूपें दत्त । भेटतां केलें भेदरहित । अभेदपद दाविलें सत्य । केलें कृत्य गुरुरायें ॥१४॥
सद्गुरु दत्त हा दिगंबर । अनंतरूपें नटला सर्वेश्वर । तेणें व्यापिलें बाह्यांतर । पाहतां सार सुत एक ॥१५॥
सुत जडता अनंतपदीं । तया कैंची आधिव्याधी । रंगीं रंगता पूर्ण बोधीं । सरली उपाधी तयासी ॥१६॥
निरुपाधी निरामय । सप्रेमतेच्या बळें होय । यदर्थी हाचि उपाय । सेविजे पाय श्रीगुरुचे ॥१७॥
म्हणोनिया अनंतसुत । सद्गुरुचरणीं सदा रत । तुम्हां संतश्रोतिया विनवीत । सांभाळा अंकित आपुला ॥१८॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविकभक्त । एकचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२१९॥

॥ इति एकचत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

राव जोडोनि पाणी। करी योगियाची विनवणी। हे डबी अर्पिली चरणीं। घ्या विलोकोनि आपुली ॥५५॥
गोरक्ष म्हणे कुशलें। बहु युक्तीनें रज जोडिले। काय पूर्व प्रकारा पावले। भगींत राहिले डाखलग ॥५६॥
पूर्व पदार्थ कां ऐसा होता। हें राया तुज न जाणवे चित्ता। देसी भंगलिया पदार्था। येणें शांतता न घडे मज ॥५७॥
अहा डबी म्हणोन। पुन्हा गोरक्ष करी रुदन। रायें दृढ धरिले चरण। बोले प्रार्थून पुढतीं ॥५८॥
तुम्ही साधु सिद्ध म्हणवितां। गोलियाचा शोक वाहतां। तेंचि केवीं येईल हातां। विवेकें समर्था शोधिजे ॥५९॥
गोरक्ष म्हणे ऐसें कळतें। मग मन कां न तुझें हें वळते। कासया येव्हढें हळहळतें। समजतां वळ तें सत्य पैं ॥६०॥
तें तुज कांहीं न समजलें। मिथ्या मोहें मन भ्रमलें। असत्य तेंचि सत्य भासलें। दृढ ठसलें मानसीं ॥६१॥
पिंड हा उसणा पांचांचा। भाग एकवटला महद्भूतांचा। येथें वास दोघांचा। नेमिल्या नेमाचा होतसे ॥६२॥
एक महद्भूतापासून। उपजती पांच पांच गुण। यांसी अधिपती श्रेष्ठ तीन। मात्रा भिन्न पांच त्या ॥६३॥
एवं मिश्रितांचा हा पिंड। वृक्ष वाढविला प्रचंड। तोही जाणा औटखंड। परिवार उदंड तयाचा ॥६४॥
यावरी पक्षी दोघे जण। ते एक एकाचेंचि अंग पूर्ण। नेम सरतां जाती उडोन। राहिले व्यापून पाहाती या ॥६५॥
श्रेष्ठ तीन जे असती। तीन कार्य तिघां हातीं। दोघां नेम उद्भवस्थिती। एक हातीं कर्ता तो ॥६६॥
जें पक्षी साधितां उड्डाण। तें वृक्ष पडे उन्मळोन। ज्याचा भाग त्यालागोन। जाती देवोन अन्य स्थळा ॥६७॥
ज्याचें त्यानें नेलें। त्यांत काय सांग गा आपुलें। स्वप्नीं द्रव्य सोसें जोडिलें। जागृतीस फावले काय राया ॥६८॥
तें जैसें सत्य नाहीं। तैसेंचि विचारें हेंही पाहीं। सांडी भ्रम सावध। न बुडे डोहीं मोहाच्या ॥६९॥
राव म्हणे जी दातारा। तुम्हीं अनुग्रह केला खरा। परी प्रीतिबाण भेदला अंतरा। तेणें मी बावरा दुःख वाहें ॥७०॥
उदंड असती कामिनी। परी तिजऐसी न देखों कोण्ही। ती अप्रतिम सर्वगुणी। वेध मनीं मज तिचा ॥७१॥
तिजऐसें निधान। शोधितां न मिळे तिन्ही भुवन। न्यूनाधिकया असतील जाण। परी तिजसमान न देखों ॥७२॥
तेचि व्हावी ऐसी वाटे। तिजसाठींच हा प्राण घोटे। क्षणक्षणां कंठ दाटे। केधवां भेटे न कळे मज ॥७३॥
मृत्यु मर्त्यलोकींची राहाटी। हे तो आहे सर्वांसाठीं एक वेळ्यां होती भेटी। मग हो तुटी होणें ती ॥७४॥
यापरी वदतां नृपवर। हृदयीं दाटला गहींवर। गोरक्ष म्हणे राहें स्थिर। पाहें चमत्कार दावितों ॥७५॥
माझी डबी न देववे तुजसी। परी दाविनों कौतुकासी। तुझी पिंगळा तूं घे निश्चयेंसी। डबी येणेंसी न देववे ॥७६॥
जेथें पिंगळेचें जालें दहन। तेथेंचि गोरक्षें सुलक्षण। दाविता जाला प्रगट करोन। राया परतोन पाहें म्हणे ॥७७॥
मंद ती लावण्यसरिता पिंगळा। पूर्ववत पाहे राव डोळां। आश्चर्य देखोनि ते वेळां। जनपाळा आनंदे ॥७८॥
राव निरखोनि जंव पाहे। तंव ती पिंगळा प्रत्यक्ष आहे। जवळी जातां लवलाहें। लज्जित होय ती बाळा ॥७९॥
राव म्हणे योगिनाथें। हें कौतुक दाविलें सकळ्यांतें। मज उपजवोनि सुखातें। नासिलें दुःखातें क्षणार्धें ॥८०॥
सामर्थ्य योगियाचें पाहोन। राव भावें करी नमन। मुखें वाणी धन्य धन्य। अघटित महिमान तुमचें ॥८१॥
तंव गोरक्ष म्हणे भूपासी। आमुची वस्तु भेटली आम्हांसी। असंख्य पिंगळा देतों तुम्हांसी। तूं जरी मागसी येधवां ॥८२॥

राव म्हणे जी स्वामिया। हें सामर्थ्य आम्हां कोठोनिया। खगसाम्यता उरगा या। कोठोनि सदया येईल ते ॥८३॥
नेणोनि सामर्थ्य तुमचें। अर्भकपणें बोलिलों याचें। अपराध घडले सत्य साचे। दान क्षमेचें देइजे ॥८४॥
परिसोनि रायाची वाणी। गोरक्ष बोले ते क्षणीं। आपुलें वचनीं आणिली हानी। पाहें करणी आमुची ॥८५॥
पुरुषें वाचें जें बोलावें। तेंचि सत्य करोनि दावावें। सामर्थ्य नसतां न वदावें। आपुलें रक्षावें वैभव ॥८६॥
असो मी जें बोलिलों तुजलें। तेंचि राया पाहें परतें। पुरविलें तुझिया आळीतें। सांभाळीं त्यातें विरह सांडी ॥८७॥
राव जंव पाहे परतोन। तों असंख्य पिंगळा जाल्या निर्माण। अलंकारभूषणेंमंडित पूर्ण। रूपें लावण्य गुणवती ॥८८॥
त्या सर्व धांवोन येती। सत्वर रायातें वेढिती। उपभोग देउनी रंजविती। आर्जवोनि बोलती शब्द निके ॥८९॥
त्या मोहाचें दाविती कौतुक। म्हणती किमर्थ राया करिसी शोक। आम्ही सेवेशी तिष्ठतों साम्यक। भोगीं सुख चाल घरा ॥९०॥ कोणी धरताती पदर। कोणी गौरवें करिती आदर। कोणी प्रार्थोनि जोडिती कर। कोणी सुंदर पद वंदी ॥९१॥
कोणी तांबुलातें घेवोन। मुखीं घालावया ये धांवोन। एक पुष्पहार घाली आणोन। एक चुंबन देऊं पाहे ॥९२॥
एक म्हणे श्रमलेती। चरण चुरीन आपुल्या हातीं। एक येतसे काकुलती। आश्रमाप्रती चलावें ॥९३॥
एक म्हणे जी प्राणेश्वरा। उदक तापलें स्नान करा। एक म्हणे वेगीं आवरा। देतें अंबरा नेसावें ॥९४॥
एक म्हणे पाकक्रिया। सिद्ध झाली भोजन कराया। पक्वान्न षड्रस वाढिते ठायां। किजे दया भोजनीं ॥९५॥
एक म्हणे प्रधानासी। दुःखे श्रम झाले रायासी। करवा दिव्य सुमनसेजेसी। तिष्ठेन सेवेसी मी अंगें ॥९६॥
एक सांगे एखाला। त्रयोदश गुणी कीजे तांबूला। शुद्धी अंतीं भूपाला। पाहिजे दिल्हा चर्वणीं ॥९७॥
दोघी धांवोनि धरिती कर। दोघी वारिती वरी चामर। एक हास्य करी सुंदर। एक मुक्ताहार सरसावी ॥९८॥
एक कंठीं घालीं मिठी। एक मोहा दावोनि सरे पोटीं। एक सांगे मंजुळ गोष्टी। एक वक्रदृष्टीं पाहे त्या ॥९९॥
एक धरोनी पीकपात्र। एक स्कंधीं वाहे उपवस्त्र। एक लावी नेत्रानेत्र। एक आत्र जाणवी ॥१००॥
एक म्हणे मुगुट घाला। मुक्ततुरा खोवीं त्याला। एक सरसावी अंगींचा शेला। रत्नकिमाळा एक सूदी ॥१॥
एक म्हणे अटिलें देहासी। मर्दन करावें सुगंधेंसी। एक म्हणे धुईन चरणासी। तो भाग तुजसी नेदीं मी ॥२॥
एक म्हणे उष्णोदकें करून। स्वामीचीं सर्व अंगें शेकीन। एक म्हणे मुक्त करीन। कुरळ सघन गुंतले ते ॥३॥
एक म्हणे स्वअंगे। पुसीन स्वामींचीं अंगे। एक म्हणे मी सुरंगें। वसन वेगें देईन ॥४॥
एक म्हणे मी मृगमदासी। मी स्वयें चर्चीन रायासी। एक घोटोनि केशरासी। करोद्वर्तनासी करीन म्हणे ॥५॥
एक म्हणे अलंकार। घालोनि शृंगारीन नृपवर। एक म्हणे सुंदर। गुंफीन हार सुमनांचे ॥६॥
यापरी नाना युक्तीं। करिया झाल्या त्या युवती। राव भ्रमण पावला चित्तीं। करितां गणती न लागे त्या ॥७॥
सभोंवतीं पाहोनि लोक। पाहतां त्यांसी पडलें ठक। न कळे कोणासी कौतुक। लीला नेटक योग्याची ॥८॥
पिंगळारूपें ज्या कामिनी। रायासि पिसें करिती मोहुनी। विनोद मांडिला चहूंकडोनी। तोचि श्रवणीं सांठवा ॥९॥
एक पुढें होवोनि विनवी राया। तूं एकटा आम्ही बहु जाया। विभक्त निवासा निर्मीं ठायां। वर्तें माया सम सर्वां ॥११०॥

# ॥ अध्याय ४२ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ।

ॐनमो सिद्ध अवधूता । सर्वात्मक तूं गुरुदत्ता । अविनाशरूपा समर्था । आदि महंता नमो तुज ॥१॥
तूं कल्याणमूर्ती सुखदायक । त्रितापहर्ता अज्ञानछेदक । तूं पापाचळाचा दाहक । भवतारक सदय तूं ॥२॥
तव पदीं माथा ठेवून । करूं आरंभिलें कीर्तन । परी तूंचि करविता निरोपण । देता अवधान तूंचि पैं ॥३॥
तूंचि स्फूर्तीचा होसी दाता । रस तुझा तूंचि चोगरितां । न्यून तें पूर्ण तूंचि कर्ता । तोषवितो संतां तूंचि कीं ॥४॥
तूंचि पत्र मशी लेखणी । तूंचि लिहविता लेखकपणीं । ग्रंथरूपें तूंचि धणी । सेवेसी चरणीं मी रंक ॥५॥
तरी या साधुसंतवृंदा । नित्य प्रार्थावें हाचि धंदा । नमो नित्यां चिया पदा । तुळंघावें कदा आहेसी ॥६॥
बैसकेसी घावी आसनें । श्रवणीं बैसवावें सन्मानें । पादुका जीवेंभावें रक्षणें । लक्ष लक्षणें आज्ञायें ॥७॥
हेंचि नित्य काज सेवकासी । यदर्थ विनवीं श्रोते सज्जनांसी । सादर होवोनी श्रवणासी । दत्तप्रसादासी सेविजे ॥८॥
मागिले प्रसंगीं निरोपण । जालें तें सज्जनीं केलें श्रवण । सामोहें सुरेशनंदन । गेला भ्रमोन अतिशयें ॥९॥
तै सावधान करावया । प्रधान शरण गेला गोरक्षपाया । प्रार्थोनि घेतले अभया । येतो शांतवाया म्हणोनी ॥१०॥
कथा सुरस । श्रोते श्रवण कीजे सावकाश । अद्भुत नवलाव विशेष । आदरें तो रस सेविजे ॥११॥
.पडवा घेवोन । गोरक्ष निघाला तेथून । चालतां छलीछंदें करून । पावला येऊन स्मशानीं ॥१२॥
. जाणवी रायातें । गोरक्ष सिद्ध आले येथें । पैल दिसती त्यांतें । शरण अतींतें जाइजे ॥१३॥
अधरासनीं बैसोन । नित्य करी तपाचरण । अलभ्य याचें दर्शन । तो तुज सन्निधान पावला ॥१४॥
ा येथें येणें येऊन राया । लीला दाविली लोकां या । वृक्षफळें सेवोनिया । पुनरा ठायां लाविलीं ॥१५॥
त होते ते योगी फार । आतां शिष्यगुरु दोघे निर्धार । आम्हीं पाहिला यांचा चमत्कार । सिद्ध थोर असती हे ॥१६॥
ते सहज लीलें करोन । आलेति घे राया दर्शन । तुझें भाग्य विशेष गहन । अप्रार्थित आगमन पैं यांचें ॥१७॥
अलभ्यलाभ तुज पावला । तो साधोनि घेइंजे भूपाळा । पुनरा नये असी वेळा । पहा टोळां तो योगी ॥१८॥
रायें परिसोनि वचन । पुढें करी जंव अवलोकन । तों योगी देखिला प्रभायमान । तेज गहन अनुपम ॥१९॥
राया मनीं खीछंद । पिंगळा पिंगळा करी शब्द । परी किंचित होयोन सावध । पाहोनि सिद्ध ठटला ॥२०॥
सन्मुख राव जंव चालला । गोरक्षें येतां नेत्रीं देखिला । सान्निध्याची दखोनि ते वेळा । हवी हवा सुरवी ॥२१॥
ती हवी भूमीं पडतां । चूर्ण जाली अवचितां । योगि खेद पावोनि चित्तां । शोक वाहना पैं जाला ॥२२॥
हवी हवी म्हणोन । आक्रोश करिता जाला रुदन । तंव भूप पावला सन्निध येयोन । वंदी चरण आदरें ॥२३॥
रायें नमिलें स्वामी । परी न वदे कांहींच वचनासी । हवीछंद लागला मानसीं । दुःख जीवासी वाटे तो ॥२४॥
जीवीं आहाल्य करी फार । नेत्रीं पावला जळाचा पूर । आक्रंद जातां न घडे आवर । राव मनीं घाबरला ॥२५॥
राव विनवोनि करी भाषण । किमर्थ स्वामी करितां रुदन । ...मन दुःख घोग । करीन निग्रहन तयाचें ॥२६॥

गोरक्ष म्हणे न होय राया । कां बोलसी तूं शब्द वांया । गेलें न ये परतोनिया । तुज सांगोनिया व्यर्थ कीं ॥२७॥
भर्तृहरी म्हणे सांगा स्वामी । तुमचे आशीर्वचनें काय कमी । पुरवीन हेतू तुमचे मी । शोक उर्मी मावळीन ॥२८॥
तंव वदे तो योगेश्वर । माझे डबीचा जाला चूर । त्यासाठीं शोक निर्धार । करितों अपार भूपाळ ॥२९॥
डबी तिजऐसी न मिळे । म्हणोनि मन माझें डहुळे । गेली न ये कदा काळें । यदर्थ विव्हळें नृपसुज्ञा ॥३०॥
तूं राज्यातें सोडोन । किमर्थ धरिलेंसी हें स्थान । तें मज सांगे आतां कारण । करिसी स्मरण कोणाचें ॥३१॥
भूप म्हणे माझी स्वामिनी । पिंगळा नामें प्रियकर राणी । प्रतिव्रतेमाजीं शिरोमणी । लावण्यखाणी सुरत्न ॥३२॥
वनीं म्यां सिंहातें वधिलें । सहज विनोदा पाठविलें । राव परभुवना गेले । सिंहें अटिलें तयांसी ॥३३॥
तिनें परिसोनि विपरित चिन्ह । तात्काळ उभाउभीं सांडिला प्राण । तें मज घडतांचि श्रवण । आलों धांवोन तिजपाशीं ॥३४॥ पाहोनिया तिच्या प्रेता । परमदुःख पावलों चित्ता । हे प्राणप्रियकर असतां । मीच घाता प्रवर्तलों ॥३५॥
तिचे आठवुनिया गुण । कळवळोनि हे देहीं शीण । सर्वीं मिळोनि केलें दहन । तें हें स्थान योगिया ॥३६॥
तिची लावण्यता बैसली ध्यानीं । मन वेधलें तिच्या लक्षणीं । भेटी व्हावी म्हणोनि । राहिलों ये स्थानीं दुःखभरें ॥३७॥
करोनि पिंगळेचा स्मर । रात्रंदिवस करीं जागर । केधवां पाहीन डोळेभर । म्हणोनि अंतर झुरतसे ॥३८॥
गोरक्ष म्हणे त्याच रीतीं । गेलो डबी बैसली चित्तीं । तिजवीण न गमे मजप्रती । दे मज भूपती आणूनि ते ॥३९॥
राव म्हणे प्रयत्न करीन । तुझी डबी तुज देईन । अनेक तिजऐशा मेळवीन । उशीर कोण या काजा ॥४०॥
योगी म्हणे माझी मज । तूं जरी डबी देसी आज । तरी मी भेटवीन तुझी भाज । परस्परां काज समसाम्य ॥४१॥
वचन परिसोनि योगियाचें । मन आनंदलें रायाचें । प्रधानासी आज्ञापी वाचें । पाचारीं गांवीचे कारीगर ॥४२॥
आज्ञा वंदोनि ते अवसरीं । सेवक पिटिले तात्काळ नगरीं । कारीगर आणोनि सत्वरीं । आज्ञा करी राजेंद्र ॥४३॥
योगियाची डबी फुटली । तिजऐसीच पाहिजे जाली । अवश्य म्हणोनि ते वेळीं । आपुले स्थळीं चालिले ॥४४॥
राव म्हणे योगियाचें मन । संतोषें ऐसें करा कारण । लागेल तें द्रव्य वेंचोन । आणा करून वस्तु वेगीं ॥४५॥
आनंद वाटेल जरी योगियासी । तरी मी तोषवीन तुम्हां सर्वांसी । हें परिसोनि वेगेंसी । लागले योजनेसि कामिक ॥४६॥
नाना धातूंच्या पृथक । कितेक जडिताच्या देख । प्रकार कौशल्य अनेक । रचोनि साम्यक आणिती ॥४७॥
ठेविती योगियाचे समोर । तेणें न रमे त्याचें अंतर । डबी डबी म्हणोनि अपार । शोक दुर्धर करीतसे ॥४८॥
त्या अनेक डब्या पाहोन । सर्वांचेहीं आनंदे मन । परी गोरक्षा न रुचे तें जाण । न करी अवलोकन त्यांकडे ॥४९॥
राव म्हणे जी नाथा । अमूल्य प्रकारें दाविल्या असतां । कांहे नये तुमच्या चिता । मज अनाया निवेदिजे ॥५०॥
गोरक्ष म्हणे जी होती । तैशीच ते मज दे हातीं । येर अमूल्य न लागती । सांगू किती तुजलागीं ॥५१॥
न कळोनि वर्म रायाला । अहंकारें हट्टी पेटला । डबीचूर करीं घेतला । सांगे कामिकांला योजना ॥५२॥
हा घेवोनि जा वेगीं चूर । दावा कुशलत्वाचा प्रकार । जैशी होती तदनुसार । आणा सत्वर करोनिया ॥५३॥
कारागिरें भिडस्त युक्ती । रजरज काचा सर्व जडती । रस पाजोनि सिद्ध करिती । पुढें ठेविती उभयाच्या ॥५४॥

राव जोडोनि पाणी । करी योगियाची विनवणी । हे डवी अर्पिली चरणीं । घ्या विलोकोनि आपुली ॥५५॥
गोरक्ष म्हणे कुशलें । बहु युक्तीनें रज जोडिलें । काय पूर्व प्रकारा पावलें । भगांत राहिले डाखलग ॥५६॥
पूर्व पदार्थ कां ऐसा होता । हें राया तुज न जाणवे चित्ता । देसी भंगलिया पदार्था । येणें शांतता न घडे मज ॥५७॥
अहा डवी म्हणोन । पुन्हा गोरक्ष करी रुदन । रायें दृढ धरिले चरण । बोले प्रार्थून पुढती ॥५८॥
तुम्ही साधु सिद्ध म्हणवितां । गोलियाचा शोक वाहतां । तेंचि केवीं येईल हातां । विवेकें समर्था शोधिजे ॥५९॥
गोरक्ष म्हणे ऐसें कळतें । मग मन कां न तुझें हें वळते । कासया येव्हढें हव्हळतें । समजतां वळ तें सत्य पैं ॥६०॥
तें तुज कांहीं न समजलें । मिथ्या मोहें मन भ्रमलें । असत्य तेंचि सत्य भासलें । दृढ ठसलें मानसीं ॥६१॥
पिंड हा उसणा पांचांचा । भाग एकवटला महद्भूतांचा । येथें वास दोघांचा । नेमिल्या नेमाचा होनसे ॥६२॥
एक महद्भूतापासून । उपजती पांच पांच गुण । यांसी अधिपती श्रेष्ठ तीन । मात्रा भिन्न पांच त्या ॥६३॥
एवं मिश्रितांचा हा पिंड । वृक्ष वाढविला प्रचंड । तोही जाणा औटखंड । परिवार उदंड तयाचा ॥६४॥
यावरी पक्षी दोघे जण । ते एक एकाचेंचि अंग पूर्ण । नेम सरतां जाती उडोन । राहिले व्यापून पाहाती या ॥६५॥
... तीन जे असती । तीन कार्य तिघां हातीं । दोघां नेम उद्भवस्थिती । एक हातीं कर्ता तो ॥६६॥
... पक्षी साधितां उड्डाण । तें वृक्ष पडे उन्मळोन । ज्याचा भाग त्यालागोन । जाती देवोन अन्य स्थळा ॥६७॥
...ाचें त्यानें नेलें । त्यांत काय सांग गा आपुलें । स्वप्नीं द्रव्य सोसें जोडिलें । जागृतीस फावले काय राया ॥६८॥
तें जैसें सत्य नाहीं । तैसेंचि विचारें हेंही पाहीं । सांडी भ्रम सावध । न बुडे डोहीं मोहाच्या ॥६९॥
राव म्हणे जी दातारा । तुम्हीं अनुग्रह केला खरा । परी प्रीतिबाण भेदला अंतरा । तेणें मी घाबरा दुःख वाहें ॥७०॥
उदंड असती कामिनी । परी तिजऐसी न देखों कोण्ही । ती अप्रतिम सर्वगुणी । वेध मनीं मज तिचा ॥७१॥
तिजऐसें निधान । शोधीतां न मिळे तिन्ही भुवन । न्यूनाधिकया असतील जाण । परी तिजसमान न देखों ॥७२॥
तेचि व्हावी ऐसी वाटे । तिजसाठींच हा प्राण घोटे । क्षणक्षणां कंठ दाटे । केधवां भेटे न कळे मज ॥७३॥
मृत्यु मर्त्यलोकींची राहाटी । हे तो आहे सर्वांपाठीं एक वेळां होती भेटी । मग हो तुटी होणें ती ॥७४॥
यापरी वदतां नृपवर । हृदयीं दाटला गहींवर । गोरक्ष म्हणे राहें स्थिर । पाहें चमत्कार दावितों ॥७५॥
माझी डवी न देववे तुजसी । परी दावितों कौतुकासी । तुझी पिंगळा तूं घे निश्चयेंसी । डवी येणेंसी न देववे ॥७६॥
जेथें पिंगळेचें जालें दहन । तेथेंचि गोरक्षें सुलक्षण । दाविता जाला प्रगट करोन । राया परतोन पाहें म्हणे ॥७७॥
तंव ती लावण्यकळिका पिंगळा । पूर्ववत पाहे राव डोळां । आश्चर्य देखोनि ते वेळां । जनपाळा आनंदे ॥७८॥
राव निरखोनि जंव पाहे । तंव ती पिंगळा प्रत्यक्ष आहे । जवळी जातां लवलाहें । लज्जित होय ती वाळा ॥७९॥
राव म्हणे योगिनाथें । हें कौतुक दाविलें सकळांतें । मज उपजवोनि सुखातें । नासिलें दुःखातें क्षणार्धें ॥८०॥
सामर्थ्य योगियाचें पाहोन । राव भावें करी नमन । मुखें वाणी धन्य धन्य । अघटित महिमान तुमचें ॥८१॥
तंव गोरक्ष म्हणे भूपासी । आमुची वस्तु भेटवीं आम्हांसी । असंख्य पिंगळा देतों तुजसी । तूं जरी मागसी येधवां ॥८२॥

राव म्हणे जी स्वामिया। हें सामर्थ्य आम्हां कोठोनिया। खगसाम्यता उरगा या। कोठोनि सदया येईल ते ॥८३॥
नेणोनि सामर्थ्य तुमचें। अर्भकपणें बोलिलों वाचें। अपराध घडले सत्य साचे। दान क्षमेचें देइजे ॥८४॥
परिसोनि रायाची वाणी। गोरक्ष बोले ते क्षणीं। आपुलें वचनीं आणिली हानी। पाहें करणी आमुची ॥८५॥
पुरुषें वाचें जें बोलावें। तेंचि सत्य करोनि दावावें। सामर्थ्य नसतां न वदावें। आपुलें रक्षावें वैभव ॥८६॥
असो मी जें बोलिलों तूतें। तेंचि राया पाहें परतें। पुरविलें तुझिया आळीतें। सांभाळीं त्यातें विरह सांडी ॥८७॥
राव जंव पाहे परतोन। तों असंख्य पिंगळा जाल्या निर्माण। अलंकारभूषणेंमंडित पूर्ण। रूपें लावण्य गुणवती ॥८८॥
त्या सर्व धांवोन येती। सत्वर रायातें वेढिती। उपभोग देउनी रंजविती। आर्जवोनि बोलती शब्द निके ॥८९॥
त्या मोहाचें दाविती कौतुक। म्हणती किमर्थ राया करिसी शोक। आम्ही सेवेशी तिष्ठलों साम्यक। भोगीं सुख चाल घरा ॥९०॥ कोणी धरताती पदर। कोणी गौरवें करिती आदर। कोणी प्रार्थोनि जोडिती कर। कोणी सुंदर पद वंदी ॥९१॥
कोणी तांबुलातें घेवोन। मुखीं घालावया ये धांवोन। एक पुष्पहार घाली आणोन। एक चुंबन देऊं पाहे ॥९२॥
एक म्हणे श्रमलेती। चरण चुरीन आपुल्या हातीं। एक येतसे काकुलती। आश्रमाप्रती चलावें ॥९३॥
एक म्हणे जी प्राणेश्वरा। उदक तापलें स्नान करा। एक म्हणे वेगीं आवरा। देतें अंबरा नेसावें ॥९४॥
एक म्हणे पाकक्रिया। सिद्ध झाली भोजन कराया। पक्वान्न षड्रस वाढितें ठायां। किजे दया भोजनीं ॥९५॥
एक म्हणे प्रधानासी। दुःखें श्रम झाले रायासी। करवा दिव्य सुमनसेजेसी। तिष्ठेन सेवेसी मी अंगें ॥९६॥
एक सांगे एकाला। त्रयोदश गुणी कीजे तांबूला। शुद्धी अंतीं भूपाला। पाहिजे दिल्हा चर्वणीं ॥९७॥
दोघी धांवोनि धरिती कर। दोघी वारिती वरी चामर। एक हास्य करी सुंदर। एक मुक्ताहार सरसावी ॥९८॥
एक कंठीं घाली मिठी। एक मोहा दावोनि सरे पोटीं। एक सांगे मंजुळ गोष्टी। एक वक्रदृष्टीं पाहे त्या ॥९९॥
एक धरोनी पीकपात्र। एक स्कंधीं वाहे उपवस्त्र। एक लावी नेत्रानेत्र। एक आत्र जाणवी ॥१००॥
एक म्हणे मुगुट घाला। मुक्तुरा खोवीं त्याला। एक सरसावी अंगींचा शेला। रत्नांकमाळा एक सूदी ॥१॥
एक म्हणे अटिलें देहासी। मर्दन करावें सुगंधेंसी। एक म्हणे धुईन चरणासी। तो भाग तुजसी नेदीं मी ॥२॥
एक म्हणे उष्णोदकें करून। स्वामीचीं सर्व अंगें शेकीन। एक म्हणे मुक्त करीन। कुरळ सघन गुंतले ते ॥३॥
एक म्हणे स्वअंगें। पुसीन स्वामीचीं अंगे। एक म्हणे मी सुरंगें। वसन वेगें देईन ॥४॥
एक म्हणे मी मृगमदासी। मी स्वयें चर्चीन रायासी। एक घोटोनि केशरासी। करोद्वर्तनासी करीन म्हणे ॥५॥
एक म्हणे अलंकार। घालोनि शृंगारीन नृपवर। एक म्हणे सुंदर। गुंफीन हार सुमनांचे ॥६॥
यापरी नाना युक्तीं। करिती झाल्या त्या युवती। राव भ्रमण पावला चित्तीं। करितां गणती न लागे त्या ॥७॥
सभोंवतीं पाहोनि लोक। पाहतां त्यांसी पडलें ठक। न कळे कोणासी कौतुक। लीला नेटक योग्याची ॥८॥
पिंगळारूपें ज्या कामनी। रायासि विर्से करिती मोहनी। विनोद मांडिला चहूंकडोनी। तोचि श्रवणीं सांठवा ॥९॥
एक पुढें होवोनि विनवी राया। तूं एकटा आम्ही बहु जाया। विभक्त निवासा निर्मी ठायां। वीन माया सम सर्वां ॥११०॥

एक मागे कनकांबर। एक पाटावद्दुतार। एक पैठणी पल्लेदार। शाहु सुंदर एक मागे ॥११॥
एक सांगे राजावळ। एक धट्टी मागे विशाळ। एक जरतारी पातळ। एक सोनसळ दोरवा ॥१२॥
एक चंद्रकळा चवकटी। एक मागे नारायणपेठी। एक म्हणे वाव्लपट्टी। द्या गोमटी आवड मज ॥१३॥
एक मागे रंग हिरवें। एक सुचविती झाली पारवें। एक म्हणे गुंजाळ बरवें। म्हणे खारवें निदान द्या ॥१४॥
एकी आवडे पिंवळें। एक म्हणे असो काळें। एक सुरंग सांगे पिंवळें। एक ढवळें शुद्धची ॥१५॥
कोणी मागती अलंकार। वांकी पैंजण पोल्हार। साखळ्या तोरड्या रूळ सुंदर। जोडवे झणत्कार अनवटाचा ॥१६॥
एकीं मुदरा खडी वेवत। चंद्रकोर सीसफुल आवळजडित। अवतारमुद्र शोभिवंत। गुंफीन वेणींत धावे मज ॥१७॥
एक बिंदी मागे घिजवरा। एकी काप सांखळ्या हातसरा। एक कर्णमुद्रा मागे फरा। एकमुक्ताहारा मागे प्रीती ॥१८॥
दुल्लड चंद्रहार गरसळी। वज्रटीकमाळा एकावळी। चंद्रहार मागे एक वाळी। नाना आळी घेवोनिया ॥१९॥
वेळा वाक्या वाजुबंद। गोंडे गजरे पाटल्या गेंद। जवे कंगण्या विविध। माजबंद कटिसूत्र ॥१२०॥
कोणी मागती शुद्ध कनकाचे। कोणी इच्छिती जडिताचे। कोणी शुद्ध श्वेत मुक्तांचे। कोणी मिश्रितांचे द्या म्हणती ॥२१॥
यापरी बहुतांची बहु आळ। पुरवा म्हणोनि करिती कोल्हाळ। तें परिसोनिया भूपाळ। होउनी व्याकुळ बैटावे ॥२२॥
हृदयशून्य वेडावला। वचन कांहीं न बोलवे त्याला। अत्यंत मनीं जाचावला। देखोनि कंटाळला त्या भारा ॥२३॥
मनीं म्हणे एक पिंगळा। इतुक्या कोठोनि झाल्या ह्या गोळा। कोण कर्म ओढवलें कपाळा। आली अवकळा मज वाटे ॥२४॥
तंव त्या अवघ्या ललना। रायासी करिती प्रार्थना। सावध होवोनि चला सदना। सोडा स्मशाना सवेगें ॥२५॥
सांभाळोनि आपुल्या वैभवासी। तोषवा सर्व गुणें पत्न्यांसी। सोहळे कां दाविता जनांसी। रक्षा लौकिकासी सत्वर ॥२६॥
मागें होती एक नार। तिजसाठीं शोक केला फार। जाणोनि तुमचा निर्धार। प्रगटला भार सेवेसी ॥२७॥
सिद्धासि निवेदिला अर्थ। तेणें ते झाले कृपावंत। तेणें पुरला तुमचा हेत। फळ अगणित पावला ॥२८॥
आतां नाणिजे कांटाळा। प्रीतीं सांभाळिजे हा पाळा। तुज पाहोनि कामज्वाळा। उठती नृपाळा शांतवीं ॥२९॥
आतां असो हा संभ्रम। आम्हां जाली दुर्धर काम। यांचें चुकलील जरी वर्म। तरी अधर्म कर्म घोर ॥१३०॥
त्वरें देउनी अंगसंगासी। शांतवीं स्वकळें सकळांसी। न स्वीकारितां वाव्हल्येसी। तूं पावसी नृपश्रेष्ठा ॥३१॥
ऐकोनि सर्वांचें वचन। भय पावलें रायाचें मन। न दिसे उपाय त्यालागून। गेला शरण गोरक्षा ॥३२॥
म्हणे त्राहे त्राहे जी दातारा। शरण आलों हें विघ्न वारा। धीर न धरवे अंतरा। कृपा करा मी दीन ॥३३॥
मूर्खत्वें अट्टहास केला। तो माझा मज फळासी आला। प्राणांत पावलों हा घाला। सोडवी दयाळा येथोनी ॥३४॥
अंग थरथरां कांपत। नेत्रीं अश्रुधारा वाहत। धरिले पाय न सोडित। जाला गलित सर्व गात्रीं ॥३५॥
गोरक्ष म्हणे गा भूपती। करीत होतासी पिंगळेची खंती। ते अनेकरूपें तुजप्रती भेटतां चित्तीं खेद कां हो ॥३६॥
आतां सुखें त्यांतें अंगिकारावें। आनंदें वैभव सांभाळावें। प्रपंचसुख प्रेमें घ्यावें। विषय करावे तृप्त कीं ॥३७॥
तूं एका पिंगळेसाठीं। जीवीं होत होतासि कष्टी। आतां मिळाल्या लक्षकोटी। आनंद पोटीं असावा ॥३८॥

हा प्रत्यक्ष तुझ्या कांता । यांसी स्वमंदिरा नेई आतां । पुरवीं त्यांचिया मनोरथा । विपरीत वार्ता न दावीं ॥३९॥
जेणें सकळांचें समाधान । राया तोचि धर्म राहें आचरोन । मनीं न व्हावें त्वां उद्विग्न । आनंदघन असावें ॥१४०॥
परिसोनि गोरक्षाचे बोल । आनंदली प्रजा प्रधान सकळ । धांवोनि धरिती चरणकमळ । म्हणती दयाळ धन्य तूं ॥४१॥
जें होतें आमुचे चित्तीं । तेंचि बोधिलें कृपामूर्ती । येणें सुख जालें सर्वांप्रती । आतां हा भूपती भद्रीं पावो ॥४२॥
तंव राव विनवी योगिया । मज अनाथावरी कीजे दया । नको नको ही मोहमाया । सोडवी येथूनिया गुरुनाथा ॥४३॥
एक पत्नी माझें व्रत । येथें प्रगटल्या असंख्यात । हें मज दिसे विपरीत । चुकवीं घात सदया तूं ॥४४॥
एक होती तीं तों गेली । आतां कोठोनि आली । हे प्रत्यक्ष देखत भुली । मंज हे कळली तव कृपें ॥४५॥
हें अनर्थासी कारण । येणें पुढें भय दारुण । नरकीं घडेल पतन । ऐसें मन भाविलें ॥४६॥
तूं सदय उदार महाराज । म्हणोनि प्रार्थितो भावें तुज । समर्था माझी राखीं लाज । नावडती हे चोज सर्वथा ॥४७॥
तुझे वंदितों मी चरण । सोडवीं सोडवीं मज येथून । नको प्रपंच हा मजलागोन । दुख दारूण ये ठायीं ॥४८॥
गोरक्ष म्हणे गा नृपवरा । बहु भयें तूं जालासि घाबरा । तरी तुज मी सांगतों विचारा । तेणें भेदरा न राहे कीं ॥४९॥
ह्या पिंगळा तुज बहु दिसती । परि प्रिय आवडे कोण चित्तीं । तेचि तूं गा धरीं हातीं । येरा मावळती ऐशाची ॥१५०॥
प्रिय तेचि घे प्रियकर । तिजसवें करीं संसार । प्रजा राज्य सांभाळी समग्र । नाणीं विचार येर मनीं ॥५१॥
तंव ते पिंगळेचे भार । एकदांचि करिती शब्दगजर । राया तूं सर्वांचा भ्रतार । कोणासि दूर सांडिसी ॥५२॥
योगी सांगे निवडोनि धेई । राया अनुचित हें कर्म पाहीं । आम्हां समान तूं सर्वां ठायीं । द्वैत कांहीं नाणीं मना ॥५३॥
एक म्हणें आज्ञा गोरक्षाचीं । ते राव न भंगी कधीं त्याची । आज्ञा जाली एकीची । गती येरां कोणती ॥५४॥
एक म्हणे पराते । उगें बोलावया काय होतें । आवण आपुल्या स्वहितातें । व्हावें जागतें सत्वर ॥५५॥
एक म्हणे हा विचार । आम्हां वानला गे निर्धार । तरी आतां प्राणेश्वर । आण सत्वर मेळ्यांत ॥५६॥
आपंगोनी एकीसी । पाहूं कैसा त्यागील येरांसी । मग सकळही तेव्हां रायासी धरोनि पछवासी वोढिती ॥५७॥
चहोंकडोनी लागतां नेटें । हांसतां पुगली जनांची पोटें । म्हणती हें राया कर्म खोटें । कुटुंबीं चव्हाटे मांडिलें ॥५८॥
प्रधान म्हणे विपरीत । होऊं पाहे महा अनर्थ । ऐसें न देखो भुवनत्रयांत । करोनि घात घेतला ॥५९॥
हें आश्चर्य देखोन । वक्ता विनवी श्रोत्यांलागुन । दृष्टांत कथा आठवली पूर्ण । ते सावधान परिसावी ॥१६०॥
कोण्ही शूद्रखाणी कांताभ्रतार । कर्मानुसार करिती संसार । त्यामाजीं दरिद्रं अपार । दोन प्रहर कठीण त्या ॥६१॥
अयंत दारिद्र्यें तापला । संसारीं गृहस्थ कांटाळला । कुटुंब म्हणे तयाला प्रार्थी देवीला आपुल्या ॥६२॥
तै तो अनुतापें करून । पावला श्रीदेवीचें स्थान । तेथें मांडिलें अनुष्ठान । सदृढ मन करोनिया ॥६३॥
ऐसें तपतां बहु दिवस । निग्रह कळला अंबिकेस । मग साक्षात् होवोनि तयास । माग वरास त्या वदे ॥६४॥
येरू परिसोनि साचोळ । नेत्र उघडोनि पाहे तात्काळ । तंव ती भगवती दयाळ । देखोनि मौळ ठेवी पदीं ॥६५॥
तंव अंबा म्हणे तयासी । काय इच्छा तव मानसीं । ते मागें तूं निश्चयेंसीं । पुरवीन कामनेसी तुझिया ॥६६॥

तंव तो म्हणे न कळे मज । पुसोनि येतों कांतेसि काज । जें सांगेल तें मागू तुज । अंबा सहज जा म्हणे ॥६७॥
बहु दिवसा गेला मंदिरीं । देखती जाली त्या अंतुरीं । वेगीं धांवोनि आली बाहेरी । कुशळ परोपरी पुसतसे ॥६८॥
येरू क्षेमातें वदोन । म्हणे अंबा जाली प्रसन्न । ते माग म्हणे मजलागून । काय मागून घेऊं तिज ॥६९॥
येरी म्हणे संसारीं । सर्व एक पाहिजे निर्धारीं । सर्व पृथक मागतां न दे खरी । कोपेल अंतरीं ती माय ॥१७०॥
तरी सर्व हेतु परिपूर्ण । होऊन न सरती परतोन । यदर्थालें घ्या मागोन । तुम्हां सुचवोन मी देतें ॥७१॥
सर्व कार्जी घ्यावी बरकत । सर्व मागणें आलें यांत । यावीण न मागा पदार्थ । जा जा त्वरित हें मागा ॥७२॥
परिसोनि कांतेचें वचन । तुळजेपाशीं गेला परतोन । प्रार्थिता जाला कर जोडून । बरकत पूर्ण मज द्यावी ॥७३॥
तंव आंबा बोले तयासी । ऐसें मागणें काय मागसी । काय उणें अन्य पदार्थासी । मागतां तुसी न ये कीं ॥७४॥
तंव तो म्हणे मी यावीण । माते न मागोंचि कांहीं जाण । हेंचि तूं देईं कृपा करून । न करीं अनुमान जगदंबे ॥७५॥
हट्ट पाहोनि तयाचा । अंबा बोले वरदवाचा । हेतु पुरो बरकतेचा । वर साचा फळो तुज ॥७६॥
वर देवोनि अंबा गेली । वृत्ति आनंदातें यांची पावली । क्षण न लगतां ते वेळीं । कांतेजवळी पावला ॥७७॥
कांतेसि करितां निरोपण । तीही जाली आनंदघन । म्हणे फेडावया पारण । साहित्य आणून मज द्यावें ॥७८॥
... घरीं अनुमनी । साहित्य आणूं कवणे रीतीं । कांता उठोन सत्वर गतीं । वाण्याप्रती मागत ॥७९॥
तो म्हणे घेवोनि जाई । उधार सत्वर आणोनि देईं । अवश्य म्हणोनि ते समयीं । भ्रतारा देई पाठवून ॥१८०॥
साहित्याची मोट बांधिली । येरे मस्तकीं वाहिली । येतां आश्रमीं कांतेनें देखिली । समोरी धांवली उतरावया ॥८१॥
मोट उतरितां नारी । तों दुसरी आहे शिरावरी । तीही उतरितां तिसरी । आश्चर्य करी कामिनी ॥८२॥
जेंव जेंव उतरोनि घेत । तंव तंव वरी ते दिसत । घर भरलें मोटें अद्भुत । न दिसे रिक्त अणुभरी ॥८३॥
वाहतां आणि उतरितां । अत्यंत शिणले उभयतां । भ्रतारास म्हणे तें कांता । श्रमले आतां टाका तुम्ही ॥८४॥
तोहि टाकितां श्रमला । परी ओझें जड जालें मस्तकाला । प्राण कासावीस व्याकुळ जाला । पाणी कांतेला पाज म्हणे
॥८५॥ येरी अन्न शिजवोन । उम्याच घाली त्या भोजन । करवोनिया उदकपान । म्हणे हें कोण अरिष्ट ॥८६॥
शिरींची मोट कांहीं सरेना । कळ लागली त्याचिया माना । दुःखें अश्रु वाहती नयना । जाणवलें जनां धांवती ॥८७॥
विपरीत पाहोनि ते वेळें । सर्व तेव्हां हंसो लागले । गृहपत्नीस पुसते जाले । केवी वर्तलें हें सांगा ॥८८॥
येरी म्हणे भगवती । प्रसन्न जाली स्वामीप्रती । माग म्हणतां निश्चिती । मज ते येती पुसावया ॥८९॥
बरकत मागावी म्हणोन । मी बोलिलें त्यांसी वचन । जन म्हणती तरीच कारण । आलें घडोन हें ऐसें ॥१९०॥
असो ऐसे लोटले तीन दिवस । श्रद्धापुत्र त्याचि ठायास । देखोनि घाटाळा कामिनीस । मानी त्रास तयाचा ॥९१॥
तें अन्नउदकातें त्यागिलें । अंग उम्यानें दटलें । प्राणांत समय पावले । ओझें न टळे कल्पांतीं ॥९२॥
जेवीं हातींची काठी पडे सुटून । तेवींच देह दिधला टाकोन । पडतांचि गेला त्याचा प्राण । करी रुदन कांता तें ॥९३॥
समोंवतीं जन आले । नाना परी नीतें गांजिलें । मागणें भलतें मागविलें । भ्रतारा आटिलें आपुल्या ॥९४॥

नाना परी तीस गांजिती । पडोसी स्वधर्मे साह्य होती । तिरडें बांधोन सिद्ध करिती । उचलोनि नेती त्या प्रेता ॥९५॥
करिती तयाचें बंधन । कांता म्हणे नेलें कोण । तंव ते पाहती परतोन । प्रेत देखोन विस्मयो ॥९६॥
तंव शून्य म्हणती प्रथम न्यावें । मग दुसऱ्या तें घेऊन जावें । कोणी म्हणती बाहेर आणावें । तुम्ही न मानावें कोण्ही म्हणे
॥९७॥ तें प्रेत स्कंधीं वाहिलें । तैसेंच तळवटीं आणीक पडिलें । म्हणती स्कंधींचें जाळा पहिलें । मग हें नेलें जाईल
॥९८॥ मुख्य प्रेता घेवोनि जाती । एक द्वारीं तिरड्यावरुती । एक घरांत पडलें निश्चितीं । देखोनि हांसती गावकरी ॥९९॥
मार्गी उचलोनि जे गेलें । ते विसावा घेऊं पावले । एक खालतें जंव ठेवले । तंव दुजें बैसलें स्कंधावरी ॥२००॥
जों जों उतरिती खांदीचें । तों तों वरीच बनलें साचें । कर्म ओढवलें म्हणती आमुचें । ग्राहीक प्राणाचें हें जालें ॥१॥
मग जीवीं बहुत कांटाळती । सरितातीरीं तैसोचि जाती । चौथे करोनि विचार युक्ती । चौदिशें पळती पटकोनी ॥२॥
मागुती येती धांवोन । सरणीं ठेविती प्रेत उचलोन । खालीं त्यजती तिरडासन । पाहतां निरखोन प्रेतवरी ॥३॥
त्या प्रेतांसी नाहीं पार । घरीं दारीं अंगणीं अपार । विसाव्यास्थळींचा विचार । प्रेतविस्तार बहुतची ॥४॥
जिकडे तिकडे जाली प्रेतें । घर भरिलें धान्य भरितें । उचलूं जातां आहे तेथें । वेड बरकतें लाविलें ॥५॥
तेथींच राया बरकत । कामिनींची जाली प्राप्त । त्या पडल्या असंख्यात । राया ओढीत चहूंकडे ॥६॥
राव भर्तृहरी वेडावला । कामिनींनीं पिसा केला । विटंबना देखोनि कांटाळला । त्रासा पावला अंतरीं ॥७॥
परम अनुतापें तापोन । काय वदता जाला आपण । धिग् या विषयाचें लक्षण । नरकीं पतन धिग् जिणें ॥८॥
नको नको हा संसार । वैभव राज्य छत्र चामर । गज अश्व रथसंभार । असो धिक्कार यालागीं ॥९॥
धिग् धिग् जिणें या कामाचें । धिक् प्रेम या कामिनींचें । धिग् भोग त्या रतिसुखाचे । धिग् धिग् आमुचें कृतकर्म ॥२१०॥
धिग् आप्त हे गणगोत । धिग् नरनारी समस्त । मज मोहामाजीं करिती ग्रस्त । धिग् मी त्यांत वेष्टिलों ॥११॥
धिग् धन धान्य पट्टासन । धिक् सत्ता धिग् मान । धिग् अहंता थोरपण । धिग् विडंबन हें माझें ॥१२॥
धिग् विद्या चातुर्यता । गुंतवी विशेष विषयपदार्थी । धिक् कळावळ अनर्थी । पाववी घाता धिग बुद्धी ॥१३॥
धिक् काय धिग इंद्रिय । धिग मन घडवी अपाय । धिग पुत्रता यांची करोनि काय । धिग मी होय लाचावलों ॥१४॥
धिग् हे विकृतिविकार । धिग् धिग् यांचे व्यापार । धिग् लोभ मोहप्रकार । मज आशा थोर धिग् धिग् हे ॥१५॥
धिक् खाद्य पाद्य आसन वसन । धिग् अलंकार धिग् भूषण । धिग् विषयलुब्ध हे जन । धिग् भाषण तयांचें ॥१६॥
धिग् दासीदाससंभार । धिग् मायामोह हा अपार । धिग् धिग् हे समग्र । यांचेनि घोर नरकपद ॥१७॥
धिग् धिग् संग कांतेचा । शोष केला सर्व देहींचा । धिक् चाळा या विषयाचा । घोट प्राणाचा करूं पाहे ॥१८॥
नको नको हें मज कांहीं । याचा उपजला वीट देहीं । आतां नातळे सर्वथाही । पोळलों पाहीं जीवीं मी ॥१९॥
यापरी भर्तृहरीनें देख । अनुतापें वर्णिलें वैराग्यशतक । धिक्कारोनि पदार्थ सकळिक । धगधगी पावक तेथीं जाला ॥२२०॥
वेगीं सर्वसातें सांडोन । गोरक्षपदीं जडला येऊन । अष्टभावें दाटला पूर्ण । वाहती नयन प्रेमजळें ॥२१॥
तिरस्कारें मन विटलें । रोमांच अंगीं थरारिले । अनन्य लोटांगण घातलें । गोरक्षें ओळखिलें अंतर ॥२२॥

हा विषयसुखातें विटला। देहभावातें पालटला। वर्म ओळखोनि भूपाला। बोलता जाला गोरक्ष तो ॥२३॥
म्हणे भर्तृहरी सोडी चरण। कासया करिसी सांग स्फुंदन। तुझे मनींचा अर्थ कोण। तो मज संपूर्ण सांगे का ॥२४॥
ऐसें साधुसिद्ध सदय। विनयकारणीं जाणती उपाय। सामर्थ्ये दवडिती अपाय। करिती साह्य दीनाचें ॥२५॥
फळवळोनिया अंतर। वद म्हणती त्या उत्तर। तो पुढील प्रसंगीं चमत्कार। रस अपार प्रेमाचा ॥२६॥
साधु अत्यंत दयाळ। हृदयीं नवनीताहोनि कोमळ। शरणागताचा प्रतिपाळ। करोनि आळ पुरवीती ॥२७॥
हे उदार धीर भाग्यवंत। यांहोनि नसे कोण्ही समर्थ। माग त्याचे मनोरथ। कृपावंत पुरविती ॥२८॥
ही कीर्ति परिसोनि श्रवणीं। मुमुक्षुआर्थिक आनंदले मनीं। दोघे वंदोनि स्वार्थकारणीं। संतचरणीं विनटले ॥२९॥
त्यामाजी हीन पामर। अनाथ दुर्बल पतित थोर। उभा जोडोनि भावें कर। यांचें अंतर जाणिजे ॥३०॥
तुम्ही संत आनंदमूर्ती। सुत लक्षितों पदाप्रती। या अभय देवोनि प्रीतीं। सेवा निगुतीं घेईजे ॥३१॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रवणेंचि पुरती मनोरथ। श्रोते परिसोत भाविक भक्त। द्विचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥३२॥

॥ इति द्विचत्वारिंशोध्यायः समाप्त ः॥

# अध्याय ४३ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

ॐनमो दत्त अविनाशा । अज्ञानछेदका ज्ञानप्रकाशा । सर्वज्ञा तूं इशा । देवसुरेशा वंद्य तूं ॥१॥
तूं सर्वसाक्षी सर्वातीत । यालागीं नामें तूं अतीत । तुज म्हणती गा अवधूत । हें विख्यात त्रिजगती ॥२॥
या नामाची विभक्ती । शिवासी पुसे ती तार्वती । तो भोळा निरोपी तिजप्रती । करी तो निवृत्ती परियसी ॥३॥
आदि मध्य अवसान । नाहीं आशापाशबंधन । अंतर्बाह्य असक्त पूर्ण । आनंदघन अविनाश ॥४॥
आधिव्याधि ज्याते नाहीं । अस्तोदय नेणें कांहीं । आकारनिराकारातीत पाहीं । अगोचर तोही अनिवार ॥५॥
हें अकारलें अक्षर । व्यापक व्यापलें सर्वाकार । अव्यंग अवद्य विचार । अव्यय अवतार आभास ॥६॥
वासनावर्जित वागे वाग । वेदांत वदनीं वक्तव्य चांग । वास्तव्य निरामय निःसंग । वचन अभंग जयाचें ॥७॥
वर्तमानें वर्ते सदा । वादीं न प्रवर्ते कधीं वादा । वर्म न भेदी कवणासि कदा । वसे वृंदा संतांच्या ॥८॥
हें लक्षण वकाराचें । अवसाविलें सर्व साचे । आतां निरोपण धकाराचें । शिवस्व वाचे वदतसे ॥९॥
धूर्त असे जयाचें चित्त । धूलि भस्में देह धूलित । धूर्त सर्व लक्षणीं युक्त । धैर्यवंत अचलसा ॥१०॥
धारणेचिया असे पर । ध्यानीं असोनि ध्यानांतर । धर्मार्थी केवळ उदार । धीर गंभीर धन्य तो ॥११॥
धाला ध्यावबी ध्याइका । धाताहि न पवे त्याच्या सुखा । धात्रीस पदें आनंद निका । धाकती धकधका रिपु त्यातें ॥१२॥
ऐसेव हा धकार । जाणिविलें हें त्रि अक्षर । आता पुढिले परिसा विचार । उरला तकार तो ऐका ॥१३॥
तम चित्ता ज्यातें नाहीं । तत्त्वीं तत्त्वविचारणा पाही । तळमळ अणुमात्र नसे देहीं । तपे सर्वदाही तपसांत ॥१४॥
तापसंतापातें वारी । तारूंपणें जगती तारी । तामसादि वृत्ति नसे शरीरीं । तो चेष्टा अहंकारी अलिप्त ॥१५॥
ताळ्याताळ्यातीत । त्वमहं तो सर्वगत । तो योगी सदा रमत । तेजें अद्भुत अनुपम ॥१६॥
हीं चारी अक्षरें उत्तम । तैशींच दीक्षा आणि क्रम । यालागीं अवधूतनाम । येणेंचि संभ्रम विस्तारिला ॥१७॥
हे स्वामी अवधूता । तूतें शिव जाला वाखाणिता । येर कोण न वर्णी समर्था । गातां चित्ता आनंद ॥१८॥
येच विषयीं विज्ञापना । वारंवार करितों तव चरणा । वांढीं गावें तुझिया गुणा । हेंचि मना आवडतें ॥१८॥
म्हणोनि आरंभिलें या ग्रंथासी । तरी सदया साह्य व्हावें दीनासी । स्वकृपें देवोनि अभयासी । वदवी वाचेसी कथामृत हें ॥२०॥ तुझे कृपेवांचोन । केवीं चाले वक्तव्यपण । मी तरी मतिमंद अज्ञान । नोव्हे सज्ञान जाणता ॥२१॥
हें वर्म जाणोनि श्रीदत्ता । मज अनाथा वोळलासि कृपावंता । जालासि या रसने वदविता । देखोनि सत्ता कृपेची ॥२२॥
मागिले कथाध्याय अंतीं । भर्ये भर्तृहरी उदासोनि चित्तीं । परम अनुतापें निश्चितीं । आला गोरक्षाप्रति शरण तो ॥२३॥
धरिले न सोडी चरण । तंव गोरक्ष म्हणे दुःख कोण । तें सांगे वा मज लागोन । संकोचित मन न करीं गा ॥२४॥
यापरी गोरक्ष वदतां । परी भर्तृहरी चरण न सोडी सर्वथा । म्हणे स्वामी तारीं मज अनाथा । वारीं व्यथा अंतरींची ॥२५॥
मी शरण जालों तुजप्रती । जीवें आलों काकुलती । मज न धावें कवणा हातीं । दास हा प्रीतीं आपंगीं ॥२६॥

जाणोनि भाव अंतरींचा । त्या उठवीं शिष्य मच्छींद्राचा । प्रवाह चालिला प्रेमाचा । न बोलवे वाचां रायासी ॥२७॥
गोरक्षगळां मिठी घालोन । ओकसाबोकसीं चालिलें स्फुंदत । व्यकुळ जाला देखोनि प्राण । सद्गुरु सावधान करिती तया ॥२८॥ बा रे शोक सांडीं आतां । मुखें बोले गुजवार्ता । तुझी वारीन मी चिंता । क्षण न लगतां येथवां ॥२९॥
भर्तृहरी म्हणे जी स्वामिया । मज अनाथावरी करीं दया । दवडीं नारीव्रत अपाया । सेवेसि पायां ठेवीं मज ॥३०॥
नको नको मज संसार । सिंहासन नको छत्रचामर । नको आप्तवर्ग राज्यभार । धनभांडार नको मज ॥३१॥
नको मज विषयिक कांहीं । पहतां आग उपजे देहीं । कांता नको सर्वथाही । कलत्र तेंहीं नको मज ॥३२॥
मज नावडे अन्नपान । यदर्थीं उदास जालें मन । यासंगें भीति दारुण । रिपु हे पूर्ण सर्व माझे ॥३३॥
विषयपंचफणीं मातें डंखिलें । विकार विकृतीनें झडपिलें । लोभमोहानें ग्रासिलें । या योगें बुडालें घर माझें ॥३४॥
उत्तम नरदेह पावलों । सेखीं यासांगें मी नागवलों । आपुल्या स्वहिता आंचवलों । अघोरीं बुडालों काढीं मज ॥३५॥
नाना विषयगुणेंकरून । मी पावलों असें बंधन । पुढें त्रासील सूर्यनंदन । सोडविल कोण तेथें मज ॥३६॥
रस कुशब्दीं जिव्हा रतली । कुकर्म निंदा श्रवणीं भरली । वस्तु कामिनीं दृष्टि वेधली । मकरंदीं भरलीं नासिकपुटें ॥३७॥
दंत रंगले रिपुत्व रंगीं । विषयें लिंग गुंतलें मगीं । ओठ चुंबनाचे प्रसंगीं । कर आलिंगीं कामिनीस ॥३८॥
मन हें विकल्पें नाडलें । चरण कुमार्गीं बोळंगले । या अमंगळ कायेसी पुष्ट केलें । वर्म न जाणितलें कोण्हींही ॥३९॥
नाहीं घडलें देवतार्चन । नाहीं घडलें तीर्थाटण । नाहीं केलें पुराणश्रवण । ऐकिलें कीर्तन नाहीं कीं ॥४०॥
नाहीं घडला परोपकार । नाहीं धर्माधर्म पाहिला विचार । नाहीं संतांचा केला आदर । श्रेष्ठसत्कार न केला ॥४१॥
नाहीं घडलें यजन याजन । अध्ययन न केलें अध्यापन । नाहीं तोषविले गोब्राह्मण । यज्ञ व्रत दान न केलें ॥४२॥
नाचरलों कांहीं पुण्यपंथें । पापचरणची घडलें दे हातें । तरी ऐसिया या अधमातें । जाणें नरकातें खरें कीं ॥४३॥
जें जें कांहीं कर्म केलें । तें तें भोगणें पुढें आलें । म्हणोनि भयाभीत मन जालें । उबगोनि आलों शरण तुज ॥४४॥
मी अन्यायी अपराधी दीन । परी समर्थासी आलों शरण । आतां न पाहीं दोषगुण । करीं पावन पतितासी ॥४५॥
सर्व अपराधांची करोनि क्षमा । तारीं सकृपें मज अधमा । सर्वांपरी चुकलों नेमा । सुखविश्रामा मज तारीं ॥४६॥
तोडीं तोडीं हा भवपाश । करीं स्वचरणाचा मज दास । जीवीं जालों मी उदास । पुरवीं आस गुरुनाथा ॥४७॥
सदय उदारा कृपामूर्ती । वारीं माझी सर्व भीती । हेतु उपजला जो चित्तीं । ते आळ प्रीतीं पुरवारी ॥४८॥
तंव गोरक्ष बोले रायासी । परतापा हे काय मिसी । जया घ्यास जो मानसीं । पावे फळासी तेंचि तो ॥४९॥
कल्पना धाडगी सांडोन । शुद्ध करीं अंतःकरण । स्वदृष्टीं पाहें निरखोन । सावधान होवोनी ॥५०॥
विश्वास धरोनी गुरुवचनीं । राव भर्तृहरी पाहे परतोनी । तो एकही न दिसे पिंगळाराणी । गुप्त होवोनी पैं गेल्या ॥५१॥
नाथप्रताप देखोनि आगळा । भर्तृहरी लागे चरणकमळा । म्हणे तुझी अगाध लिळा । मज दयाळा आवंगीं ॥५२॥
आन पदार्थीं आवडी नाहीं । मन जडलें तुझिया पायीं अक्षय ठाव तेथें देईं । न मागें कांहीं येर तुम्हा ॥५३॥
छेदीं माझें भवबंधन । तुटें आटवीं जन्ममरण । निवटीं निवटीं अज्ञान । आपणांसमान करीं मज ॥५४॥

तूंचि माझी जननी जनिता । तूंचि माझा आप्त चुलता । तूंचि स्वजन होसी भ्राता । इष्ट त्राता तूं माझा ॥५५॥
तूंचि माझें सौभाग्यधन । तूंचि स्वामी करिता कल्याण । तूंचि माझा प्रियकर प्राण । श्रमनाशनकर्ता तूं ॥५६॥
स्वामी तूंचि माझा सद्गुरु । भवसागरींचा तूंचि तारूं । सर्व भावें तूं आधारू । मज पैलपारू नेता तूं ॥५७॥
सर्व योगें तूंचि पाळिता । तूंचि होसी माझा दाता । तुजवीण मज अनाथा । नसे संरक्षिता आन कोण्ही ॥५८॥
मी आजवरी होतों परदेशी । पावलों तव चरणमाहेरासी । आतां न ठेवीं मज उदासी । वारीं चिंतेसी सदया तूं ॥५९॥
दूर करीं अज्ञानतिमिर । त्रिविधतापाचा करीं संहार । शीतळ करीं माझें अंतर । कृपाकर देवोनी ॥६०॥
जन्ममृत्यूचें भय पाठीं । स्वकृपें तें माझें निवटी । मां पाहि तूं कृपादृष्टीं । अपराध पोटीं घालूंन ॥६१॥
मी विनय अर्थभूति । दीन वदनें तुला प्रार्थित । न पाहें स्वामी माझा अंत । अनाथ सनाथ करीं वेगीं ॥६२॥
बहु क्षुधित असें पोटीं । म्हणोनि तव चरणीं दिधली मिठी । दीनदयाळा उठाउठीं । लावीं ओठीं ब्रह्मरस ॥६३॥
तव बीजामृत पाजीं श्रवणीं । जेणें पावेल स्वात्मधणी । वरी प्रबोध लेववीं लेणी । अभयपाणी ठेवीं माथा ॥६४॥
तुझें पद जें आवडतें । तेंचि सकृपें देईं मातें । मी बाळ तुझें नेणतें । घेवो संगातें उचलोनि ॥६५॥
परिसोनि भर्तृहरीची विनवणी । गोरक्ष द्रवला अंतःकरणीं । सदय सकृप होवोनी । पाहे निरखोनी शरणागता ॥६६॥
आनंदसुमुहूर्त अमृतवेळा । सद्गुरूसी उपजला कळवळा । जवळी पाचारिलें भूपाळा । ये कोमळा म्हणोनिया ॥६७॥
वा रे बहु तूं श्रमलासी । त्रिविधतापें तापलासी । तेणें दुःखी जीवीं होसी । कळलें मजसी गुह्य तुझें ॥६८॥
तरी आतां होवोनि सावध । पूजासामुग्री करीं सिद्ध । सोडोनि अंतरींचे निषेध । पूजीं पद सप्रेमें ॥६९॥
होतांचि सद्गुरूचें अभयवचन । भर्तृहरी जाले आनंदघन । उभे राहिले कर जोडोन । बोलती प्रार्थोन नम्रत्वें ॥७०॥
जी स्वामी करुणाकरा । माझी विनंती अवधारा । पूजासमारंभ करुणाकरा । सिद्ध दातारा असे कीं ॥७१॥
नयन तुर्गीचें प्रेमजळ । तेणें क्षाळीन चरणकमळ । सद्बुद्धिचंदनें चर्चीन भाळ । विवेक परिमळ त्यावरी ॥७२॥
भक्ति सुरंग अक्षता । त्या अर्पी आदरें मीननाथा । सद्भावहार गुंफोनि अतौता । सद्गुरू समर्था लेववीन ॥७३॥
अर्पिन वैराग्याच्या चिरा । शांति क्षमा दये चातुरा । शमदम गजरे शोभवीं करां । विरक्ती हारा ओपीन ॥७४॥
अनुतापाची सिद्ध मेखळा । निश्चयाची कटी अचळा । निजअर्थे घालीन गळां । सयली सुढाळा नवरंगी ॥७५॥
मुमुक्षुअर्थ कुंडलें श्रवणीं । लोभममतेच्या पादुका चरणीं । अनुवाद तोडर भव्य भूषणीं । कार्याकारणीं व्रीदावळी ॥७६॥
प्रकृति तुळसी कोमळा । त्रिगुण अर्पीन त्रिदळा । अष्टमात्रेचें वाहीन कमळा । धीर पिंवळा नेसवीन ॥७७॥
धूपीं कामक्रोध जाळीन । ज्ञानदिवा उजळीन । अहं सोहं नैवेद्य अर्पीन । प्राशनीं देईन चिद्गंगा ॥७८॥
करमुखशुद्धी जाल्यावरी । प्रीतीं तांबूल ठेवीन करीं । तो घालोनि मुखांतरीं । रस अंतरीं सांठविजे ॥७९॥
तनमनधन दक्षिणा । अर्पणार्थ हे गुरुचरणा । यदुपरी होतांचि अर्चना । हृदयसिंहासना विरूढावें ॥८०॥
पंच प्राणांच्या उजळोनि ज्योति । जीवें ओंवाळूं ही आरती । इच्छा कामना निगुती । अर्घ्य पुढती फळ विविधें ॥८१॥
सुसंग ज्योति कर्पूर लावूं । तव मुखेंदु निदळ पाहूं । विनय आदरें करुणा गाऊं । पुष्पांजळी वाहूं संकल्पपुष्पें ॥८२॥

काया कुरवंडीं करोन । पदीं श्रीफळ करूं अर्पण । सहजें दंडवत येईल घडोन । सर्वार्पण ऐसें तुज ॥८३॥
ये अन्वयें ही पूजा । तुज समर्पिलीसे गुरुराजा । एवं ग्राह्य करोनि ओजा । अंगीकार माझा करीं स्वामी ॥८४॥
ही विनंती परिसोन । जालें सद्गुरुचें समाधान । तात्काळ मस्तकीं हस्त ओपोन । करवीं श्रवण गुज कानीं ॥८५॥
निजमंत्र श्रवणीं सांठविला । अभयवर त्यातें दिधला । ज्ञानबोध तात्काळ केला । योग निरोपिला सर्वही ॥८६॥
शम दम अवघें त्यागविलें । विकार विकृतीतें विभांडिलें । पंचविषय नष्ट केले । समूळ निर्दाळिलें विकल्पकल्पा ॥८७॥
बोध विवेक बाणवोनि अंगीं । सिद्ध केला तो वीतरागी । निजकृपें रंगविला निजरंगीं । लागवेगीं योगिरायें ॥८८॥
इडा पिंगळा सुषुम्णा । मार्ग दावोनि बाणवी खुणा । रेचक कुंभक त्राहाटक लक्षणा । पूरकपणा साधवी ॥८९॥
ओळखी करवोनि तत्त्वाची । मार्ग सांगितलें पांची । उलट दाविली प्राणाची । गांठीं अपानाची संयुक्त ॥९०॥
नळगताचा संचार । कुंडलिनीप्रवेशप्रकार । तेथें धरवोनि धीर । मार्ग स्थिर बाणवी ॥९१॥
भेद त्या षट्चक्राचे । मातुकेसहित दैवतांचे । सुंवरद पाववोनि त्याचे । पंथ पश्चिमेचे दावीत ॥९२॥
अजपाजपाचें प्रमाण । पंच देहांचें विवरण । पंच समाधींचें ठाण । अवस्थादि गुण प्रकाशविले ॥९३॥
सप्त पाताळांचे भेद । मार्ग दाविले विविध । सप्ताद्रि सागर शुद्ध । द्वीपबोध सरितादि ॥९४॥
पश्चिम मार्गापासोनी । एकवीस स्वर्गांची मांडणी । हिंडविलें चौदा भुवनीं । ब्रह्मस्थानीं पावविला ॥९५॥
सिद्धी संधी साध्य साधवी । भैरवद्वारें नव दाखवी । वाच अनुभवातें ठसवी । दशधा भरवी नाद पृथक ॥९६॥
पुढें साधवी भ्रमण । ज़ाला ब्रह्मरंध्र पावन । माजी करितां प्रवेशन । त्रिकुटासन पावला ॥९७॥
पुढें निरखूं जातां निढळ । तंव प्रभा दाटली सकळ । तें अनुपम सहस्रदळ । अवघा बंबाळ तेजाचा ॥९८॥
तेथें समरस होतां । सर्व नाद झाला वाजता । गेली विरोनि आपणता । अवघी स्वरूपता दाटली ॥९९॥
निढळिनातें निढळिलें । बिंबतां बिंबचि पाहिलें । चंद्रामृत पान करविलें । अमरत्व लाधलें योगिया ॥१००॥
रंग सांडोनि पुढें गेला । अरंगातें निरखिता जाला । तारा ग्रहमंडळ भास पावला । तोही वितुळला गुरुकृपें ॥१॥
पुढें शुद्ध पाहिलें गगन । तेंचि निराकार निर्गुण । निरामय निर्विकल्प स्थान । तेथेंचि निरंजन योगी पाहे ॥२॥
यापरी बिंबवोनि त्यासी । भोग भोगवी सदा उन्मनीसी । नित्य पान सत्रावीसी । अजरामर अविनाशी तो केला ॥३॥
प्राणापानाचे संयमीं । मळ कुंडलिनी मुखीं होमी । येणें क्रमे क्रम क्रमी । यमनियमीं नित्य नवा ॥४॥
हा योगिया योग । उत्तम प्रकारें आचरे सांग । तो न पावे कदा भंग साधील जोग अपूर्व तो ॥५॥
तो हा उत्तम बोध भर्तृहरीसी । आनंदें गोरक्ष उपदेशी । पारंगत करोनि अभ्यासीं । निजसुखासी पावविला ॥६॥
देवोनिया अभयकर । आत्मतत्त्वीं केली अमर । जन्ममृत्यूचा करोनि संहार । काया अमर केली त्याची ॥७॥
अमृतवचन बोले वैखरी । जव लग रहे ये धरतरी । तव लग जीवें तूं भरथरी । अमर करी तेरी काया ॥८॥
हें वचन नोव्हे अप्रमाण । वदलो त्रियाचा सत्य जाण । येथोनि विचरें निरामय पूर्ण । सांडी व्यवधान मायिक हें ॥९॥
कलीचें जग हें त्रिविध । यासी पडों नेदी संबंध । स्वइच्छें रमे सावध । करीं बोध शरणागता ॥११०॥

गुरु एवों विचारावें । नित्य योग तपा आचरावें । निग्रहार्थिया दर्शन द्यावें । हेतु पुरवावे तयाचे ॥११॥
तूं जे जयातें आनंदें देसी । तें सुफळित फळ होईल त्यासी । येरव्हीं जे भावें अर्चितील तुसी । तेही फळासी पावतील ॥१२॥ परी आपुल्या योगातें साधोन । जगीं असावें अदृश्यमान । कोणाचे न पाहावे दोषगुण । अहंपण न मिरवावें ॥१३॥
भार न घालावा कोणावरी । सदय शांत असावें अंतरीं । कोठें न करावी अगोचरी । बरोबरी सिद्धाची ॥१४॥
निर्लोभ नैराश्य असावें । विवेकें मन कसावें । असोनि जगीं न दिसावें । सज्जनीं वैसावें अलिप्त ॥१५॥
न दुखवावें कदा कवणासी । आपणची व्यापलों सर्व देशीं । सोटों नये भिक्षेसी । जागृत निशीं असावें ॥१६॥
न घालावा कोठें वाद । मनीं नाणिजे कांहीं भेद । जीवीं वाटों न द्यावा खेद । जिव्हे स्वाद नसावा ॥१७॥
कोण्हा न ठेवावें दूषण । आग्रहें न करावें भाषण । न मिरवावें जगीं भूषण । क्रोधें शोषण न करावें ॥१८॥
बाहेरी असावें कुश्चळ । अंतरीं असावें निर्मळ । धरोनि नसावें एक स्थळ । साहोनि काळ असावें ॥१९॥
मान आणि अपमान । सुखःदुख तैसेंचि जाण । दुःखहर्षी आनंदघन । मानोनि समान राहिजे ॥१२०॥
लोभ मोह आणि भयासी । त्यागोनि निर्भय राहिजे मानसीं । उपाय न कीजे अपायासी । निंदाद्वेषी नसावें ॥२१॥
पंचविसां नाणिजे विटाळा । विवेकप्रयत्नें यांसी टाळा । हें वर्म बोधिजे एकाचि कुटाळा । आचरतां वेटाळा न बाधी ॥२२॥
एकास बाणवी संग विसाचा । तोचि योगी जाणावा सांचा । काय असोनि बहु दिवसांचा । लाभ निक साचा कोणता ॥२३॥ हा मार्ग असे पुराणा । जावोनि शोधा वेदादि पुराणा । येर भटकोनी काय राना । आपुलें आवराना आपण ॥२४॥
असो आतां यापरी । गोरक्ष बोधोनि भर्तृहरी । भूषणबाणा देवोनि सत्वरीं । झोळी करीं दिधली ॥२५॥ म्हणे राया तुज वेष दिधला । परी तो अनुभवा पाहिजे आला । त्यजोनि देसील या लज्जेला । आणिसील भीक्षेला तै खरे ॥२६॥
ये नगरीं त्वां सत्तें करोन । राज्यवैभव भोगिलें जाण । यामाजी तुझे आप्तजन । मानीक प्रधान सर्वही ॥२७॥
इष्टमित्र असती अपार । गणगोत मायिक नारीनर । आश्रित पुरोहित द्विजवर । कर्ते कारभार प्रौढ-स्थान ॥२८॥
पिशुन दायाद तेही नांदती । दासदासी बहुत असती । प्रीती-अप्रीतीचे जन वर्तती । सभाग्य वर्तती दुर्बळ ॥२९॥
यदर्थ तूतें मी आज्ञा करीं । भिक्षार्थ फिरें घरोघरीं । लज्जा न धरितां निर्धारीं । आणी सत्वरीं मागोनी ॥१३०॥
राया भिक्षेसी जातां । सर्व जन मानिजे मातापिता । विशेष न ध्यावी आप्तहिता । आग्रह सौराया न कीजे ॥३१॥
आदरें जातां भिक्षेसी । कठोर न वदावें कवणासी । दात्या-अदातियासी । द्वैत मानसीं नाणिजे ॥३२॥
दूध भिक्षा आदरें घ्यावी । रक्त भिक्षा कधीं न करावी । सदा शांत वृत्ति धरावी । भूतें पाहवी समसाम्य ॥३३॥
भिक्षा मार्गी सावधान । मुखें करावें नामस्मरण । बाउगें न करावें भाषण । श्रेष्ठासि नमन करावें ॥३४॥
अप्रार्थित वैसों नये । मानी अमान्य करूं नये । लोलिंगत कोठें होवों नये । असत्य बोलूं नये वाणीसी ॥३५॥
वदतां वदावें कल्याणवाणी । उमें नसावें द्वार धरोनी । भिक्षेचा नाद फळवोनि श्रवणीं । पंथ क्रमोनी चालावें ॥३६॥
कलह मोह शोकीं गुंतूं नये । चौढाळपणा करूं नये । भिक्षेवांचोनि घेऊं नये । राहूं नये स्थिर कोठें ॥३७॥
ही मानोनि सत्य शिक्षा । आनंदें कीजे राया भिक्षा । हें प्रिय मज गोरक्षा । दिधली दीक्षा सांभाळीं ॥३८॥

परिसोनि या बोधवचन । भर्तृहरी वंदी गोरक्षचरण । तीन प्रदक्षिणा करोन । आदेश म्हणोन चालिला ॥३९॥
प्रवेश करोनि नगरीं । भिक्षार्थ फिरे घरोघरीं । करें वाजवोनि किंगरी । भजन करी सद्गुरूचें ॥१४०॥
जग रायातें पाहोन । दुःखें शोक करिती जाण । नानापरी बोधिती वचन । करिती सन्मान बहु आदरें ॥४१॥
प्रबुद्ध मिळोनी नारीनर । म्हणती काय केला हा विचार । भाग्यशील तूं सकुमार । वैभव थोर त्यागिलें कां ॥४२॥
येथें कैंचें छत्र सिंहासन । कैंचें अलंकार वस्त्रें भूषण । कैंचे गज रथ अश्व वहन । त्यागितां गहन श्रम राया ॥४३॥
कैंचें दिव्य अन्न षड्रस । आदरें जेवबील कोणी तुम्हांस । त्यागिलें कनकपात्रास । करून त्रास सुख कोण ॥४४॥
पयर्की शय्या सुमनसेज । कां सांडिली त्याची ओज । केवीं येईल आतां नीज । वदेल गुज कोण तेथें ॥४५॥
तंव राजेंद्र बोले वचन । आम्ही योगी योगसंपन्न । आमुचीया वैभवासमान । कोणी सधन दिसेना ॥४६॥
कोण पुसे या राज्यवैभवासी । हे नाशिवंत पदार्थ निश्चयेंसी । सत्ता पाहतां एकदेशीं । काय ऐसियासी करावें ॥४७॥
या लोकींचें मायिक सुख । भोग मागितां भोगणें दुःख । हे पदार्थ अवघे विषयिक । तुम्हांसि कौतुक तयांचें ॥४८॥
जंव जंव जेणें भोगावें । तेणें जन्ममरणा पात्र व्हावें । कोसल्या परी गुंतावें । पडलें ठावें आम्हांसी हें ॥४९॥ आचरोनि [illegible] या नाशिवंत राज्यपदासी । त्या भेदें आचरें अन्योन्य कर्मासी । त्या गुणें नरकासी पाववणें ॥५०॥ [illegible] जोडे नारी नरासी । कांहीं उमज न पडे त्या खरासी । विषयभोगें विसरला हरिहरासी । घडनी राशी पापाच्या ॥५१॥ पापें पापचि देहीं जोडे । पायीं पडती मायिक खोडे । हें न समजोनि वेडे । विषयीं माकडे डुलपती ॥५२॥ हे यमाजीचेंच पाहुणे । पाहुणे परी सक्त मेहुणे । सत्कार जाच आलें सोसणें । उपास पारणें त्यांतची ॥५३॥
हा योग न मनेचि योगियां । योगमार्गाची योग्यांची क्रिया । सदा रमणें अविनाशठायां । कवीं अपाया न पवती ॥५४॥
जाणोनि योगी योगसंधी । आनंदें राज्य करी अविनाशपदीं । ज्ञानविवेकीं विवरी बुद्धी । आत्मैव बोधीं निमग्न ॥५५॥
योगिया कामधेनू पाळिन । भिक्षारूपें सदा दुभन । षड्रस अन्नें करवीं प्राप्त । तेणेंचि तृप्त योगी हे ॥५६॥
नाहीं कोण्हाचें बंधन । सदैव त्यानें मुक्तपण । धरापट हा त्यांचाचि जाण । स्वइच्छें रमण तयांचें ॥५७॥
या योगिजनां समस्तां । सर्वां ठायीं मातापिता । आत्मपणें आत्मता । मानोनि रमता योगी होय ॥५८॥
मृगसिंहकंबलासन । धरापर्यंक अचलासन । यावरी योग्याचें पद्मासन । हेंचि सुखशयन तयाचें ॥५९॥
शशिसूर्याच्या मशाला । कंथा मेखळा दुशाला । अंबरवस्त्र प्रशस्त शाला । संकोच कशाला कोणता ॥१६०॥
योगिया सेजे उन्मनी । तुर्या तिष्ठे सेवेलागुनी । स्वरूपीं राहे भोग भोगुनी । ब्रह्मानंदभुवनीं आनंद ॥६१॥
सर्व देशीं सर्व सत्ता । योगी सावध स्वरूपस्वार्था । योगी स्वतंत्र सर्व कर्ता । पुरवी अर्था विनयाच्या ॥६२॥
योगिया उणें कांहींच नाहीं । सिद्धी रिद्धी लागती पायीं । योगपदाची अद्भूत नवलाई । अजरामर पाहीं तें सदा ॥६३॥
मी तयांचा जालों दास । माझा त्या चरणीं निवास । तेचि पुरविती माझी आस । धरिली कास न सोडीं ॥६४॥
तंव श्रेष्ठ करिती विज्ञापना । राया छत्रचामर त्यागिलें भूषणा । बिरुदावळी वाज नाना । त्यजिला स्वजनांना याचाचा ॥६५॥
त्यजोनि भांडार गोपुर । हा योग रचला तुज सुंदर । आम्हां न मने हा प्रकार । रंगलें अंतर तुझें कैसें ॥६६॥

तैं रात देतसे प्रत्युत्तर । श्रवण करिती नारीनर । आम्हां योग्यांचे विचार । जाणवितों सार परिसावें ॥६७॥
श्रीसद्गुरूचा अभयपाणी । तेंचि छत्र शोभे आम्हांलागुनी । प्रकृती चामरें करवोनी । मज नाथांनीं ओपिलीं ॥६८॥
कर्मदग्ध विभूती चांग । तिणें चर्चिलें हें अंग । ज्ञानकथा अभंग । सयली सुरंग नवविधा ॥६९॥
बोधविवेक कुंडलें श्रवणीं । मंदील ऐक्याचा बरवेपणीं । निजकृपेचा तोडा पेंच बंधनीं । वैराग्यमणी मम कंठीं ॥७०॥
आत्मत्वाचा खोंविला तुरा । स्वशक्ती कलगी मारी लहरा । अभेद श्रीदावळी सैरा । अद्वय फरा श्रीदादिक ॥७१॥
शमदमाचें वीरकंकण । निश्चय माजबंद कटी पूर्ण । सत्यसंकल्पाची कौपीन । आचळा धारण आचळवें ॥७२॥
मर्दोनिया पंच विषयां । तोडा शोभविला मम पायां । औटपिट करोनिया दया । दिल्हें नांदावया मंदिर हें ॥७३॥
स्वात्मनत्त्वाचें भांडार । दश वाद्यनाद गजर । राज्य करितां श्रीशंकर । सेवाधर जीव तो ॥७४॥
त्रिगुण त्रिशूळ अनाहत डमरू । सिंगी पुंगी नाद प्रकारू । सूक्ष्म किंगरी शब्दाकारू । होत गजरू दुतारें ॥७५॥
सत्रावी तुंबी जीवनकळा । अमृतरूपी बाहे झुळझुळां । तेंचि पाळी जीवां सकळां । तिचेनि कळा टवटवी ॥७६॥
हें श्रीगोरक्षनाथें । सकृपें ऐश्वर्य दिधलें मातें । आलों आज्ञा वंदोनि येथें । तुम्हां भिक्षेतें मागावया ॥७७॥
न वदा आतां कांहीं येथुनि । सुखें भोगा वैभवधणी । आनंदें नांदावें स्वस्थानीं । दुःख मनीं न मानावें ॥७८॥
तुम्ही सर्वां मातापितर । म्हणोनि प्रार्थितों जोडोनि कर । कृपा असूं द्या अपार । लोभ दीनावर कीजे जी ॥७९॥
तुम्ही खेद न कीजे कांहीं । कोणतेंहि आम्हां न्यून नाहीं । सुख स्वानंद असां ठायीं । विक्षिप्त देहीं न व्हावें ॥१८०॥
प्रपंचीं असावें सावधान । आचरोनि आपुलें सदाचरण । सारासार पदार्थ कोण । नित्य शोधून पहावा ॥८१॥
नित्य अनित्याचा प्रकार । तोहि जाणावा निर्विकार । भेद अभेद द्रोह दूर । त्यजोनि आपपर ओळखावें ॥८२॥
भाग्य दरिद्र म्हणावें कोणा । देहीं असावी विचारणा । सुखदुःखाची चाळणा । आणावी ध्याना निश्चयें ॥८३॥
देव द्विज साधु संत । योगी सिद्ध तापसी महंत । यांसी असावें शरणागत । सप्रेमयुक्त सद्भावें ॥८४॥
कुमार्ग समुळ त्यजावा । आदरें सुमार्ग आचरावा । जीवीं सर्वदा विवेक असावा । परोपकार करावा घडेल तो ॥८५॥
पापमार्गातें नव जावें । त्वरें पुण्यमार्गा साधावें । घात आघाता न प्रवर्तावें । धैर्य न सांडावें आपुलें ॥८६॥
प्रसंगोपात येनील काळ । तेथें न व्हावें विकळ । दृढ धरावें सत्त्वें बळ । जाईल वेळ न राहे ॥८७॥
भजन पूजन ध्यान । धर्म व्रत कीजे दान । पठण श्रवण मनन । निदिध्यास पूर्ण असावा ॥८८॥
श्रेष्ठ रहणी न सांडावी । अधिकत्वें आपुली न मांडावी । विकार विकृति विभांडावी । वळें खंडावीं दुर्व्यसनें ॥८९॥
आपुले कल्याणासाठीं । सद्गुरुचरणीं घावी मिठी । न पडावें भलते हाटीं । करा साठी वचनांची या ॥१९०॥
शब्दीं धरावी नम्रता । भूतार्थ वाहावी सदयता । हा बोध वाणे ज्याच्या चित्ता । तोचि स्वहिता पावेल ॥९१॥
सत्य बोलावें वचन । त्यागावें परस्त्री परधन । धर्म कर्मीक फळ भोगून । सर्वी लीन असावें ॥९२॥
हे सर्वांस माझी विनंती । या मार्गी जागा दिवसराती । तुमची वाटतसे बहु खंती । कळवळे चित्तीं अंतर हे ॥९३॥
हा अंगीकारोनि शब्दासी । लोभ असो द्या निज मानसीं । द्यावी भिक्षा योगियासी । सादर समयासी असेल ते ॥९४॥

परिसोन भर्तृहरीचे बोल । नरनारी देती प्रेमें डोल । नेत्रीं अश्रु वाहती ढळढळ । जेवीं तें जळ सरितेचें ॥९५॥
सप्रेमें बोलती वचन । आम्हां सर्वां जातां सोडोन । ऐसें तोपवील आम्हां कोण । जालों तुजवीण उदासी ॥९६॥
तुझे वैराग्यवचन ऐकतां । देहीं गेहीं पावलीं शून्यता । चितादहनीं समस्तां । टाकोनि जातां तूं होसी ॥९७॥
अनुताप वैराग्य फिरसी कानन । पुनरा दर्शन आम्हां कोठून । तुझे अंतरले येयोनि चरण । कासया प्राण ठेवावे ॥९८॥
जेवीं श्रीराम जातां वनासी । दुःखित जाले आयोध्यावासी । तोचि भाग राया आम्हांसी । देवोनि जासी योगमुक्तें ॥९९॥
कीं कृष्ण जातां मथुरेतें । शोकाग्नि झोंबला वृजातें । तेवींच राया आम्हातें । देशीं दुःखतें वाटे जीवीं ॥२००॥
तंव भर्तृहरी म्हणे शोक आंवरा । स्वस्थ चित्तें आपुली करा । विवेक हृदयीं विवरा । शांतीसी धरा आणिजे ॥१॥
सद्गुरु आज्ञा वंदोनि शिरीं । भिक्षेसि आलों तुमचे द्वारीं । ते सुखें घालाल मातें जरी । तरी ते बरी घेईन ॥२॥
दुःखें घाल मातें भिक्षा । तरी ते नावडे गुरुगोरक्षा । मी न करीं तुमची उपेक्षा । कारण लक्षा या रीतीं ॥३॥
हे कारण लक्षोनि चतुरीं । संतोष मानती ते अवसरीं । भिक्षा आणोनि झडकरी । झोळीभीतरीं घालिती ॥४॥
घरोघरीं करितां भ्रमण । सर्वे फिरती महाजन । शब्द भर्तृहरीचे ऐकोन । घालती आणून भिक्षा त्वरें ॥५॥
भिक्षा घेवोनि जे येती । ते राया पाहोनि सद्गद होती । नयनोदकें नेत्रपातीं । हेळावती एकसरां ॥६॥
राव न पाहे कोणाकडे । भिक्षा घेवोनि चाले पुढें । पायीं रुपती देखोनि खडे । अंतर भडभडे जगाचें ॥७॥
असो भिक्षा करोनि अवंतीपुरी । भर्तृहरी निघाला बाहेरी । संभार भिक्षेचे बरोबरी । उत्तरद्वारीं निघाले ॥८॥
सप्रेमें वार्ता करीत । उरक्ति वेगें चालतां पंथ । सन्मुख देखोनि सद्गुरुनाथ । भर्तृहरी वदत आनंदें ॥९॥
अलख गांजवोनि विशेष । आदेश वदे तें गुरुस । गोरक्ष उत्तर दे तयास । आदिनाथ आदिगुरूस आदेश हा ॥२१०॥
भिक्षा सद्गुरूसी समर्पून । सद्भावें दंडवतें वंदिले चरण । उभा ठाकला कर जोडून । गोरक्ष प्रतिवचन त्या देती ॥११॥
साहित्य भिक्षेचें मिळालें अपार । याचा भंडारा कीजे सत्वर । प्रसादा आणीं अवंतीपूर । नारीनर वर्णयाती ॥१२॥
सर्वांमुखीं प्रसादअन्न । घावें परमप्रीतीं आदरें करून । राव भर्तृहरी आज्ञा वंदोन । करीं निमंत्रण सकळिकां ॥१३॥
भर्तृहरीची आज्ञा होतां । याती वर्ण जाला मिळता । तयां साहित्य दे आपण स्वतः । पाकसिद्धता करवीली ॥१४॥
भर्तृहरी सद्गुरुसी जागवीत । पाकसिद्धी जाली समस्त । प्रसादपात्रें पुढें ठेवित । भावें निवेदित गुरुवर्या ॥१५॥
श्रीमच्छंद्र बैसवोनि आसनीं । गोरक्षें पूजिला भावें करोनी । तेवींच गोरक्षातें प्रार्थोनी । बैसला अर्चनीं राव तेव्हां ॥१६॥
षोडशोपचारें पूजा केली । षड्रस पक्वान्नें निवेदिलीं । श्रीगुरुमूर्ति आनंदली । आज्ञा दिधली प्रसादीं सर्वां ॥१७॥
ठायीं ठायीं क्षिप्रातीरीं । प्रसादा बैसले हारोहारीं । भूपति त्यां प्रदक्षिणा करी । भावें नमस्कारी त्रिवार ॥१८॥
कर जोडोनि करी प्रार्थना । विलंब जाला प्रसादकारणा । आतां स्वस्थ करोनि मना । प्रीतीं भोजना सारिजे ॥१९॥
हा सद्गुरूचा प्रसाद । सेवितां मानिजे आल्हाद । तंव जन म्हणती राया आनंद । ब्रह्मानंद आजि सर्वां ॥२२०॥
यापरी प्रार्थोनि सर्वांसी । भर्तृहरी पावले सद्गुरुपाशीं । तंव गोरक्ष आज्ञापी रायासी । शेष प्रसादासी सेविजे ॥२१॥
श्रीसद्गुरुआज्ञा वंदोन । भर्तृहरी करिती प्रसादसेवन । सर्व आटोप होतां पूर्ण । म्हणती प्रयाण कीजे आतां ॥२२॥

देखोनि सद्गुरूचें चलन भर्तृहरी आवरी आसनवसन । बाणे आपुलाले करोनि धारण । केलें नमन स्थळासी ॥२३॥ आलखशब्द गाजविले । सिंगीनाद त्राहाटिले । पुंगीनादें वंदिले । पादुका त्याले दोघेही ॥२४॥ सिद्धता होवोनि चालतां । नगरिक लोकीं देखिले अवचितां । धांवोनि पाळा जमला भोंवता । करिती आक्रांता एकसरें ॥२५॥ अहा योगिया आमुचा प्राण । कैसा तूं जातोसि घेवोन । म्हणोनि वक्षःस्थळा बडवोन । घेती संपूर्ण स्वकारानें ॥२६॥ अंग धरणीवर टाकिती । गडबडां योग्यापुढें लोळती । पल्लव पसरोनिया हातीं । दान मागती रायाचें ॥२७॥ अश्रुधारा वाहती नयनीं । गहिंवरें वदती प्रार्थोनी । नको नेवूं रामालागुनि । घालिती चरणीं मिठी प्रेमें ॥२८॥ हे योगिया कृपासागरा । आम्हां दीनांच्या दातारा । जाणोनि आमुच्या अंतरा । देईं धीरा अभयत्वें ॥२९॥ एक म्हणती दयाघना । तुज येउं दे आमुची करुणा । नाहीं तरी जोग दे संपूर्णा । लावी भिक्षाटणा नगरी हे ॥२३०॥ एक म्हणती आतां काय । पुनरा दृष्टीं पडे राय । तरी हाचि योजावा उपाय । सोडा ठाय सर्वही ॥३१॥ कितेक वदती योगियासी । तुज नेणेंचि असे रायासी । तरी स्वकरें दग्ध करीं नगरीसी । आटीं सर्वांसी एकदां ॥३२॥ मागें गंधर्वसेन नृपवरीं । क्रोधें पालथी घातली नगरी । तेवींच हा भर्तृहरी । मांडिली बोहोरी ये रीतीं ॥३३॥ तया कामिनीनें उपसर्गिलें । यातें तुवां योगी केलें । पद संपूर्ण हें नासिलें । भोगणें आलें दुःख आम्हां ॥३४॥ तुम्हीं तों सर्व भावें उदासी । तेंचि पद दिधलें तुम्ही रायासी । कोणा निरविलें जे आम्हांसी । हें मानसी वागों या ॥३५॥ आम्ही परदेसी रायावीणं । राव आमुचा सत्य प्राण । तो तूं जासी हरोन । तरी दे मरण सकळिकां ॥३६॥ या दुःखें अपार । सर्वहि करिती हाहाःकार । फुटला नावरे शोकसागर । जाले योगेश्वर स्थिर तेव्हां ॥३७॥ गोरक्ष म्हणे रायासी । कैसें करावें या जगासी । बहुत बोधिलें आम्हीं तुजसी । तूंही नायकसी कांहीं केल्या ॥३८॥ ऐसियांसी करावें काय । हा तों न सुचे आम्हां उपाय । विलंब गमनालागीं होय । तुझा तूं सोय जाण याची ॥३९॥ गुरुवाक्यातें ऐकोन । भर्तृहरी जाले म्लानवदन । हृदय सद्गद आलें भरून । वाहती नयन न सुचे त्या ॥२४०॥ दोहींकडे आड विहिरी । आतां करूं कोणती परी । सखेद होवोनि अंतरी । दृष्टी वरी न करी तो ॥४१॥ सद्गुरु येवोनी रागा । म्हणती आम्हां अटक कां गा । तुझा तूं सांभाळी उदेगा । आम्हां वेगां जाऊं दे ॥४२॥ हें परिसोनि वचन । येरें धरिले तात्काळ चरण । म्हणे संकल्प न फिरे जाता प्राण । तुझी आण गुरुवर्या ॥४३॥ जाणसी सकळही मानस । वरी कां घालिसी ही कानस । तुज धन्वंतरिया कळली नस । निवारितां रोगास तूंचि कीं ॥४४॥ ब्रह्मांड करावया प्रकाशमान । खद्योताअंगीं सामर्थ्य कोण । धरा करावया तृप्त पूर्ण । कुंभा अंगवण कैंवीं ते ॥४५॥ तेवीं मी या जनासी । कैंवीं शांतवूं निश्चयेसी । मी दीन रंक जडलों पायांसी । तुम्हीं न. मजसी उपेक्षावें ॥४६॥ तुम्हीं स्वामी कृपावंत । समर्थ उदार महंत । पुरविते सकळांचे मनोरथ । लडिवाळाचे अर्थ सर्वहि ॥४७॥ यासंबंधाची नाहीं आस । हे तंव विदित कीं पायांस । तोडीं तोडीं या मोहास । न घालीं पाश पुढतीं ॥४८॥ याचें निवारण करिता । तूंचि होसी गा समर्था । मज गांजूं नको व्यर्थ आतां । सोडवीं ताता बाळकासी ॥४९॥ परिसोनि भर्तृहरीची प्रार्थना । गोरक्ष बोलता जाला जनां । यासी जडली आमुची उपासना । जातां प्राण न सांडीं हा ॥२५०॥

तुमचा तो यापाशीं जीव । हा कळला मज सत्य भाव । यदर्थी निवेदितों उपाव । न धरा अभाव ये वचनीं ॥५१॥
आम्हीं अमर केल भर्तृहरीसी । त्यावरी दिधला जोग यासी । हा न भोगी राज्यसुखासी । फिरेल उदासी स्वइच्छें ॥५२॥
परी लालसा तुमचे मनीं । भर्तृहरीं रहावे ये स्थानीं । तरी तेंचि आज्ञापितों त्यालागोनी । सांठवा श्रवणी वचन तें॥५३॥
तंव भर्तृहरीसी म्हणती नाथ । तुझे ठायीं यांची बहु प्रीत । तुजसाठीं केला अंगपात । शोक अद्भुत पाहे पा ॥५४॥
यांची करुणा परिसोन । द्रवलें आमुचें अंतःकरण । यदर्थ आज्ञापितो तुजलागोन । करीं कारण एक आतां ॥५५॥
तुज असे योग साधणें । तरी या क्षिप्रातीरीं गुंफा करणें । अवंतींपुरीं भिक्षा मागणें । येथेंचि राहणें निरामय ॥५६॥
अभ्यासें योग साधेल । अंतरायें मोह तुटेल । गुप्त समागम घडेल । सहित जोडेल सर्वही ॥५७॥
इच्छेऐसें त्यां रमावें । परी अचळ स्थान येथें असावें । भाविकांते दर्शन द्यावें । हेतु पुरवावे अनन्यांचे ॥५८॥
त्यां निश्चळ आम्हांसाठीं । कधीं न व्हावें जीवीं कष्टी । तुझ्या आमुच्या होतील भेटी । न पेटे हाटीं मानो आज्ञा ॥५९॥
ऐसी आज्ञा भर्तृहरीलागुन । देतां आनंदले सकल जन । जयजयकारें टाळी पिटोन । करिती भजन नाथाचें ॥२६०॥
भर्तृहरी म्हणे गुरुराया । आज्ञा केली करोनि दया । सेवेसि अंतरलों या पायां । परी तुम्हीं दया न सांडिजे ॥६१॥
गोरक्ष म्हणे जें जें करिसी । ते ते सेवाचि पावे आम्हांसी । कल्पना नाणिजे मानसीं । मी तुजपाशीं सर्वदा ॥६२॥
एवं देवोनि वरदहस्त । वेगीं सोडिला अंकपात । बोलवितां समूह समस्त । करिती प्रणिपात आदरें ॥६३॥
निघतां मार्गीं गर्गाश्रमासी । वंदोनि गौतमतीर्थासी । उल्टोनि धर्मराज सप्रेमेंसी । पाहोनि सत्य त्यासी घेतले ॥६४॥
तेथोनि पाहिलें क्षिप्रातीर । उभा ठेला योगेश्वर । म्हणे येथोनि परता समग्र । पैलपार न यावें ॥६५॥
मग सर्वही पायां लागती । कर जोडोनिया प्रार्थिती । कृपा असावी दिनावरती । हे विनंती सकळांची ॥६६॥
गोरक्ष वदे आशीर्वचन । तुम्ही असावें आनंदघन । हा भर्तृहरी मद्रूप मानोन । करा सेवन सहितार्थ ॥६७॥
भर्तृहरीसी म्हणे यतों आतां । तूं राहें कांहीं न करीं चिंता । प्रसाद पादुका जाला देता । भगत अवस्था भर्तृहरीसी ॥६८॥
गोरक्ष मच्छींद्र दोघेजण । पैलक्षिप्रा गेले उतरोन । कच्छभुजदेशा केलें गमन । भर्तृहरीसी पावन करोनिया ॥६९॥
गोरक्ष गे त्यापाठीं । भर्तृहरी बैसले क्षिप्रेतटीं । जन आनंदे बोलती गोष्टी । मानिती पोटीं लाभ हा ॥२७०॥
प्रधानादि प्रबुद्धजन । भर्तृहरीसी विनविती प्रार्थून । चलावें स्वनगरीं आपण । न कीजे अनुमान स्वामीया ॥७१॥
तंव भर्तृहरी वदे सकळांसी । आग्रही न पडावें निश्चयेंसी । येथेंचि बांधिजे गुंफेसी । एकांतवासी राहूं आम्ही ॥७२॥
देखोनिया रायाचें मानस । बंध करिती त्या आवेस । खोदोनिया गहन विवर । सदृढ गुंफेस बांधिलें ॥७३॥
जेथोनिया सद्गुरुमी मार्गी लाविलें । तेचि स्थळीं गुंफेसि बांधिलें । आनंदें भर्तृहरी तेथें राहिले । सुख वाटलें जगासी ॥७४॥
योग पूर्ण तेथें साधिला । मग स्वइच्छें वावरों लागला । स्थळोस्थळीं तप आचरला । भक्तांसि लाविला तो दश ॥७५॥
ज्या ज्या देशीं केलें भ्रमण । तेथें स्थापिलें आपुलें स्थान । भाविकां प्रगटोन देती दर्शन । इच्छा पूर्ण करिती त्यांची ॥७६॥
नाना भर्तृहरीची जीं जीं स्थळें । तेथें भाविक भरविती मेळे । गाती ध्याती प्रेमळें । करिती सोहळे अनुपम्य ॥७७॥
जेवी जालंदरें गौडदेशीं । अमर केलें गोपीचंदासी । वैराग्य देवोनि त्यासी । पद अविनाशी पावविला ॥७८॥

त्याहोनि आगळा भर्तृहरी । गोरक्षें केला निर्धारीं । आनंदें रमती धरेवरी । दोघे दोपरी दो दिशे ॥७९॥
हें सद्गुरुकृपेचे महिमान । अतर्क्य न कळे कवणालागून । शरणागता करिती पावन । आपणासमान क्षणार्धें ॥२८०॥
श्रीसद्गुरुदत्तदिगंबर । तेणें वदविलें हें चरित्र सुंदर । पुढेंहि वदविता तोचि दातार। कथा अपार स्वलीलेची ॥८१॥
दत्तप्रबोधनामें हा ग्रंथ । दत्तरूपेंचि हा साक्षात । पुरवावया मनोरथ । जगदोद्धारार्थ प्रगटला ॥८२॥
प्रगट तरी या संतांसी । योगी सिद्ध भाविकांसी । हें वर्म जाणोनि निश्चयेंसी । रतला सेवेसी अनंतसुत ॥८३॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविक भक्त । त्रिचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२८४॥

॥ इति त्रिचत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ४४ वा ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

नमो सद्गुरु दत्त समर्था । ज्ञानसमुद्रा त्रितापहर्ता । तूं सर्वज्ञ सर्व कर्ता । गोड कथार्था वदविता तूं ॥१॥
गोड चरित्रें तुझीं गहन । तीं करावया आदरें श्रवण । आर्यिक्र बैसले श्रोतेजन । इच्छिती निरोपण साक्षेपें ॥२॥
त्यांचे मनोरथ पुरवावया । स्वामी अवधूता कीजे दया । स्वचरित्र लावीं वदावया । प्रार्थी पाया दीन हा ॥३॥
मागां त्रेचाळिसावे अध्यायीं । योग भर्तृहरीचा वदविला पाहीं । मच्छींद्र गोरक्ष लवलाहीं । ठेवोनि ठायीं त्या जाती ॥४॥
मार्गी निवेदोनि सकळ्यांसी । क्षिप्रा उतरले वेगेंसी । क्रमोनि जाती कच्छभुजदेशीं । अवंतीं भर्तृहरीसी स्थापोनी ॥५॥
वक्ता विनवी श्रोतियांतें । सादर होइजे श्रवणातें । दत्त दयाळू वदविता येथें । मज निमित्तातें करोनि पुढें ॥६॥
तुम्हीं राहोनि सावधान । सांभाळोनि कीजेजी श्रवण । उभयार्थी न लागे दूषण । लक्षोनि संरक्षण करणें तुम्हां ॥७॥
मी मूढ अज्ञानाची राशी । अणुमात्र ज्ञान नाहीं मजसी । यदर्थ विनवितों तुम्हांसी । पक्ष उभयांसी संरक्षा ॥८॥
मी अल्पमति बुद्धिहीन । तुम्हीं श्रोते प्रौढ सज्ञान । तुमचें करावया समाधान । नसे आंगवण मज कांहीं ॥९॥
परी येथें हा श्रीदत्त । पुरवावया सकळ्यांचे हेत । स्वमुखें कथा वदवीत । प्रबोधग्रंथ नाम दत्त ॥१०॥
सद्भावें करितां श्रवण । सर्व कलिमल जाती नासोन । अज्ञान जाय वितळोन । प्रगटे ज्ञान श्रवणेंची ॥११॥
या वर्माचे जाणते । तुम्ही सद्भाविक असां श्रोते । यदर्थ लक्षोनि तुमच्या पदातें । निरोपीं कथेतें परियेसा ॥१२॥
मच्छींद्र आणि गोरक्षनाथ । उभय आनंदें पंथ क्रमित । कच्छभुजदेशीं पावले त्वरित । वास्तव्य करीत मूळ स्थानीं ॥१३॥
तेथें गोरक्षें तपाचरण । केलें आदरें गुरुसेवन । सांप्रदाय वाढविला गहन । जग पावन पैं केलें ॥१४॥
नाना लीला कौतुक । दावोनि भजनी लाविले भाविक । ताप निवटोनि दिधलें सुख । भजती लोक अपारी ॥१५॥
आसनी स्थापोनि गुरूसी । सांप्रदायी लाविले सेवेसी । आपण आज्ञा घेवोनि वेगेंसी । उत्तर पंथासी चालिले ॥१६॥
पंथ उत्तरेचा कठिण । परी योगियांसी संकट कोण । सिद्धी तिष्ठती कर जोडोन । करीं त्या पालन कामधेनू ॥१७॥
देव तीर्थस्थानें पाहत । योगी सिद्धांचें दर्शन घेत । सागरीं स्नान करोनि त्वरित । सख्य घालित मेरूसी ॥१८॥
आयागमनीं करोनि भ्रमण । द्वीप द्वीपांतरें करी अवलोकन । मानससरोवराप्रती येवोन । पाहे संपूर्ण रचनुका ॥१९॥
तेथोनिया तीर्थे करित । उल्लंघी वनोपवनें पर्वत । पूर्व समुद्रीं होवोनि सुस्नात । क्षिति अद्भुत उल्लंघी ॥२०॥
गौडबंगालदेशीं जाऊन । कामाक्षीचें घेतलें दर्शन । लीला अवलोकी संपूर्ण । आपुलें महिमान प्रगटवी ॥२१॥
सांप्रदाय वाढवोनि तेथें । तेथील जग लाविलें भक्तीतें । कित्येक योगधारणेतें । लावोनि क्षितिशांनें उद्धरिलें ॥२२॥
तेथें स्थापोनि अधिष्ठान । सेवेसी योजिले दासजन । उपासना सत्कर्म वाणवोन । निघाले तेथून दक्षिणे ॥२३॥
अनेक देशांतें उल्लंघिलें । येवोनि रामलिंगा पावले । महारुद्रातें भेटले । लंकेसी देखिलें जावोनी ॥२४॥
तेथें करोनि भिक्षाटण । सर्व पाहिलें लंकाभुवन । रामभक्त देखोनि बिभीषण । दिल्हे दरुषण तयासी ॥२५॥
गुजगोष्टी करोनि त्यासी । निघतां पाहे सुवेळेसी । निकुंबळा देखोनि वेगेंसी । सागरतीरासी पावला ॥२६॥

उदधी उल्लंघोनि त्वरित । पावला ऋष्यमूक पर्वत । किष्किंधा देखोनि समस्त । धरिला पंथ पश्चिमेचा ॥२७॥
हिंडतां देवतीर्थे पाहे । मुखीं सदागुरुचरित्र गाये । देखानिया आनंद ठाये । रमतां होय ते स्थळीं ॥२८॥
स्वच्छंदें आनंदें रमत । महाबळेश्वरीं पावला अकस्मात । तेथें गुरुबंधु चर्पटनाथ । योगीसमूहांत पैं होता ॥२९॥
तया चौरंगी सन्निधान । गोरक्ष उभे ठेले आपण । आलखशब्द बोलतां गर्जोन । तो करी श्रवण चर्पट ॥३०॥
ध्यानीं ध्वनीतें ऐकिलें । तात्काळ ध्यानातें विसर्जिलें । धांवोनिया आदेश बोले । गोरक्षा वंदिलें सद्भावें ॥३१॥
आलिंगनीं पडली मिठी । प्रेमाश्रु वाहती नेत्रतटीं । तैं आनंद न समाये पोटीं । सद्गद कंठीं उभयतां ॥३२॥
यापरी उभयांचे आलिंगन । सरतां भेटले योगीजन । परम आल्हादें करून । गुह्य संभाषण करिताती ॥३३॥
परस्परें वार्ता कुशल । निवेदिसी येरयरां सकळ । चर्पट जोडोनि करकमळ । म्हणे सद्गुरु दयाळ क्षेम कीं ॥३४॥
मज दीनाचा आठव । सदय करीतसे कीं गुरुराव । सगुण भेटीसाठीं माझा जीव । वेधला उपाव न चले कीं ॥३५॥
आपुली आज्ञा मज प्रमाण । ती करितां नयेचि उल्लंघन । ठायींचे ठायींच स्मरोन । लक्षोनि चरण स्वस्थ येथें ॥३६॥
चातकापरी वेधलें चित्त । कीं केधवां भेटेल सद्गुरुनाथ । दिवानिशीं तुम्हां आठवीत । तों तूं अकस्मात पावलासी ॥३७॥
तुज पाहतां जालें समाधान । आतां मज दावीं सद्गुरुचरण । गोरक्ष बोले तैं वचन । पावसी दरुशण त्वरितची ॥३८॥
योगी प्रार्थिती गोरक्षासी । धन्य हा चर्पट योगवासी । याचे संगें पावलों सुखासी । आणि योगासी लाधलों ॥३९॥
आपण अंगें कष्ट भोगोन । आम्हा दिधलें सुख पूर्ण । वाचें सदा सद्गुरुभजन । केले पावन जीव बहु ॥४०॥
हा शांत दांत विरक्त । निःस्पृह निःसंग निश्चित । मन नसे लोलिंगत । शुचिष्मंत सर्वस्वीं ॥४१॥
हे परिसोनि वार्ता । आनंद गोरक्षाच्या चित्ता । म्हणे श्रमलासी योग साधितां । चाल आतां मजसवें ॥४२॥
परिसोनिया आनंदवाणी । चौरंगी लागे गोरक्षचरणीं । गोकर्णमहाबळेश्वरासि वंदोनी । योगी तेथोनी निघाले ॥४३॥
देश उल्लंघितां नाना । ठायीं ठायी विलोकिती रचना । मार्गीं ज्ञानविलास निरोपणा । करिती भाषणा आगमोक्त ॥४४॥ यापरी पंथ क्रमित । मल्हाळदेशीं पावले त्वरित । तेथें अधिपति मेनीनाथ । दूतें श्रुत केलें त्या ॥४५॥
आजी योगिनाथांचा भार । पावला आपुले नगरीबाहेर । हें परिसोनिया राजेंद्र । सामोरा सत्वर पावला ॥४६॥
भार विलोकोनि दूरी । राव चाले पादचारी । सन्मुख येतां झडकरी । आदेश करीं दंडवतें ॥४७॥
देखोनि मेनिनाथाचें नमन । गोरक्ष उठवोनि दे आलिंगन । भूपा नावरेचि स्फुंदन । करी समाधान योगी त्याचें ॥४८॥ गोरक्ष संबोखितां त्यासी । येरू वंदी पृथक सर्वांसी । परम आदरें सुस्थळासी । ठाव योगियांसी दिधला ॥४९॥
नित्य सद्भावें अर्चन । करोनि तोषविले योगीजन । इच्छित पदार्थ समर्पोन । करी भाषण नम्रत्वें ॥५०॥
देखोनि आतिथ्य रायाचें । मन आनंदलें योगियाचें । वरप्रदान बोलती वाचें । फळ सेवेचें सफळ फळो ॥५१॥
ऐकतां योगियांचें अभयोत्तर । मेनीनाथ घाली नमस्कार । सुखावे गोरक्षाचें अंतर । परी चमत्कार मांडिला ॥५२॥
सकळ योगियां देखतां । गोरक्ष पुसे मेनीनाथा । अरे हे कोणाची राज्यसंपता । तें मज आतां सांग तूं ॥५३॥
मेनी मच्छिंद्राचा बाळ । सुज्ञ शांत परम सुशीळ । चतुर विवेकी प्रेमळ । जोडोनि करकमळ वदतसे ॥५४॥

जी स्वामी दयाघना । परिसा दासाची विज्ञापना । येथील अधिपति सद्गुरुजाणा ॥ पृथक वचना काय बोलूं ॥५५॥ श्रीसद्गुरु मच्छींद्रनाथ । त्याचेंचि राज्यवैभव हें समस्त । हा देह त्याचा आज्ञांकित । कामीं रावत तत्सेवे ॥५६॥ मी नोव्हें जी राज्य कर्ता । नोव्हें उपभोगासी भोगिता । सर्व स्वामिची असे सत्ता । कर्ता करविता समर्थ तो ॥५७॥ सर्व संभार हा सद्गुरूचा । मी कायावाचा मनें दास त्याचा । अन्यथा बोलें वाचा । सेवक तुमचा ठेवंणाईत ॥५८॥ तुमची आज्ञा वाहोनि शिरीं । राज्यवैभवाचें रक्षण करीं । पद लक्षोनि आजवरी । चातकापरी राहिलों ॥५९॥ तंव अकस्मात भाग्योदय । जाला देखिले स्वामीपाय । आपण आणि सद्गुरुराय । वंच जी उभय मजलागीं ॥६०॥ पाहतां स्वामी तुमचे चरण । सदया उल्हासलें माझें मन । आतां विनवितों कर जोडोन । परिसिजे वचन स्वामिया ॥६१॥ मज सद्गुरुचरणाची वाटते खंती । ते मज दावा सत्वरगती । सेवोनि राहीन निश्चितीं । येर ते प्रीती मज नसे ॥६२॥ हें राज्य छत्र सिंहासन । वैभव संपति भांडार धन । हें तुमंचे तुम्ही घ्या आवरोन । सोडया येथोन मज आतां ॥६३॥ सद्गुरुसेवनाहूनि थोर । मज न वाटे हा राज्यभार । मिथ्या मायिक हा प्रकार । सत्यसार सद्गुरुपद ॥६४॥ तें सेवोनि मी स्वस्थ राहीन । हें तुमचें तुम्ही करा जतन । यदर्थीं प्रार्थितो हा दीन । सोडवा येथून स्वामिया ॥६५॥ कळेल त्या हें सोपोनि धावें । मज अनन्या सर्वे न्यावें । हेंचि मागणें जीवेंभावें । चरण दावावे स्वामीचे ॥६६॥ यापरी गोरक्षा प्रार्थितां । प्रेमा नावरे मेनीनाथा । सदृढ चरणीं ठेवोनि माथा । म्हणे सद्गुरु ताता भेटवीं ॥६७॥ योगी म्हणती गोरक्षासी । धन्य प्रेमभक्ती या मानसीं । कृपा करोनि शांतवीं त्यासी । उतरला कसीं तुझ्या हा ॥६८॥ धन्य हा सद्गुरुभक्त खरा । शांतवोनि देईं अभयवरा । परिसोनि गोरक्ष द्रवला अंतरा । म्हणे सकुमारा ऊठ वेगीं ॥६९॥ मेनीनाथातें उठवोन । सप्रेमें दिलें आलिंगन । म्हणे वा रे ऐक वचन । उदास मन न करीं तूं ॥७०॥ कळलें तुझें मज अंतर । होसी सद्गुरुचरणीं तूं तत्पर । तुज न बाधिती कदा विकार । निर्भय निर्धार स्वस्थ राहें ॥७१॥ हें राज्य छत्र सिंहासन । संपत्ति वैभव अवघें पूर्ण । करीं सद्गुरूचें हें जतन । अणुमात्र दूषण तुज नाहीं ॥७२॥ हें सर्वस्व सद्गुरूचें म्हणसी । तरी तूं वेगळा सांग काय मजसी । सर्वस्वामाजीं तूंही होसी । का उबगसी या काजा ॥७३॥ हें जीवेंभावें करितां रक्षण । तुज घडलें गा सद्गुरुसेवन । आणीक तुज सांगतों कारण । जीवीं धरून आचरे तें ॥७४॥ ज्याज्या कार्यातें आचरसी । देहीं भोग उपभोग जे भोगिसी । आयव्यय नाना करिसी । ते म्हणे सद्गुरूसी अर्पण ॥७५॥ सदा सर्वदा करितां कारण । अथवा आसन शयन भोजन । वाचे वदे सद्गुरुसी अर्पण । हेचि साधन साधीं तूं ॥७६॥ ऐसें आचरतां सर्वदाही । अणुमात्र तूंतें दोष नाहीं । सद्गुरुसेवा हेचि पाही । स्वय राहीं करोनिया ॥७७॥ आमुची आज्ञा राहे वंदोन । करीं हें सद्गुरूचें सर्व जतन । या सेवेसी न करीं अनुमान । घडेल दर्शन सद्गुरूचें ॥७८॥ त्वां सर्वस्व अर्पिलें सद्गुरुनाथा । तरी तुझी त्या समर्थासी सर्व चिंता । स्वस्ति क्षेमें नांदे आतां । स्वस्थ चित्ता करोनिया ॥७९॥ यापरी अभय देतां त्यासी । येरू तात्काळ वंदी चरणासी । म्हणे जी दयाळा कृपाराशी । मज दीनासी नुपेक्षावें ॥८०॥ गोरक्ष म्हणे उदास । कासया करिसी आपुलें मानस । कधीं न विसरूं वत्सा तुज । सांभाळीं वैभवा सद्गुरूच्या ॥८१॥ आम्ही जाउनी सद्गुरुपाशीं । तुझा आदेश सांगू त्यासी । तो कृपासमुद्र भेटेल तुजसी । चिंता मानसीं न करावी .

॥८२॥ यापरी आश्वासोनि मेनीनाथा। पुसोनि गोरक्ष जाला निघता। येरें प्रणिपात करोनि समस्तां। झाला बोळविता आनंदें ॥८३॥ सवे चर्पटासह घेवोनि योगी। गोरक्ष लागे सत्वर मार्गी। पंथ क्रमिती लागवेगीं। सेवेसी चौरंगी सादर ॥८४॥ स्वकर्मनिष्ठीं अति सावध। चालतां करिती ज्ञानसंवाद। शरणागता ठसविती बोध। जगीं अभेद वागती ॥८५॥ ऐशापरी पंथ क्रमोन। पश्चिम सागरा पावले येवोन। तेथें हिंडतां वनोपवन। आनंद स्थान पाहिलें ॥८६॥ पश्चिम देशाचे अभ्यंतरीं। मठी घालोनि राहिले निर्धारीं। ते जग पाहती अद्याप वरी। शोभा साजिरी महास्थळ ॥८७॥ गोरखमठी ज्यानामें म्हणती। गोरक्ष तये स्थानीं वसती। योगीजन पाळे तपती। अनुपम ख्याती तेथींची ॥८८॥ सकळ सिद्धांमीतरीं। गोरक्ष महायोगी निर्धारीं। योग साधीत नाना परी। मुद्रा खेचरी लावोनिया ॥८९॥ त्रिशूळावरी देवोनि आसन। योगी करी जप ध्यान। केधवां उधरीं उलटासन। केधवां पद्मासन अंतरीक्ष ॥९०॥ चौऱ्यायशीं आसनें चाळी चपळ। योगबळे दावी नाना खेळ। सिद्धी जोडोन करकमळ। इच्छित सकळ पुरवीती ॥९१॥ भोंवते वृकव्याघ्रश्वापदभार। निर्वैर तिष्टती अपार। होवोनि गोरक्षाचे आज्ञाधर। सदा समोर बैसती ॥९२॥ आणिक गोरक्षाचे निदान। भिक्षा करी ठायींच बैसोन। अयाचित न घे कवणापासून। स्वमुखें दान न मागे ॥९३॥ तंव श्रोते म्हणती नवल। निवेदितां हे अघटित बोल। यांतील वर्म प्रांजळ। निरोपा सकळ आम्हांसी ॥९४॥ परिसोनि श्रोत्यांचें भाषण। वक्ता विनवी कर जोडोन। जी परिसिज सावधान। करीतों निरोपण क्रम त्याचा ॥९५॥ गोरक्ष अवतार शंकराचा। होय राव हा योगियांचा। स्वामी केवळ योगसिद्धांचा। दास मछिंद्राचा आगळा ॥९६॥ करावया जगदोद्धार। दोघे शिवविष्णूचे अवतार। ज्यांची सत्ता सर्वांवर। काळ किंकर जयांचा ॥९७॥ जन्मभरणाचा करोनी ग्रास। वावरती जगीं होवोनी उदास। न धरिती कवणाचा कधीं आस। तोडिता पाश शरणागताचे॥९८॥ स्वसामर्थ्य करोन। अद्भुत दाविती लीलाविंदान। न घडे तेंचि घडवून। जगीं महिमान प्रगटविती॥९९॥ गोरक्ष महा तपोराशी। आज्ञा करी झोळी दंड्यासी। नित्य जावोनी मछाळदेशीं। मागोनि भिक्षेसी आणिजे ॥१००॥ ते निर्जीव असतां। गोरक्षाज्ञा वंदोनि माथां। वेगें जावोनि उभयतां। आणिती अलौता भिक्षेसी॥१॥ केवढी त्याची सामर्थ्यशक्ती। भिक्षा आणवी निर्जीवा हातीं। सर्व सिद्ध नेत्रीं पाहती। आश्चर्य मानिती आगळें तें ॥२॥ आणीक एक नवलपरी। गोरक्ष बैसोन नगशिखरी। जाज्वल्य तप तेथें करी। आसन अधरी देवोनिया ॥३॥ त्या तपप्रभावें करोन। केलें वनस्पतींचें अवाहन। तात्काल प्रगटल्या सर्व येवोन। आपुली आंगवण जाणविती ॥४॥ तैं गोरक्षी आज्ञापी सकळां। आनां वास कीजे या स्थळां। सोडो नये या अचळा। योगी खेळा खेळतील ॥५॥ गोरक्ष आज्ञा वंदोनि शिरीं। वनस्पती वसती अद्यापवरी। तेथें सक्रिया नाना परी। गोरक्ष करी स्वअंगें ॥६॥ वनस्पति औषधी संयोगोन। नाना धातु केल्या निर्माण। सकळ क्रिया सिद्ध करोन। स्वयें अनुभवोन ग्रंथ केलें ॥७॥ उदर उपसर्ग योगियांसी। तेणें योग न साधे तयांसी। यदर्थ हा योग निश्चयेंसी। उदरभरणासी निर्मिला ॥८॥ हे धातु क्रिया करोन। परां उपसर्गितां व्हावें भरण। निर्वेध करावें योगाचरण। एकांत सेवोन सर्वदा ॥९॥ तेंही कार्यापुरतें साधावें। निःस्पृह निरंजनीं वसावें। अन्याचरणीं न वेचावें। योगियां भरावें हा नेम ॥११०॥

विषयीं प्रापंचिक जन । यातें न लाधे हें जाण । सिद्धयोगियांचें हें धन । ठेविलें निर्मोन गोरक्षें ॥११॥
योगी सिद्धांची झालिया कृपा। तयासीच होय हा मार्ग सोपा। वस्तु निर्मिल्याती अमूपा। न पवती वापा फुकट येरां ॥१२॥
गोरक्ष बोलिला करोनि प्रगट। तें बहुतां असे काव्यपाठ। करितां न फळे भोगिती कष्ट। कल्पना अचाट चालविती ॥१३॥
मूढ त्या वर्मातें नेणतां। जोडूं पाहे क्रियेची संपता। कृपेवीण चढे केवीं हाता। न साधे साधितां सत्य हें ॥१४॥
जेणें तयाऐसें व्हावें। त्यातेंचि हे क्रिया फावे। कीं सेवन सेवोनि लाधावें। प्रसाद वरवे येयींचे पैं ॥१५॥
येरां सर्वथा न सांपडे। साधनीं शिणती मूर्ख वेडे। साधनीं सिद्ध ऐसे थोडे। ते प्रगट उघडे न राहती ॥१६॥
ज्यासी फावलें हें बीज। तो कोणासी न बोले गुज। आपुले साधोनि राहे नीज। लौकिकीं ओज न मने त्या ॥१७॥
हें सिद्धिऋद्धीचें कारण। यातें जाणती सिद्धयोगीजन। ते अलिप्त जनीवसोन। भस्मीं जाण अग्नि जैसा ॥१८॥
ते जगामाजीं असती। असोनिया ते न दिसती। बिभत्सापरी वावरती। थोरीव न दाविती प्रगटोनि ॥१९॥
ते जग पाहती परीक्षोन। कसितां जो कसीं उतरला पूर्ण। तया होवोनिया सुप्रसन्न। देती दान आवडीचें॥१२०॥
असो या योगियासाठीं। गोरक्षें निर्मिली क्रिया गोमटी। हे संसारिकां न पडे दृष्टीं। वळती खोटी योगिसिद्धां ॥२१॥
जेथें क्रिया साधल्या समस्त। तया नामें म्हणती गोरखपर्वत। तेथें साधक रमती बहुत। वस्तु प्राप्त व्हावया ॥२२॥
सकळ वनस्पतीते पाहोन। गोरक्ष म्हणे ह्या पुरातन। यावरी एक निर्माण। करूं नूतन वृक्ष नवा ॥२३॥
सकळ वनस्पतींचा घेवोनी रस। केल्या धातू दिव्य विशेष। त्या वनस्पतीचा उरला वाकस। तो सडोनि आम्लतेसपावला ॥२४॥ तै वनस्पती बोलती प्रार्थोन। समर्थे रसक्रिया घेतली साधोन। आमुचा निकस देतां त्यागोन। हें तंव भूषण नसे तुम्हां ॥२५॥ समर्थें केलिया अंगीकार। तें रूपासि यावें जी निर्धार। ऐसा असतां विचार। करितां अव्हेर निकसाचा ॥२६॥ गोरक्षें परिसोनि दीनवाणी। म्हणे हंचि होते माझें मनीं। तात्काळ निकसा पाहे निरखोनी। तंव तो अंबोनीगेलासे ॥२७॥ स्वकरें घेवोनि केला गोळ। भूगर्भी पेरिला तात्काळ। वरी अभिमंत्रोनी जळ। सिंचितां सरळ उगवला ॥२८॥
गोरख आमली म्हणोनी। त्यासी ठेविलें नामाभिधान। अत्यंत स्थूलविशाळमान। सर्वौषधी पूर्ण ते असे ॥२९॥
असो ऐशी ठायीं ठायीं। गोरक्षें लीला दाखविली पाहीं। नेत्रीं दिसेल हिंडतां मही। ग्रंथीं नाहीं विस्तारिलें ॥१३०॥
लीला लिहितां सविस्तर। वाटेल ग्रंथ केवळ सागर। कारणपरत्वें घेतलें सार। पुढील प्रकार आवरावया ॥३१॥
योगियांमाजी हा महंत। मुगुट सिद्धाचा गोरखनाथ। सदा सर्वदा आनंदभरित। योग साधित अनुपम ॥३२॥
नित्य कामधेनू पाठवून। भिक्षा आणवी तिजकडोन। सकळ सिद्धां तोषवोन। स्वानंदघन गोरख मठीं ॥३३॥
एवं गोरक्षकथानिरोपण। श्रोते सज्जनीं केली श्रवण। आतां सिंहावलोकनें करून। मागील कथन अवधारा ॥३४॥
श्रीदत्तदिगंबरमूर्ती। पावले त्या गिरिनाळपर्वतीं। योगी असंख्य मिळाले भोंवतीं। वार्ता बोलती गुजगुज ॥३५॥
तों एकाएकीं अकस्मात। मेघ नसतां छाया पडत। वरी अवलोकितां निश्चित। कौतुक दिसत अगोचर ॥३६॥
दत्त वदे योगियांसी। हें कोण चिन्ह सांगा आम्हांसी। तंव ते निरोपिती स्वामीसी। झोळी निश्चयेंसी हे होय ॥३७॥
श्रीमच्छिंद्राचा अंकित। महासिद्ध म्हणवी गोरक्षनाथ। त्याचे आज्ञेनें नेमस्त। झोळी जात भिक्षेसी ॥३८॥

ते ऊर्ध्वपंथें करून । नित्य करिते गमनागमन । ते हे जातस वरोन । छायापतन तिचें हें ॥३९॥ दत्त म्हणती ऐसियाचें । दर्शन व्हावें आम्हां साचें । यासी कारण करूं युक्तीचें । आगमन सिद्धाचें सहजची ॥१४०॥ दत्त अविनाश दिगंबर । सर्वज्ञ सर्वात्मक योगेश्वर । मायातीत निर्विकार । परब्रह्म साचार प्रगट हा ॥४१॥ षड्गुणसंपन्न सनातन । जो वेदशास्त्र अगम्य पुर्ण । तो जगदोद्धारार्थ प्रगटोन । करी पावन जगतीसी ॥४२॥ देव ऋषिगण गंधर्व । यक्ष किन्नरादि समुदाव । लोकलोकादि जीव मानव । स्तविती अपूर्व जयाते ॥४३॥ तो हा दत्त दयानिधी । देखता झाला योगसिद्धी । हांसोनि म्हणे हेचि संधी । अहंबुद्धी तोडावया ॥४४॥ मग योगियां बोले स्वामी दत्त । धन्य गोरक्षाचे सामर्थ्य वहुत । त्याचे दर्शनीं आम्ही क्षुधित । पुरावा हेत वाटते ॥४५॥ आतां उपाव करू यदर्थी । म्हणोनि दत्त पाहे ऊर्ध्वपंथीं । आज्ञा पवतां सिद्धीप्रती । झाली उतरती झोळी ते ॥४६॥ श्रीदत्तपदाचे सन्निधान । गोरक्षझोळी उतरली येऊन । देखतां आश्चर्य सकळांलागून । म्हणती पूर्ण नवलाव हा ॥४७॥ म्हणती गोरक्षाची झोळी । त्याचीण नुतरेचि कदा काळीं । ते अवधूताचे न्याहाळी । चरणांजवळी पावली ॥४८॥ धन्य हे स्वामींचें सामर्थ्य गहन । अवलोकितांच आली उतरोन । परी गोरक्ष हा हठी दारुण । करील कोण गति नेणों ॥४९॥ दत्त म्हणती स्वस्थ असावे । होईल ते ते उगेचि पहावें । या झोळीचेनि वैभवें । घडेल बरवें दरुपण तें ॥१५०॥ परिसोनि अवधूताची मात । सकळही राहिले तेव्हां निवांत । वेदांतचर्चा श्रवण । करीत आनंदभरित दत्तसंगे ॥५१॥ इकडे आपुले आश्रमी । माध्यान्हीं निरखोनी पाहे व्योमीं । न दिसे झोळी सर्वगामी । चिंता ऊर्मी दाटली ॥५२॥ म्हणे आजी हें काय जालें । येणें झोळीचें किमर्थ खुंटलें । मग योगियें ध्यानीं अवलोकिलें । वर्म जाणीतलें तयाचें ॥५३॥ मग पाचारोनि योगीपाळा । सांगे झोळीसी अटक झाला । मजहोनि कोण आगळा । व्यत्यय केला पाहूं तो ॥५४॥ सवें घेवोनि योगीभार । सामर्थ्य प्रगट केलें अपार । गगनमार्गी करोनि संचार । चालवी अधर सर्वांसी ॥५५॥ साधोनिया आयागमन । सर्व स्थळें करिती अवलोकन । तंव गिरिनारपर्वतीं सतेजमान । देखिली सुलक्षण भव्य मूर्ती ॥५६॥ नेत्रीं स्वझोळी तेथें देखिली । पाहतां वृत्ती क्रोधावली । म्हणे येणेंचि केली टवाळी । नेत्रकमळीं पाहूं कैसा ॥५७॥ दत्त सर्वात्मक जाणता । जाणविता जाला तैं समस्तां । पैल येणें होतसे गोरक्षनाथा । गगनपंथा विलोका ॥५८॥ तंव ते अवघे योगीजन । पाहती ऊर्ध्व उभें राहून । येतां देखती सिद्धजन । उतरले संपूर्ण पर्वतीं ॥५९॥ अवधूताचे सन्निध पाहीं । गोरक्ष पावला लवलाहीं । मूर्ति देखोनि ते समयीं । आनंद देहीं उद्भवला ॥१६०॥ पाहतांचि गोरक्ष निवाला । वाटे प्रेमें आलिंगावें याला । परी लौकिकभावा संकोचला । धरी अहंतेला बळेंची ॥६१॥ म्हणे या अहंतेकरूनी । उभय योग येईल कळोनी । होईल आनंद सर्वां मनीं । कीर्ति वर्णनी वाटेल ती ॥६२॥ एवं भाग हा मनीं इच्छिला । बाह्यार्थे क्रोध प्रगट केला । निकुरें गोरक्ष बोलों लागला । योगीमेळा अवलोकी ॥६३॥ आदेश न करीतां बोले वचन । म्हणे विपरीत रूपा तूं कोठील कोण । सांग तुझें नामाभिधान । वास्तव्यस्थान निवेदीं तें ॥६४॥ कोण वर्ण कोण व्यक्ती । कोण दीक्षा आहे तुजप्रती । उपास्यमठ कोण निश्चितीं । आचारपद्धती कोण तुज ॥६५॥ कोण सद्गुरु मातापिता । कोण आश्रम निरोपिजे आतां । कोण परिवार आसता । वेद गोत्रता शाखा तुज ॥६६॥

कोण मुद्रा कोण आसन । कोण वृत्ति कोण ध्यान । कोठोनि जालें आगमन । कोठें गमन कारण वदा ॥६७॥
जितुके प्रश्न गोरक्षें केले । तितुकेही हृदयीं सांठविले । परी वचन कांहीं न बोले । मौनचि साधिलें श्रीदत्तें ॥६८॥
उत्तर नेदी म्हणोन । गोरक्ष पुनरा करी भाषण । अहो एवढी तुम्हां आंगवण । असोनि वचन न बोला ॥६९॥
सामर्थ्य नाहीं बोलावया । तरी झोळी उतरली कासया । याडीव दाविलें सकळां या । पुढीऌ उपाया न जाणतां ॥१७०॥
मज जाणीतलें तुम्हीं नाहीं । मी मच्छींद्रदास गोरक्ष पाहीं । आदीनाथाचे सांप्रदायी । योग सर्वही सिद्ध माझे ॥७१॥
त्या मच्छींद्रांचे कृपें करोन । मज तें आहे सर्वज्ञान । सिद्धी निष्टती दासी होऊन । जन्ममरण नाहीं मज ॥७२॥
हे सद्गुरुकृपेचे मज वाणे । वेदांत सिद्धांत सर्व जाणें । अंतरिक्ष असे माझें येणें । कृत्यही करणें अघटित ॥७३॥
आजवरी हा योग साधितां । कोणी न भेटला मज अडवितां । परी हे तुम्ही केली कृत्या । पाडिला गुंता झोळीसी ॥७४॥
हें गुज मातें जाणवतां । धांवोनि आलों मी अतौता । किमर्थ झोळी होसी आडवितां । ते सामर्थ्यता मज दावी ॥७५॥
निरोपिले प्रश्न पुरवावे । योग आपुले दावावे । जिंकिता वाणे हरावें । ब्रीद सोडावें स्वपदाचें ॥७६॥ परिसोन
गोरक्षाचें वचन । अवधूत हांसे गद्गदोन । म्हणे तुमचा योग धन्य धन्य । अवंच कोण करील त्या ॥७७॥ सर्व
स[illegible]जी मुगुटमणी । तुम्ही म्हणवितां आपणांलागोनी । पाहोनि नेत्रीं योगरहणी । आनंद मनीं सकळांच्या ॥७८॥
९ योगिया मुखें करितां श्रवण । अर्थ भेटीचा उपजला पूर्ण । तंव अकस्मात झोळीचें गमन । होतां वरोन पाहिलें ॥७९॥
तीतें नेत्रीं अवलोकितां । तिनें ओळखिलें आमुच्या चित्ता । पूर्ण करावया मनोरथा । वेग खादुना साधी हे ॥१८०॥
मम सन्निध हे स्थिरावली । शकुनवार्ता जाणविली । कीं आतांचि गोरक्ष ये वेळीं । तुम्हांजवळी पावेल ॥८१॥
या संकेतें आम्हांसी । उल्हास पावला परम मानसीं । तेवींच हृदयीं जाणविलें तुम्हांसी । म्हणोनि वेगेंसीं पावलां ॥८२॥
तुझें आगमनाचें कौतुक । पाहोनि वाटलें आम्हां सुख । येतांचि प्रश्न केले अलोलिक । चतुर नेटक होसी तूं ॥८३॥
यापरी गोरक्षातें वदोन । अंतरभाव जाणावयालागोन । भाषणीं धरोनिया मौन । करिती अवलोकन स्वलीलें ॥८४॥
पुढील प्रसंगीं चमत्कार । विरुद्ध माजेल अपार । तो कथारस सुंदर । ग्रहण सविस्तर कीजे जी ॥८५॥
लीलालाघवी सिद्ध असती । पावन करावया ही जगती । आचरोनि चरित्रें प्रकाशिती । नाहीं नीती तयांतें ॥८६॥
मनोरम त्या कथा । निजभावार्थें श्रवण करितां । पूर्ण बोध करवी चित्ता । सकळ मनोरथा पुरवीते ॥८७॥
दत्त गोरक्षाची लीला । सकळ सिद्ध पाहवया डोळां । सावधपणें वेध सकळां । अंतरीं जिव्हाळा गोडपणीं ॥८८॥
उभयतांची क्रिया वर्तलवरस । माजेल जो का अतिसुरस । तो सेविजे साधकास । सांडोनि आळस सावधानें ॥८९॥
दत्त सदय शांत उदार । करावया प्रगटला दीनोद्धार । स्वबोध छेदी अहंकार । दवडी तिमिर अंधत्व ॥१९०॥
सकळ सिद्धांचा राव । होय स्वामी हा दत्तदेव । याचे चरणीं ठेवितां भाव । संकल्प वाव होऊं नेदी ॥९१॥
देखोनि अनन्याची प्रीती । सकृपें मनोरथ पुरवीती । अभय देवोनिया रक्षिती । प्रेमें आपंगिती दासातें ॥९२॥
दत्त आनंदाचा कंद । यातें जाणती संतवृंद । त्याचें निजभावें सेवितां पद । स्वाम आल्हाद वाणवी तो ॥९३॥
अनेक सेवा नाना असती । व्रत तप दानां नाहीं गणती । परी या सत्सेवेतें न पावती । श्रेष्ठ निश्चितीं सर्वांत हे ॥९४॥

अनेक दैवतें असती नाना। क्षेत्र तीर्थे पुण्यस्थाना। पूजितां न पवती संतचरणा। जाणे महिमाना शिव विष्णू ॥९५॥ देव देवांची देवता। तेही पूजी भावें संतां। मानी हे माझी हृद्गता। यांसी पूजितां तोषें मी ॥९६॥ स्वमुखें बोले ईश्वर। मजहोनि असती संत थोर। करितां तयांचा सेवादर अर्चिले निर्धार मजचि तेणें ॥९७॥ अहो या संतांच्या मूर्ती। तो मीच होय गा निश्चितीं। संतांचे जे दास असती। तयां मी श्रीपती बोळंगे ॥९८॥ अनेक ग्रंथांचे ठायीं। बहुधा वचन हेंचि पाहीं। म्हणोनि निर्धार बाणला हृदयीं। संतपायीं विनटलों ॥९९॥ अनन्यभावें संतचरणीं। निशिदिनीं राहिलों लक्ष ठेवोनी। माझे आवडीची धणी। कृपा करोनी पुरवीती ॥२००॥ म्हणोनि आदरें वारंवार। संतां विनवीं जोडोनि कर। आपूले कृपेचा देवोनि आधार। वक्तृत्व सुंदर चालविजे ॥१॥ मी अनाथ दीन रंक। परी संतांचा म्हणवीं सेवक। यदर्थी कृपा कीजे आवश्यक। लडिवाळ देख तुमचा मी ॥२॥ अनंतसुत संतांचा दास। संतची पुरविते याची आस। म्हणोनि सदृढभावें धरिली कास। पदींच निवास दीजे या ॥३॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। त्या प्रसादेंचि रसभरित। परिसोत भाविक श्रोते संत। चतुश्चत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२०४॥

॥ इति चतुश्चत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ४५ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

श्रीवरमूर्ती दिगंवरा । षट्पाणी तूं सर्वेश्वरा । अत्रिनेत्रा उदारा । गुणमुखधरा षड्गुणा ॥१॥
जय त्रिशूलधारणा भूपते । चक्रधर श्यामा नमो त्वते । दंडकमंडलु विराजिते । ब्रह्ममूर्ते नमो तुज ॥२॥
जय भस्मोद्धूलित पिनाकिने । व्यालासनधर पीतवसने । कमलोद्भव कमलासने । त्रितापशमने त्र्यंबके ॥३॥
जय नाना नाटकरूपधरा । जय दयासिंधु करुणाकरा । श्रीअविनाशदत्ता परात्परा । जगदोद्धारा नमो तुज ॥४॥
जय सर्वव्यापका जगद्गुरु । शोधितां आगमा न पवे पारू । तो तूं आमुचा दातारू । दे अभयकरू निजकृपें ॥५॥
न झाळके दिठुवा तव कृपेचा । तरीही काय वदेल जी वाचा । सौरसु न चले बुद्धीचा । वेग मनाचा स्थिर नोहे ॥६॥
पदरीं नसतां भांडवल । तरी वेव्हार केउता चालेल । बीजावांचोनि फळेल । मृणमंडल कृपिया केवीं ॥७॥
तेवीं तुझ्या कृपेवीण । कोणतेही कार्य न घडे पूर्ण । यदर्थी तव चरण लक्षून । कृपादान मागतों ॥८॥
सद्गुरुदत्ता तूं दयाळ । शरणागतासी कनवाळ । सदया पुरविसी इच्छित आळ । धीर अळुमाळ न धरितां ॥९॥
तूं परम स्नेहाळु उदार । ऐसे कीर्तीचा ऐकोनि वडिवार । स्तुतिस्तोतारण करोनि अपार । वरद सुंदर मागती ॥१०॥
अपेक्षित त्यालें देसी । ऐसा तूं उदार दत्ता होसी । म्हणोनि याचक दीन पायांपासी । तिष्ठे दानासी कृपेच्या ॥११॥
मजसी घाल जरी कृपादान । तरीं ग्रंथीं चालेल निरोपण । येन्हवीं मी बुद्धीहीन । जाणसी पूर्ण दयाळा ॥१२॥
वारंवार दीपकीं स्नेह भरितां । प्रकाश राहे दीपीं पुरता । अंधार नुरवी सर्वथा । दीपें पाहतां वस्तु नाना ॥१३॥
जेवीं वनस्पतीतें जीवन । माळिये देतां वाढे पूर्ण । मग सफळ फळें फळोन । सतृप्त जन त्या प्रहणीं ॥१४॥
तेवीं तुझें कृपामृत । अधिकाधिक व्हावें प्राप्त । तेणें रसभरित वाढे ग्रंथ । सकळ मनोरथ पुरती ॥१५॥
मांदी संत सज्जनांची । भोळे भक्त भाविकांची । पात्रें ओढवोनि श्रवणांचीं । वाट साची पाहती ॥१६॥
तुझा कथारस श्रवणीं गोड । श्रोत्यांलागीं त्याची चाड । त्यांचे पुरवावया कोड । पुरवी आवड वक्तियांची ॥१७॥
जी तुम्हीं आपुले कृपें करून । वदविलें गोरक्षकथन आविर्भाव त्या अंगीं दाटोन । केले प्रश्न समर्था तुज ॥१८॥
तेच वेचाळिसाव्याअंतीं । कथा परिसिली सकळ संतीं । पुढें क्षुधित श्रवणार्थी । करविता तृप्ती तुझा तूं ॥१९॥
परिसा श्रोते हो सावधान । गोरक्षाचे प्रश्न परिसोन । दत्त कांहीं न बोले वचन । अविर्भाव पूर्ण पाहे त्याचा ॥२०॥
तंव गोरक्ष होवोनि चंचळ । बोलूं लागला भलतेंचि वरळ । तें ऐकोनि योगी सकळ । कापती चळचळ अंतरीं ॥२१॥
गोरक्ष रोषें म्हणे दत्तासी । कां मौन धरिलें वाचेसी । सामर्थ्य नोव्हे उत्तर धावयासी । तरी कां झोळीसी उतरिलें ॥२२॥
अभ्यासोनि वृश्चिकमंत्रातें । जिंकूं धावे बृहस्पतीतें । शृंग फुटतो जंबुकातें । भिडे सिंहातें इच्छित ॥२३॥
तेवीं तुवां हे करणी । केली अर्भकता मज न जाणोनी । व्याघ्रापुढें बोकड मातोनी । येतां मरणीं तो पावे ॥२४॥
वर्षाकाळें शिंगरें निघती । पक्षबळें ब्रह्मांड झडपूं धांवती । वातापुढें केवीं राहती । पक्ष गळती मृत्यू त्या ॥२५॥
तैसेचि होऊं पाहे तुज । कांहीं तरी बोले मज । शरण येतां सोडीन सहज । नाहीं तरी भाज भाजीन ॥२६॥

ऐसे उग्रपणें गोरक्ष बोलत । परी कांहीं उत्तर नेदी दत्त । जैसा तृण प्रहरे पर्वत । कांहीं न डगत अचलसा ॥२७॥
सदा शांत धीर गंभीर । विशालाक्ष अंतरीं स्थिर । तंव गोरक्ष बोले उत्तर । खवळावया अंतर पुढती ॥२८॥
विरूप पिशाच म्हैसा । डोळे वटारोनी पाहतो कैसा । शिक्षीन आतां वस्ताऐसा । रगडीन जैसा मत्कुण ॥२९॥
जैसा वर्षाकाळीं खळमळ समस्त । सरिताप्रवाहें सागरीं जात । तो उदरामाजीं सांठवीत । कदा न ढहूळत तत्संगें ॥३०॥
तैसा हा दत्त अविनाशी । सदैव निश्चळ मानसी । विक्षेप नाणी चित्तासी । पाहे गारक्षासी स्वललिलें ॥३१॥
खवळितां दत्त न बोले वचन । मग गोरक्ष क्रोधावला अतिदारुण । त्रिशूळ करीं वसवून । हांक दारुण दीधली ॥३२॥
आरक्तवर्ण जाले नेत्र । क्रोधें थर्थराट होतीं गात्र । सभोंवते सिद्ध सर्वत्र । दीनवक्त्र भयें त्या ॥३३॥
तंव इकडे गुरुमच्छींद्रनाथ । योगारूढ असतां ध्यानस्थ । ध्यानीं देखिलें विपरीत । पेटला कृतांत गोरक्ष हा ॥३४॥
ग्रासील वाटे काळा । कीं भक्षील आतांची अनळा । सपाट करील ब्रह्मांडगोळा । ऐसें डोळां देखिलें ॥३५॥
पाहतां गजबजिले अंतर । उठले आसनावरोनि सत्वर । तंव चर्पट जोडिता झाला कर । स्वामी विचार परिसा जी ॥३६॥
आजी गोरक्षाचे झोळीसी । अंतराय पडला यावयासी । हें जाणोनि लागवेगेंसी । विचार मानसीं गोरक्षा ॥३७॥
गुह्य अटकीचें जाणोन । चित्तीं जाले क्रोधायमान । सर्वे सिद्धांतें घेवोन । आयागमन साधिलें ॥३८॥
पूर्व पंथातें लक्षोनिया । गेले असती गुरुराया । चर्पटवाणी परिसोनिया । विचार ठायां शोधिला ॥३९॥
म्हणे चौरंगी चाल वेगीं । विपरीत दिसे या प्रसंगीं । अभिमानें वेष्टिलें गोरक्षालागीं । तम अंगी नाशक ॥४०॥
ऐसें वदोनि शिष्यातें । वेगीं निघाले गगनपंथें । निमिषमात्रें गिरिनाळातें । अवलोकिते जाहाले ॥४१॥ तंव तीं
त्रिगुणात्मक मूर्ती । पाहतां मच्छींद्र आनंदले चित्तीं । म्हणे हा अविनाश निश्चितीं । पावन जगती करूं आला ॥४२॥
न जाणोनि याचें महिमान । व्यर्थ गोरक्षें धरिला अभिमान । कथिल रजतासमान । पाड कोण कैसा त्या ॥४३॥
वैनतेय आणि वायस । बक आणि राजहंस । पाषाण आणी परिस । केवीं पाडास समत्वें ॥४४॥
जेवीं भास्कर तेजापुढें । खद्योत मिरवी तेज बापुडें । म्हणे वावरा माझ्या उजेडें । त्याचि पडिपाडें मासे मज ॥४५॥
असो मच्छींद्र बोले गोरक्षासी । अर्भकपणें काय करिसी । सावध होय सांडीं तमासी । हा अविनाशी नासेना ॥४६॥
अज्ञानयोगें तामसगुण । कां केलास वृथा धारण । यायोगें लाभ कोण । पाहें विचारोन मानसीं ॥४७॥
सांडीं सांडीं विरोध सकळ । दवडीं दवडीं द्वेष खळ । विवेकदृष्टीं पाहे निर्मळ । न करीं काळ अकळातें ॥४८॥
हा तुटे ना फुटे कवणासी । हा विटे ना छटे भ्रम नासी । हा घटे ना हटे अविनाशी । आवेश मानसीं व्यर्थ कां ॥४९॥
वेगीं क्रोधातें आवरीं । शांति विवेका विवरीं । ऐक्यभावें सत्वरी । लाभ वरीं भेटोन ॥५०॥
हे मानीं तूं माझे बोल । न करीं न मानोनि वृथा फोल । तद्रंगीं रंगोनि डोल । सुखकल्लोळ पावसी ॥५१॥
ही बोध मच्छींद्रवाणी । सकळ सिद्ध ऐकती श्रवणीं । संतोष सकळांलागोनी । परी गोरक्षमनीं रुचेना ॥५२॥
नायकोनि सद्गुरूचें वचन । क्रोधभरें धांवला आपण । त्रिशूळ मारोनि घ्यावा प्राण । ऐसें संधान योजिलें ॥५३॥
स्वबळें त्रिशूळ हृदयीं भेदिला । वाटे भेदोनि पार गेला । पैलभूमीं जावोनि रुपला । तो देखिला सकळिकीं ॥५४॥

योगी म्हणती ते समयीं । निष्ठुर घाव मारला हृदयीं । भेदोनि गेला पैलठायीं । केवढी नवलाई बळाची ॥५५
कितेक पाहती दत्तहृदया । तंव जैशी तैशीच दिसे काया । गोरक्षसंधान गेलें वांया । रिते ठायां त्रिशूळ तो ॥५६
एक म्हणती ते अवसरीं । शस्त्र न चले दत्तावरी । अविनाशपुरुष हा निर्धारीं । धरेवरी प्रगटला ॥५७
एक म्हणती शस्त्रापुढें । केवीं धडकी राहतील धडे । क्रोधें संधान गेलें वाकुडें । चुकलें योडें भेदितां ॥५८
एक म्हणती बोलूं नका । दत्तयोगी बहु नेटका । एक म्हणती या गोरखा । कैंचा आवांका त्यापुढें ॥५९॥ ऐश
येरांच्या ऐकोनि गोष्टी । क्रोधें खवळला गोरक्ष पोटीं । धांवोनि त्रिशूळ उपडिला मुष्टीं । भेदिला पृष्टीं दत्ताच्या ॥६०॥
पूर्ववत गेला निघोनी । दूरी पडिला त्रिशोळ जावोनी । सर्व योगी विलोकोनी । हृदयस्थानीं पाहाती ॥६१॥
दत्तकांतीसी न दिसे चिरटी । अद्भुत नवलाव देखिला दृष्टीं । वृथा गोरक्ष होय हिंपुटी । ऐशा गोष्टी बोलती ॥६२॥
संधान चुकतां दोन्हीं वेळां । विशेष गोरक्षीं क्रोधज्वाळा । पेटोनिया उतावेळां । करीं त्रिशूळा पुन्हा धरी ॥६३॥
तंव मच्छींद्र म्हणे गोरक्षासी । मूढत्व कां पावलें तुजसी । तूं अद्यापी यातें नोळखसी । अखंड निश्चयेसी अभेद हा ॥६४॥
वृथा करितोसी श्रम । यापुढें न चले तुझा क्रम । गमावूं नको आपुला भ्रम । नोव्हे सुगम मूर्ती हे ॥६५॥
आतां विवेक अंगीं । उदेल्या पदा त्वरित भंगीं । भक्तिभाव प्रेम संगीं । वेगीं संजोगीं विनयपणा ॥६६॥
निवडिलें दिसे सारासार । ही व्यक्ती सर्वांहोनि पर । करितां प्रयत्न न पवे पार । पटकीं शीर कासया ॥६७॥
माझें मानोनि हें वचन । सांडी द्वेष आवरीं मन । शुद्ध करोनि अंतःकरण । सत्य पूर्ण करीं आतां ॥६८॥
हा अद्वय निश्चळ निर्मळ । यासी उपसर्गितांही न उठे मळ । संतापरहित हा शीतळ । अंतरीं कोमळ अवधूत हा ॥६९॥
याशीं त्वां ऐक्यचि करावें । प्रेमा वाटविजे जीवेभावें । मग सुख आनंद तो पावें । किती सांगावें तुज बापा ॥७०॥
महापातक हा अभिमान । येणें बहुतांसि आटिलें पूर्ण । विष्णुशिर गेलें उडोन । हयवदन प्राप्त त्या ॥७१॥
दक्ष अभिमानें ताडला । द्वेषकर्मीं प्रवर्तला । शिवें मस्तकीं तोडिला । पुनर्लाभला बस्तशिर ॥७२॥
ज्याचा त्यासीच घातक । हा अभिमान होय देख । यालागीं सांडीं तवक । विश्वीं पावक अंतरीचा ॥७३॥
होतां चित्त शुद्ध विनयस्थिती । सहजें शत्रु ते मित्र होती । याची अनुभवोनि प्रचीती । घेईं चित्तीं गोरक्षा ॥७४॥
असो यापरी मच्छींद्रें बोध । केला परी नोव्हे सावध । गोरक्षा अंगीं द्वेष मद । भरला शब्द रुचेना ॥७५॥
आडवे तिडवे घाव निष्ठुर । कळेल तैसे करी प्रहार । वाटे त्रिशूळें केला चूर । कैंचा निर्धार उरी आतां ॥७६॥
गोरक्ष मागुतीं निरखोनि पाहे । परी ते मूर्ती संचलीच आहे । सिद्ध म्हणती केलें काय । हा तो होय वृथा श्रम ॥७७॥
यागी सिद्ध निरखिती । चमत्कारें गद्‌गदां हांसती । परस्परें सर्व बोलती । सबळ भ्रांती गोरक्षा ॥७८॥
दत्तयोगींद्राचा रावो । यापुढें न चलेचि उपावो । गोरक्षाचा श्रम वावो । न सांडी हावो निकुराचा ॥७९॥
श्रीदत्त असतां शस्त्रपाणी । वीरशौर्य सतेजपणीं । तया गोरक्ष भिडे सबळें करोनी । परी क्षोभ मनीं नुपजे त्या ॥८०॥
तीक्ष्ण शस्त्रें खोंचित । मर्मस्थळीं त्रिशूळ भेदित । परी हा जैसा तैसाचि स्वामी दत्त । आनंदभरित दिसतसे ॥८१॥
जैसें गगन निश्चळ निर्मळ । कीं नग जैसी अटळ । कीं निष्कंप उदधीजळ । सर्वांगीं शीतळ चंदनसा ॥८२॥

अनुपम्य ही भव्य मूर्ती । जीव तारावया प्रगट विभूती । तयासी गोरक्ष जिंकूं पाहती । आपुली ख्याती दावोनी ॥८३॥
इंदुबिंब तारांगणीं । न लोपे खद्योतकिरणीं । भूमी करतळजीवनीं । जाईल बुडोनि मेरु कैसा ॥८४॥
तैसीं या गोरक्षप्रतापें । कधीं न हा अविनाश दीपे । कोपविल्याही न कोपे । पाहे स्वरूपें लीलाछंदें ॥८५॥
सुहास्य कमळ दिसे उदार । सज्ञान ज्ञानें गुणगंभीर । गोरक्ष त्यापुढें पामर । व्यर्थ वडिवार दावितो ॥८६॥
धूर्ते शिंपितां वैश्वानरासी । प्रबळ पेटे टाकी शिखेसी । कवळूं धांवे गगनासी । समोंवत्यासी पोळवी ॥८७॥
तैसीं सिद्धांचे बोल ऐकोन । गोरक्ष संतापला जैसीं प्रलयाग्न । मारी सिद्धां वाग्बाण । कठोर दारुण तीक्ष्ण ते ॥८८॥
या विपरीताच्या पडिपाडें । मज दूषितां अतिप्रौढें । आतांचि ठेचीन तुमची हाडें । मोडीन जाभाडें करपत्रें ॥८९॥
त्यासी गौरवोनि करितां भापण । आतांचि त्यातें पहा मर्दीन । मग तुम्हांतें दृढ शासन । निकुरें करीन क्षणार्धे ॥९०॥
तुम्ही सर्व मंदमती । नोळखा माझी सामर्थ्यशक्ती । वल्गना मांडिली बहुरीतीं । दावितों प्रचीती येधवां ॥९१॥
यापरी सकळां बोलोन । क्रोधें भरला आरक्तवर्ण । खदिरांगाराऐसे नयन । त्रिशूळ पडताळोन धांवला ॥९२॥
त्रिशूळासहित उरावरी । न धरत आदळला निर्धारीं । सरिसा पडिला पैलपारीं । दणत्कार थिरीं भूमींचा ॥९३॥
त्या दत्तशरिरांतोन । सबळ आदळला भूमीं जावोन । तेणें मूर्च्छना पावला दारुण । गतप्राण पडियेला ॥९४॥
गोरक्ष निचिष्टित पडिला । सिद्ध योगी पाहती डोळां । सद्गुरु मच्छींद्र ते वेळां । जवळी आला तयाच्या ॥९५॥
पाहतां मूर्च्छना दाटली गाढी । वाटे गतप्राण पडिली कुडी । देखोनिया हडबडी । भयें हुडहुडी योगिसिद्धां ॥९६॥
विपरीत चिन्ह पाहोनि डोळां । मोहें सद्गुरूसी कळवळा । सद्गद कंठीं नेत्रीं जळा । प्रवाह सुटला नावरे ॥९७॥
योगीजना त्याच रीतीं । हेलावलीं तेव्हां नेत्रपातीं । गुण आठवोन याचे वदती । अभिमान चित्तीं केवढा या ॥९८॥
सिद्धिसाधन योगयुक्त । विद्याकळापारंगत । याच्यासम तुक्रा भूतळांत । नव्हता निश्चित देखिला ॥९९॥
या गुणेंचि जडला या अभिमान । इतरां लेखो तृणासमान । त्याचें करावया खंडण । प्रगटला पूर्ण अविनाश ॥१००॥
दत्तदिगंबर कृपाराशी । त्रासितां त्रास नेदी गोरक्षासी । बाधक कर्म ज्याचें त्यासी । बोल परासी कोणता ॥१॥
रावणें हारितली सीता । अभिमानें नेदी मागुता । शिणविलें त्या रघुनाथा । पावला घाता स्वकुळेंसीं ॥२॥
हिरण्यकश्यपू विष्णूसि द्वेषी । भक्ती देखोनि पुत्रा त्रासी । सबळ अभिमान मानसीं । तेणेंचि लयासी हरीकरें ॥३॥
त्याहोनि अधिक हें लक्षा । कोण्ही न फिरवितां कांहीं अक्षा । स्वकरेंचि आपण पावला शिक्षा । अभिमानपक्षा वाहोनी ॥४॥
असो आतां हें भापण । मच्छींद्रें गोरक्ष अंकीं घेवोन । म्हणे बा रे सावधान । उघडोनि नयन पाहें मज ॥५॥
योगी मिळाले समोंवते । कांहीं तरी बोले त्यांतें । कोणा निरवोनि जासी मातें । अविनाशपदातें वरावया ॥६॥
जेवीं शक्तिघातें लक्ष्मण । मूर्छित भूमीं केलें शयन । तया अंकावरी घेवोन । विलाप रघुनंदन करी जैसा ॥७॥
तयापरी मच्छींद्रनाथ । विव्हळोनि पुत्रा बोभात । विमळांबुधारा नेत्रीं वाहत । याम निश्चित अर्ध जाला ॥८॥
हा विपर्यास जाणोनी । श्रीदत्त पाहे कृपालोचनीं । म्हणे आतां उठेल गोरक्ष गुणी । चिंता मनीं न कीजे ॥९॥
तंव काय जाला चमत्कार । श्रोतीं श्रवण कीजे सादर । गोरक्षें करितां निकुर । उराउर आदळलें ॥११०॥

अभिमानाचें निर्दलन। अंगसंगेंचि जालें जाण। वृत्ति विराल्या संपूर्ण। स्वरूपीं अनुसंधान लागलें ॥११॥ मोतूंपण जालें वावो। अभिमानाचा पुसिला ठावो। पावला विश्रांतीचा गावो। फिटला अंहभाव द्वैताचा ॥१२॥ समाधिसुखातें पावला। देहभावातें विसरला। जन्ममरणा आंचवला। जेवीं समरसला नगहेमीं ॥१३॥ या वर्मातें न जाणोनी। मोहें आहळती सर्व मनीं। मच्छींद्र धैर्य धरोनी। पाहे लोचनीं श्रीदत्ता ॥१४॥ मच्छींद्राची अंतरस्थिती। जाणे तेव्हां अवधूतमूर्ती। जवळी येवोनि त्वरित गतीं। करी न्याहाळिती गोरक्षा ॥१५॥ सर्व व्यापक जो योगिया। पावे गोरक्षाच्या आनंद ठाया। म्हणे जगत्कल्याण करावया। आलों वांया तें होय ॥१६॥ यदर्थीच सावधान। घे त्वरें कायाप्रावरण। जेणें आनंदें निवती सज्जन। तेंचि कारण विस्तारीं ॥१७॥ ऐसें आठवा देवोनि भलें। दत्तरूप ठायीं संचलें। हें कृत्य कवणा न कळे। तटस्थ कमळें सकळांचीं ॥१८॥ तंव गोरक्ष योगीराज। निद्रिस्थापरी उठिला सहज। नेत्रीं देखिला सद्गुरु सतेज। पादांबुज वंदिले ॥१९॥ जालें गुरुशिष्यां आलिंगन। सिद्धयोगियां समाधान। म्हणती आजिचा सुदिन। पावलें जीवन गोरक्षा ॥१२०॥ सद्गुरु बोले गोरक्षासी। कां भ्रांतीनें वेढिलें तुजसी। अभिमानें ताडिलें बहुतांसी। प्रचीत मानसीं आली कीं ॥२१॥ ‍[illegible] तमभरें भरोन। विरुद्धें पावलासी थोर शीण। आतां तरी सावधान। पाहें निरखोन मूर्ती हे ॥२२॥ [illegible] सच्चिदानंदमूर्ती। सकळ जीवांची विश्रांती। दर्शनें त्रिविधताप लया जाती। मुक्तगती प्राणिया ॥२३॥ या अविनाशपदाचें। जया दर्शन होय साचें। जन्ममरण निरसे त्याचें। लाभ वाचें वदवेना ॥२४॥ अनंत जन्मांतरींचें पुण्य गहन। तरीच या दत्तरूपाचें घडे दरुषण। यालाभासाठीं तपती तपोधन। ऋषि देवगण ब्रह्मादि ॥२५॥ तो हा सहजीं प्रगटला। अलभ्यलाभ दैवें जोडला। आंगणी कल्पतरू उगवला। तो जेवी तुडविला दैवहीनें ॥२६॥ कामधेनू पावतां गोठणीं। अभाग्यें दवडिली दंडोनी। हातां येतां जेंव चिंतामणी। घालोनि गोफणी गोफणीला ॥२७॥ तेवींच तुवां मंदमती। नोळखोनिया अविनाशमूर्ती। अनुचित केली सर्व कृती। नाडलासि निश्चितीं अभिमानें ॥२८॥ तुवां जे केले अभिमानें उपाय। ते तुझे तुजचि जाले अपाय। अजूनि तरी सावध होय। धरीं पाय विमळाचे ॥२९॥ नको मरूं व्यर्थ भरीं। येथें कोणाची न उरे उरी। सांडोन अहंता चरण धरी। त्वरें वरीं वरदासी ॥१३०॥ हा कैवल्याचा दानी। साकाररूपें जग पावनीं। प्रगटलासे पूर्णपणीं। फेडावया पारणीं जीवांचीं ॥३१॥ जीव अज्ञानें पीडिले। मायामोहें भ्रमित जाले। दुर्धर दुःखार्णवीं बुडाले। आवर्नी गुंतले जन्मपंक्तीं ॥३२॥ काम क्रोध मद मत्सर। दंभ आणि अहंकार। लोभ मोह अनिवार। येणें जर्जर केले जीव ॥३३॥ यांचिया संचारें जाण। मायामोहें जीव गेले भ्रमोन। यापासाव संतति दारुण। जाली निर्माण घातकी ॥३४॥ निंदा द्वेष कुमती। भेद भ्रम घातक वृत्ती। लोलुपता अनुचित गती। कुसंगती कुमार्ग ॥३५॥ आशा मनीषा तृष्णा कल्पना। भ्रांती मुली इच्छा वासना। यांचाचि वेध जडला मना। नाना भावना विपरीत ॥३६॥ विवेक नुपजेची अणुमात्र। अविवेकें दुष्कर्मे अपवित्र। घडे सर्वदा विचित्र। कोठोनि पात्र मुक्त ते ॥३७॥ दुस्तर होती पापराशी। भोगी अघोर रौरवासी। सदा वावरे जन्मराशीं। उसंत तयासी कोठोनी ॥३८॥

नाना योनींचें भ्रमण। दुःख भोगी अतिदारुण। सुटावया आंगवण। जीवा लागुन नसेची ॥३९॥ सदा यमपाशीं गुंतला। अज्ञानतमें निबिड भरला। आपेंआपणची नागवला। सुखा मुकला सर्वस्वीं ॥१४०॥ भडकती तापत्रयाचे उमाळे। त्या दहनें जीव तळमळे। तया निवावयाचें न कळे। नेत्र आंधळे दुर्मदें ॥४१॥ कर्म करितां न भी कुडें। पावतां दुःख तेव्हां रडे। अघोर नरकीं सदा सडे। बाडेकोडें जीव हा ॥४२॥ असो ऐसे जीव अनंत। गांजले गंजले अद्भुत। न सुचे तयां स्वहितपंथ। बुडाले निश्चित भवडोहीं ॥४३॥ परमदुःखार्णवीं जीव देखोन। अविनाशीं कळवळ उपजली पूर्ण। हे दिगंबररूप धरोन। जाले अवतीर्ण तारावया ॥४४॥ हा उदार धीर आनंदभरित। अपेक्षित करावया दत्त। नाम धरोनि येणें दत्त। सिद्ध समर्थ प्रगटला ॥४५॥ वाहोनि दीन जनांची करुणा। सदयत्वें पावला हा योगिराणा। याचा पार न कळेचि कोण्हा। शास्त्र पुराणा अगम्य॥४६॥ फळल्या कोण पुण्याच्या राशी। म्हणोनि पावलों या दर्शनासी। हा निर्विकल्प सदा मानसीं। जावें पदासी शरण याच्या ॥४७॥ हा करावया जगदोद्धार। होवोनि प्रगटला साकार। हा व्यापक सर्वांतर। महिमा अपार न वर्णवे ॥४८॥ याचें प्राप्त होतांचि कृपादान। होय कल्याणाचेंही कल्याण। जाय दुःखार्णव आटोन। सुख सुखावोन सुख पावे ॥४९॥ मच्छींद्र म्हणे रे गोरक्षा। शिक्षोनि केलीस त्वां परीक्षा। पूर्णत्व आलें कीं पूर्ण लक्षा। कीं उरली अपेक्षा आन कांहीं॥१५०॥ येतां प्रथम तूं बोधिलें। परी वचन माझें ना ऐकिलें। श्रमोनि शेवटीं काय जालें। मुळींचें आलें रूपासी ॥५१॥ श्रवणीं सांठवोनि गुरुवचन। गोरक्ष प्रार्थी विनय होऊन। जी जें आज्ञापिलें मज आपण। त्याचा अवमान न केला॥५२॥ झोळीसी व्यत्यय होतां। मज येणें घडलें जी ताता। मूर्ती विलोकोनि संतोष चित्ता। वाटे अतौता कवळावा ॥५३॥ परी त्यांतील कारण। द्विविधा उपजलें बुद्धीलागून। तें चरणीं करितों निरोपण। कीजे श्रवण स्वामिया ॥५४॥ तव कृपेचा वोगर। तो अंगीं पिकला सविस्तर। त्रिलोकीं किती बडिवार। योगेश्वर जाणती ॥५५॥ येथें येतांचि उठाउठीं। तंव सिद्धयोगी पाहिले दृष्टीं। अविनाश पाहिला मध्यपीठीं। हर्ष पोटीं उदेला ॥५६॥ या योगिराजाचें होतां दर्शन। तात्काळ तम गेला वितळोन। वाटे करावें आलिंगन। तंव लौकिक येवोन ठाकला ॥५७॥ निष्फळ योगें भेटतां। तरी विपरीत भासेल येथें समस्तां। कां हों गोरक्षाची एवढी योग्यता। उगाच येतां भेटला ॥५८॥ सिद्धांईची आम्हां प्रौढी। टावोनि दीनें लेखी बापुडी। अवधूत देखोनि पडली झांपडी। भेटला तांनडीं वळ क्षीण ॥५९॥ हे उपजेल सकळां मानसीं। भेटतां दूषण लाविनील तुम्हांसी। यदर्थ न भेटलों अविनाशी। विरुद्ध लौकिकासी या साठीं ॥१६०॥ होणें तैसें येईल घडोन। परी लौकिक पुरुषें करावा संरक्षण। तेथें लागूं देऊं नये दूषण। प्रयत्नें आंगवण सांडू नये ॥६१॥ नसतां यासाठीं धरिला। वळें अवमानुनी भी त्यासी भला। येव्हवीं पाहतां त्या रूपाला। आनंद जाला स्वामिया ॥६२॥ आतां दुसरा हेतु तुम्हासी। तोही निवेदितों परियेसी। वस्तु नाना येतां दृष्टीसी। प्राह्म मानसीं करावया ॥६३॥ परी गुरुनाथा श्रेष्ठ वचन। अंगीकार न कीजे परीक्षेवीण। यदर्थीच हें कारण। अवलंबन पैं केलें ॥६४॥ परीक्षेवीण अंगीकारितां। दूषण लागू पाहे मायां। यालागीं शोध पुरता। कीजे समर्था चतुरीं ॥६५॥ दिव्य नामें कांचन। परी पाहावें तावनोन। वरी मुलामा पारखोन। घेती सज्ञान रूप कीं ॥६६॥

वाजारीं पाहिलीं आम्रफळें । काडी टोचितां गर्भ कळे । आम्र मिष्ट मधुर रसाळें । चोखितां आढळे रसनेसी ॥६७॥
ग्राह्य अग्राह्य समजावें । तरीच द्रव्यातें वेंचावें । हें वर्म न जाणतां घ्यावें । तरी फजीत व्हावें सर्वांनं ॥६८॥
अमोलिकनामें रत्नहिरा। भोगिया घेण्यासी हांवरा। परी परीक्षा पाहोनि खोटा खरा। निवडोनि दातारा काढिती ॥६९॥
हिरा ठेवोनि ऐरणीं । घाव घालिती सबळ घनी । खरा तो जाय गडोनी । गारकरणी चुरा होय ॥१७०॥
जेवीं मोहरा सुतेंकरोन । गुंडाळोनी दीजे महाग्न । खरा तरी जळे इंधन । राहे आपण सुतेसीं ॥७१॥
ऐशापरी परीक्षोनी । मज पाहिलें घटकमक्षणीं । तो उपदेश माझे मनी । भरला कृपें करोनी तुमच्या ॥७२॥
आतां असो हीं भाषण बहुत। कळविला तव पदीं भावार्थ। हा अपराध नाणिजे मनांत। दूषण सत्य वारिलें ॥७३॥
झोळीनिमित्त आगमन । होतांच जालें हें दरुषण । पाहतांचि जीवा समाधान । वाटलें आलिंगन घडावें ॥७४॥
परी जें आडवें ठाकलें । तें स्वामिया निवेदिलें । बळें क्रोधा अंगीकारिलें । निष्ठुर बोलें बोलिलों ॥७५॥
हां स्वामी दत्त दिगंबर । पूर्ण शांतीचा सागर । क्षमायुक्त बोले मधुर । अन्योन्य उत्तर न करीच हा ॥७६॥
अंतरगर्भ कळावा सकळांसी। म्हणोनि शब्दें पुन्हा त्रासीं। प्रश्न केले सत्पात्रासीं परी निवांत मानसीं न बोले ॥७७॥
यालागीं करोनि क्रोधा। बळें वाढविलें सबळ द्वंद्वा। सांगतां नायकोनि केले भेदा। दत्त अनुवादा इच्छोनी ॥७८॥
येथें अवघा सिद्धमेळ। हे वचनामृतें व्हावे शीतळ। मी प्रसादासाठीं व्याकुळ। व्हावी आळ पूर्ण माझी ॥७९॥
याचि कारणासाठीं। केली इतुकी आटाटी। केधवां होईल कृपादृष्टी। पावेन तुष्टी अंतरीं ॥१८०॥
परी एक नवल अद्भुत। जालें तें चरणीं करितों श्रुत। अंगी आदळतां निश्चित। जालों मूर्छित धरणीये ॥८१॥
होतांचि दत्ताचा अंगसंग। क्रोधाभिमानाचा जाला भंग। सुखसागरीं अव्यंग। भोगोनि रंग राहिलों ॥८२॥
मी देही कीं विदेही। अणुमात्र दुःख तेथें नाहीं। बोलावें तरी बोलूं कायी। वर्म ठायीं पडेना ॥८३॥
आनंदलहरी उसळत। तेजोमय गोल प्रभाभरित। तया उपमा द्यावया निश्चित। नसे पदार्थ ब्रह्मांडीं ॥८४॥
पाहतां माझीं विरलों। मीतूंपणा हारपलों। सुखार्णवीं सुखिया जालों। सेखीं हारपलों आपणिया ॥८५॥
जैसी जळीं विरे जळगार। तेवीं समूळेंसी तदाकार। माझा मज विसर। पडिला साचार गुरुवर्या ॥८६॥
सुखानंदीं असतां निमग्न। तेथें अविनाश ठाकला येवोन। म्हणे होय वेगीं सावधान। अवतारकारण करावें ॥८७॥
या जगदोद्धारासाठीं। येव्हढ्या उभारिल्या खटपटी। त्या साधावया उठाउठी। चाल भेटीं सिद्धांच्या ॥८८॥
यापरी निरोपण शुद्ध। गोरक्षमच्छींद्राचा संवाद। ऐकतां हर्षले योगी सिद्ध। म्हणती विरुद्ध विराला ॥८९॥
सर्वांतरीं देखोनि उल्हास। संतोषोनि बोले अविनाश। गोरक्षा बहु श्रमलास। निवटीं खेदास विवेकें ॥१९०॥
तुवां मज केला प्रश्नादर। तें म्यां तुज न दिधलें उत्तर। तेणें क्षोभलें तुझें अंतर। मानें प्रकार तो केला ॥९१॥
होता जो लौकिकीं संभ्रम। तो निवटिला करोनी क्रम। आतां तरी घे विश्राम। सद्गुरु सर्वोत्तम सेवोनी ॥९२॥
चित्तीं होय सावधान। शुद्ध करीं अंतःकरण। प्रश्नोत्तरांचें निरोपण। करवितों श्रवण परियेसीं ॥९३॥
हे परिसोनि अमृतवाणी। सिद्ध योगी आनंदले मनीं। वक्ता म्हणे श्रोत्यांलागोनी। श्रवणें पारणीं फिटतील ॥९४॥

श्रीगुरुदत्तयोगींद्र । महाराज केवळ कृपासमुद्र । जेवीं चकोरालागीं द्रवे चंद्र । तेवीं हा आर्द्र भावार्थिया ॥९५॥
पुरवावया दोनांची आळ । फेडावया संदेहें विटाळ । हा प्रगटलासे दयाळ । पूर्ण स्नेहाळ दासाची ॥९६॥
याचिया कृपें करूनी । रसना सरती होय निरोपणीं । येऱ्हवीं मतिमंद अज्ञानी । प्रसादावांचोनी केवीं वदे ॥९७॥
हा दत्तप्रबोधनामें ग्रंथ । येथें ज्याचा तोचि बोलवीत । निमित्तासी पुढें अनंतसुत । करोनी समर्थ चालवी ॥९८॥
काष्टमापें धरोनि हातीं । धान्यराशी उमा निती । कीं यंत्रधारें तुळविती । तुळितां निश्चितीं वेगळा ॥९९॥
तेवींच हेंही असे निरोपण । कर्ता करविता अवधूत पूर्ण । रसराज हा करा पान । श्रोते सज्जन आवडीं ॥२००॥
पुढिले प्रसंगीं दिगंबर । गोरक्ष प्रश्नांचें देतील उत्तर । तें अमृताहोनी गोड फार । ऐकतां अंतर सुखावे ॥१॥
यालागीं श्रोत्यां सज्ञनां । अनंतसुताची विज्ञापना । एकाग्र करोनिया मना । दत्तवचना स्वीकारिजे ॥२॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । यासी दत्तकृपेचेंच संमत । श्रोते परिसोत सावचित । पंचचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२०॥

॥ इति पंचचत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

## — प्रश्नावलीसंबंधीं खुलासा —

भगवान अनसूयानंदनांचेच कृपेनें प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराजांनी ही प्रश्नावली तयार केली आहे. ही पहाण्याची पद्धती पुढीलप्रमाणें आहे :

मनातील कामना पूर्ण होण्याकरितां सद्गुरूंची प्रार्थना करून या प्रश्नावलीतील कोणत्याहि एका अक्षरावर पृच्छकानें बोट ठेवावें नंतर ज्या अक्षरावर बोट ठेविलें असेल त्याच्या पुढील अक्षरापासून अक्षरें मोजण्यास आरंभ करावा. असें मोजतांना प्रत्येक अठरावें अक्षर एका कागदावर लिहून ठेवावें. याप्रमाणें प्रथम ज्या अक्षरावर बोट ठेवलें असेल त्या अक्षरापर्यंत अठरा-अठरा अक्षरें मोजावीत व प्रत्येक अठरावें अक्षर क्रमानें एका कागदावर मांडून ठेवावें. शेवटीं या सर्व अठरा अक्षरांचा मिळून एक मराठी श्लोक तयार होतो व त्यात 'दत्तमाहात्म्य वाचावें, कृष्णालहरी वाचावी, पंचपदी करावी, करुणात्रिपदी म्हणावी' इत्यादि रूपानें कामना पूर्ण होण्याकरिता कांहीं साधन मागितलें जातें श्रद्धापूर्वक त्याप्रमाणें वागून सर्वांनीं श्रीसद्गुरुकृपेनें आपली इष्टसिद्धी करून घ्यावी.

( मागे पहा )

॥ ॐ श्रीदत्त प्रसन्न ॥

# श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांची प्रश्नावली

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री | वा | सु | दे | वा | नं | द | स | र | स्व | ती | स्वा | मी | ज | य | ति | त | मां | घा | चि | ले | ई | रो | द | १ |
| २ | स | त | चि | स्व | जे | मं | ना | री | त्नै | स | घ | पा | सु | तां | हो | ल | नि | ना | का | रा | ला | चि | शि | दें | २ |
| ३ | ला | त्रि | पू | रा | चि | हि | दे | स | का | तो | सं | अ | द्य | ती | घा | त्तें | क्षा | गा | र्गी | का | जीं | अ | ति | भ | ३ |
| ४ | पा | त | यें | इ | क | न | पा | गु | सु | द | न | पं | ज | लीं | स | थ | त | ग | ह | के | सं | ए | टें | सू | ४ |
| ५ | ठ | रू | दे | त्त | थी | च | ल | ला | त्य | पा | सु | घ | द | दो | सि | सि | सा | ये | क | च | धा | वं | सा | प | ५ |
| ६ | त | ण | द | सो | स्सा | म्द् | यीं | न | द्धी | द्धी | रीं | च्या | री | रि | ने | पू | थं | दी | शी | सी | त्त | ळा | घ्य | त्त | ६ |
| ७ | धि | स | का | या | इ | स्म | ज | त्रा | प्रे | स | जी | किं | इ | फ | ने | पू | प | प्रा | तु | म | ळ | सु | त्त | र | ७ |
| ८ | रो | र्धी | य | प्रे | या | या | ए | रू | मा | जीं | रि | थं | नी | श्लो | जी | दे | दे | विं | ते | भा | तो | मैं | ची | प | ८ |
| ९ | पे | णा | नें | द | थ | ना | का | की | दे | य | तू | ता | भी | य | फो | ज | ल | धे | क्षा | त्रि | ती | त्ता | ए | क | ९ |
| १० | म | गु | ६ | य | पु | तं | ति | तं | ण | रि | सु | प | ज | प | न | घ | द | री | ना | रू | टा | ती | रा | का | १० |
| ११ | थं | मे | सा | वा | मा | रो | री | वी | पू | ता | शा | तां | क | क | कु | थ्य | फ | अ | त | द | त | चि | न | प | ११ |
| १२ | तु | त | णिं | र | क्ष | थ | रि | था | मी | र | री | सा | रीं | हा | रीं | शि | सें | री | ला | री | मा | ते | री | शी | १२ |
| १३ | ती | म | द | छि | थी | प्रा | थी | क | था | को | प्रा | हो | थी | म | हो | त्या | मं | इ | स | ल | त्त | सा | म | त | १३ |
| १४ | छ | रि | घी | ण | त | इ | ध | नो | ई | त्या | य | ए | त्य | भ्य | मा | इ | इ | आ | ण्णा | ता | त | तं | का | ल | १४ |
| १५ | ष | र | ल | ज | हा | दे | स | ते | हा | ली | स | हे | ल | शु | जा | फा | म | फा | ली | थ | का | यं | ज | भ | १५ |
| १६ | फ | हि | स्य | गु | पु | इ | ह | द्ध | म | यैं | स्य | म | ला | तु | म | ति | प | य | ला | ये | ने | क | रा | ए | १६ |
| १७ | री | चि | नो | धा | रें | ना | मृ | हा | ना | ला | तां | ने | हो | हा | मा | क | णा | घा | प्रे | त्ता | भा | नो | हो | पू | १७ |
| १८ | ता | पू | पू | भा | ल | र | ते | तीं | मैं | धा | तें | चीं | मैं | ने | थे | हें | ही | तीं | ध्धी | र्ण | तीं | वें | श्व | क्षी | १८ |
| १९ | ठे | चिं | था | स | था | द | घा | इ | का | चिं | ये | सं | सा | प | सा | इ | दि | द | धी | ता | चीं | ता | चा | त्त | १९ |
| २० | चि | पु | यें | ता | थें | र | र | ण्मा | धि | ए | गं | त्त | वि | का | घि | हें | यें | भा | तां | सा | हो | कां | सं | क्षी | २० |
| २१ | पं | सें | तां | सि | य | मा | श्या | क | श्या | दू | य | य | इ | धे | ई | क | ये | ल | थ | नि | सा | द्ध | र | ता | २१ |
| २२ | स | हि | सु | र | र | सु | ए | सु | ळ | रि | ह | तु | तो | थ्य | धु | चि | छ | सु | अं | शो | नी | हो | वे | धा | २२ |
| २३ | पे | ले | लो | शी | ची | ला | हा | या | सं | हो | पा | ता | त | घृ | म | द | घ | र | क | र | फ | अ | न | ह | २३ |
| २४ | म | घ | ग | य | फ | ज | री | धा | नी | र | री | सा | रीं | हा | री | शी | से | री | ला | रीं | मा | तें | री | शीं | २४ |
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | |

॥ इति श्रीप्रश्नावली संपूर्णा ॥

# निवेदन

अनंत कोटी ब्रह्मांड नायक राजाधिराज योगिराज भगवान अत्रिनंदन दत्तात्रेय यांचेच केवल कृपेने तयार झालेला श्री दत्त प्रबोध ग्रंथाचा ५ वा भाग अध्याय ३६ ते ४५ जनता जनार्दनाचे चरणी अर्पण करण्यास आम्हास फार आनंद होत आहे. या भागाची वर्गणीही रु. १-५० पैसे ठेविली आहे. हा भाग पहिल्या चार भागापेक्षां मोठा असून ही अत्यंत अल्प अवधीत व फार सुंदरपणें छापून दिल्याबद्दल समर्थ प्रेस, ठाणें व रामदास मुद्रणालय, दादर, येथील प्रेमी मंडळी व मालक माननीय श्री स. पां. जोशी यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. श्री दत्त प्रबोधाचा ४ था भाग कांहीं अपरिहार्य कारणामुळें भाविकांच्या हाती पडण्यास थोडा विलंब झाला याची भरपाई माननीय श्री. जोशी यानी हा पाचवा भाग अपेक्षेपेक्षा लौकर लोकांचे हाती देऊन केली आहे. आता फक्त तीन भाग राहिले आहेत व ते सुद्धां शक्य तितक्या लौकर लोकांच्या हाती देण्याची आमची उत्कट इच्छा आहे. भाविकांची या ग्रंथातील विषय जाणून घेण्याची जिज्ञासा पाहून लौकरात लौकर हा संपूर्ण ग्रंथ त्यांचे हातीं पडावा अशी इच्छा आहे आणि त्यालाच अनुसरून आम्ही भाविकाना अशी नम्र विनंती करू इच्छितो कीं आठही भागाची वर्गणी जर भाविकानी आम्हास आगाऊ पाठवून दिली तर प्रेसचे मालक श्री. स. पां. जोशी यांचेवर आर्थिक ताण बसणार नाहीं. तरी ग्राहकानी या आमच्या प्रेमाचे विनंतीचा सहृदयपणें विचार करावा व पुढील वर्गणी अगाऊ पाठविल्यास आम्हास फार आनंद वाटेल. अर्थात सर्व गोष्टीत प्रेरणा देणारे भगवान दत्तात्रेयच आहेत व यापुढील भागही त्यांच्याच कृपेने अल्प अवधीत बाहेर पडावयाचे असलेने त्यांचीच प्रार्थना अनन्य भावे करून हे निवेदन संपवितो.

श्रीदत्तपौर्णिमा शके १८८६.

श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, मुंबई.

卐 सूचना—यापुढील ६ वा भागही शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध होईल. 卐

## ॥ करुणात्रिपदी ॥

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवी आतां ॥ध्रु०॥ तूं केवळ माता जनिता, सर्वथा तूं हितकर्ता। तूं आप्त स्वजन भ्राता, सर्वथा तूंची त्राता ॥चाल॥ भयकर्ता तूं भयहर्ता ॥ दंडधर्ता तूं परिपाता। तुजवांचुनि न दुजी वार्ता ॥ तूं आर्तां आश्रय दत्ता। शांत हो० ॥१॥ अपराधास्तव गुरुनाथा, जरि दंडा धरिसी यथार्था। तरि आम्ही गाउनि गाथा, तव चरणीं नमवूं माथा ॥ चाल ॥ तूं तथापि दंडिसि देवा ॥ कोणाचा मग करूं धावा। सोडविता दुसरा तेव्हां ॥ कोण दत्ता आम्हां त्राता। शांत ॥२॥ तूं नटसा होउनि कोपी, दंडितांहि आम्ही पापी ॥ पुनरपिही चुकत तथापी आम्हांवरि न च संतापी ॥चाल॥ गच्छतः स्खलनं क्वापी। असें मानुनि नच हो कोपी ॥ निजकृपालेशा ओपी। आम्हांवरी तूं भगवंता ॥ शांत० ॥३॥ तव पदरीं असतां ताता आडमार्गी पाउल पडतां। सांभाळुनि मार्गावरता, आणिता न दुजा त्राता ॥ चाल ॥ निज बिरुदा आणुनि चित्ता ॥ तूं पतीतपावन दत्ता। वळे आतां आम्हांवरता ॥ करुणाघन तूं गुरुनाथा। शांत हो० ॥४॥ सहकुटुंब सहपरिवार, दास आम्ही हें घरदार। तव पदीं अर्पूं असार, संसाराहित हा भार ॥चाल॥ परिहरिसी करुणासिंधो ॥ तूं दीनानाथ सुबंधो। आम्हां अघलेश न बाधो ॥ वासुदेव प्रार्थित दत्ता। शांत हो श्रीगुरुदत्ता० ॥५॥

### पद

श्रीगुरुदत्ता जय भगवंता। तें मन निष्ठुर न करी आतां ॥ ध्रु० ॥ चोरें द्विजासी मारितां मन जें, कळवळलें तें कळवळो आतां ॥१॥ पोटशुळानें द्विज तडफडतां, कळवळलें तें कळवळो आतां ॥२॥ द्विजसुत मरतां वळलें तें मन, होकीं उदासिन न वळे आतां ॥३॥ सतिपति मरतां काकुळति येतां, वळलें तें मन न वळे कीं आतां ॥४॥ श्रीगुरुदत्ता त्यजि निष्ठुरता, कोमलचित्ता वळवी आतां ॥५॥

### पद

जय करुणाघन निजजनजीवन, अनसूयानंदन पाहि जनार्दन ॥ ध्रु० ॥ निज अपराधें चुकतों कष्टी, होउनि पोटीं, भय धरुं पावन ॥१॥ तूं करुणाकर कधीं आम्हांवर, रुससी न, विकटवदन कृपाघन ॥२॥ वारी अपराध तूं मायबाप, तरि मनीं कोपलेश न वामन ॥३॥ बालकापराधा गणे जरि माता, तरि कोण त्राता देईल जीवन ॥४॥ प्रार्थी वासुदेव पदीं ठेवी भाव, पदीं देवो ठाव देव अत्रिनंदन ॥५॥ जय० ॥

६

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परमभागवत

श्री अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा

विरचित

# श्री दत्तप्रबोध

## भाग ६ वा

अध्याय ४६ ते ५२

# अर्पण-पत्रिका

अनंतकोटी ब्रम्हांडनायक राजाधिराज योगीराज

## श्री साईनाथ महाराज शिर्डी

यांचे पवित्र चरणी

श्री दत्तप्रबोधरूपी कमलपुष्पातील पद्मदल अर्पण

## ॥ श्री साईनाथ प्रार्थना ॥

अगाध शक्ती अघटित लीला तव सद्गुरु राया । जडजीवाते भवि ताराया तूं नौका सदया ॥ ध्रु ॥
वेणी माधव आपण होउनि प्रयाग पद केलें । गंगा यमुना द्वय अंगुष्ठी प्रवाह दाखविले ॥१॥
कमलोद्भव कमलावर शिवहर त्रिगुणात्मक मूर्ती । तूंचि होउनि साईसमर्था विचरसि भूवरती ॥२॥
प्रहर दिसाला ब्रम्हासम तें ज्ञान मुखें वदसी । तमोगुणाला धरुनि रुद्ररुप कधि कधि दाखविसी ॥३॥
कधीं कधीं श्रीकृष्णासम त्या बाललिला करिसी । भक्त मनासी सरस करुनी मराळ तूं बनसी ॥४॥
यवन म्हणावें म्हणावें तरी ठेविसी गंधावर प्रेमा । हिंदु म्हणूं तरि सदैव वससी मशिदित सुखधामा ॥५॥
धनिक म्हणावें जरी तुला तरि भिक्षाटन करिसी । फकिर म्हणावें तरी कुबेरा दानें लाजविसी ॥६॥
तथैकसा तें मशिद म्हणूं तरि वन्ही ते ठाया । धुनित सदा प्रज्वलीत राहे उदि लोकां वाया ॥७॥
सकाळपासुनि भक्त सावडे पूजत तव करिती । माध्यान्हीला दिनकर येतां होत असे आरती ॥८॥
चहुं बाजूंना पार्षदगण सम भक्त उभे राहती । चौरी चामरें करीं धरुनी तुजवर टाळीती ॥९॥
शिंग घड्याळें सूर सनया दणदणते घंटा । चोपदार ललकारिती द्वारीं घालुनिया पट्टा ॥१०॥
आरति समयीं दिव्यासनि तूं कमलावर दिससी । प्रदोषकाळीं बसुनि धुनिपुढें मदन दहन होसी ॥११॥
अशा लिला त्या त्रयदेवांच्या प्रत्यहि तव ठायीं । प्रचीतीस येतानी अमुच्या हे बाबा साई ॥१२॥
ऐसें असतां उगीच मन्मन भटकत हें फिरतें । अतां विनंती हेंच तुला बा स्थीर करी त्यातें ॥१३॥
अधमाधम मी महापातकी शरण तुझ्या पायां । अतों, निवारा दासगणूंचे त्रिताप गुरुराया ॥१४॥

# ॥ श्री दत्त प्रबोध ॥

## ॥ अध्याय ४६ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीदत्तात्रेयाय नमः

नमो निरालंब निर्विकारा । प्रणव दत्ता अखिल सारा । निश्चळ निर्मळा परात्परा । आकारविकारातीत तूं ॥१॥
तत्त्वातीता निरंजना । त्रिगुणरहिता सनातना । निर्विकल्पा अपरंपार गहना । सच्चिद्घना नमो तुज ॥२॥
जय सर्वसाक्षी सर्वज्ञा । वेदवंद्या पुरुषप्राज्ञा । अद्वया अभेदा गुणज्ञा । प्रणिपात तुज्ञा तव पदीं ॥३॥
तूं निरामय निष्कलंक । षड्गुणसंपन्न सुखदायक । न दिसोनि असती सर्वात्मक । त्राता पालक सर्वांचा ॥४॥
सर्व नियंता तूं सद्गुरु दत्त । अनंतरूपें तूं नटलासि अनंत । अगाध महिमा अपरिमित । विश्वीं विश्वनाथ तूंचि होसी ॥५॥
त्रिगुणात्मक रूप धरोन । करिसी हें त्रिकार्य कारण । सेखीं त्रिपदातीत राहोन । स्वरूपीं निमग्न सर्वदा ॥६॥
करावया दीनोद्धार । प्रगटोनि म्हणविसी अत्रिकुमार । निस्पृहें विचरसी जगतीवर । उदार धीरसदयत्वें ॥७॥
नैराश्य निष्काम निर्द्वंद्व । निर्भय निःसंग अभेद । निरहंकार निःखेद । आत्मैव स्वानंद सदा भोगी ॥८॥
ऐसा तूं कृपासागर । स्वच्छंदें रमसी या क्षितीवर । शरणागताचें जाणोनि अंतर । अभयवर त्या देसी ॥९॥
सत्य संकल्पें जो अनन्य । त्याचे न पाहसी दोषगुण । स्वयें वारिसी भय शीण । करिसी पावन क्षणार्धें ॥१०॥
ज्यातें कृपें तूं न्याहाळिसी । वरदपाणी माथां देसी । तो वंद्य होय सकळांसीं । सिद्धपदासी तो पावे ॥११॥
जयजय दत्ता सर्वोत्तमा । अगाध तुझी कीर्तिमहिमा । वर्णिता पार आगमनिगमा । न लागे सुखधामा कधीं त्या ॥१२॥
येर इतरांची गती । केवीं वर्णावया चाले मती । हें तों न घडेचि निश्चितीं । पुरे स्तुती करावया ॥१३॥
जरी तूं होसील कृपावंत । तरी तो वदेल गुण किंचित । तेहि होतील रसभरित । अभय दत्त होतां तूं ॥१४॥
यदर्थीं मी अनाथनाथा । तुज प्रार्थितसे स्वामी दत्ता । स्ववरदें चालवीं ग्रंथा । नसें कर्ता मीं येथें ॥१५॥
कर्ता करविता तूंचि येथें । माझें मीपण समर्पिलें तुम्हां तें । तरी दया करोनि पुरतें । करवीं ग्रंथातें जगद्गुरू ॥१६॥
तुझें कीर्तन अत्यंत गोड । तेथें भाविक श्रोत्यांची विशेष चाड । तें पुरविता तूंचि आवड । वदवी निवाड कथारस ॥१७॥
पंचेचाळीस अध्यायपर्यंत । कथा वदविली रसभरित । ते परिसोनि श्रोते संत । जाले क्षुधित आगळे ॥१८॥
सर्वांगे पसरोनि श्रवण । आदरें करूं बैसले श्रवण । तयां तृप्त करावया जाण । असे तुजवीण कोण दत्ता ॥१९॥
तुझें नाम अविनाशदत्त । वांच्छित पदार्था करिसी दत्त । असोनि उदर न हो अदत्त । हेचि वदत पुढतपुढती ॥२०॥
नाम ब्रीद सांभाळावें । तरी हेतु सकळ पुरवावे । अनन्यासी पावन करावें । हृदयीं धरावें शरणागता ॥२१॥
तुजविण गा स्नेहाळे । कोण पुरवील आमुचे लळे । आम्ही अज्ञान तुझी बाळें । पाळिजे दयाळें स्नेहंभरें ॥२२॥
तदर्थीं आम्ही क्षुधित । कृपें पाजीं तव कथामृत । श्रवणमुखें विकासित । करोनि इच्छित लोभ तो ॥२३॥
श्रोतावक्त्यांचिया मानसा । जाणोनि पुरविजे लालसा । पाजीं क्षुधितां स्वबोधरसा । जाला जीव पिसा श्रवणार्थी ॥२४॥
गताध्यायाचे अंतीं । योगी त्या गिरिनाळपर्वतीं । प्रश्नोत्तरालागीं निश्चितीं । सादर श्रवणार्थी रीतीं या ॥२५॥

हेतु जाणोनि वक्तियाचा । वदे राव तो योगियांचा । भाग परिसा प्रश्नोत्तराचा । निरोपितों साचा निजमुखें ॥२६॥ वक्ता विनवी श्रोतियांलागुन । श्रवणीं होईजे सावधान । गोरक्षासि अवधूत करिती भाषण। तो संवाद पूर्ण अवधारा ॥२७॥ प्रश्न आदरोनि गोरक्षाचे । श्रीदत्त निवेदी स्वरार्चे । ते सप्त श्लोक दिव्य साचे । विवरण त्यांचें परियेसा ॥२८॥ श्लोक। देवान लोकानसुरानरावावर्णाश्रमं नैव कुलं न जातिः ॥ न धूममार्गो नच दीप्तिमार्गो ब्रह्मैव रूपं परमार्थ तत्त्वम्॥१॥ ॥ टीका ॥ इंद्र वरुण सविता कुबेर । गणगंधर्व यक्ष किन्नर । रुद्र रुद्रगण अप्सर । यांहोनि पर वेगळाची ॥२९॥ यम पितृगण प्रजापती । सनकसनंदन महामूर्ती । सनत्कुमारादि विभूती । याहोनि निश्चिती वेगळाची ॥३०॥ अष्टलोक अष्टदिक्पाळ । संख्या एकवीस स्वर्गमाळ । गोलोकादि लोक सकळ । याहोनि निश्चळ वेगळाची ॥३१॥ राक्षस दैत्य दानव । चतुर्लक्षादि मानव । नाना रूपांचा समुदाव । याहोनि अपूर्व वेगळाची ॥३२॥ ग्रह तारा नक्षत्र । अंबुधरादि योग विचित्र । कर्ण ऋषिगण पवित्र । याहोनि स्वतंत्र वेगळाची ॥३३॥ द्विपद चतुष्पद षट्पद । नाना जीव जंतु श्वापद । जळचर भूचर निष्पद । याहोनि अभेद वेगळाची ॥३४॥ जारज आणि अंडज । स्वेदजादि उद्भिज । वर्ण याति अनेक बीज । याहोनि अभेद वेगळाची ॥३५॥ सप्त धातु सप्त सागर । सप्ताद्रि मेरुमांदार । सप्त पाताळ सप्त वार । याहोन निर्धार वेगळाची ॥३६॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । यांचेचि प्रकार पंचवीस । सेखीं त्रिगुणाचा सौरस । याहोनि निःशेष वेगळाची ॥३७॥ अंक वस्तुसंख्या । मातृकान्वय तो वरवा । वाचा नेत्र मनाचा रिघावा । रूप नांवा वेगळाची ॥३८॥ आश्रम आश्रय कुळ याती । नाद भेद बिंद गती । अस्तोदय कृष्णदीप्ती । याहोनि निश्चितीं वेगळाची ॥३९॥ काळ वेळ घटिका प्रहर । तिथि मास संवत्सर । ऋतु अयन पर्वप्रकार । यातीत विचार वेगळाची ॥४०॥ वेद शास्त्र पुराण । श्रुतिशाखा ग्रंथ पूर्ण । विद्या वैभव धन । असे याहून वेगळाची ॥४१॥ कर्म धर्म मार्ग दोही । दीप्तिमान जाणा तोही । आक्रम विक्रमादि सर्वही । त्याहोनि पाहीं वेगळाची ॥४२॥ सर्वी सर्वातीत कळा । व्यापोनि वर्ते निराळा । काळ अकाळातीत वेगळा । अनुपम लीला अतर्क्य ॥४३॥ गोरक्षा हें प्रश्नोतर । निवेदिलें वर्ते सविस्तर । येथींचा जाणोनि वे विचार । होसी गुरुपुत्र ज्ञाता कीं ॥४४॥ न जाणोनि हें मानसीं । या बोला तर्कट म्हणसी । बळें मूर्खत्व स्थापिसी । तेंही परियेसी साक्षेपें ॥४५॥ सावध होवोनि पुढारां । निरोपितो तें अवधारा । तदर्थतें अंगीकारा । शब्द सैरा जाऊं नेदी ॥४६॥ ॥श्लोक॥ मूर्खोपि नाहं न च पंडितोहं मौनं च वार्ता न च मे कदाचित्। वितर्कतर्कं च कथं वदामि स्वरूपनिर्वाणमनामयोहम ॥२॥ ॥टीका॥ अर्भक मूढ अज्ञान। अविचारत्व अवलक्षण। दिसतां एवं दिसती गुण । परी याहोनि भिन्न असें कीं ॥४७॥ दावी परी अंगीं नसे। कोणा न कळे हें कोण पिसें । भ्रमिनीं भ्रम विलसे। काय कैसें जाणता जाणे ॥४८॥ विचक्षणाचा धरिसी भाव। तरी तोही येथें वाव। न मिरवी पांडित्य वैभव। न दावी महत्त्व जाणिवेचें ॥४९॥ कोणा म्हणावें अज्ञान। कोणा स्थापावें ज्ञानसंपन्न। पाहतिया दोन्ही समान। यातील लक्षण लक्षीं हें ॥५०॥ विषय मायिक पदार्थ। लोभ आशा मोहभरित। यातें मनादि इंद्रिय होतात। पावती घात या योगें ॥५१॥

हाचि मूर्खत्वाचा योग खरा। स्वात्मस्थित लवंडिती सारा। स्वीकारी नाशिवंत असारा। पंक्ती घेरा भोगाचया ॥५२॥
या मार्गाते दवडिलें। निरिच्छपण अंगिकारिलें। निर्विकल्प अभेदत्व बाणलें। केवीं उरलें मूर्खत्व त्या ॥५३॥
या अन्वयें वर्ते पाहीं। अणुमात्र मूर्खत्व तेथें नाहीं। हें विवेकें वागविजे देहीं। होसी तूंही मग तोची ॥५४॥
हा स्वानुक्रमाचा गुण। तुज करिता निरोपण। यातें पांडित्य मानोन। आणिसी दूषण मानसीं ॥५५॥
तरी पांडित्याचा भाग। तोही निरोपितों प्रसंग। करीं तो श्रवण प्रीतीं चांग। एकाग्र लाग साधोनिया ॥५६॥
विषयिक स्वार्थ कामना। तेथें लोलिंगत हे वासना। ते सुफळ व्हावया कामना। करिती आचरणा बहु रीतीं ॥५७॥
वेदशास्त्रपुराण। नाना ग्रंथींचे पठण। पदबोध अर्थ निरोपण। क्लृप्ती विशेषण राग तर्क ॥५८॥
आचार विचार वाह्याव्कार। तेवींच विनयता नम्रोत्तर। प्रसंगोक्ती चमत्कार। रंजीक श्रृंगार मनोरम ॥५९॥
एवं अभ्यासीं नेटके जाले। सम्यपण गुणें जडलें। वाक्पटुत्व विस्तारिलें। थेंड वाढविलें विषयार्थीं ॥६०॥
गुणें जडोनि आश्रय। समासंगीं सरता होय। इच्छी सन्मान अर्थ सोय। पांडित्य गाय त्यासाठीं ॥६१॥
सगुणातें वाटवावें। येर परां उपमर्दावें। समत्वासी साम्य व्हावें। वाह्य मानवावें वरीलपणीं ॥६२॥
स्वार्थसंपादनीं खटपट। परार्थी होय आळुमाळित। म्हणवी आपणातें पंडित। प्रौढी मिरवीत आपुली ॥६३॥
तरी येथें ऐसें कारण। न केलें कांहींच धारण। जयाकारणें लौकिकसंपादन। पंडितपण मिरवी तो ॥६४॥
जया थोरिवेची चाड नाहीं। तो स्वपांडित्य न मिरवीच कांहीं। समदृष्टीं सर्वां पाहीं। अभेद देहीं सर्वदा ॥६५॥
म्हणोनि विषयपांडित्य न विस्तारूं। यालागीं नच पंडित उत्तरूं। स्वात्मस्थितीचा उद्गारू। सहज चमत्कारू होतसे ॥६६॥ हें परिसोनि वचन। म्हणसी यावरी होसी मौन। तरी या मौनाचें लक्षण। सांगतों श्रवण कीजे आतां ॥६७॥
अंतर विषयलोभआशेनें भरिलें। मन रसरंगीं हें भरलें। जिन्हा रुचीचे घे गरळें। वरी धरिलें मौन मुखीं ॥६८॥
काम क्रोध मद मत्सर। दृढ देहीं दंभ अहंकार। हे न लजीच अणुमात्र। वाह्य प्रकार मौन हें ॥६९॥
इच्छेऐसी वस्तू व्हावी। तरी न बोलोनि खुणमुद्रा दावी। न देतां भृकुटी फिरवी। क्रोधें झिडकावी करातें ॥७०॥
आणीक मौल क्षण। जिव्हे काष्ठ दे गुंतवोन। हें नोव्हे येथें आचरण। वदे न मौन म्हणोनि ॥७१॥
यावरी म्हणसील वाचाळ। तरी न वदे उगे बरळ। स्वानुभविक शब्द सरळ। अनुभव प्रांजळ वेतिया ॥७२॥
प्रतिशब्दान्विक शब्द। तोही केवळ स्वात्मबोध। सर्वांसरतां अभेद। विवेकिया स्वानंद प्रगटवी ॥७३॥
ऐसियासी तर्कवितर्कता। कैसेनि म्हणावी सांग आतां। वळें कर्दम फेंकितां। न मळे सर्वथा अर्क तो ॥७४॥
तेवीं ब्रह्म निश्चळ निर्मळ। अखंड अभेद अचळ। तेथें तर्कवितर्क विटाळ। केवीं स्पर्शतील स्वरूपीं त्या ॥७५॥
मन वाचेचा न लगे लाग। तथें काय येरांचा पांग। तें निरामय निःसंग। अखिल अभंग अवीट हें ॥७६॥
याहीवरी तूं नोळखसी। अज्ञानें प्रश्न वाढविसी। कीं सुसंपत्कामी होसी। न कळे मजसी निवेदीं हें ॥७७॥
याविषयींचें निरोपण। करितों परियेसीं सावधान। निश्चळ श्रवणीं कीजे मन। अन्य व्यवधान सांडोनी ॥७८॥
॥श्लोक॥ न मे च माता न पिता न बंधुर्न मे च पत्नी न च पुत्रमित्रम्। न पक्षपातो नविपक्षपातः कथं सुसंपत्सु न काम

कामी ॥३॥टीका॥ जें अखिल ब्रह्म निरुपाधिक। तेणें स्वइच्छें निर्मिलें दृश्य कौतुक। तो हा साकाररूपें मी देख। अज्ञान टक पाहती या ॥७९॥ अनुमानें वाग्वाद। भाटीव वाखाणी हा वेद। तया नगीं वसें मी शुद्ध। अकळ निःशब्द अरूप मी ॥८०॥ वेदार्थरूपीं निघाल्या श्रुती। विशेष गुणें वाखाणूं जाती। पार न लगे त्यां निश्चितीं। शब्दें नेति परतल्या ॥८१॥ मद्भक्तिप्रेमाचे श्रम। जाणोनि धावया आराम। आयोनि अवतरलों सुखधाम। धावया विश्राम अनन्यांसी ॥८२॥ त्या मज माता न कोण्ही पिता। बंधु न कोण्ही चुलता। भगिनी न कोण्ही आप्तता। न मज कांता पिशुनादि ॥८३॥ मी मायातीत निरंजन। गुणातीत गा निर्गुण। नामरूपातीत भिन्न। शून्यातीत निःशून्य आभासत्वें ॥८४॥ निःशून्यचि हें शून्य जालें। शून्यचि शून्यातें व्यालें। स्वतेजें तें प्रकाशलें। तेंचि उद्धरलें पाहे पां ॥८५॥ अहं ब्रह्मास्मि स्फुरतां। त्या नांव गा चैतन्यता। एकोहं बहुस्यामता। उदेली इच्छितां इच्छा ते ॥८६॥ इच्छा चैतन्याचे मेळीं। महातत्त्वीं माया उदेली। ते प्रणवात्मकें प्रगटली। द्विविधा जाली तेचि पुढें ॥८७॥ पुरुष आणि प्रकृती। उभय रंगलीं एकप्रीतीं। ब्रह्मत्वा विसरले निश्चितीं। म्हणोनि पदप्राप्ती जीव त्या ॥८८॥ ब्रह्मीं साचोलें पाहतां। पद पावलें त्रिगुणता। त्वं ततोसि अभिधानता। त्रिगुणात्मता जालीसे ॥८९॥ जो प्रणव ॐकार। अर्धमात्रेचा प्रकार। तेयोनि त्रिमात्रिक विस्तार। देवतागुण निर्धार तेचि ते ॥९०॥ मुख्य प्रणवप्रकृति देह जाण। त्यापासाव उद्भवले देह तीन। अभिमान वाचा मातृका वर्ण। अवस्थादि संपूर्ण पृथक्त्वें ॥९१॥ या त्रिअहंकारांचा समुदाव। रज सत्त्व तम यातें नांव। यापासाव पृथक्‌कोद्भव। जाले अपूर्व पाहे पां ॥९२॥ सात्त्विकीं अंतःकरणपंचक। राजसीं पंचज्ञानेंद्रिय मात्रा देख। आणि कर्मेंद्रिय चोख। एवं त्रिपंचक रजाचें ॥९३॥ आतां या तामसांपासोन। निर्माण जालें गगन। तेयोनि वायोपासाव तेज जाण। उदक त्यापासोन धरा हे ॥९४॥ एवं हा सर्व उभारा। मायेपासाव पावला विस्तारा। ब्रह्म नेणेचि या विचारा। परी या थारा ब्रह्मींच ॥९५॥ काय सागर उपजवीतें रंगासी। परी वायुयोगें होणें त्यासी। होती जाती सहजेसी। कोण उदधीसी व्यथा ते ॥९६॥ कीं या नभीं जडलेपणें। दिसताती हीं चंद्र तारांगणें। तीं वावरती आपुलें गुणें। नभ त्या नेणें कांहींच ॥९७॥ तेवींच तो मी सर्वातीत। कर्मीं नसे कदा लिप्त। निराश्रयें स्वानंदें रमत। पक्षपात मज कैंचा ॥९८॥ जया विचार्य संपादणें। तेंचि पक्षविपक्षातें जाणें। निर्द्वंद्व जें कां नैरास्यपणें। त्या काय करणें पक्षविपक्षा ॥९९॥ अहो जो का सर्वातीत। निर्लोभ निश्चळ शांत। निर्मोह निरहंकार निर्भ्रांत। साक्षीभूत सकळांचा ॥१००॥ तो निष्काम निश्चयेंसी। कधीं न जाणे त्या कामासी। कोठोनि स्पर्शे सुखसंपत्तीसी। तेवीं संततीसी परिवारा ॥१॥ हे बोल येयें मिथ्या वावो। सर्व ठावाचा हाची ठावो। न जाणोनि याचा भावो। घेवोनि संदेहो बोलसी ॥२॥ विरोधें करिसी गा संवाद। दंभीपणें वादविसी वाद। मनीं वाहसी वृथा भेद। कोण हा छंद घेसि वांयां ॥३॥ जितेंद्रिय संयमी होसी। ही कल्पना मज स्थापिसी। यदर्थ निरोपितों पाहे तुजसी। सादर श्रवणासी असावें ॥४॥ ॥श्लोक॥ जितेंद्रियोहं ह्यजितेंद्रियोहं न संयमी नापी च मोहजातं। त्वया मया तत्र कथं वदामी स्वरूपनिर्वाण-नामयोद्दम् ॥५॥ ॥टीका॥ गोरक्षा तूं सुलक्षण। होसी पर्यंसी यथार्थ वचन। न जाणेची मी इंद्रियदमन। इंद्रियांहून

वेगळाची ॥५॥ बाह्य इंद्रिय कोंडोन धरी। मनतें न मर्दी निर्धारीं। वासना हिंडे दारोदारीं। कोण योरी जळो ते ॥६॥
मनवासनेहोनि परता। तत्र आमुचा योगीनाथा। आम्ही न जाणं त्या सर्वथा। न करी व्यथा ते आम्हां ॥७॥
आम्ही सकामना निष्काम। विषयातीत सर्वोत्तम। सहजें जितेंद्रिय वर्म। नाचरतां धर्म योग हा ॥८॥
आचरूं हेंही नसे। नाचरतां हें सहजीं वसे। विषय करावे सोसें। हेंही न वसे सहसाही ॥९॥
त्यासाठीं यमनियम। तोचि मीगा सर्वोत्तम। न करोनि कांहीं क्रम। तत्वप्रेम मी होय ॥११०॥
हें तत्व पावावया। यमनियम सर्व क्रिया। शमदमादि हातवटिया। शिणविती काया बहुतेक ॥११॥
आपणचि ते विसरले। संयमी बहु धुंडिते जाले। अहंकर्तेपणें नाडले। भ्रमीं पडले युगकोटी ॥१२॥
जें अखंड अभेद ओतप्रोत। भरोनि उरले सदोदित। तें अलक्ष्य आणिजे लक्षांत। श्रेष्ठ योगांत योग हा ॥१३॥
मोह येथेंचि असावा। संमोहींच पाहावा। त्या मावायेचि प्रगटावा। जैसा ज्या व्हावा तैसाची ॥१४॥
येर मोह जो विषयिक। तो सर्वस्वीं होय घातक। व्यसनीं पाडी हाचि देख। घडवी अनेक दुःखें जीवा ॥१५॥
या मोहातीत अविनाशयोगी। तो अखंडानंदे निःसंगी। ब्रह्मैवाहं वर्ते जगीं। निज रूप भोगी भोगतया ॥१६॥
तया दुजेंपण अणुमात्र नाहीं। सर्व ब्रह्मेति तोचि पाहीं। तेथें तूं मीच वार्ता काई। सर्वथाही अद्वयत्व ॥१७॥
जरी असाती द्वैतता। तरीच तूं मी हे निघे वार्ता। निश्चितासी कैंची चिंता। अभेदीं भेदता कोठोनी ॥१८॥
तंव गोरक्ष म्हणे जी आपण। निरोपिलें निःसीम प्रौढवचन। तरी जो शिव सनातन। यातें जाणून आहां कीं ॥१९॥
परिसोनिया गोरक्षबोला। अवधूतासी विस्मयो जाला। म्हणे अद्यापि न कळे याला। संशयो गेला नाहींच ॥१२०॥
संशय निवटावया निश्चितीं। मज बोलणेंचि आलें पुढतीं। म्हणे सांठवी हें उक्ती। तुजप्रती निरोपितो ॥२१॥
॥श्लोक॥ शिवं न जानामि कथं वदामि वयं शिवःस्वंपरमार्थतत्वम्। सत्यं स्वभावो गगनोपमोहंज्ञानामृतं तुर्यमतींद्रियोहम् ॥५॥ ॥टीका॥ जें सकळ ज्ञानाचें ज्ञान। जें ध्याति या ध्यानाचें ध्यान। जें वेदगर्भीचें बीज धन। शिव सच्चिद्घन व्यापक ॥२२॥ सर्वज्ञ सर्वसाक्षी सर्वागत। जो भूतपती भूतातीत। संगी निःसंग विरक्त। आदि मध्य अंत ज्या नाहीं ॥२३॥ आब्रह्मस्तंबपरियंत। व्यापक हा शिवसमस्त। तो साक्षात द्वइत। शुद्ध शांत गगनोपम ॥२४॥
तो भक्तीचा होय दाता। या इंद्रियांचा चाळिता। ज्ञानामृतातें प्राशविता। असे सर्व सत्ता जयाची हे ॥२५॥
सकळ बीजांचें हें बीज। सकळ तेजाचे जें तेज। सकळ गुजांचें हें गुज। तो स्वात्म निजशिवची ॥२६॥
शिवसनातन सर्वज्ञ। शिव अज अजित प्राज्ञ। शिवगुणातीत गुणज्ञ। अपरंपारज्ञ शिव हा ॥२७॥
तत्वातीत तें तत्व जाण। गुणातीत जो निर्गुण। जो निराकार निरंजन। सर्व संपूर्ण पूर्णत्वें ॥२८॥
अंडपिंडब्रह्मांड सूक्ष्मस्थूळप्रचंड। शब्द स्वादरस उदंड। नादवितंडतांडव शिव ॥२९॥
सजीवनी जीव भाव अभाव। दृश्यादृश्य अवघा शिव। रिक्त त्याविण नसे ठाव। शिवोहं अनुभव प्रत्यक्ष ॥१३०॥
सर्वं शिवेति हें जाण। येथें कैंचें तूंमीपण। अहं शिवोहं हें वचन। नव्हे अप्रमाण शब्द हा ॥३१॥
शिव सत्य ज्ञानप्रकाश। शब्दान्वयें जाणिजे चोख। स्वात्मानुभवीच हे ओळख। केवळ वाचक नोव्हे हा ॥३२॥

ती होवोनि प्रज्वलित । अंतरमळातें दाहित । तेणें द्वारें होती मुक्त । तेज अद्भुत तियेचें ॥८७
तेथें प्राणपवन घावरा । रिघूं पाहे भलतिया द्वारा । योगिया साधी तेथें आवरा । शनैः सांवरा सांवरित ॥८८॥
कोण्ही हठातें पटती । अंतरमाळा बाह्य वमिती । धुती नीती चोखाळिती । पुनः स्थापिती पूर्ववत ॥८९॥
कोण्ही लंबिनीचा योग । शिरा तोडोनि साधिती प्रयोग । मध्यमे वैखरीचा संग । अवघड प्रसंग हठी हे ॥१९०॥
एवं वायुसाधनेसी । अनेक योग हे निश्चयेंसी । ऐसी साधितां कांहीं एक दिवसीं । स्थिरता वायुसी साधूं लागे॥९१॥
वायु स्थिरावतां तीरीं । मनही स्थिरावे अंतरीं । विहारीं तुटे कामलहरी । इंद्रियव्यापारीं क्षीण तें ॥९२॥
रहणी यापरीं साधिजे । अभ्यास वरवा ठेविजे । मग षडंग आरंभिजे । योगिराजें क्रमोक्त ॥९३॥
ओट हाताची मांडणी । यांतची षडंगाची दावणी । उपाव वायूच्या कोंडणीं । पश्चिमगमनीं रमावया ॥९४॥
जो कुंडलिनीमुखीं भरला । तो कुंभक त्राहाटकें दटाविला । षडंग कोंडणी निर्बुजला । मग तो शिरला मणिमार्गे ॥९५॥
अवघड मणिपुराच्या वाटा । तेथें सिद्धीचाच होटा । त्या चाळक पेटती हटा । चढूं धीटा न देती ॥९६॥
याचेंही एक:कारण । जीव वासनावेष्टित पूर्ण । त्या सिद्धीचें नटनाट्य भापण । भ्रमें परिसोन वरदोक्त ॥९७॥
कोण्ही एक दोन जाती । कोण्ही तीन चार वेंघती । कोण्ही पांच सहा लाग करिती । परी त्या आडविती जावया ॥९८॥
कोण्ही रिघाले सात आठ । नव दहा अकरा बरवंट । बारा तेरा चौदा स्पष्ट । तेथेंहि कलकलाट तयांचा ॥९९॥
पंधरा सोळा सतरा ।:वेंध अठरा एकोणीस सैरा । वीस एकविसाचा पावला थारा । जाणोनि विसारा धांवती ॥२००॥
ज जयासी अपेक्षित । तेंचि देवोनि करिती शांत । सेखीं आपण होवोनि अंकित । कीर्ति लोकांत वाढविती ॥१॥
त्यां सिद्धिबळें करोन । अघटित दाविती कर्में करोन । कोण्ही साधिती आयागमन । अधरासन वायुबळें ॥२॥
कोण्ही उदकावरी चालती । अग्निउदकस्तंभ करिती । गुप्त प्रगट क्रिया दाविती । परकाया प्रवेशती कोण्ही एक ॥३॥
नाना शापदें होवोन । चमत्कारें दाविती सिद्धपण । कोण्ही मारोन देती संजीवन । कोण्ही मृता उठवोन चालविती ॥४॥
नाना वस्तु काढोनि देती । अवघे भूतभविष्य सांगती । नाना स्थळीं समाधि घेती । प्रगट होती सेवेची ॥५॥
नाना प्रकारें धातुक्रिया । करिती काळविवंचना कितेक वायां । कित्येकांच्या पार नाहीं भक्षाया । हें लक्ष योगिया सिद्धिबळें ॥६॥ सिद्धमार्गाची गती । एक मार्गे नसे निश्चितीं । यंत्र मंत्र तंत्रें असती । योगयुक्ती हठाची ॥७॥
या षडंगयोगाची क्रिया थोर । वाटवितां वाढेल अपार । तुम्ही योगी येथें स्थिर । आम्ही तों परवीरही तया ॥८॥
हा आचरतां शुद्ध नाहीं । हा बुडवितो कीर्तिडोहीं । याचें नेणां वर्म कांहीं । आपुले ठायीं ठकलांती ॥९॥
अंगीकारितां या कारणां । दडचे जडलोति अभिमाना । वृथा वाटे मीतूंपणा । आत्मैवपणा नाटवे ॥२१०॥
आतम्व जया पावलें । भूतमात्रा समव्ही आलें । द्वैत समूळीं ज्याचें गेलें । षडंगी भले ते योग्य ॥११॥
आणीक एक योग पाहीं । षड्विकार नांदती देहीं । त्यांतें मर्दिल्यावीण कांहीं । षडंग ठायीं टसेना ॥१२॥
एकें वेडें गेलें बहुतांतें । सेखीं भेदिलें तव गुरुत्तें । तैं प्रयास पडले दत्तें । या वर्मातें ओळखीं ॥१३॥
एकापासोनि सोडविला । मागुनी दुजी अवगिला । तेथेंही त्यां परिश्रम केला । अद्भुत दाविला पराक्रम ॥१४॥

अद्भुत पराक्रम दावोन । उडविलें तें त्या दोघांचें भान । सहाय्यतिरिक्त हे दोन । धन्य छेदन त्वां केलें ॥१५॥ योग साधोनि बरे । कर्तृत्व केलें खरें । त्या कर्तृत्वें अंगीं भरे । सहाय्य पुरस्कारें येवोन ॥१६॥ त्यायोगें सर्व धांवती । ते तव अंगीं संचरती । तुज ते मर्दिले न जाती । येणें दुर्गती सर्व जाण ॥१७॥ पृथक ऐकिजे विस्तार । तुज सांगतों साचार । न करीं श्रवणीं अनादर । घे सत्वर साठवणीं ॥१८॥ योगसंभ्रमीं तुझा काम । सिद्धियोगें पावलासि भ्रम । कैसा म्हणावा तूं निष्काम । केवीं सर्वोत्तम पद पावसी ॥१९॥ असो सिद्धिकामासी व्यत्यय येतां । तुजा क्रोध भरला तव चित्तां । या सर्वां योगिया देखतां । होसी संतापता अनिवार ॥२२०॥ आपुलें सिद्धिऐश्वर्य करोन । अंगीं मद आलासे चढोन । क्रोधमदें अविवेकी होऊन । त्रिशूळ धारण करीं घेतला ॥२१॥ तैं मत्सरें मांडिलें द्वंद्व । अद्वातद्वा केला भेद । अनिर्वाच्य वाग्वाद । करितां प्रसिद्ध न भीसी ॥२२॥ तैं गुरु तुझा मच्छींदर । तुज प्रबोधितां जाला साचार । तैं दर्भे नाडिलें तुज थोर । केला अव्हेर शब्दाचा ॥२३॥ सिद्धांसन्निध युद्ध करितां । विशेषणार्थ जडली अहंता । नानापरी मातें झुंजतां । काय हातां फावलें ॥२४॥ या सहांचा दुर्गुण । हा तुज आला कीं अनुभवून । यांचें न होतां निर्दालन । षडंगसाधन केवीं शुद्ध ॥२५॥ असो हे षडंग योगाची उपाधी । लक्षांत कोण्ही एखादा साधी । भोगितां भोगील समाधी । परी मी विशुद्धी वेगळा यां ॥२६॥ यां अनेक योगप्राप्तीसी । होती गुरूचे उपदेशी । फळआशा धरोनि मानसीं । रत सेवेसी निरंतर ॥२७॥ आशाबद्ध तोही गुरू । राखवीत सेवेचा विचारू । मर्जी शिष्याची रखी थोरू । प्रसाद विस्तारू लौकिकीं ॥२८॥ देखोनि संपत्तिवैभवासी । गुरु प्रीतीं उपदेशिती त्यासी । मानमान्यता समरसीं । चित्त वित्तासी विटाळलें ॥२९॥ गुरूचा देखोनि वैभवपसारा । शिष्य घालिती येरझारा । म्हणती स्वामी कृपा करा । अंगीकारा दीनातें ॥२३०॥ जंव जंव वैभव पाहणें । तंव तंव काज कारभारा धांवणें । कळेल त्या रीतीं तृप्त होणें । जाणिजे खुणें इतुक्या ॥३१॥ किंवा गुरुगृहीं पावली विपत्ती । मग शिष्य निघोनि जाती । कोण्ही शिष्य भोगोनि संपत्ती । समाचार न घेती गुरुचा ॥३२॥ आत्मतत्त्वीं नाहीं ओज । मेळवी शिष्यांचा समाज । कर्णीं सांगे मंत्रबीज । गजर बाज प्रसूतीचा ॥३३॥ न स्वस्थानीं बोधिला । स्वात्मरंगीं न रंगला । अविनाशपदीं न पावला । वाहक जाला भाराचा ॥३४॥ कोण बोधाचीं लक्षणें । शिष्य बोधावा कवणें गुणें । त्यापासोनि काय घेणें । त्या काय देणें न कळेची ॥३५॥ हे कैसेनि म्हणावे गुरु । शुद्ध जगीं हे पोटभरू । येथें कैंचा स्वात्मविचारू । कैसेनि पारू उतरिती ॥३६॥ तेवींच लोभस्वार्थी शिष्य जाण । वरीवरी दांभिकें करिती सेवन । प्रसंगीं कसवटीं येतां जडोन । तोंड चुकवोन राहती ॥३७॥ न चेव शुद्ध वाणी । बोलिलों असे याचि कारणीं । सद्गुरुपद जें निर्वाणीं । तें सच्छिष्यपणीं पाविजे ॥३८॥ गुरुपद तें नाना रीतीं । ग्रंथ वाढेल करितां उपपत्ती । त्यांत निंदाभेद उद्भवती । म्हणोनि पुढतीं वाढवीना ॥३९॥ सद्गुरुपद याहोनि थोर । तेथील रहणी वेगळा विचार । तेंही ऐक तूं सारासार । बुद्धि स्थिर करोनिया ॥२४०॥ निःसंग आणि निर्द्वंद्व । निर्लोभ आणि अभेद । नैराश्य आणी निःखेद । हर्ष आल्हादयुक्त जे ॥४१॥ शांत दांत गा निर्मळ । अक्रोध वैराग्य सुशीळ । उदार धीर अचळ । सदा शीतळ सर्वांगीं ॥४२॥

वोटें विभक्त नये दावितां । नगीं वसे रसनें गातां । नेत्रपार न लगे पाहतां । मनाची रिघता न चलेची ॥३३॥
पाहतां सर्व तोचि होय । न जानामि त्या वोलतां नये । तो न जाणसी याची सोय । म्हणोनि उपाय योजिसी हा ॥३४॥
ओळखोनि तुझिया योगासी । निरोपितों कळावया तुजसी । गोरक्षा तूं सुजाण होसी । लक्ष दे श्रवणासी पुढलिया ॥३५॥
॥श्लोक॥ अतत्स्वरूपं नहि वस्तु किंचित् तत्त्वस्वरूपं न हि वस्तु किंचित् । आत्मस्वरूपं परमार्थतत्त्वं न हिंसकः कोपी न चापि हिंसा ॥६॥टीका॥ नाना आकार विकार । नाना वस्तुचे प्रकार । नाना भूतें औडंवर । तत्त्व सार नोव्हेचि तें ॥३६॥
नाना वीजें नाना तरू । अनेक श्वापदें जलचरू । कृमी कीटकें आफणफणीवरू । अनंत विस्तारू नोव्हेचि ते ॥३७॥
लक्ष चौऱ्यायशीचा उभारा । व्योम चंद्र ग्रह नक्षत्र तारा । वनस्पति जंगम नग घरा । उदक वारा नोव्हेचि तें ॥३८॥
अतळ वितळ सुतळ । तळातळ रसातळ पाताळ । तेवींच एकवीस स्वर्गमंडळ । द्वीपाचळ उदधी नसे ॥३९॥
देव दानव ऋषिगण । अष्टदिक्पति लोक संपूर्ण । भूस्वर्गपाताळादि देवता भिन्न । न होति जाण तत्त्व हें ॥४०॥
नाना धातु अलंकार । नाना रत्नें विविध प्रकार । काष्ट मृण्मयादि चीर । यांतहि विचार तो नाहीं ॥४१॥
वर्णखाणी याती गोत । आचार विचार नाना पंथ । मानापमान योग्यता निश्चित । भाग्य संपत नव्हेचि तें ॥४२॥
दान धर्म नोव्हे कर्म । भेद अभेद नोव्हे वर्म । लौकिक संबंध नोव्हे शर्म । नोव्हे आराम सुखदुःख ॥४३॥
भय ताप नोव्हे भीती । यश अपेश नोव्हे कीर्ती । ज्ञान अज्ञान नोव्हे स्फूर्ती । बुद्धी मती धृती नसे ॥४४॥
नाना घटपटादि योग । नाना हुत महायाग । व्रततपाचरणें प्रयोग । नोव्हे जोग तें कांहीं ॥४५॥
शुची अशुची चांडाळ । सुबुद्धी दुर्बुद्धी अमंगळ । नाना विद्या नाना खेळ । कळ विकळ नोव्हेचि तें ॥४६॥
राग विरागादि रस । नाद भेद ताल सुरस । घात आघातादि कुरस । सरसविरस तें नसे ॥४७॥
देह गेह सुत जाया । अनेक प्रकारें विस्तार माया । स्वार्थ परमार्थ प्रपंचक्रिया । लोभ मोह दया नोव्हे तें ॥४८॥
दृश्यादृश्याचा पसारा । क्रिया अक्रिया मार्ग सारा । पाहतां वस्तुत्वें विचारा । अणुमात्र खरा लेश नसे ॥४९॥
असो हें गा बहुभाषण । तत्त्वस्वरूप हें नोव्हे जाण । परी हें न पडे त्याविण । व्यापोनि अव्याप्त लक्षण तोचि तें ॥५०॥
तें गुह्य आत्मतत्त्व पाहीं । व्यापक असे सर्वा ठायीं । अतर्क्य याची नवलाई । निवडितां कांहीं न पवे करीं ॥५१॥
तें जाणीतल्याविण ठावें । उगेचि कैसें सांपडावें । तुज वाटे जरी परिसावें । तरी श्रवण द्यावें श्रवणासी ॥५२॥
या व्यापकाचा योग । किंचित निवेदितों चांग । श्रवणीं साठवीं तो भाग । करीं लाग तेवींच सर्वी ॥५३॥
पाहे पां रसअंगीं जडला स्वाद । शब्द ध्वनीमाजीं नाद । ग्रंथामाजीं अर्थभेद । वादी विवाद ओळखिजे ॥५४॥
कनकीं शोभे ती कांती । दीपामाजीं पाहें दीप्ती । रत्नीं कळा फांकती । पुष्पीं निघती परिमळ ॥५५॥
नाना पदार्थमात्रीं जाण । रुचिपरत्वें भिन्नभिन्न । क्षार आम्ल मधुर तीक्ष्ण । कटू गोडपण ओळखीं हे ॥५६॥
पंच भूतांमाजी पवन । देहीं चेतविता चैतन्य । रस जाणता रसज्ञ । तोचि प्राज्ञ प्राज्ञत्वें ॥५७॥
सर्व वस्तूंसी सनेजता । ते निवडितां नये योगिनाथा । सर्वां ठायीं त्याची सत्ता । त्याविण सर्वथा नोव्हे कांहीं ॥५८॥
नाना गुंफित पुष्पहार । अंतरीं सुताचा आधार । तेवीं व्यापक जगदीश्वर । पट निर्धार सूतचि तें ॥५९॥

रंगविरंगी पट शोभले । नाना नामीं प्रौढीं प्रौढले । पाहोनि त्यातें जग भुललें । अंगीं शृंगारलें लेवोनिया ॥१६०॥ तेवींच ईश्वरापासोन । विश्व जालें हें निर्माण । परी विश्वगत असे कोण । ही तों खूण नोळखसी ॥६१॥ सुवर्णाचेचि अलंकार । येर धातूंचे पात्रप्रकार । तेवींच मृत्तिकेंगसाव सुंदर । होती अपार भिन्नत्वें ॥६२॥ त्या आकारें वेगळेंपण । पाहतां पाहतसो आपण । परी तें नोव्हे वेगळीक जाण । असति समरसोन एकमेकीं ॥६३॥ एवं ब्रह्मचि हें व्यापिलें । दृश्य नगरूपें विस्तारलें । हें सर्वात्मकीं ओळखी भलें । यावीण वेगळें नसे कांहीं ॥६४॥ हें व्यापोनि सर्वातीत । सूत्रेंचि यंत्रें नाचवित । होय जाय कार्य कृत्य । साक्षीभूत तो पाहें ॥६५॥ जेवीं बुद्धीं जड फोसला करोन । त्याचें नांव ठेविलें पहिलवान । त्यातें बळें पाडितां परापासोन । तो उठे तटकारोन कोसला की ॥६६॥ कीं खेळ रची बाजेगर । काष्ठमृगी स्थापी सुंदर । काष्ठपुतळियाकरीं मारवी शर । आपण दूर राहोनिया ॥६७॥ तेवींच हें मायालाघव । घडामोडी होतसे अपूर्व । या कृत्याहोनि वेगळें तत्त्व । मूळ ठाव सर्वांचा ॥६८॥ तें न कोणातें द्वेषी । सद्यत्वें न कदा पोसी । तें कांहीं कदा न पडे सोसीं । कधीं न सुखदुःखासी कोणा न दे ॥६९॥ आयुष्य सरतां प्राणी मरे । तें मागिल्यातें दुःख भरे । म्हणती घात केला इश्वरें । दावेदारें आमुचा ॥१७०॥ नेणोनि मूर्खें आरोपिती । परी तो नेणे कृत्योत्पत्ती । हिंसकत्व कैंचें त्याप्रती । होती जाती आपसयें ॥७१॥ जीव कृत्याचें कारण । तैसेचि नेम जाती नेमोन । तदनुसारें भोग संपूर्ण । येती घडोन पुनर्जीवा ॥७२॥ मज मरणें ना मारणें । करीं ना कांहीं करणें । हरीं ना कोणाचें हारणें । आचरणें सरणें ज्याचें त्या ॥७३॥ अणुमात्र मातें रिपुत्व नाहीं । सर्वातीत सर्वें पाहीं । सर्वात्मकीं मी विदेही । तूं तोही मीच सारा ॥७४॥ अद्वय अभेद विमळ । येथें शब्दजात न साहे विटाळ । अंतर्बाह्य सदा सर्व शीतळ । ताप आळुमाळत म नुरवी ॥७५॥ ऐसियावरी म्हणसील साधन । कांहीं योग केले असतील धारण । मनोविनाश यावीण । घडेल कोठून कैसेनी ॥७६॥ गारक्षा तव कल्पनेचा भेद । उठतां करूं म्हणसी संवाद । तरी वाउगा न करीं वाद । होय सावध श्रवणार्थी ॥७७॥ निर्विकल्पासी कल्पना । काय आणिसी वाउगी मना । सांडीं सांडीं वितर्क भावना । शुद्ध अंतःकरणा करीं बापा ॥७८॥ अविनाश म्हणे रे आतां । गोरक्षा श्रवणीं सावध करीं चित्ता । सातव्या श्लोकींच्या अर्था । घेइंजे स्वहिता उमजोनी ॥७९॥ ॥ श्लोक ॥ षडंगयोगो न च नैव शुद्धम । गुरूपदेशो न च नैव शुद्धम । मनोविनाशो न च नैव शुद्धम । वयं च तत्त्वं वयमेव शुद्धम ॥७॥ ॥ टीका ॥ योगीसिद्धांचियासाठीं । निर्मिल्या नाना योग हातवटी । ते करिती बहु खटपटी । तामस हठी षडंग ॥१८०॥ आहारातें अनुमानावें । दिवसेंदिवस न्यून करावें । एक ग्रासीं रहावें । पुनर्चद्रवावें एकएका ॥८१॥ यासी अहारविहार म्हणती । हे साधावया योगयुक्ती । कामनिद्रेतें जिंकिती । अल्पगती गमनादि ॥८२॥ या क्रमाची राहणी । साधोनि दृढावती आसनीं । मग प्रणवाचे साधनीं । लागती निरोधनीं योगी ते ॥८३॥ रेचक कुंभक त्राहाटक । करोनि सोडिती पूरक । त्रिकाळीं साधन करोनि देख । अंतरें चोख करावया ॥८४॥ अध ऊर्ध्व द्वारें दोन । वावरे प्राण आणि अपान । उभयां संयमून जाण । प्राण शोषण अपानीं ॥८५॥ उभय संयम नळद्वारें । तों कुंडलिनी मुखीं भरे । तैं ती ठायींचि सरसरे । भडका योगें प्रदीप्त ॥८६॥

निंदा द्वेष अणुमात्र नाहीं । देही असोनि वर्ते विदेही । तया आपपर वेगळें तेंही । दीप ठायीं नसे जेवीं ॥४३॥
सच्चिदानंदीं सदा वास । तेचिपरी भूतमात्रास । सर्वागत सर्व निवास । वाट दुजपणास नाटके ॥४४॥
ज्ञान अज्ञान पक्ष दोन्ही । रस चोपोनि तो राहे विज्ञानी । सदा तन्निष्ट स्वरूपस्थानीं । भोगी उन्मनी स्वात्मरंगीं ॥४५॥
जगीं वागोनि न दिसती । बालोन्मत्त पिशाचवृत्ती । स्वइच्छें सदा रमती । विरक्त विचरती सानुरागें ॥४६॥
जया करोनि घेणें स्वात्महित । तोचि तयातें शरण रिघत । सेवोनि कृपा संपादित । सच्छिष्य निश्चित तोचि पैं ॥४७॥
शिष्य असती बहुतांपरी । नाना अर्थी सेवा करी । विषयिक पदार्थी आशा धरी । जगीं थोरी व्हावया ॥४८॥
नाना परी धरोनि कामना । लागे लाभार्थ सेवना । कैंचा अनुताप उपजे मना । स्वात्मसाधना नोळखी ॥४९॥
तो सच्छिष्य न म्हणावा । नुगवोनि वेई आपुला गोंवा । काय करावें त्याच्या कीर्ति नांवा । कैंवीं भवा तो उतरे ॥२५०॥
सच्छिष्याचे ऐकें गुण । किंचित करितों निरोपण । भवभयभीती वाहोन । अनुताप दारुण देहीं त्या ॥५१॥
विषयिक पदार्थ नावडे चित्ता । संग धरी सदा विरक्ता । देहीं न धरोनि लोभ अहंता । सद्गुरुनाथा शोधीत ॥५२॥
संतसाधूंतें शरण जाय । लोटांगणीं अर्पी काय । म्हणे अनाथ मी गाय । बुडतों उपाय कीजे जी ॥५३॥
काया वाचा मनें करून अनन्यभावें म्हणे शरण । अंगीकारिजे मजलागोन । मी हीन दीन अनाथ कीं ॥५४॥
सद्गद हृदयीं सप्रेम । जीवीं नसे अन्य काम । व्हावी सद्गुरुकृपा उत्तम । हे मनोधर्म अंतरींचे ॥५५॥
सत्य संकल्प सद्गुरुचरणीं । सेवा करीं सेवकपणीं । कंटाळा नुपजे कधीं मनीं । वागे वचनीं तत्पर ॥५६॥
मधुरोत्तरीं निरवी सर्वदा । न प्रवर्ते कधीं निंदा वादा । नेणेंचि कांहीं भेदाभेदा । धरोनि मर्यादा वागत ॥५७॥
रात्रंदिन करी सेवा । यावीण नावडे कांहीं मेवा । त्रास नेदी कवणिया जीवा । दे विसावा सकळांतें ॥५८॥
सद्गुरु कृपें करितील बोध । तयींच हृदयीं सांठवी सावध । शासितां नुपजवी क्रोध । सेवी पद आल्हादें ॥५९॥
लक्ष सद्गुरुचे चरणीं । कोणताही आग्रह न धरी मनीं । समर्थ तोषवितील जें कृपादानीं । प्रसाद धणी पावे तें ॥२६०॥
गोरक्षा तूं ऐसाचि होसी । कसितां उतरलासि कसीं । नेत्र दिधला वटकासी । आणि गुरूसी दूसरा ॥६१॥
तैंच पावलासी सुलोचन । ही तुझी तूं लाधलासी खूण । हें सच्छिष्याचें लक्षण । वाणलें पूर्ण तव अंगीं ॥६२॥
परी अभिमानें नाडलें । पुढें अवघें फोल जालें । सिद्धिवळें मन चेवलें । लाभ बुडाले स्वात्मिक ॥६३॥
आतां त्या लाभासाठीं । मनोनाश करिसी हटीं । तेहि मज वाटे चावटी । वृथा खटपटी कोरड्या ॥६४॥
सकळ इंद्रियांचें अधिष्टान । एक तें असे मुख्य मन । तें मनही असे अंगहीन । कैसेनि दंडण तयातें ॥६५॥
या मनाची उत्तम स्थिती । जाईल पाहा नेलिया पंथीं । बंधमोक्षाची गती । धरिल्या प्रीती संगाच्या ॥६६॥
मन केवळ स्फटिक । संगविल्याऐसी दावी चमक । तुटकें फुटकें विटकें देख । होय बाधक संगरंग ॥६७॥
निःसंग असतां पाहीं । तो शुद्ध सत्त्व आपुले ठायीं । तयाकडे अपराध नाहीं । लाविल्या सोयीं वागेल ॥६८॥
म्हणोनि मनोनाशाचें कारण । कधीं न करींच गा धारण । मन सन्मार्गेंच वर्तवून । राखें सुप्रसन्न विभूति हे ॥६९॥
मन मारुत चंचल असती । संग गुण घेवोनि उठती । तयामाजींच लिप्त न होती । शुद्ध असती असक्तें ॥२७०॥

जें अद्वैताहं भलें । तेंचि सर्वात्मकीं व्यापलें । येथें मन केउतें वेगळें । विचार वळे पोहें पां ॥७१॥
ब्रह्म जयातें म्हणती । तेंचि परमार्थतत्त्व गा निगुती । आदिमध्य तेंचि अंतीं । सकळ उपपत्ती तयाची ॥७२॥
पदार्थमात्र सर्वोत्तम । व्यापोनि अव्याप्त निष्काम । पाहतिया नसे कांहीं भ्रम । सकळ संभ्रम स्वानंदीं ॥७३॥
जें स्वानंदाचें रूपडें । अंतर्बाह्य तेंचि उघडें । अहंते कधीं न सांपडे । शहाणाचि अडे वेद पाहा ॥७४॥
न घडेचि कांहीं निश्चयाला । म्हणोनि खलु विधि ब्रह्म बोलिला । सर्वं ब्रह्मेति या बोला । श्रुति गलबला हाचि हा ॥७५॥
अक्षरत्वें मायाब्रह्म नटलें । त्रिगुणात्मकें आविर्भवलें । व्यापकत्वें तत्त्व ब्रह्म भरलें । सर्वातीत उरलें साक्षित्वें ॥७६॥
त्या साक्षिरूपें करून । प्रगट वावरे संपूर्ण । येथें कैंचें द्वैतलक्षण । ब्रह्म सनातन अविनाश ॥७७॥
यापरी सद्बोध भाषण । सप्त श्लोकीं केलें निरोपण । योगी सिद्ध करिताती श्रवण । देहभान नसे त्यां ॥७८॥
गोरक्ष मुखाकडे उगाचि पाहे । चाकाटोनि मनीं थिजला राहे । वाटे अर्पावी पदीं काये । पसरोनि बाहे कवळावा ॥७९॥
ऐसा सकळ चिंतांसी । आनंद उद्भवला मानसीं । मच्छींद्र अतिवेगेंसी । आलिंगनासी मिसळला ॥२८०॥
देखोनि उठले योगीजन । प्रेमें अवधूता करिती वंदन । अवधूत देती आलिंगन । प्रेम सघन वर्षलें ॥८१॥
योगी मच्छींद्र करिती स्तुती । म्हणती धन्य धन्य ही अविनाशमूर्ती । सकळ जीवां द्यावया विश्रांती । साकार स्थिती प्रगट हा॥८२॥ नंतर मच्छींद्र म्हणे गोरक्षा । अजोनी काय पाहसी परीक्षा । सर्वज्ञत्व आणीं लक्षा । यावरी उपेक्षा ना घेईं ॥८३॥
सोडोनिया अभिमान । निर्विकल्प करीं मन । याचे वंदीं आर्ता चरण । अलभ्य पूर्ण लाभ हा ॥८४॥
यापरी सद्गुरु आज्ञापीत । परी तयाचें आळुमाळा चित्त । कांहीं चमत्कार व्हावा विख्यात । हेतु मनांत हाचि पैं ॥८५॥
यासाठींच भटीं आळस । हें जाणती जाला अविनाश । याचा योग विशेष । कथारस असे कीं ॥८६॥
उभयांचें संवादचरित पाहीं । निरोपण होईल पुढिले ठायीं । तेथील अद्भुत नवलाई । सुरस तोही सांठवा ॥८७॥
येथें वदविता दिगंबर । ग्रंथीं त्या कृपेचा आधार । पाहतां मी मतिमंद पामर । परी बोलविता सार ज्याचा तो ॥८८॥
श्रीदत्त पूर्ण कृपाराशी । तेणेंचि करीं धरिलें अर्भकासी । आपणचि होय हृदयनिवासी । बोलवी वाचेंसी स्वचरित ॥८९॥
तें परम अतिगोड । श्रवणीं पुरवी श्रोत्यांचें कोड । तुम्हांसीच येथें चाड । अभाविक मूढ काय जाणें ॥२९०॥
ग्रंथरूपी हें मानससरोवर । येथें हंसरूपी तुम्ही श्रोते सुंदर । अर्थ मुक्ताफळें सेवणार । आणि निवडणार दुग्धपाणी ॥९१॥
ते तुम्ही संत दयाघन । अवधूतानंदीं सदा निमग्न । मी अनाथ दुर्बळ तुम्हां शरण । मागतों दान कृपेचें ॥९२॥
अनंतरूपी संतविभूती । जाणोनि सुत करी विनंती । सेवा घ्यावया दीन हातीं । पुढतां पुढतीं हेंचि मागें ॥९३॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । यासी दत्तकृपेचें संमत । श्रोते श्रवण करोत अखंडित । षट्चत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२९४॥

॥ इति षट्चत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ४७ वा ॥

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥ श्रीगणेशसरस्वतीभ्यां नमः ॥

श्रीजयजयविभो स्वामिदत्ता । सच्चिदानंद सदोदिता । अचल अखंडा मायातीता । तव पदीं माथा अर्पिला ॥१॥
तूं सदय उदार शांत । दीनवत्सल कृपावंत । जाणसी दीनाचें मनोगत । अनाथ सनाथ करीं तूं ॥२॥
मी तरी तुझा म्हणवीं दीन । अनन्यभावें पदीं शरण । जाणोनि अंतरींचें कारण । करीं पूर्ण मनोरथा ॥३॥
तव आधारें स्वामिराया । लागलों तुझे गुण गाया । त्याची परिपूर्ति करावया । कीजे दयादान मज ॥४॥
मागां तुझेचि कृपेंकरोन । करविलें श्रोत्यांपुढें निरोपण । तें चरित्र तुझें गोड गहन । चालवीं पूर्ण पुढतीं ॥५॥
या श्रोतियाचें गुज । तूंचि जाणसी महाराज । पूर्ण आर्थिकाचें करीं काज । पुरविता चोज तूंचि होसी ॥६॥
तूं दीनांचा सोयरा । निरोपणीं निरोपवीं दातारा । श्रोते वाट पाहती कथासारा । त्यांचिया अंतरा तोषवीं ॥७॥
दत्त दयेचा सागर । हृदयीं देता जाला उद्गार । कथा निरोपावया सुंदर । आनंद थोर उदेला ॥८॥
तंव श्रोते बोलती वचन । चालवीं कथेचें निरोपण । गोरक्षें कां न केलें वंदन । विकसित मन कां त्याचें ॥९॥
वक्ता वदे श्रोत्यांसी । तुम्ही सावध सत्य श्रवणासी । तुमची आवडी देखोनि सरसी । निरोपित्यासी आनंद ॥१०॥
उभय हृदय आनंदभरित । तो आनंदचि होय श्रीदत्त । त्या कृपायोगें हा ग्रंथ । रसयुक्त गोड बहु ॥११॥
त्या रसाचें करिते पान । तुम्ही भाविक संतजन । तुमचेचि कृपें करून । होय निरोपण अवधारा ॥१२॥
मागां सेचाळिसावे प्रसंगीं । दत्तासि नमिते जाले सिद्धयोगी । दत्तही सकळांतें आलिंगी । आनंदें रंगीं रंगले ॥१३॥
तंव मच्छींद्र बोले गोरक्षासी । उठ भेटें श्रीदत्तासी येरू म्हणे सद्गुरूसी । उगेंचि यासी कैंचि भेटूं ॥१४॥
येणें बहुयुक्तीचें केलें भाषण । तें ऐकतांचि आनंदलें मन । बोलाऐसा अनुभव पूर्ण । यावा दिसोन सकळांतें ॥१५॥
तंव अविनाश वदे बा गोरक्षा । तुज कोणती पाहिजे परीक्षा । ते वदें मज तूं दक्षा । बाणविती लक्षा आतांची ॥१६॥
कोण योग उद्भवला अंतरीं । तो सर्वांदेखतां सांग झडकरीं । तें पुरेचि येथें उरीं । हेतु निर्धारीं पुरतील ॥१७॥
गोरक्ष म्हणे सावधान । सर्व सिद्धांसन्निध बोलतों वचन । खेळ खेळूं उभय आपण । कौतुक संपूर्ण पाहतील ॥१८॥
तो खेळ जरी म्हणाल कोणता । तरी लपंडाईचा मांडूं आतां । कोण कोणाच्या लागे हातां । कोण जिंकिता होय कोण्हा ॥१९॥ अवधूत म्हणे कळलें बीज । तव मनीं दावावें वाटे चोज । बरें पाहूं कैसें काज । पाहतील आज सिद्ध सारे ॥२०॥
गोरक्ष म्हणे समस्तांसी । तुम्ही सावध पाहा खेळासी । कैसे धरितील हे लपणारासी । कळेल तुम्हांसी सामर्थ्य ॥२१॥
पुढतीं म्हणे अवधूता । जाणवेल आतां खेळ खेळतां । उपेगा नये बोल बोलतां । अनुभव समस्तां बाणवा ॥२२॥
अविनाश वदे न बोलें उत्तर । लपावया न करीं उशीर । हे वाट पाहती योगेश्वर । लीलाचमत्कार पाहावया ॥२३॥
गोरक्ष म्हणे धरोनि आवांका । बोलतां बोलसी बहु नेटका । परी खेळ नोव्हे हा फुका । उतरणें तुका कठीण कीं ॥२४॥
अंग चुकवानि समरीं । त्रिशूळ चुकविले निर्धारीं । येणें काय जालें तरी । आतांचि परी कळेल ॥२५॥
तितुक्यानेंचि हे भुलले । आणी तव अंतरही फुललें । आतांचि कळों येईल भलें । खेळीं खेळें निवडती ॥२६॥

तंव मच्छींद्र म्हणे उगला । कां भलतेचि बोलसी बोला । आगळिकें माजविसी कळीला । सम फळिला मांडोनी ॥२७॥
दीप करावया शांत । जेवीं पतंग झेंपावत । कीं तृणपुतळा धांवत । विझवावया हुत स्वबळानें ॥२८॥
उरग होवोनि कोपायमान । म्हणे मी गिळीन विनतानंदन । कीं मक्षिका म्हणे पक्षेंकरून । मेरू उलथोन पाडीन हा ॥२९॥
खद्योत म्हणे भास्करा । येई तूं मज पुढें समरा । तेवीं त्वां मांडिलें अविचारा । अनर्थ खरा वाढविसी ॥३०॥
मच्छींद्र क्रोधें गोरक्षासी । बोलतां वदे अविनाशी । बाळक खेळतां खेळासी । आनंद मानसीं असावा ॥३१॥
जो त्या अंतरीं उद्भवला हेत । तो न होतां पूर्ण मनोरथ । बालक रुसे फुगे निश्चित । कदापि शांत न होय तें ॥३२॥
यालागीं त्याऐसें व्हावें । अर्थ त्याचे पुरवावे । तोषवुनी शांतवावें । क्रोधें न भरावें अर्भका ॥३३॥
यावरी क्रोधें न भरा कांहीं । मच्छींद्रनाथा चमत्कार पाहीं । गोरक्षाची नवलाई । कैसी काई कळों दे ॥३४॥
जेणें गोरक्ष संतोषभरित । होईल तोचि साधूं अर्थ । त्याचा प्रेमा मज बहुत । न मानीं विपरीत मच्छींद्रा ॥३५॥
मग अवधूत म्हणे गोरक्षासी । बा रे आरंभ करीं लपावयासी । आलों पाहें धरावयासी । सावध वेगेंसी खेळीं राहे ॥३६॥
येथोनि श्रोता सावधान । एकाग्र कीजे लीला श्रवण । त्या गिरिनाळपर्वतीं योगीजन । तटस्थ निरखोन पाहती ॥३७॥
तो पाहावया चमत्कार । स्वर्गीं दाटले सुरवर । ऋषिगण यक्ष किन्नर । अप्सरा विद्याधर सर्वेही ॥३८॥
नेत्र विकासोनि सर्व पाहती । तों गोरक्ष गुप्त जाला निश्चितीं । सागरीं मीन होवोन त्वरित गतीं । जळचर संगतीं मिसळला ॥३९॥ सर्व सिद्ध पाहती नयनीं । गोरक्ष न दिसे कवणांलागूनी । म्हणे गेला न कळे कवणे स्थानीं । आणीं धुंडोनी श्रीदत्ता ॥४०॥ तंव दत्त सर्वज्ञ सुजाण । ठायींच पाहे विलोकोन ओळखिलें त्याच लपतेंस्थान । विचित्र संधान मांडिलें ॥४१॥
विचित्र पक्षीरूप धरिलें । कृष्णहरित श्वेत भलें । लंब चंचुपुट विशाळें । पक्षबळें उडाला ॥४२॥
तें त्या सकळां देखतां । भरता जाला गगनपंथा । पश्चिम सागरावरता । तारा धरिता जाहला ॥४३॥
तंव त्या सागराचे पोटीं । विशाळ जलचरांची राहाटी । पक्षी न्याहाळोनि पाहे दिठीं । ओळखोनि पुटीं धरीं त्या ॥४४॥
तारा धरितां निरखी जळीं । तंव अकस्मात देखिला कल्लोळीं । बाणाऐसा उतावेळीं । बुडी तळीं दीधली ॥४५॥
चंचुपुटीं धरिला गोरक्षमीन । आणिला योग्यांचे सन्निधान । सकळ करिती अवलोकन । आचंबित मन सर्वांचें ॥४६॥
धरिल्या रूपातें त्यागिलें । पूर्वदेहा प्रगट केलें । देखोन सर्व आनंदले । गोरक्ष बोले पुढतां ॥४७॥
दत्ता तूं कुशल होसी । वर्म जाणोनी खग पक्षी जालासी । मातें धुंडोनि वेगेंसी । योग्यांपाशीं आणिलें ॥४८॥
क्रिया दावोनि उत्तम । बरवाचि केला पराक्रम । परी पुढिले प्रसंग नसती सुगम । जाणवेल वर्म खेळतां ॥४९॥
असो आतां तुम्हीं लपावें । आम्ही शोधूं तुम्हां बरवें । या कौतुकाचेनि वैभवें । कळतील अनुभवें सकळांतें ॥५०॥
तंव दत्त म्हणे गोरक्षासी । लपणें छपणें तुम्हांसी । आम्ही नाचरूं या योगासी । तुमचें तुम्हांसी साजेतें ॥५१॥
लपणें लोपण्याचे प्रकार । याचा बहुत असे विस्तार । जया वाटलें भय फार । तो कीं तस्कर लपतसे ॥५२॥
पाहे पां तो शुक भ्याला । द्वादश वर्षें गर्भीं लपाला । भयेंचि सन्मुख पळाला । कपारीं बैसला जावोनी ॥५३॥
भयेंचि राव दशरथ । वनितांमाजी वनितां होत । शिव पळोनि न्यग्रोध होत । योग[illegible]त काळवंचनें ॥५४॥

हा योगांच्या गती । येर इतरांचा पाड किती । जयां लपणें आटवे चित्तीं । ते भोगिती दुःखराशी ॥५५॥
असो तुज लपणें आवडे । तें तूं आचरें यार्डेकोर्डे । सहजें पटेल उघडें । धरितां अडे कोण येथें ॥५६॥
ऐसें ऐकोनि बोला । तात्काळ गोरक्ष पळाला । जळचरांमाजीं प्रवेशला । नवलक्ष जाला रूपें तो ॥५७॥
तैं दत्त जाले धीवर । जाळें पसरिलें अपार । गोरक्षा निवडोनि धरी सत्वर । आणोनि बाहेर दाविती ॥५८॥
तो जळचरयोग पाहतां । आश्चर्य वाटे योगियांचे चित्ता । म्हणती धन्य अवधूता । तूंहि शोधिता नेटका ॥५९॥
असंख्य जळचराचे भार । त्यांत गोरक्षाचा संचार । भिन्नभिन्न रूपें साचार । तो तुज विचार कैसा कळे ॥६०॥
कैसा त्यातें परीक्षिसी । प्रगट धरोनि आम्हां दाविसी । हें वर्म न कळे आम्हांसी । धन्य होसी योगींद्रा ॥६१॥
अवधूतलाघवातें देखोन । चकित जालें गोरक्षमन । मागुती धरोनि अवसान । म्हणे सावधान होय दत्ता ॥६२॥
म्हणे आतांचि पाहें कौतुक । क्षणें तुज पाडीन मी टक । इतुक्यानें न होसी नेटक । चिंता वटक लावीन मी ॥६३॥
परिसोनि वदे अविनाशी । वृथा अभिमान कां वाहसी । या अभिमानें नाडिलें बहुतांसी । पार त्यासी असेना ॥६४॥
विधि वक्रदालभ्यांलागोन । किंचित जाला अभिमान । ते पवनें नेले उटवोन । पावती भ्रमण ब्रह्मांडीं ॥६५॥
अनंत ब्रह्मांडांची माळा । त्यांत किंचित पाहिली डोळां । अग्रापासोन द्विगुण विधिला । पाहातां सहस्राला पाहे तो ॥६६॥
उभयतांचें अभिमानखंडण । होवोनि पावले जीवदान । मग तया कृपें करोन । पूर्वस्थान पावले ॥६७॥
शुकाची कोण जाली गती । जनकाश्रमीं पवला फजिती । ही महाद्वाड अहंकृती । तुजला किती सांगावें ॥६८॥
असो तुझा असे योगभर । तयासि आला महापूर । एकाएकीं उतार । घडेल निर्धार कोठोनी ॥६९॥
करीं तुज जें असें करणें । त्याचे फिटतें होईल पारणें । दमत्यावीण अभिमान जिरणें । कैसोनि घणें उठेल हें ॥७०॥
वरवी लीला योगी पाहती । या चमत्कारें त्या आनंद होती । भुवनत्रयीं वाढेल कीर्ती । चाल पुढतीं सरूं नको ॥७१॥
सर्वांतें जो होय आनंद । तोचि होय आम्हां परमानंद । परिसोनि माझे बोलिले शब्द । न राहें स्तब्ध लपें तूं ॥७२॥
तंव गोरक्ष म्हणे जी आतां । उशीर काय मज लपतां । शब्दें शब्द वाढवितां । व्यत्यय आणितां काय म्हणों ॥७३॥
ऐसें बोलोनि ते अवसरीं । गुप्त जाला जो बोलतां उत्तरीं । पक्षिपाळ्या वनांतरीं । त्या भीतरीं संचरला ॥७४॥
दशलक्ष योनी गणती । त्यामाजीं भार अमूप असती । गोरक्ष संचार निश्चितीं । आदरें करिती त्या ठायां ॥७५॥
ऐसें देखोनि त्याचें कारण । जेथें असती पक्षी सान । त्या शोधनी पक्षीश्येन । होय आपण अवधूत ॥७६॥
धरोनि त्यातें प्रगट करावें । मागुतीं गोरक्षें जावोनि दडावें । रूप अनेक धरावें । मध्यम व्हावें पक्षिजाती ॥७७॥
त्यामाजीं प्रसंग पाहोन । अरित्ररूप दत्त करी धारण । आणीं गोरक्ष धरोन । सर्वेचि सोडोन देतसे ॥७८॥
तेहि मंदी सरतां पाहीं । गोरक्ष होय स्थूळ देहीं । त्यातें विलोकोनि लवलाहीं । दत्त तोहि व्याध होय ॥७९॥
पाश टाकोनि त्वरित । निवडोनि गोरक्षासीच धरित । मच्छिंद्रापुढें धरोनि आणित । म्हणे हा सुत ओळखीं ॥८०॥
नाना पक्षिरूपें पाहोन । गद्गदां हांसती योगीजन । म्हणती गोरक्षा सांडीं अभिमान । उगा शीण कां भोगिसी ॥८१॥
जें जें केलें त्यां लाघव । तेथें दत्तें केला पाहें उपाव । रिक न गेला कोण्ही डाव । जाणें भाव सकळ हा ॥८२॥

गोरक्ष म्हणे काय जालें । उगेंचि कां बोलतां हीन बोलें । मी यातें देईन बहुत झोले । कां म्यालें मन तुमचें ॥८३॥
ऐसें बोलतां गुप्त जाला । कृमिकीटकीं मिसळला । रुद्रलक्षाचा नेग भला । विभक्त पाळा संभारें ॥८४॥
तेथें गोरक्ष करितां प्रवेश । त्यातें जाणता जाला अविनाश । शत्रुत्व रूपें विशेष । धरूनि त्यास आणि वेगें ॥८५॥
प्रगट करोनी दावी सर्वां । परी गोरक्ष न सांडीं आपुल्या गर्वा । मच्छींद्र म्हणे जी लेश नुरवा । बरवी करवा प्रदक्षिणा ॥८६॥ योगींद्र म्हणे राहा स्थिर । उगेंचि पहा धरोनि धीर । याचे योगयुक्तीचा प्रकार । होईल आवर अपैसाची ॥८७॥
एवं मच्छिंद्रा दत्त जंव बोलती । तों गोरक्ष गेला गुप्त गतीं । भुजंगोत्तमीं प्रवेशती । दत्त होती खग तेव्हां ॥८८॥
फणअफणाचा मेळ । स्थूल सूक्ष्म सान व्याळ । त्यामाजीं वावर सळसळ । खग निढळ पाहे तयां ॥८९॥
एकाएकीं त्या अवलोकित । चंचुपुट आकळित । गगनपंथें उडोनि येत । प्रगटोनि दावित गोरक्षा ॥९०॥
यापरी कृमी सरले । अवधूतें ओळखोनि धरिलें । मागुतीं येरें आवगिले । स्थावरीं शिरावले तद्रूपें ॥९१॥
त्या वीसलक्षाची भरती । तितुके स्थलीं गोरक्ष फिरती । हें जाणोनि अविनाशमूर्ती । दावी अनुभूती योगियां ॥९२॥
योगी आणि मच्छींदनाथ । यांचा धरोनिया हात । गोरक्ष स्थावर यथार्थ । तो प्रशस्त दावीं त्या ॥९३॥
जें जें स्थावर जंगम रूप होय । तयांची दत्तची जाणे सोय । येरां ओळखी कोठोनि काय । पहातां नवलाय सकळांसी ॥९४॥ जे जे खेळा पाहों आले । चमत्कार देखोनि ते भुलले । आणिक पाहावया लांचावले । आसनीं ठेले तटस्थ ॥९५॥
तंव गोरक्ष म्हणे आतां । सावध होय योगी दत्ता । मी सर्वांठायीं असें रमता । तूं शोधितां शिणसील ॥९६॥
तंव अविनाश म्हणे वदसी खरें । परी माझें व्यापकत्वहि न सरें । तुझी बळ शक्ति येथें नुरे । फिरणें फिरे म्हणों उगा ॥९७॥
जेथें जेथें तूं लपसी । तेथोनि प्रगट करीं तुजसी । तव लीलायोगें सकळांसी । आनंद मानसीं होतसे ॥९८॥
न करीं शाडगें व्यवधान । कौतुक पाहावया भुकेले नयन । जरी आला असेल तुजला शीण । तरी एक क्षण विश्राम घे ॥९९॥ ऐसें बोले जंव दत्तयोगी । तशांत गुप्त जाला गोरक्ष वेगीं । गवांचे मेळ प्रसंगीं । चतुष्पाद रंगीं रंगला ॥१००॥
तीस लक्षांचा समुदाव । पृथक योक ते अपूर्व । जातिवर्ण अभिनव । त्यांत डाव गोरक्षाचा ॥१॥
त्रिगुणात्मकहा योगिराणा । जो अगम्य वेदपुराणा । तो सर्वांतरींच्या जाणे खुणा । करोनि कारणा वेगळाची ॥२॥
तेणें ओळीखलें मानसीं । गोरक्ष पावला चतुष्पदासी । धुंडोनि आणावें तयासी । प्रगट सिद्धांसी दावावें ॥३॥
जें जें रूप गोरक्ष धरी । तैसाचि दत्त होय त्याचा अरी । त्यातें धरूनि झडकरी । सिद्धां सत्वरी दावित ॥४॥
व्याधरूपें धरोनि त्वरित । पाशजाळ पसरित । निवडोनि गोरक्षा गोवित । आणोनि दावित सकळांतें ॥५॥
कोठें सांपळे योजिले । त्यामाजींच त्या धरिलें । कोठें स्वार होऊनि भले । आरूढ ते जाले त्यावरी ॥६॥
कधीं गुंतवी बंधनीं । कधीं गर्तेत गोवोनी । कधीं पळतां धरी चरणी । कधीं मुखनीं धरीत ॥७॥
गोरक्ष दावी बहुशक्ती । त्याऐसीच दत्त करी युक्ती । चतुष्पदाच्या धुंडोनि पंक्ती । धरी सूक्ती मुक्त जेंवी ॥८॥
अणुमात्र दुःख न देतां । त्यासी धरितसे अवचितां । दावी त्याचे गुरुनाथा । म्हणे हा लपता कैसा जी ॥९॥
मज कर्धांच न सांपडावें । ऐसें तरी यानें लपावें । यापरी या जरी न साधवें । कां दिणावें व्यर्थ वांया ॥११०॥

मागुनीं तो गोरक्ष वदे । दत्ता एवढ्या न बांधीं श्रीद्रें । शब्दें तोषविसी योगींद्रें । उगेंचि आल्हादें बोलोनी ॥११॥
आतांचि जाणवेल तुम्हांसी । कैसें धरितां पाहूं आम्हासी । वदतां गुप्त जाला वेगेंसी । चतुर्लक्षासी संचरला ॥१२॥
हे मानवाची गणना । विभक्त मूर्ती विभक्त वर्णा । असंख्य भार असती जाणा । तदुपरि धारणा समूहीं ॥१३॥
जेथें जेथें गोरक्ष जाय । तेथें तेथें दत्त पाहे । म्हणे आतां करावें काय । सरला उपाय पैं माझा ॥१४॥
गोरक्ष जेथें जेथें लपला । दत्तही तेथें प्रगट जाला । धरोनि योगियां दाविला । विचारीं पडिला गोरक्ष ॥१५॥
सप्त द्वीप सप्त सागर । दश खंड दश महेंद्र । मेरु आणि मंदार । लोकसमग्र लपाला ॥१६॥
एकवीस स्वर्ग चौदा भुवन । सप्त पाताळें संपूर्ण । सकळ योनी सकळ वर्ण । लपतां धुंडोन आणि दत्त ॥१७॥
अणुरेणू परिमाणू । तत्तद्रूपीं करी भ्रमणू । म्हणे केउता जाणेल प्रमाणू । न धरितां आणूं उणीव त्या ॥१८॥
ऐसें गोरक्ष जंव मनीं भावित । तंव ते ठायीं प्रगटे दत्त । गोरक्षालागीं म्हणत । चाल योगिनाथ वाट पाहे ॥१९॥
गोरक्ष ओळखितां खोंचे मनीं । म्हणे अद्भुत दिसे याची करणी । पावतो येऊनि लपते स्थानीं । एकाहि विंदानीं चुकेना ॥१२०॥ असो योगियांपुढें आणिला । तव म्लान वदन गोरक्ष देखिला । मच्छिंद्र म्हणे खेळ सरला । किंवा कांहीं उरला सांग मज ॥२१॥ गोरक्ष म्हणे जी गुरुनाथा । म्यां न्यून न केलें खेळतां । परी जेथें तेथें पाहे दत्ता । कला पुरता पाठिलाग ॥२२॥ नाना रूपीं जाऊनि दडालों । हिंडतां स्वामी श्रम पावलों । याचिया कृत्या पाहोनि म्यालों । मनीं निवालों खेळ पाहोनी ॥२३॥ तंव मच्छिंद्र म्हणे रे बाळका । तूं केंवि पावसी याच्या तुका । महिमा न कळे वेदादिकां । केंवि आणिका समजेल ॥२४॥ जें जें रूप तुवां धरिलें । तेथें तेथें दत्त पावले । पाहतां ठायींचे ठायीं संचले । गेले न आले येथेंची ॥२५॥
आम्हांपुढें ऐसाचि ठेला । तुजवाटे मार्गे लागला । भाविकजनां जावोनि भेटला । अविनाश भरिला परिपूर्ण ॥२६॥
तूं सांडीं सांडीं आतां भ्रम । बुद्धि निर्विषय करीं निष्काम । घे याचिया पदीं आराम । सुखधाम पावसी ॥२७॥
सद्गुरु शिष्यासी जंव बोधिती । तंव सिद्धयोगी करिती विनंती । धन्य या गोरक्षें दाविली ख्याती । धन्य मूर्ती अविनाश ॥२८॥ उभय लीला नयनीं पाहतां । आनंद जाला आमुच्या चित्ता । उपमे पदार्था धुंढितां । आम्हां सर्वथा दिसेना ॥२९॥ कसें म्हणावें गगन । सागर प्रतिमेवरी दूजा कोण । तेंवि यांचें प्रतिमेसी पूर्ण । यथार्थ जाण तेचि ते ॥१३०॥
असो उभय कौतुक पाहिलें । परी लालसेनें गुंतविलें । ते मनोरथ पाहिजे पुरविले । सदय कृपाळें आमुचे ॥३१॥
गोरक्ष लपाले बहुत । तों शोधोनि आणी श्रीदत्त । हें कौतुक पाहिलें समस्त । एक अर्थ उरला असे ॥३२॥
तो जरी म्हणाल कोण । तरी गोरक्षा ऐक वचन । अवधूत होतील गुप्तमान । तुम्हीं शोधोन आणावें ॥३३॥
सर्वेचि विनविती अविनाशा । पुरविजे एवढी आमुची आशा । ध्यान लागलें देवसुरेशा । वर्णिती यशा विमानीं ॥३४॥
ऋषि गंधर्व विलोकिती । कौतुक पहावया आनंद चित्तीं । यदर्थींच कृपामूर्ती । तोषवी प्रीतीं या अर्थें ॥३५॥
दत्त दीनांचा दयाळू । शरणागतासी वत्सळू । अनन्याची पुरवी आळू । द्रवला प्रेमाळू देखोनिया ॥३६॥
ओळखोनि सकळांचा हेत । काय बोले तेव्हां दत्त । जैसें गोरक्षाचें मनोगत । प्रिय निश्चित तें आम्हां ॥३७॥
हा खेळ जें जें कांहीं जालें । तें त्याचेचि योगें भलें । आतां तुमचे मनीं जें वागलें । तें तेणेंचि आवगिलें पाहिजे कीं

॥३८॥ मग योगी बोलती गोरक्षा । दत्तें तुझी घेतली परीक्षा । आतां सावध होवोनि दक्षा । पुरवी अपेक्षा आमुचीही ॥३९॥ तुम्ही लपतां शोधून । अवधूतें आणिलें तुज धरून । त्याचा पालटा घे करून । क्षुधित नयन पाहावया ॥४०॥ तंव गोरक्ष म्हणे जी बरवें । या दत्तें आतां शीघ्र लपावें । आपुलें वैभवकृत्य दावावें । म्यां धरावें सत्यचिया ॥४१॥ जें जें लपणीचें स्थान । त्याचें जाणें मी विंदान । केविं राहे मजपुढें लपोन । न लागतां क्षण धरीन या ॥४२॥ तैं दत्त गद्गदा हांसती । म्हणे गोरक्षा धन्य तुझी हे ख्याती । ऐसा दुजा न देखों क्षितीं । योगगती तुझीच चांग ॥४३॥ तंव मच्छींद्र म्हणे शिष्यासी । केंवि हातीं चढे तुज अविनाशी । योगाभिमान वृथा वाहसी । श्रम पावसी वाटे मज ॥४४॥ म्यां बहुतापरी तुज बोधिलें । परी वचन माझें नाहीं ऐकिलें तुझे अनुभवा सर्व आलें । तथापि न वळे मन कांहीं ॥४५॥ हा अति अभिमान नोव्हे बरा । येणें बहुतांचा जाला मातेरा । अजूनि तरी करीं आवरा । मोडीं थारा तयाचा ॥४६॥ अरे हा सर्वां अगोचर । तूं तरी त्यापुढें पामर । मज न मने तुझा विचार । शरण सत्वर त्या होईं ॥४७॥ धुंडितांहि कल्पांतीं । हा न लभे तुझिया हातीं । अभिमानें मंद मती । लाभ जाती हातींचे ॥४८॥ प्रस्तुत हातींचें गमावोन । पूर्ण प्राप्तीसी भोगिसील शीण । सावध होय बापा अजोन । कल्याणधन संपादीं ॥४९॥ तंव योगी म्हणती राहा जी । हा गोरक्ष श्रेष्ठ आमुचे समाजीं । काय हीनत्व घेईल या काजीं । सुखें पाहा जी कौतुक ॥१५०॥ प्रीती देखोनि योगियांची । मूर्ती बोळली करुणेची । अहंता छेदावया गोरक्षाची । लीला साची दावित ॥५१॥ सर्व विलोकितां प्रेमें दत्ता । तंव गुप्त जाला अवचितां । योगिजनांचिया चित्ता । विस्मयो वाटता पैं जाला ॥५२॥ अहो या दृष्टीपुढें । अचल अविनाश होतें रूपडें । तें अदृश्य जालें कोणीकडे । कोण झांपडें आलें नेत्रा ॥५३॥ गेला न कळेचि कवणातें । गुप्त जाला जेथिंच्या तेथें । गोरक्षा शोधोनि आणी यातें । अतिअतौतें भेटवीं ॥५४॥ मच्छींद्र म्हणती सावधान । शोधितां जाणवेल शाहाणपण । हें परिसोनि गोरक्ष आपण । करूं शोधन चालिला ॥५५॥ योगमार्गें गोरक्ष गेला । या अवधूतातें शोधिता जाला । जें जें होता आपण नटला । तो तो पाहिला ठाव तेणें ॥५६॥ जारज अंडज उद्भिज । नाना वर्ण स्वदज । चारी खाणी हा सतेज । योगीराज धुंडित ॥५७॥ चारी वर्ण सर्वां ठायीं । तेही शोधिता जाला पाहीं । पशुपक्षीमानवदेहीं । जलचर तेही शोधिले ॥५८॥ कृमी कीटकअलिका । स्थावर जंगम सर्व देखा । समाजीं शोध करी निका । थोका थोका निराळा ॥५९॥ यापरी शोध करून । पर्वतीं आला परतोन । तंव तेथें न दिसे अत्रिनंदन । उदास मन जाहालें ॥१६०॥ सिद्ध म्हणती गोरक्षासी । गवसोनि आणिला काय अविनाशी । भेटवीं त्वरें आम्हांसी । त्याचीण निश्चयेंसी गमेना ॥६१॥ त्या कांहीं न बोले वचन । हिंडतां पावला परम शीण । मुख गेलें कोमावून । देखिलें वदन सर्वांनीं ॥६२॥ एक सिद्ध जाला बोलता । काय जालें जी गोरक्षनाथा । कोमाइला इंदु न बोले वार्ता । जीवीं सखेदता दीसते ॥६३॥ गोरक्ष म्हणे शोधिलें बहुत । परी कोठें न सांपडे तो दत्त । येथें प्रगटला असेल निश्चित । म्हणोनि त्वरित पावलों ॥६४॥ तंव येथेंहि तो दिसेना । आतां पुसूं तरी जावोनि कवणा । गेला नेणों कवण्या स्थाना । कोण योजना करूं सिद्धी ॥६५॥ मज अदृश्य ठायीं पडे । अनेक रूपीं सांपडे । ऐसे योग माझे गाढे । गुप्त जोडे सहजेंची ॥६६॥

तो नष्ट जाला वाटे योग । जीवीं लागली चिंतारोग । स्वकरें लावूनी घेतला उद्योग । करितां लाग साधेना ॥६७॥
असो या परी बोलोन । पुनरा धरिली अंगवण । पुन्हा योगमार्गा अवलंबोन । करूं शोधन चालिला ॥६८॥
पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर । अष्ट दिशा शोधिल्या समग्र । क्षेत्र पुरें ग्रामें सर्वत्र । मठ मठिका सविस्तर शोधिल्या ॥६९॥
सरिता सरोवरें आराम । लहान थोर स्थळें गुंफा धाम । सागरादि भूगर्भ अनुक्रम । अनुत्तम उत्तम पाहिले ॥१७०॥
एकवीस स्वर्गांत धांडोळिलें । लोकालोकही पाहिले । चौदा भुवनें विलोकिलें । सप्त पाताळें शोधित ॥७१॥
तंव श्रोते म्हणती वक्तिया । दत्त गेलेति कवण्या ठायां । तें वर्म कैसें न कळे तया । कोण क्रिया ते निरोपीं ॥७२॥
देखोनि श्रोत्यांचा प्रश्न । वक्ता म्हणे जी सावधान । आज्ञा करितांचि आपण । दिधलें स्मरण श्रीदत्तें ॥७३॥
दत्त सर्वात्मक सर्व निवासी । अगम्य अगोचर श्रुतींसी । स्तवितां टक आगम-निगमासी । नाम अविनाशी दत्त हें ॥७४॥
ह्या आकार-विकाररहित । त्रिमूर्ति साकारे परी गुणातीत । निर्मळ निश्चळ उदार शांत । निःसंग वावरत निर्भय ॥७५॥
गोरक्षाची पुरवावया आळ । लीला दाविती हे दयाळ । तत्त्वीं तत्त्वाचा करूनि मेळ । व्यापूनि सकळ उरला असे ॥७६॥
अहो त्या योगिराया । कैंची काया कैंची माया । कैंची दिसेल कोठोनि छाया । कोण ठाया केंवि कळे ॥७७॥
दत्त नोव्हे एक देशी । म्हणोनि सांपडे गोरक्षासी । हा भरला सर्व भागासी । कैंचा त्यासी दिसेल ॥७८॥
परिसोनि तोषलें श्रोत्यांचें मन । म्हणती मागील चालवीं निरोपण । कोण अवस्था गोरक्षालागोन । तें कीर्तन श्रवण करूं ॥७९॥ जी गोरक्ष शोधितां शिणला । गलित अवस्था पावला । अनुताप अंगीं संचरला । अभिमान गळाला योगाचा ॥१८०॥ श्रमूनि आला सद्गुरुजवळी । मिठी घातली चरणकमळीं । म्हणे न सांपडे कदा काळीं । चिंता जाली काय करूं ॥८१॥ तंव सर्व योगियांचा पाळा । गोरक्षासी बोलता जाला । हातिंचा लाभ गमाविला । काय तुजला म्हणावें ॥८२॥
तुज योगबळाचा अभिमान । नायकसी मच्छींद्राचें वचन । बळें कलह वाढवोन । जोडिला शीण श्रमोनिया ॥८३॥
दैवें चिंतामणी सांपडला । तो गोफणोनि त्वां भिरकाविला । आंगणींचा कल्पद्रुम उपडिला । कामधेनूला दवडिलें ॥८४॥
तेवींच केली ही त्वां करणी । अलभ्य लाभ टाकिला गमावोनि । तुज गुणी म्हणूं कीं अवगुणी । कीर्तीसि हानी आणिली ॥८५॥ रसायन घ्यावें जीवावया । कीं पतन व्हावया सांग काया । कल्याणार्थ सद्गुरुदया । कीं अपाया संपादिजे ॥८६॥ मेणोनिया स्वहितासी । उपाय योजिला अपायासी । काय म्हणावें आतां तुजसी । मुकाविलें लाभासी सर्वांतें ॥८७॥ आजवरा स्वीकारिलेंसि योगधारणें । त्याचें बरवेंचि फेडिलें पारणें । सर्वां मुखीं पुसिलीं पानें । धन्यता कोणें घावी या ॥८८॥ अनंत जन्मीं तप जोडे । तैंच ऐसियाचा लाभ घडे । फुकट केंवी सांपडे । दर्शन उघडें अभाग्या ॥८९॥
असो त्याचें न होतां दर्शन । केंवीं राहतील आमुचे प्राण । तुझा उपकार आम्हांलागून । फळला पूर्ण गोरक्षा ॥१९०॥
मग आठवूनि श्रीदत्त । सद्गद जाले हृदयांत । दयाळा तूं अनाथनाथ । ये धांवत भेटी दे ॥९१॥
नयनीं वाहती विमलांबुधारा । अंगीं कांपती थरथरा । अट्टहास्यें करिती नामउच्चारा । ये करुणाकरा दीनबंधो ॥९२॥
प्रेमा नावरे योगियांसी । स्मरोनि स्फुंदती उकसाबुकसीं । दीनदयाळा अविनाशी । दावीं चरणांसी एकदां ॥९३॥
यापरी सकळ योगी दुःखित । हें देखोनि मच्छींद्रनाथ । रागें गोरक्षातें धिक्कारित । केलासी घात सर्वेयां ॥९४॥

धिक्कार तुझ्या योगासी । धिक्कार तुझ्या योग्यतेसी । धिक्कार तुझ्या अभिमानासी । काय या वाढविसी जाळावें ॥९५॥
जळो ऐसें मूढ ज्ञान । जळो हा तुझा दुष्ट गुण । जळो तुझें हें कर्म गहन । कासया वदन दाविसी हें ॥९६॥
जें कृत्य अपेशकारक । त्याचें केउतें कोणा सुख । अमृत लवंडोनि पाजी विख । ऐसा मूर्ख न देखिला ॥९७॥
साकरेचें असतां आळें । त्यांत मर्दिजे घृतकेळें । तें सोडोनि सर्पगरळें । मेळवी बळें दुष्ट तो ॥९८॥
तेवींच तुझें आचरण । सर्वांसि आलें आढळोन । चिताडोहीं पाडिलेंसि नेऊन । वांचतील कोठून आतां हे ॥९९॥
हे दत्तवियोगे कासावीस । करतील प्राणकायेचा नाश । तुजवरी सत्य हें अपेश । भोगसील यमपाश येणेंचि कीं ॥२००॥
आतां तुज सुखठाव कैंचा । भाग घेतलासि खरवाचा । येथें उपाय कोणाचा । भोग ज्याचा तोचि भोगी ॥१॥
अनुतापार्थ पूर्ण । मच्छिंद्रें प्रेरिले भेदबाण । विकट भ्रुकुटी फिरवोन । दिला लोटोन पदघातें ॥२॥
देखोनि सद्गुरुचा कोप । गोरक्षा जाला पश्चात्ताप । सर्व देहीं सुटला कंप । म्हणे महत्पाप ओढवलें ॥३॥
सहज लीलें धरिला अभिमान । बळें वाढविलें नसतां कारण । त्यांत ठायीं ठायीं दूषण । आलें जडोन माझें मज ॥४॥
गरुडाच्या पडिपाड संगा । सबळें जिंकूं धांवे भुजंगा । कीं विटंबावया नागा । पेटे रागा मंडूकी ॥५॥
कीं जिंकावया केसरी । पराक्रमें बोकड धांवे वरी । तेवींच म्यां ही केली परी । विचार अंतरीं न करितां ॥६॥
माझा मीच दावेदार । योगाभिमानें जालों साचार । कैसें कर्म वाढविलें दुस्तर । लाभ थोर गमाविला ॥७॥
सर्व पापांचें मूळ पाहतां । हेंचि दुर्धर असे अहंता । ते मज ठायीं उद्भवतां । पावलों घाता सर्वस्वें ॥८॥
या अवगुणें मातें नाडिलें । दुर्धर व्यसनीं पाडिलें । अविनाश रूपडें दवडिलें । अपेश जोडिलें हत दैवें ॥९॥
योगी जाले रुष्टमान । सद्गुरु मच्छींद्र कोपले पूर्ण । हेंचि जोडी काय जन्मोन । धिग् धिग् जिण हें माझें ॥२१०॥
आतां हे कठिण जाली गोष्टी । मयोगें पडले सर्व संकटीं । अविनाश न पडे शोधितां दृष्टीं । काय यासाठीं करावें ॥११॥
त्या दत्ताचें न होतां दर्शन । अवघे सिद्ध त्यजितील प्राण । तयातें उपाव करूं कोण । संकट दारुण ओढवलें ॥१२॥
यापरी याचें बोलतां । पश्चात्ताप जाला गोरक्षचित्ता । म्हणे करुणाघना श्रीदत्ता । धांव आतां ये समयीं ॥१३॥
भयें कांपे थरथरां । नेत्रीं वाहती अश्रुधारा । सभोंवता पाहे भिरभिरां । म्हणे कोठें दातारा गेलासी ॥१४॥
मी अपराधी तुझा दीन । नेणतपणें दिधला शीण । तो रोष मनीं धरोन । गेलासि लजोन सांग कोठें ॥१५॥
तूं सदय शांत अविनाश । न पाहें माझे गुणदोष । मी शरण जालों तव पदास । तारीं दीनास दयाळा ॥१६॥
मी अन्यायी अपराधी । तुज शरण जालों कृपानिधी । मज बाधी चिंता व्याधी । तोंडीं आधीं ये माये ॥१७॥
येतां त्वरें धांवोन । माउली दीना देईं दरुषण । तुझें नाम पतितपावन । तें ब्रीद रक्षण करीं वेगीं ॥१८॥
तुजवांचोनि ओस दिशा । मज वाटती अविनाशा । त्रिगुणात्मका सर्वेशा । न करीं निराशा दीनाची ॥१९॥
म्यां पामरें तुम्हांतें गांजिलें । हिंडवितां बहु कष्टी केलें । म्हणोनि रुष्ट मजवरी जालें । म्हणोनि उपेक्षिलें काय जी ॥२२०॥
वोसंगीं बाळ मारी लात । अर्भकपणें लोटोनि ताडित । म्हणोनि माता काय खेद मानित । कृपें आलिंगित बाळातें ॥२१॥
तेवीं तूं माझी माउली । दीन अनाथ वत्साची गाउली । माझे अपराध पोटीं घालीं । पाव ये वेळ[illegible] ॥२२॥

मी चांडाळ दुर्गुणी । छलक बुद्धी पापखाणी । मजसमान या त्रिभुवनीं । धुंडितां कोण्ही नसेची ॥२३॥ ऐसा मी अपराधी खरा । परी तुज शरण गा दातारा । मज अनाथा अंगीकारा । परात्परा पावन तूं ॥२४॥ मज या सिद्धांनीं त्यागिलें । सद्गुरुनाथें मोकलिलें । तुजवीण आतां ये वेळें । मज कनवाळे नसे कीं ॥२५॥ छंद जो जो घेतला अर्भकपणें । तो तो पूर्ण केला कृपाघनें । आतां अव्हेर दीनाचा करणें । हीं काय भूपणें योग्य तुम्हां ॥२६॥ आधीं पाळावा समर्थे लळा । सेखीं विश्वासोनि कापावा गळा । येणें थोरीव काय सुशीळा । संकटीं बाळा गोवावें ॥२७॥ तुम्ही मोकलितां निराधारी । मग मज पामरा कोण तारी । तुजहोनि श्रेष्ठ या दिगंतरीं । मज तों अंतरीं दिसेना ॥२८॥ तूं सदय उदार शांत । कृपाळू अनथांचा नाथ । तिहीं लोकीं प्रसिद्ध मात । माझाचि अंत पाहसी कां ॥२९॥ शरणागतातें तारिसी । अनन्यातें आपंगिसी । भेदाभेद नाहीं तंव मानसीं । निष्ठुर मजविशीं कां गा तूं ॥२३०॥ हें तुज नोव्हे उचित । कीं मोकलावें शरणागत । सकृपा तुझें नाम श्रीदत्त । असोनि अदत्त कां होसी ॥३१॥ आतां हेचि तुज प्रार्थना । न पाहें माझ्या दोपगुणा । प्रगट होय दे दर्शना । तोपवीं मना सकळांच्या ॥३२॥ म्हणोनि अट्टहासें आक्रोश केला । सद्गुरु अनुतापें तापला । अभिमान समूळ गळाला । सद्भाव संचरला अंगीं त्या ॥३३॥ सप्रेमभावें देखा । गोरक्ष मारी नामें हांका । तंव लीला दावी सिद्ध सखा । चमत्कार निका परिसिजे ॥३४॥ गोरक्ष अंगीं प्रेम दाटलें । प्रवाह नेत्रांतून सुटले । देहभारा मन विटलें । विपयिक हटले योग सर्व ॥३५॥ ऐसा देखोनि शुद्ध भाव । लीला दावी करुणार्णव । गोरक्ष वाहतां अपूर्व । आपुलें लाघव प्रगटवी ॥३६॥ गोरक्ष तये अवसरीं । दीनत्वें नाम घेऊनी जंव पाचारी । तंव शब्द निघे ॐकारी । सर्वांतरीं सारिखा ॥३७॥ जंव जंव गोरक्ष पाचारित । तंव तंव प्रीतीं उत्तरें ध्वनी उठत । सिद्धयोगी श्रवण करित । पाहती चकित चहूंकडे ॥३८॥ जेवीं व्यास शुका शुका पाचारी । उत्तरें प्रतिध्वनी उठे सर्वांतरीं । तैशीच जाली येथें परी । देव अंबरीं ऐकती ॥३९॥ कीं हिरण्यकश्यपु पुत्रासी पुसे । तुझा रक्षक कोठें वसे । येरू म्हणे सर्वी विलसे । रिता नसे ठाव कोठें ॥२४०॥ परिसोन भक्ताची वाणी । हरि संचरला सभास्थानीं । गुरगुर शब्द चहूंकडोनी । काष्ठपापाणीं उठला ॥४१॥ तैसीच गती जाली येथें । हुंकारध्वनी ऐकिली योगिनाथें । शब्द काष्टीं पापाणीं जाले निघने । मूक्ष्मगर्ने व्यापोनी ॥४२॥ आप तेज वायु पाहीं । प्रतिउत्तर शब्द तये ठायीं । ठाव कोठेंचि रिता नाहीं । ऐकोनि नवलाई योगियां ॥४३॥ तंव योगी गोरक्षातें म्हणती । प्रतिध्वनी अवधूताचे उमटती । परी कोठें न कळे याची वस्ती । केवीं प्राप्ती घडेल ॥४४॥ गोरक्ष म्हणे धुंडितां मागलों । परी या स्वपात्रा न पावलों । जीवीं श्रमी, बहु जालों । काकुलती वदलों शेवटीं ॥४५॥ हा अनाथशब्दाची करुणा । ऐकोनि तोषला पहे पोसिराणा । पाचारितां देतो प्रतिवचना । तो पटे श्रवणा सकळांच्या ॥४६॥ ते ध्वनी मात्र उमटती । परी कोठें कांहीं न दिसती । आतां पुसं कवणाप्रती । कोण प्राप्ती करवील ॥४७॥ या अवधूतप्राप्तीसी । शरण जाऊं मी कवणासी । कोण वार्ता सांगेल मजसी । वारील श्रमासी कोण माझ्या ॥४८॥ तंव योगी म्हणती सावधान । धरीं सद्गुरु मच्छींद्राचे चरण । तोचि गुह्य वार्ता निरोपून । करील शांतवन सर्वांचें ॥४९॥ ऐसपरी योगी सुचविती । मच्छींद्रचरणीं गोरक्षें ठेविला माथा । सद्गद विनवी गुरुनाथा । म्हणे शरणागता उपेक्षीं ॥२५०॥

तैं निरभिमान देखोनि वृत्ती । सद्गुरु गोरक्षा बोलती । सर्व सिद्ध योगी ऐकती । सावध चित्तीं होवोनी ॥५१॥
मच्छींद्र म्हणे हा श्रीदत्त । सच्चिद्घन आनंदभरित । अभेद अखंड सदोदित । त्रिगुणरहित सर्व साक्षी ॥५२॥
सर्वज्ञ हा सर्वगत पाहीं । नसोनि वसे सर्वां ठायीं । विकाररहित विदेही । देवादिकांहीं अतर्क्य ॥५३॥
हा जन्ममरणाहोनि वेगळा । कोणा न कळे याची कळा । अनाद्यंत हा सर्वांगळा । अतर्क्य लीला अनुपम ॥५४॥
यासी येणें कधीं न जाणें । हा सर्वात्मकीं सचोलपणें । यासी गुप्त ना प्रगट होणें । दिसणें नसणें काय कैंचें ॥५५॥
आगमनिगमा न कळे गती । येरा मानवांचा पाड किती । योगमार्गे कुंठित होती । श्रम पावती तपोधन ॥५६॥
तुम्हां वाटे हा लपाला । परी तो सर्वात्मकीं प्रगट ठेला । काय म्हणावें मूढाला । नाश केला अभिमानें ॥५७॥
दुर्धीच आहे नवनीत । परी जो सक्रियेंत या मथित । तयासीच होय तें प्राप्त । येऱ्हवीं निश्चित कोठोनी ॥५८॥
तोचि विश्वीं भरला विश्वात्मा । जाणीतल्या तोचि परमात्मा । आपुले देहीं जो आत्मा । आत्मानात्मा भिन्न नाहीं ॥५९॥
तेंचि अविनाशरूप गोजिरें । ब्रह्मांडीं जें भरून उरे । जैं अभिमान समूळ जिरे । मग तो त्वरें लाभतो ॥२६०॥ येथें लाग
नसे जाणिवेचा । पाहिजे भक्तिभाव शुद्ध प्रेमा साचा । दास म्हणविजे काया मन वाचा । मग स्वामी दीनाचा बोळतो
॥६१॥ या अनन्याचेसाठीं । तया धांवणें उठाउठीं । प्रगटचि कोरडे काष्ठीं । अवताररहाटी नानाविध ॥६२॥
सत्य निष्ठा निर्धार । सदृढ भाव प्रेमपाझर । तेथें अवधूत न लावी उशीर । आळ सत्वर पुरवी तो ॥६३॥
पाहे पां कसोटी लाविल्याविण । घेणार न घेती कांचन । हिरा निघे घण साहोन । अंगीकार पूर्ण मग त्याचा ॥६४॥
आतां किती वर्ते सांगावें । वर्में खहिता ओळखावें । शरण होतां जीवेंभावें । दयाब्धि पावे साच पैं ॥६५॥
दूर व्हावा शुकाभिमान जनकें जैंवीं केला यत्न । तापविल्या निर्दोष कांचन । केला शोधून शुद्ध तैसा ॥६६॥
अंतःकरण होतां शुद्ध निर्मळ । दत्तरंगीं रंगला प्रेमळ । विनयता देखोनि कोमळ । विमळीं कळवळ उपजली ॥६७॥
येईं येईं गा दत्तराया । तुजविण क्षीण प्राणकाया । येऊं दे लडिवाळाची दया । दावीं पायां आपुल्या ॥६८॥
तुझीं सकुमार पाउलें । तेथें चित्त मन माझें वेधलें । तरी ये माउली उतावेळें । क्षुधित बाळें दर्शना ॥६९॥
अनंतसुत विनवी श्रोतियां । स्तवितां प्रेमा नावरे योगियां । पुढिले प्रसंगीं करुणालया । उपजे दया दीनांची ॥७०॥
दीनबंधु हा दीनानाथ । कृपाळुपणें अति समर्थ । पुरवावया दीनचि अर्थ । प्रगटे मावार्थ पाहोनी ॥७१॥
निष्ठा प्रेम भक्तिविण । कधीं न घडे प्रगट दर्शन । यालागीं हे करावे जतन । लाभ गहन त्यायोगें ॥७२॥
तो योग वसे संतीं । अंतर्बाह्य दिवाराती । यास्तव दत्ता तुमची प्रीती । कधीं न विसंबती तुम्हातें ॥७३॥
ते आणि आपण । सदा सर्वदा समरसोन । उदकनीरा भिन्नपण । कैंचें कोठून येईल तें ॥७४॥
जाणोनिया वर्मातें । मी शरण आलों संतातें । तरी अपंगोनिया या दीनातें । लाविजे सेवेतें निरंतर ॥७५॥
तुमचे पदीं घडावा सहवास । हेंचि प्रिय आवडे जीवास । म्हणोनि लागलों कासेस । न करा निरास दासाची ॥७६॥
प्राप्त होतां संतकृपा । ठाव नुरेचि त्रिविधतापा । जाळी भवभय अघोर पापा । जन्ममरणखेपा चुकती ॥७७॥
तुम्ही संत साधु दयाघन । अवधूतमूर्ती प्रभावमान । धीर उदार पावन । पतितोद्धारण कर्ते जी ॥७८॥

तुम्हां शरणागताचा कळवळा । पाळितां अनन्याचा लळा । म्हणोनि पदीं वेळोवेळां । जोडोनि कमळा प्रार्थित ॥७९॥
तुम्ही समर्थ साधुसंत । तुमचे पदीं प्रेमभावें अनंतसुत । दान कृपेचें मागत । पूर्ण मनोरथ व्हावया ॥२८०॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । भाविक परिसोत श्रोतेसंत । सप्तचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२८१॥

॥ इति सप्तचत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ४८ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीसद्गुरु दत्तात्रेयाय नमः ॥

जयजय श्रीदत्तदिगंबरा । जयजय करुणाब्धे दयासागरा । भवभयहरणा विश्वोद्धारा । परात्परा परंज्योती ॥१॥
सर्वज्ञा तूं सर्व साक्षी । दीना पाहें कृपाकटाक्षीं । हा तव कथामृतातें लक्षी । यातें नुपेक्षीं दयाळा ॥२॥
श्रोते करूं बैसले श्रवण । त्यांसी करवीं कथामृतपान । गोड चालवितां निरोपण । तूंचि पूर्ण अवधूता ॥३॥
गतकथाध्यायाचे अंतीं अनुताप उपजला गोरक्षाप्रती । हुंकारध्वनी ऐकोनि प्रचीती । तुज स्तविती सिद्धयोगी ॥४॥
कृपाळा तव दर्शनासाठीं । विनय सर्व जोडोनि संपुटीं । सप्रेम वाहे बाष्प दिठीं । ध्यास पोटीं दत्ताचा ॥५॥
दीर्घ स्वरें करुणावचन ।, अट्टहासें करिती स्तवन । तें परिसा सावधान । श्रोतेजन सर्वही ॥६॥
जयजय स्वामी अवधूता । करुणाघना श्रीदत्ता । मायातीता त्रिगुणरहिता । कृपावंता शरण तुज ॥७॥
जयजय सच्चिद्घनविलासिया । सकळ सिद्धाधिपते योगिया । करीं अनाथावरी दया । दाविजे पायां आपुल्या ॥८॥
जय निःसंग निष्कामा । जयजयाजी मंगळ धामा । जयजय योगीजनविश्रामा । पाव आम्हां दीनातें ॥९॥
जय अविनाशरूपा परात्परा । जय अखिल अभंगा निर्विकारा । तूं दीन अनथांचा सोयरा । सर्वांतरा तोषवीं ॥१०॥
योगीजन हे वाट पाहती । दीनवाणीं तुज बाहती । करुणाघना कृपामूर्ती । त्वरित गती घे आतां ॥११॥
तुज शोधितां शिणले फार । परी न पवेचि करुणापार । तेथें अज्ञानपणें मी पामर । कैसीं पार पावेन ॥१२॥
तें न जाणोनि जालों कष्टी । पावलों या दुष्ट अभिमानें संकटीं । तेणें अंतरली तुझी भेटी । क्षीण पोटीं जोडिला ॥१३॥
अद्भुत कपींद्राचें उड्डाण । त्यापुढें कोळ्हाटी दावी भूषण । बृहस्पतीस यावया दूषण । मूढ आपण पावला ॥१४॥
तेवींच येलें म्यां मूढें । तुझे न जाणोनि पवाडे । अर्भकपणें जोडिलें सांकडें । येल कुडें माझें म्यां ॥१५॥
हा अवगुण मल्ला माझा मज । म्हणोनि जीवें भावें शरण तुज । त्राहि त्राहि राखीं लाज । पुरवीं चोज दीनांचे ॥१६॥
आम्हां दीन जनांची ग्लांती । परसोनि येऊं दे कृपा चित्तीं । धांवें पावें शीघ्र गतीं । वाळा प्रीती सांभाळीं ॥१७॥
जयजय दत्त अवधूता । तूंचि माउली आमुचा पिता । गुरोर्गुरुपरं धामता । सौख्य सत्यता तूं आम्हां ॥१८॥
तुझे पदीं काय प्राण । सत्य संकल्पें केला अर्पण । आतां न पाहें पतितनिर्वाण । दे दर्शन स्वामिया ॥१९॥
यापरी शरणागतांचे बोल । प्रेमभरित निघाले रसाळ । ते परिसोनि दीनदयाळ । प्रगट तात्काळ जाहले ॥२०॥
भव्य सतेज मूर्ती । पाहतां जाला आनंद चित्तीं । जयजयकारें टाळी पिटिती । पुष्पें वर्षती सुरवर ॥२१॥
दत्त अदृश्य संदर्शनीं । देव योगींद्र गेले सुखनी । चिंतानळें दग्ध होवोनी । तापस मनीं आह्लादले ॥२२॥
तंव सर्वांतर द्रवला । अवधूत कृपाघन वर्षला । दर्शनें आराम टवटवला । प्रफुल्लित जाला आल्हादें ॥२३॥

जैं दत्त कृपाघन वर्षले । तंव प्रेमभावाचे पूर लोटले । तेणें खळमळ पातकें वाहावलें । पाटव्य जाले विकार्थ ॥२४॥
तें त्या अवधूतदर्शनें । शुद्ध आर्द्र जालीं अंतःकरणें । स्वर्गी पाहावया दाटलीं विमानें । वर्षती सुमनें अपार ॥२५॥
सर्वां मुखीं जयजयकार । विमानीं होती वाद्यगजर । नादें दुमदुमिलें अंबर । जोडोनि कर स्तविताती ॥२६॥
सद्भावें पावले नमना । प्रेमें मिठी घालिती चरणां । अवधूतनामें करिती गर्जना । मिसळती आलिंगना अंगसंगीं ॥२७॥
त्या आनंदाचा सोहळा । पाहावया येणें जालें सकळां । ब्रह्मा विष्णु जाश्वनीळा । देवपाळा इंद्रासह ॥२८॥
नारद तुंबर यक्ष किन्नर । गणगंधर्व नळ कुबेर । वरुण सविता विद्याधर । दर्शना सत्वर पावले ॥२९॥
सनत्कुमार सनकसनंदन । अष्टदिक्पाळ रुद्रगण । वसुगण आणि पितृगण । सिद्ध चारण ऋषिभार ॥३०॥
दैत्य दानवादि आले । नमनीं एक ठायीं मिसळले । वैरभावातें विसरले । नवल जालें दर्शनें ॥३१॥
तें आणिक चमत्कार । पावला वसंत आणी समीर । वनस्पति प्रफुल्लित अपार । फळभारें डोलती ॥३२॥
गिरिनाळपर्वतासह कानन । वृक्षमंडित जालें शोभायमान । आराम रमणीय रम्य स्थान । जळ परिपूर्ण ठायीं ठायीं ॥३३॥
तापल्यांचे ताप निवारी । क्षुधितांची क्षुधा हरी । तृषालस्य नाठवे शरीरीं । चिंता वारी कल्पना ॥३४॥
त्या आनंदाचा विलास । भोगावा जीवमात्रीं आस । गृहा प्रपंचीं मानोनि त्रास । आले दर्शनास अपार ॥३५॥
खग नग आणी पन्नग । गाई व्याघ्र कुरंग । निर्द्वंद्व फिरती संग । दर्शनीं अनुराग सकळांचा ॥३६॥
सरिता सिंधु पावक । अग्निमूर्तिमंत देख । पवीचा न मनोनि धाक । भोगिती सुख दर्शनीं ॥३७॥
जीवमात्रानें संतोष । दत्तनामें करिती घोष । वाखाणिती अवधूतयश । तोषे अविनाश पाहतां ॥३८॥
जालें सकळांतें दर्शन । तंव भृगु नारद शुक सनिधान । म्हणती दिगंबरा धन्य महिमान । केलें पावन सर्वांतें ॥३९॥
धन्य अद्भुत तुझी लीला । ते अतर्क्य नयेचि तर्काला । वेंटीं वळे आगमनिगमाला । येर पामराला कोठोनि ॥४०॥
तूं सर्वातीत अगोचर । तूं निःसंग निर्विकार । तूं सच्चिद्घन परात्पर । तूंचि आधार सर्वांचा ॥४१॥
तूं मायातीत निरंजन । प्रकृतिपुरुषाहोनी भिन्न । तूं अज अजित सनातन । प्रणवप्राणप्रिय तूं ॥४२॥
तूं साक्षीत्वाचा साक्षी । अलक्षत्वाचाही लक्षी । तूं पक्ष ना विपक्षी । कृपें निरीक्षीं या दीना ॥४३॥
तूं क्षरा अक्षराहोनी पर । निराधारा तूं आधार । तुझे अपांगपातें साचार । हे चराचर वागती ॥४४॥
तूं अवीट अभंग आनंदकंद । जिवा द्यावया परमानंद । पुरवावया निजभक्तछंद । तुज चि आल्हाद तुज जाला ॥४५॥
शुद्ध भक्ती शुद्ध क्रिया । पवित्रपणें अत्रिजाया । सुशील वागली अनसूया । म्हणोनि दया उपजली ॥४६॥
तो आवडला तुज ठाव । यदर्थी कराविलें अपूर्व । छळनार्थ आणिले तिन्ही देव । सोमोद्भव कराविला ॥४७॥
निज घरीं बाळत्व पावोन । मोदें कराविलें स्तनें सेवन । पुनर्जातां याहुनी सत्तलोचन । करुणावचन बोलिजे ॥४८॥

ऐकोनि करविलें सदय देवा । वरदवाणी प्राप्त मेवा । देवत्रीनि नेमिसी ठावा । अवतार उद्धवा सकृपें ॥४९॥
मायाकार गर्भ दाविले । विधि हर पृथक नेमिले । त्रिगुणात्मक स्वतः जाले । प्रकट केले रूपगुण ॥५०॥
या जगद्धोरासाठीं । दाविसी योगसिद्ध राहाटी । धन्य धन्य हे त्रिपुटी । पाहतां दिठीं आनंद ॥५१॥
आतां नमो तुंतें सर्वोत्तमा । आमुचे अपराध कीजे क्षमा । वारीं या दोनांच्या श्रमा । सुख आरामा पाववीं ॥५२॥
यापरी ऐकोनि स्तवन । अवधूत जाले आनंदघन । म्हणे तुम्ही माझे प्रत्यक्ष प्राण । पदपूर्ण जाणतां ॥५३॥
मग भृगु नारद शुकासी । आलिंगिता होय अविनाशी । पार नाहीं त्या सुखासी । ज्याचा त्यासी अनुभव तो ॥५४॥
जें का कनक शुद्ध नाणें । त्या प्रतिपाडा कां पितळ दावणें । पाचा उपमे काच देणें । हें न साहणें सुज्ञातें ॥५५॥
यदर्थ न दिधले दृष्टांता । अमृत उपमा अमृता । उभय आलिंगनीं समरसतां । रत्नीं कीळता तेवीं ते ॥५६॥
असो स्वानंदलहरी जिरवोन । अवधूतें केले त्रिवर्ग सावधान । करोनि शुकातें अवलोकन । काय वचन बोलत ॥५७॥
म्हणे तूं मुक्त असतां । कां पावलासी बाधकता । वृथा भययोगें वाहिलीस चिंता । भोगलसि व्यथा अघोर कां ॥५८॥
तूं व्यासअरणीचा नंदन । दुस्तर जाणोनि माया आवरण । द्वादश वर्षे पूर्ण । राहिलासि लपून गर्भीच तूं ॥५९॥
तेथें श्रवण व्यासमुखें । सर्वही अवगत केलें निकें । मग प्रगटलासी गीतार्थ सुखें । वैराग्य तिखें दाविलें ॥६०॥
जेथें जालें जन्मधारण । तया दिधला जन्मतां शीण । सर्वात्मक राहिलासि होऊन । परी दूषण अयोग्य तें ॥६१॥
व्यास तव पाठीं धांवला । तो कुमारीनीं दूषिला । तुझा त्यांनीं स्तव केला । ऐकतां भरला अभिमान ॥६२॥
त्या अभिमानें नाडिलें । सर्वात्मकपण विरालें । तें व्यासें परीक्षिलें । ठायीं न पडलें वर्म तुज ॥६३॥
पुत्र नाडला म्हणोन । तुज बोले पाराशरनंदन । जातां भेटें जनकालागुन । तो बंधु जाण आम्हांसी ॥६४॥
जातां विदेहपुरासी । पुसतां भलतेंचि वदसी । विचारें त्यागितां मानसीं । वर्म तुजसी कळलें तें ॥६५॥
तें घातक बीज निवटावया । दर्शनींच केली भूपें दया । परीक्षार्थ करविली क्रिया । केलीस वांया देहलोभें ॥६६॥
मग बैसविलें भोजनीं । बैसविलें भूपें साम्य स्थानीं । तेथें म्यालासि शस्त्रें पाहोनि । अभ्यवस्थपणीं जेविसी ॥६७॥
जनकें वर्म जाणोनि मानसीं । बहु बोधिलें पैं तुजसी । छेदिलें तव देह अभिमानासी । लोभ मोहासी सांडविलें ॥६८॥
तंव चित्त केलें निर्धूत । विवेक बाणविला बळिवंत । दया समता हृदयात । विचार समस्त प्रबोधिले ॥६९॥
नानापरी देवोनि आंची । मूस उतरली सत्य साची । अनुपम जाल्याही परीक्षा याची । पक्व काची पाहावी ॥७०॥
म्हणोनिया तो नृपवर । आन युक्ती करी चमत्कार । एकांत शय्या रचोनि सुंदर । साहित्यप्रकार सिद्ध ते ॥७१॥
पाचारोनिया सुशील गृहिणी । आज्ञापिलें तिजलागोनी । मनतुल्य सर्व सेवा जाणवोनि । सिद्ध कामिनी वळव्यावा ॥७२॥
जें होईल उभयांत । तें मातें कीजे श्रुत । सेवेंत कल्पना नाणीं किंचित । होतां रत दोष नाहीं ॥७३॥

पतिआज्ञा शिरीं वंदोन । त्या पर्यंकीं तुज करविलें शयन । राया कांता सेवे सोपोन । गेला आपण अन्य स्थळा ॥७४॥
मागें राणी सेवा करितां । विपरित भासलें तव चित्ता । नग्न आलिंगीं काममारिता । कायासंकोचिता तूं होसी ॥७५॥
योग्यपणाचें वर्म चुकलें । आयोग्य मार्गीं परम भ्रमलें । भयाभीत मन जालें । पृष्ठी वळे फिरविली ॥७६॥
ऐशापरी सरली रजनी । प्रभातें उठोनि गेली राणी । रावपदीं भाळ ठेवोनी । जालें निरोपोनी दिधलें ॥७७॥
तंव भेटीस राव आला । वृत्तांत पुसतां न बोलसी बोला । कांता नाचरली सेवेला । यदर्थीं आला रोष वाटे ॥७८॥
शुका तें त्वां आद्यंत । रायासी केलें सकळ श्रुत । नरेन्द्रें जाणोनि भावार्थ । म्हणे विपरीत कर्म तुझें ॥७९॥
जें जें म्यां तूंतें बोधिलें । तें तें वांया त्वां दवडिलें । अद्याप वृत्त चित्त न जालें । मन मळलें तैसेंची ॥८०॥
जरी शुद्ध असतें अंतःकरण । तरी कळवितां भय कोण । नग्न माता बाळस्तन । मुखीं पान स्वानंदें ॥८१॥
कामिनीचे अन्य प्रकार । पाहतां न व्हावा विकार । तरीच योग सिद्ध साचार । ना तरवीच पार जगामाजीं ॥८२॥
शुद्ध असतें अंतःकरण । विकाररहित असतें मन । तरी करितासी स्तनपान । काया संकोचोन काय केलें ॥८३॥
धिग् साधन धिग योग । धिग् वैराग्य वीतराग । धिग् भगवें नासोनि केलें सोंग । हा तों रोग निश्चयें ॥८४॥
खोंचले रायाचे शब्दबाण । तें अनुताप उद्भवला दारुण । जनकासी म्हणसी आपण । कृपें शासन मज केलें ॥८५॥
हा उपदेश बाणला चित्ता । बोध बाणविलासी पुरता । तव चरणीं अर्पिला माथा । कृपावंता तारिलें ॥८६॥
जनकें केली पूर्ण कृपा । वैराग्यमार्ग दाविला सोपा । हृदयीं उजळोनि ज्ञानदीपा । अज्ञानखोपा मोडिला ॥८७॥
तो बोध बाणला तुम्हांसी । पुढें आला उपेगासी । अमरें पाठविलें रंभेसी । छळावयासी तपीं तुज ॥८८॥
कामरंभा वसंत । नानापरी तुज मोहित । त्या विषाचें त्वां केलें अमृत । संवाद बहुत गोड तो ॥८९॥
तव संवादें निश्चितीं । तिर्यांसही जाली उपरती । त्या प्रबोधाची प्रचीती । घडोनि निश्चितीं तुज आली ॥९०॥
सर्वात्मकपण नेरुद्दे पुरुषाचें । नाशक घर अभिमानाचें । श्रम निष्फळ गोरक्षाचे । केले साचे अभिमानें ॥९१॥
याकारणें तुज म्हणतों सावधान । असावें निर्द्वंद्व निरभिमान । सर्वां भूतीं समान । एक भिन्न नसेची ॥९२॥
एकापासोनि अनेक जाले । अनेकीं एकचि वसलें । निःसंग संगीं रंगलें । पाहे पां मळें तेंचि तूं ॥९३॥
यापरी होतां संवाद । गेला शुकाचा भेदाभेद । जाला सर्व आत्मैं बोध । अविनाशपद पावला ॥९४॥
बोधितां बाणलें शुकासी । सद्गुरी श्रवण घडलें सर्वांसी । तंव निरखोनि नारदासी । बोले वचनासी अवधूत ॥९५॥
नारदा तुम्ही ब्रह्मनिष्ठ । ऋषींमाजीं परम श्रेष्ठ । वैष्णवांमाजीं वरिष्ठ । सदा तल्लिष्ट हरिभजनीं ॥९६॥
निःसीम वैराग्य विरक्त । आत्मज्ञानें अनुरक्त । प्रपंचापासोनि असक्त । भगवद्भक्त ख्याती हे ॥९७॥
संत साधु ऋषि भार । योगी तापसी दिगंबर । या सत्संगीं तुम्ही सादर । सारासार जाणते ॥९८॥

शांत दांत निःसंग । जोवीं सर्वदा वीतराग । दर्शनें फेडितां परपांग । स्वात्मरंगें भोगितां ॥९९॥
सत्कर्मी सदा सुशीळ । अंतःकरणीं अत्यंत निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ । मानसविमळ वमचें ॥१००॥
सर्वदा असतां सावधान । विवेकप्रबोधें संपन्न । अंतर्निष्ठ ज्ञानघन । असतां मन पांगुळलें ॥१॥
आपण वयोवृद्ध तपोवृद्ध । ज्ञानवृद्ध योगवृद्ध । असोनि आचरणीं परम शुद्ध । तथापि सावध असावें ॥२॥
परम अनिवार विकार । न चुकती करावया उपकार । दुग्ध पाजितां फणिवर । करितां उपकार चुकेना ॥३॥
संगाऐसें आचरे कर्म । हा तंव वृत्तीचा असे धर्म । तेथील अणुमात्र चुकतां वर्म । नुरवी शर्म किंचित ॥४॥
हा तंव अनुभव असे तुम्हांसी । क्रीडतां देखिलें जलचरांसी । पूर्ण लक्षितां तयांसी । विकृति मनासी उद्भवली ॥५॥
अहा कांहींच माहीं केलें । वय वृथा गमाविलें । प्रपंचसुख न भोगिलें । मन वेधलें कामबाणें ॥६॥
तेथें सर्वची गेलें वांया । विषयीं भ्रमित जाली काया । तदर्थ धुंडिसी उपाया । पावेन अपाया न जाणसी ॥७॥
वाटे अप्रयासीं व्हावा योग । प्राप्त व्हावे शीघ्र भोग । मग तो फिटावया पांग । द्वारके लाग साधूं जासी ॥८॥
सोळा सहस्र एक शत । अष्ट नायका विराजित । राज्य करी कृष्णनाथ । करील मनोरथ पूर्ण तो ॥९॥
जावोनि तया सभेसी । नारदा सचिंत बैसलासी । तें जाणोनि हृषिकेशी । गुज तुम्हांसी विचारी ॥११०॥
तैं तें तुम्हीं जाणवितां । वर्म कळलें यदुनाथा । प्रथम केल्या विवाहवार्ता । त्या न चित्ता तुज येती ॥११॥
म्हणसी तुज असती बहुत । एक मज करीं अर्पित । हांसोनि बोले रमाकांत । उठा त्वरित वेळ कां ॥१२॥
करावे भगवद्भक्ताचें रक्षण । मनोरथ करावे सत्य पूर्ण । दूषणाचें करावें भूषण । हें तव नारायण धर्म जाणे ॥१३॥
तें दावितां निर्धारीं । म्हणे नारदा उठा सत्वरीं । म्हास नसेल ज्या घरीं । ते अंगीकारीं कामिनी तूं ॥१४॥
नारदा येथें जाला उपदेश । परी त्या न जाणितला एक लेश । हातीं घेटोन विशेष । शोधावयास चालिला ॥१५॥
तेथें ही दाविली अनुभूती । सर्वाश्रमीं व्यापला श्रीपती । तेथेंही उमज न धरोनि चित्तीं । वाहिलीस खंती श्रम वांया ॥१६॥
उठतां कामाची ज्वाला । ईश्वरशक्तीवरी ठेविसी डोळा । नेणसी सर्वेश्वरी कळा । पावलासी अवकळा कुसंगें ॥१७॥
नट नाट्य नारायण । तया कपटी ठेविलें दूषण । परम कष्टी होवोन ॥ द्वारकापट्टण सोडिलें ॥१८॥
खेदें मानस क्रोधभरित । अविवेकें जालासि संतप्त । स्वकर्मा भंगलें चित्त । ओढवला अनर्थ सन्मुख तो ॥१९॥
जातां मार्गी सरोवरीं । स्नाना प्रवेशलासी सत्वरीं । अघमर्षणींच नारी । जालासि सुंदरी स्वअंगें ॥१२०॥
अवयव पाहतां लज्जित । नारदा जालें दुखें चित्त । स्वमनीं जालासी भयाभीत । म्हणसी विपरीत केवीं जालें ॥२१॥
परी जो छंद जया मानसीं । तद्रूप होणें सत्य तयासी । ही साक्ष पुसा भ्रमरासी । आणा आळिकेसी अनुभवा ॥२२॥
तेवी तुम्हांतें फळलें । तेथें मायिक पुरुषें अंगीकारिलें । संतान विशेष विस्तारिलें । प्रभवादि भले पुत्र साठ ॥२३॥

एक जालें कन्यारत्न । कपिलाषष्ठी नामाभिधान । विषयप्रपंची भोग संपूर्ण । भोगितां मन विटलें ॥२४॥
त्या भेणें पळालासि शेवटीं । परिवारासह पुरुष लागे पाठीं । थर्थराटें धाक भरला पोटीं । रिघालासि पाठीं कृष्णाच्या ॥२५॥
तेथें विनोद जाला अद्‌भुत । त्रास पावलें ऐकोनि चित्त । अनुतापें त्राहि त्राहि म्हणत । तैं कृपावंत जाला हरी ॥२६॥
मायिक रूप आच्छादिलें । पुत्रकन्या मान्य केले । सदयत्वें तुम्हां सोडविलें । पूर्ववत दिधलें तव रूपा ॥२७॥
नारदा तूं सिद्धसवन । तुज न लागावें हें लंछन परी कुसंगें पावला दुर्गुण । सज्ञानपण हारपलें ॥२८॥
विकारें ध्वज उभारिला । प्रकार आपुला वाढविला । मनोरथ सकळ पूर्ण केला । नाथिलें बला तुमच्या ॥२९॥
तेथें कैवारी सर्वोत्तम । तेणें हरिला भवभ्रम । बुद्धी केली निः । बोधकम बोधवोनी ॥१३०॥
आचरतां सत्कर्म राहाटी । असत्कर्म लागे पाठीं । पाडी नाना व्यसनसंकटीं । पुण्य सांठीं होऊं नेदी ॥३१॥
यदर्थ असावें सावधान । सत्संगीं रावविजे मन । अन्य त्यजोनी व्यवधान । स्वस्वरूपीं लीन असावें ॥३२॥
देहींचे विकार दंडावे । तर्क वितर्क खंडावे । शांती क्षमेतें न संडावें । आणि विभांडावे लोभ मोह ॥३३॥
वासना सांडावी कुडी । ममतेची छेदावी बेडी । तृष्णा कल्पना आशा खंडी । कीजे तडातोडी तयाची ॥३४॥
दया आणि विरक्ती । वरावी हे परम प्रीतीं । प्रेमभाव भक्ती । सत्संगती जोडावी ॥३५॥
भेदाभेद टाळावे । विवेकें अंतर क्षाळावें । रिपुवर्गा ते जाळावें । समत्व पाळावें सर्वां भूतीं ॥३६॥
इंद्रिय सर्पंथीं वाटावें । चित्त मनातें घोटावें । शब्दमार्गे दाटावें । कधीं न हटवें या काजा ॥३७॥
सदा सत्समागमीं वागावें । स्वहितार्थासाटीं जागावें । सच्चिद्घनस्वरूप भोगावें । भजनीं गावें हरीनें ॥३८॥
हें नारदा तुमचें आचरण । पाहोनि जीवीं आनंदघन । तुम्हां सारखांचें दर्शन । अलभ्य पूर्ण लाधलों ॥३९॥
तुम्हां माझी पूर्ण गोडी । भजनी तुमची तैसीच आवडी । आजी लाधलों आनंद जोडी । स्वानंद गुढी उभारिली ॥१४०॥
यापरी होतां शब्दगौरव । वाटे परमामृताचा स्त्रव । धांवोनि नारदें तें घातली धांव । भेटी अभिनव सप्रेमें ॥४१॥
जीवींशिवा पडली मिठी । प्रेमानंदीं जडल्या गांठी । वळल्या अमृताच्या कोटी । हृदय पोटीं आल्हाद ॥४२॥
त्या आनंदासी नाहीं पार । समरसले सिंधुसागर । चित्स्वरूपी तदाकार । वृत्ति निर्भर मुराल्या ॥४३॥
ब्रह्मानंद ओतप्रोत । भेदाभेद जाला गलित । योगयोगासी कर्णे जागृत । द्वैतों मत राहिलीं ॥४४॥
दत्तें स्वानंदातें निरविलें । लोचन उघडोनि नारदा पाहिलें । तंव चिद्घनानंदीं निवळे । सोवळे तुटले देहभाना ॥४५॥
मग आपुलें आपण । नारदा केलें सावधान । येरें उन्मनी निरसोन । पाहे निरखोन दत्तमुनी ॥४६॥
भेटतां नेत्रीं निरखिलें । म्हणे तेंचि अंतरीं पाहिलें । प्रसरें पाहतां व्यापलें । तें हें ठसलें एकचि की ॥४७॥
तंव आपुला म्हणती पुरे । देवें वदी ऐसें शिरे । येरू म्हणे हें पुरें । हृदया वरें आपुला ॥४८॥

यापरी दत्त नारदासी । भाष्य होय परम हर्षी । सुखसंतोष सर्वांसी । प्रेमा भृगूसी नावरे ॥४९॥
झरतां देखोनि नयन । दत्त नम्रोत्तरीं करी भाषण । जी तुम्हीं अत्रिसमान । नारद पूर्ण तैसेची ॥१५०॥
तुम्ही मत्पित्याचे बंधू । पितृव्य माझे कृपासिंधू । तुमचा महिमा अगाधू । लागला वेधू त्रिदेवा ॥५१॥
महाराज तूं तपोधन । स्वतेजें तूं प्रकाशमान । तुळितां भास्कर वाटे गौण । तूं सुमित्र पूर्ण सर्वांसी ॥५२॥
तूं वेदांतज्ञानें निपुण थोर । विचार जाणसी सारासार । वाग्विलासें अंगिराकुमर । डोले प्रियकर त्या वाटे ॥५३॥
तूं सर्वज्ञ उदार पंडित । शांत दांत आणि विरक्त । आत्मज्ञानी विख्यात । वंद्य सकळांत मान्यत्वें ॥५४॥
क्षमा दया तुजपाशीं । हृदयीं वागती अहर्निशीं । अद्वय अभेदपणें वागसी । निर्मळ मानसीं पवित्रता ॥५५॥
विद्याविनयसंपन्न । तुज ऐसा न देखों आन । प्रताप आगळा सतेजमान । भरिलें त्रिभुवन कीर्तीनें ॥५६॥
तुम्ही सर्वज्ञ जाणते । परीक्षक वस्तूचे पुरते । उपमा द्यावया तुम्हांतें । न दिसे मातें कांहींच ॥५७॥
उपमे द्यावा जरी नारद । तरी तो कळकुटा प्रसिद्ध । नसता वाढवी विरोध । परी सत्य संवाद तयाचा ॥५८॥
त्रिलोकीं जया रमण । चेष्टित त्याचें काळक्रमण । परी कोठें न घे दूषण । दूषणीं भूषण होय केल्या ॥५९॥
नारदलीलेची जी क्रीडा । न दे कवणासी कांहीं पीडा । कलहपरी लाभ रोकडा । आनंद गाढ निपजवी ॥१६०॥
नारदकृत्य कल्याणकारक । वाढवी सकळां सुखदायक । तुमचेंही चरित्र अलोलिक । वाटे कौतुक मज त्याचें ॥६१॥
महाराज भृगु तूं श्रेष्ठ । तपोधनांमाजीं वरिष्ठ । सर्वज्ञ होसी अंतरनिष्ठ । परीक्षा उत्कृष्ट जाणसी ॥६२॥
विचारी पाहसी शोधून । कोठें योग्यता श्रेष्ठपण । कोठें नांदती षड्गुण । कोण संपन्न सदय तो ॥६३॥
सर्व त्रैलोक्य शोधिलें । जीवजंतु मात्र पाहिले । मानव असुर धुंडाळिले । देव चोखाळिले सर्वही ॥६४॥
कोठें कांहीं कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं । षड्गुण सदयता पाहीं । निरभिमान तोही दिसेना ॥६५॥
शोधितां सर्वही शोधिलें । नियतें सकळांचें उरलें । आतां तेही शोधू वहिले । मनीं वागलें तुमच्या ॥६६॥
शोधार्थ केलें गमन । त्वरें पाहिलें कैलासभुवन । अपर्णेसहित शिवलक्षीन । आनंदघन अंतरीं ॥६७॥
गेलासि शोधावया अंतर । म्हणोनी न केला नमस्कार । उभें राहोनि धीट समोर । पाहसी प्रकार तेथींचा ॥६८॥
देखोनि तुमचें उद्धटपण । शिव जाले कोपायमान । तुम्हां कळला तमोगुण । जाणोनि दूषण निघाला ॥६९॥
तेथींच सत्यलोकीं जातां । चतुर्मुख पाहिला विधाता । तो तुमचा प्रत्यक्ष जनिता । मातापिता वंद्य कीं ॥१७०॥
तेथेंही जावोनि समोर । नम्रनीं न जोडिले त्या कर । तेणें ओळखोनि अनादर । जाला क्रूर अंतरीं ॥७१॥
परी पुत्रलोभें करिती क्षमा । पुसती तुम्हां कुशल क्षेमा । मोहें आपणीं वाढविती प्रेमा । म्हणे उत्तमा बैस का ॥७२॥
आजी स्नेहमातें टाळिलें । अविचारत्व अंगीकारिलें । हें आम्हां नीट न वागलें । चित्त भंगलें अवमानीं ॥७३॥

देखोनि त्याचें सोशिकपण । त्या ओळखिला तो रजोगुण । नोव्हे हें षड्गुणसंपन्न । हें शांतपण लटिकें ॥७४॥
तें न रुचे त्या मानसी । मग पातला क्षीरसागरासी । शेषशायी वैकुंठवासी । जाणे मानसी भृगु आले ॥७५॥
परीक्षेसि आला निश्चित । परी जागोनि भगवंत । शाप फाविता जाला कृत्य । तें सावचित परिसावें ॥७६॥
लक्ष्मीस आश्रमीं ठाकिलें । कौस्तुभा करीं घेतलें । वक्षस्थळ निम्न केलें । मिषें दाविलें निद्रेचें ॥७७॥
श्रोते म्हणती साक्षेपता । इतुकी कां करणें अनंता । तरी विनवी वक्ता । सावध चित्त करावें ॥७८॥
धराम्नीनें कारण । करितों तुम्हांसी निरोपण । तें आवडी कीजे श्रवण । बहु नारायण कृपाळु ॥७९॥
परम वत्सला हरीअंगीं । दुःख न बाधावें निजालागीं । यास्तव त्या प्रसंगी । कार्य संयोगी सुलाघें ॥१८०॥
भृगु आलेति ज्या कारणा । ती पूर्ण कराची त्यांची कामना । तोषवावें त्यांच्या मना । यदर्थ योजना हरी करी ॥८१॥
जो सर्वोत्तमाअंगीं विचार । ती क्लृप्ति परिसा सादर । जाला असे निद्राभर । द्विज अंतर जाणावया ॥८२॥
जरी असावें जागृत । तरी न घडे द्विजकार्यार्थ । म्हणोनि निमग्न निद्रेंत । सावचित अंतरीं ॥८३॥
किंवा द्विजपदप्रसाद । साधावया अंतरीं सावध । हृदय पात्र प्रसिद्ध । ओढवी मुकुंद निद्रामिषें ॥८४॥
निद्रा नोव्हे तें ध्यान । एकाग्र मांडिलें अनुष्ठान । द्विजप्रसाद चरण । व्हावयालोन प्राप्त तो ॥८५॥
हरी म्हणे हा द्विजवर । परी तो माने आम्हां श्वशुर । त्याची कुमरी लक्ष्मी सुंदर । करणें सत्कार योग्य त्याचा ॥८६॥
परी ते आले परीक्षेसी । आम्हां पावणें प्रसादासी । प्राप्त काळीं पत्नीसी । रोष मानसीं उपजेल ॥८७॥
किंवा मी निष्काम निःशक्त निद्राभर । पाहोनि कोपेल आमुचा श्वशुर । रोषें कन्येसी दावील माहेर । म्हणोनि गृहांत करविलें ॥८८॥ कीं भृगु देतांचि लत्ताप्रहारा । क्रोध भामिनीच्या उपजेल अंतरा । देखोनि शापील द्विजवरा । म्हणोनि मंदिरा प्रवेशवीं ॥८९॥ किंवा आपुला अनमान । तो न कळावा कांतेलागुन । पाहतां लावील दूषण । पुरवी गमन यदर्थी ॥१९०॥
असो कौस्तुभ कां घेतला हातीं । ताडितां रुतेल पदाप्रती । त्या दुःखें निश्चितीं । आहाळेल चित्तीं द्विजवर ॥९१॥
कीं पूर्ण पदमुद्रा उमटावया । हा कौस्तुभ आणील व्यत्यया । यदर्थ कंठींचा काढोनिया । मुक्त हृदया पैं केलें ॥९२॥
लाभे द्विजाचा पवित्र चरण । तेथें या जडाचा पाड कोण । त्या भूषणें मज भूषण । म्हणोनि काढून घेतला ॥९३॥
कीं वनीं प्रगटतां केसरी । धाकें पळता होय करी । तेवींच कौस्तुभ ते अवसरीं । करांतरीं लपाला ॥९४॥
हृदयीं निम्नता कां आणिली । ती क्लृप्ती असे निराळी । श्रोतीं सांठविजे कर्णविळीं । तेथील नव्हाळी अद्भुत ॥९५॥
ब्राह्मणाचा दक्षिण चरण । पवित्र आणि परम पावन । स्पर्शतां पापप्रमोचन । न जागतां क्षण करीतसे ॥९६॥
गंगा यमुना सरस्वती । रेवा तापी भागीरथी । कृष्णा वेण्या गोमती । नीरा भीमरथी कावेरी ॥९७॥
फल्गु क्षिप्रा वेत्रवती । तुंगभद्रा चर्मण्वती । सिंधु पयोष्णी भोगावती । मही पार्वती गंडिका ॥९८॥

वैतरणी ख्याता ताम्रपर्णी । सुरनदी मनकर्णिका गोकर्णी । जया पुण्यावती पुष्करिणी । प्रवरा इंद्रायणी शरयू ते ॥९९॥
नाना सरिता सानथोर । तीर्थे सरोवरें अपार । सप्त द्वीपे सप्त सागर । तेही समग्र एक ठायीं ॥२००॥
द्विजदक्षिणपदांगुष्ठीं । तीर्थे वसती हीं गोमटीं । येर त्या पदतळवटीं । महात्म्यें कोटी पुण्यपर्वे ॥१॥
प्राप्त होतां द्विजचरणरज त्यासी । महायात्रा घडे सहज । त्या प्रसादाचें गुज । अधोक्षज जाणता ॥२॥
म्हणोनिया निम्न हृदय । करोनिया वाट पाहे । केव्हां येईल विवितनय । प्रसाद लाहे केधवां ॥३॥
पदमुद्रा हृदयीं धरीन । तीर्थे उदरीं सांठवीन । मिरवीन आवडीं तें भूषण । धन्य महिमान तयाचेनी ॥४॥
यापरी अपेक्षा करितां । तों भृगु पावला अवचितां । जवळी कोण्ही नसे पाहतां । निद्रिस्त अनंता देखिलें ॥५॥
उभें राहोनिया समोर । थिरावला घटिका चार । तेथें न करितां कोण्ही सत्कार । सक्षोभ अंतर पैं जालें ॥६॥
म्हणसी आलों ज्या कारणासी । तें उरकावें अतिवेगेंसी । मग दक्षिण लत्ता हृदयासी । अति निष्ठुरेंसी ताडिली ॥७॥
लत्ता मारोनि विचारीं । पळोनि पळसी अतिदूरी । परम सखेद जालासि अंतरीं । तंव मधुकैटभारी धांवला ॥८॥
लत्ताप्रहारें जागृत । होवोनि धांवला अतित्वरित । भाळ चरणांवरी ठेवित । सप्रेमयुक्त आलिंगी ॥९॥
मग तुम्हां करीं धरोन । आसनीं बैसवी जगज्जीवन । षोडशोपचारें करोनि पूजन । चुरी चरण स्वअंगें ॥२१०॥
म्हणे जी स्वामी दातारा । तुम्हीं प्रसाद केला या कठोरा । दुःख झालें असेल चरणसुकुमारा । क्षमा करा अपराधा ॥११॥
माझें हृदय अति कठिण । केवळ खडतर हा पाषाण । तुमचे सुकुमार चरण । श्रमित पूर्ण ताडिल्या ॥१२॥
कृपा केली जी दयासागरा । मज जागविलें नंदिसुरा । तुम्हांवांचोनि दातारा । मज थारा असेना ॥१३॥
तुम्हींच सत्य वाढविलें । नामरूपातें आणिलें । तुमचेनि आंगवण आलें । प्रसाद झाले प्राप्त कीं ॥१४॥
मी निराकार निर्गुण । तुम्हींच केलें मातें सुगुण । नाना अवतार तुम्हांलागुन । तुम्हीच गुण ते गातां ॥१५॥
मज होणें जाणेंचि नाहीं । सर्व वर्तत्व तुमचें पाहीं । राहतों ठेवाल ते ठायीं । करविनां कांहीं करीन तें ॥१६॥
तुमची भीड मज बहुत । मीतरी तुमचा मुद्रांकित । आज्ञा चराचरीं वाहत । जीवेंभावें अंकित तुमचा ॥१७॥
ऐसें बोलतां नारायण । ढळढळां वाहती मृगनयन । कळला षड्गुणसंपन्न । ऐश्वर्य पूर्ण यासि साजे ॥१८॥
ते तुम्हीं ध्यालें स्तविलें । येरयेरां गौरविलें । रूप हृदयीं सांठविलें । लक्ष लाविलें चरणांब्री ॥१९॥
यापरी भृगुलागीं श्रीदत्त । सहजीं व्याख्यान निरोपित । परिसोनि भृगु सद्गदित । पाहे निश्चित तैसाची ॥२२०॥
श्यामसुंदर सुहास्य वदन । किरीट कुंडल शोभायमान । कौस्तुभ वैजयंती केली धारण । पीत वसन कासेसी ॥२१॥
चतुर्भुज मंडित कर । शंख चक्र पद्म गदाधर । अंगीं शोभती दिव्य अलंकार । पायीं तोडर ब्रीदावळी ॥२२॥
चरण सुकुमार साजिरें । आरक्तवर्ण पद गोजिरें । कमळ[illegible] जें सकरें । तें ऋषिश्वरें [illegible] ॥२३॥

लक्षितां रूपा आनंदघन । पाहातां न फिरती मागें लोचन । तन्मय वृत्ती विरालें मन । ब्रह्मसनातन अवीट हें ॥२४॥
पाहतां पाहणें पाहिलें । हृदयीं वत्सलांछन देखिलें । स्वपद तेथें मिरविलें । लज्जित जालें मन तेव्हां ॥२५॥
धांवोनि मिठी घातली चरणीं । म्हणे तारीं तारीं मोक्षदानी । अपराध घडला मजपासोनी । विपरीत करणी म्यां केली ॥२६॥
न जाणोनि तुझा महिमा । लत्ता मारिली पुरुषोत्तमा । दंड करावा या अधमा । न करोनि क्षमा त्वां केली ॥२७॥
सिद्ध योगी सर्व पाहती । म्हणती भृगूची हे कोण गती । अवधूतचरणा धरोनि विनविती । आम्हांप्रती कळेना ॥२८॥
तैं विनविती नारदासी । कां अवस्था हे भृगूसी । नारद म्हणे गा अविनाशी । नको वत्सासी चोरूं पान्हा ॥२९॥
जें भृगूतें दाविलें । तें पाहिजे प्रगट केलें । येणें साफल्य वृत्त सर्व जालें । पावन दयाळे कीजे दीना ॥२३०॥
कृपाळू तो सर्वेश्वर । ओळखोनि सर्वांचें अंतर । प्रगट जाला दीनोद्धार । सगुण साकार भक्तांसी ॥३१॥
देव सिद्ध मानव । ब्रह्मादि सर्व समुदाव । यालागीं दर्शन अपूर्व । रमाधव देतसे ॥३२॥
सर्व जाले हर्षभर । मुखें करिती जयजयकार । वाद्यें वाजों लागलीं अपार । पुष्पसंभार वर्षती ॥३३॥
आनंदे होतसे आलिंगन । मच्छींद्र गोरक्ष धरिती चरण । सद्भावें करिती पूजन । कर जोडोन प्रार्थिती ॥३४॥
पंचारत्या घेवोनि करीं । देवललना पावल्या सत्वरीं । निजप्रेमें ओवाळिला हरी । अक्षता वरी समर्पिल्या ३५॥
त्या आनंदासी नाहीं पार। स्वरूपीं तल्लीन जाले निर्भर । करिती प्रदक्षिणा पदांवर । अर्पिती शिर निज भावें ॥३६॥
पाहतां नेत्रीं आनंदकंद । अवघाचि जाला ब्रह्मानंद । निरसला ताप गेला खेद । भेदाभेद हरपला ॥३७॥
पाहतां पाहिलें अनुपम ध्यान । विराल्या वृत्ती जालें समाधान । हरपली क्षुधा तृष्णा तहान । वेधलें मन सर्वांचें ॥३८॥
विकार अवघे मावळले । मीतूंपणा शून्य पडलें । देहभावातें विसरले । सबाह्य मुराले परब्रह्मीं ॥३९॥
सरिता मिळाल्या सागरीं । त्यांचा ओघ फिरे माघारीं । तेवींच जाली येथें परी । जाणता हरी जाणत ॥२४०॥
मग सर्वात्मक सर्वेश्वर । म्हणे हा खुंटेल व्यापार । यांच्या वृत्ती जाल्या मदाकार । घालावा सांवर आतां या ॥४१॥
धरिलें रूप आच्छादिलें । त्रिगुणात्मक प्रगट केलें । सावध सर्वांतें बोले । सूत्र फिरविलें दिनानाथें ॥४२॥
नेत्र विकाशोनि सर्व पाहती । तंव पुढें देखिली अवधूतमूर्ती । धन्य धन्य वाचें म्हणती । हर्षे नमिती दत्तपदा ॥४३॥
अविनाश वदे जी भृगू । तुम्ही फेडिला सर्वांचा पांगू । तुमचा प्रेमा शुद्ध चांगू । त्याचेनि लागू साधिला ॥४४॥
नारद म्हणे बरवें आलें । लाभ समस्तांतें फावलें । भ्रांति कल्पनेसी दवडिलें । अभिमाना केलें देशोधडी ॥४५॥
उडविला भेदाभेदा सवळ । अंतर्बाह्य केलें निर्मळ । भक्तिभाव प्रेमा सबळ । स्थापिला अचळ निजरूपें ॥४६॥
सर्वांवरी करणें दया । म्हणोनि साकार तूं दत्तात्रेया । सद्बोध करिसी भुवनत्रया । तापत्रया वारिसी ॥४७॥
वळलासि तूं दीनबंधु दातारा । अनाथ दुर्बळ्यं सोयरा । तुज जे शरण सर्वेश्वरा । ते पैलपारा सहजची ॥४८॥

तुझें करितां नामस्मरण । ते जीव होती सत्य पावन । ध्यानमात्रें होतसे कल्याण । धन्य माहिमान हें तुझें ॥४९॥
भृगू म्हणे साचें । नारदा तुम्ही बोलतां वाचें । अनुभवें मन निवालें सर्वांचें । सकळ आनंदाचें पात्र हा ॥२५०॥
तंव दत्त वदे भृगूसी । तूं पात्र गा परीक्षेसी । शोधिलें पूर्ण योग्यतेसी । परी घात पुढल्यासी निपजला ॥५१॥
नारद म्हणे तो कोण । कैसा सांगा जी निवडोन । अविनाश म्हणे करा श्रवण । मागील निरोपण अवधारा ॥५२॥
ताडितांचि लत्ताप्रहर । क्षमा करोनि केला सत्कार । परम गौरविला हा विधिकुमर । तैंच अंतर ओळखी हा ॥५३॥
ऐश्वर्यातें ओळखोन । ह्रदयीं जाला हा संतोषमान । निघे तेव्हां आज्ञा मागोन । अनहित कोण नोळखिलें ॥५४॥
भृगू गेलियापाठीं । शयनीं पहुडला जगजेठी । सेवेसीं पावली गोरटी । करसंपुटीं चरण धरी ॥५५॥
तंव गद्गदां हांसे फणिवर । हंसतां न धरवे त्यासी धीर । म्हणे हा केवढा निष्ठुर । न भीं अंतर काय वदो ॥५६॥
लक्ष्मी वदे शेषासी । कोण विस्मयो तो सांग मजसी । येरू म्हणे दर्शनासी । भृगुऋषी पावले ॥५७॥
निद्रिस्त असतां सर्वेश्वर । तो उभा राहिला समोर । जागृत न होतां मुरहार । लत्ताप्रहार ताडी क्रोधें ॥५८॥
परम निष्ठुर हा ब्राह्मण । अविचारी कर्म केलें गहन । हें ब्रह्म केवळ सनातन । यासी लत्ता ताडन योग्य हें ॥५९॥
ज्याचा महिमा वेद गाती । श्रुति नेति नेति म्हणती । सहा अठरा वाखाणिती । लत्ता त्याप्रती योग्य काय ॥२६०॥
परिसोनि या उत्तरा । लक्ष्मी सक्रोध जाली अंतरां । मग शापजीवन घेतलें करां । तें शार्ङ्गधरा जाणवलें ॥६१॥
उठोनि म्हणे करिसी काय । नसतां करीं तूं अपाय । ब्राह्मण असती माझी काय । मी प्राण होय तयांचा ॥६२॥
शापोनि त्यातें भस्म करिसी । मग ठावचि नाहीं मजसी । लक्ष्मी वदे ह्रषीकेशी । निष्फळ जीवनासी न करीं मी ॥६३॥
हरि म्हणे क्रोधें करोन । जरी संतप्त जालें तुझें मन । तरी न भस्म करीं हे ब्राह्मण । करोनि रक्षण करणें करीं ॥६४॥
लक्ष्मी म्हणे हे दुष्ट मती । भारी दारिद्रय पीडील यांप्रती । होईल यांची मानहंती । उपजेल प्रीती हीन सेवे ॥६५॥
न पाचारितां दारोदारीं । विप्र हिंडतील निर्धारीं । ऐसें ऐकोनि वदे हरी । कालांतरीं हें खरें ॥६६॥
ते शब्द तुम्ही परिसोन । क्रोधावलें तेव्हां तुमचें मन । म्हणसी हे माझी कन्या असोन । शापवचन बोलिला ॥६७॥
तैं रोष नावरे तुम्हांसी । कन्येतें शाप देता होसी । वहु भोगितील तुजसी । तूं न राहसी एके ठायीं ॥६८॥
तूं एकासी न होसी रत । तुजवरी वहुतांचें चित्त । लक्ष हीनाश्रमीं तुझी प्रीत । पापी पुण्यवंत न पाहसी ॥६९॥
सदा सर्वदा तूं जारीण । न राहसी एकाची होऊन । हा तुजलागीं दुर्गुण । राहो जडोन सर्वदा ॥२७०॥
अहो जी हे तुमची वृत्ती । उभय पक्षीं घातक निश्चितीं । उत्तम काय हे रीती । वाटली तुजप्रती ऋषिवर्या ॥७१॥
हें अविवेकी लक्षण । हें अयोग्य तुम्हां जाण । तुम्ही तापसी विचक्षण । हें न भूषण तुम्हांतें ॥७२॥
हे उभयांचे सत्य बोल । ते कधीं न होती गाफील । पुढल्यातें जड जाईल । अपेश येईल तुम्हांतें ॥७३॥

सर्व कर्मांसी अभिमान । घातक असे हा दारुण । हाचि बाढवी दुर्गुण । करवी हाण तपाची ॥७४॥
सर्वांपरी होय नाश । आचरण आचरतां अपेश । तेणें मिळेल काय यश । अनुभव गोरक्षास पुसावा ॥७५॥
होणें तैसी जाली परी । सावध व्हावें अजोनी तरी । लीनता वागो तुम्हांभीतरीं । न वसो शरीरीं गरिमा ते ॥७६॥
शांति क्षमा दया भूत । सदा असो तुमचें चित्त । द्वेष भेद हो गलित । अद्वेषीं चित्त सदा रमो ॥७७॥
तत्त्वावबोध मानसीं । जडो भक्ति प्रेमा अहर्निशीं । ज्ञानें वैराग्य सतेज राशी । विरक्ती तुम्हासी प्राप्त हो ॥७८॥
उपरति वागो चित्ता । विकार न बाधो सर्वथा । प्रौढ विवेक जवळी वसतां । येतील हातां सर्व लाभ ॥७९॥
जें जें जालें बोधनिरोपण । तें तें सांठविजे हृदयीं पूर्ण । तदुपरि घडतां आचरण । होय कल्याण तयाचे ॥२८०॥
हे परिसोनि प्रसादवाणी । जयजयकारें जाली ध्वनी । प्रणिपात अवधूता करोनी । जाती स्तवोनी सुरऋषी ॥८१॥
आज्ञा मागोनि देव गेले । ऋषी स्वस्थानातें पावले । अवधूतनामीं चित्त रंगलें । भजनीं जडले मानव ॥८२॥
योगी सिद्ध समस्त । मध्यपीठ तो श्रीदत्त । गिरिनाळपर्वतीं शोभिवंत । आनंदभरित बैसले ॥८३॥
योगी सिद्धांचा वाग्विलास । पुढील प्रसंगीं अतिसुरस । श्रवण करितां नासतील दोष । तुटती भवपाश दत्तकृपें ॥८४॥
दत्त सद्गुरु दयासागर । शरणागतांचें हा माहेर । दीन दुर्बळांचा दातार । सदय उदार भाविकां ॥८५॥
भाविक जे साधुसंत । सिद्ध योगी महंत । त्यामाजीं दत्त समर्थ । सदा डुल्लत स्वानंदें ॥८६॥
जया दत्तकृपेची आस । तेणें शरण जावें संतांस । धरोनि चरणीं विश्वास । त्या सेवेस संपादिजे ॥८७॥
संतचरणीं नाहीं भाव । तया कैचा तो दत्तराव । जन्मोनि न करी उपाव । धिग् वैभव तयाचें ॥८८॥
जेथें नसे संतसेवन । न घ्यावें त्याचें दर्शन । न ऐकिजे त्याचें भाषण । होतां दूषण सत्य लागे ॥८९॥
जया संतपूजेची आवडी । जया संतभजनीं अतिगोडी । जो सच्चरणाचीच जोड जोडी । तोचि सांवडी सुखातें ॥२९०॥
संत भवसागरींचें तारूं । संत सुखाचे सागरू । संत शरणागता उदारू । संत सर्वेश्वरू सर्वदा ॥९१॥
म्हणोनिया अनंतसुत । म्हणवी संतांचा शरणागत । अनन्याचे मनोगत । ते समर्थ पुरवीती ॥९२॥
इति श्रीदत्तप्रबोध ग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । परिसोत श्रोते संत अखंडित । अष्टचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥२९३॥

॥ इति अष्टचत्वारिंशोध्यायः समाप्त ॥

## ॥ अध्याय ४९ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरवे नमः ॥

जयजय सिंहाचलनिवासा । जय अत्रिहृदयविलासा । जय अनसूयात्मजा अविनाशा । सिद्ध मानसहंसा नमो तुज ॥१॥
जय ऋषिकुळभूषणभूषिता । जय तापससमूह महंता । जय चिद्विलासा स्वामिदत्ता । कृपावंता नमो तुज ॥२॥
जय प्रणवरूपा परात्परा । जय त्रिगुणात्मका विश्वोद्धारा । स्वानंदजीवना सुखकारा । सदय उदारा नमो तुज ॥३॥
तूं शरणागताचें सुखधाम । तूं अनाथ पतितांचा कल्पद्रुम । पूर्ण कर्ता सर्व काम । देता आराम दत्ता तूं ॥४॥
तव पदाब्ज लक्षोन । आरंभिलें तुझें कीर्तन । तें सत्वशाचें निरोपण । करविता पूर्ण तुझा तूं ॥५॥
गत कथाध्यायशेवटीं । वर्पल्या आनंदाच्या कोटी । देवऋषिसिद्धां देखोनि भेटी । अभिमान निवटीं प्रबोधीं ॥६॥
आनंदें तुझे गुण गात । देवऋषि खस्थळा जात । तव सभोंवते सिद्धमहंत । स्वानंदभरित वैसले ॥७॥
श्रोते म्हणती हें कथन । अनुपम केलें श्रवण । हें भवशोषक रसायन । जालें निर्माण जीवनार्थ ॥८॥
त्रिविध ताप सारावे । भवाब्धीसी ओसरावें । माया मृगजळीं तरावें । कधीं न पसरावें गर्भवासा ॥९॥
ऐसिया कारणासी । चिंता होती मुमुक्षांसी । तों हे मात्रा सरसी । प्राप्त अनायासीं जाहली ॥१०॥
ही दत्तप्रबोधिनीमात्रा । भवरोगियां पाजीं पवित्रा । चुकवीं जन्म कर्मात्री यात्रा । श्रवणपात्रां रस ओतीं ॥११॥
तुज दत्तकृपायोग लाधला।तेणें हा दिव्य रसराज सिद्ध जाला।तोश्रवणमुखें पाजीं सकळां। विलंब प्रेमळा न लावी ॥१२॥
श्रवणीं प्रेम देखोनि श्रोत्यांचें।निरोपणीं आनंदलें मन वक्त्याचें।चिंतन करोनि दत्तपदाचें।निरोपण कथेचें आरंभी॥१३॥
व्हावें श्रोतें सावधान । दत्तकथामृत कीजे श्रवण । त्या गिरिनाळपर्वतीं योगीजन । अवधूता वेष्टुन वैसले ॥१४॥
जाले चमत्कार नयनीं । अवलोकिले सर्व सिद्धांनीं । गेले अभिमान दग्ध होवोनी । गोरक्ष लोटांगणीं पैं आला ॥१५॥
काया जाली रोमांचित । अष्टभावें हृदय दाटत । पाझर प्रेमाचे फुटत । ते न सांवरत कांहीं केल्या ॥१६॥
न धरत चालिलें स्फुंदन । धरिलें न सोडी चरण । मुखें वारंवार म्हणे मी दीन । अपराधी पूर्ण तुमचा ॥१७॥
तारीं अथवा मारीं । मी अनाथ पडलों तुमचे द्वारीं । मज तारिना निर्धारीं । ब्रह्मांडोदरीं दुजा नसे ॥१८॥
दान शरणागताचा त्राता । स्वामी तूंचि गा श्रीदत्ता । तूंचि होसी भय वारिता । अभयदाता तूंचि आम्हां ॥१९॥
गोरक्षग्लांति देखोन प्रेमळ । सिद्धांपोटीं उपजली कळवळ । उभे राहोनिया सकळ । करकमळें जोडिती ॥२०॥
अवघे बोलती प्रार्थोन । श्रीदत्ता तूं पतितपावन अनाथरक्षक करुणाघन । सदय पूर्ण अंतरीं तूं ॥२१॥
अवधूता तूं दीनवत्साची गाउली । अनन्य प्रेमळाची माउली । होसी श्रमल्याची साउली । पाउलापाउलीं सांभाळिसी ॥२२॥ ऐसा तूं गा उदारधीर । कनवाळू तुझें कोमल अंतर । जाणोनि पदीं लीन पामर । कां न त्यावर कृपा करिसी ॥२३॥
तंव अवधूत म्हणे जी आपण । बहु गौरवें करितां भाषण । यासी अमान्य करील कोण । निम्नीं जीवन वाहावें ॥२४॥
तें उलटें कोठें वाहे । हें तुम्हां दृष्टीस आलें काय । याचे जाणते तुम्ही सोय । मार्गींच उपाय साधका ॥२५॥
दत्तवाक्यार्थाचें गुज । कोण्हा न पडे त्याची समज । परी तो मच्छींद्र योगिराज । जाणे बीज अंतरींचें ॥२६॥

तें निवी मच्छींद्रनाथ । तूं अद्वय अभेद सर्वागत । तुझे ठायीं नसतां द्वैत । आणिलें मनांत ऐसें का ॥२७॥
तूं सदय उदार संपन्न । अंगीं वात्सल्य परिपूर्ण । उदार कृपाळू सर्वज्ञ । अनाथा पावन तूं होसी ॥२८॥
श्रीस्वामी दत्तराया । तुझी सर्वां भूतीं सम दया । ऐसें असोनि गुणालया । भाविसी वांया कां ऐसें ॥२९॥
तूं सकळांचा होसी नियंता । सत्वगुणें तूंचि पाळिता । तमोगुणें तूंचि हंता । सर्व सत्ता तुझीच कीं ॥३०॥
सर्वांभकीं तुझा निवास । राहोनि हालविसी सूत्रास । खेळ वाढविला विशेष । मायाजाळास पसरोनी ॥३१॥
चैतन्यपणें चेतवित । कर्मरूपें खेळ होत । त्या लीलेचा साक्षीभूत । तूं समर्थ वेगळाची ॥३२॥
जीव अज्ञानें वेष्टिले । लोभमोहें ग्रस्त जाले । षड्विकारें नाडिले । फेरीं पडले नरकवासीं ॥३३॥
नसतांचि पावले बंधन । घातक आपलेचि आपण । आण वाढलें वाढतां मी तूं पण । सुटणें कोठून कैंचें त्या ॥३४॥
भ्रमोनि विसरले मूळ ठाया । म्हणोनि पावले थोर अपाया । युक्ती न सुचे निघावया । तापत्रया भोगिती ॥३५॥
संसारदुःखाचा पर्वत । वाहतां उमासा न पावे किंचित । परी न खंडवे तयाची प्रीत । हाय हाय भोगीत सर्व काळ ॥३६॥
जीव दुःखाचे सागरीं । वाहती बुडती भवपुरीं । तेथें जळचरें तोडिती नाना परी । यम प्रहरी निराळा तो ॥३७॥
जीव अत्यंत गांजला । कर्म भोगितां उबगला । परी न सुचेचि कांहीं त्याला । देखोनि आला कळवळा तुज ॥३८॥
तूं त्या भवसागरींचा तारूं । उतरोनि नेता पैलपारू । धावया बुडतियां आधारू ॥ आलासि सत्वर धांवोनी ॥३९॥
जीवासि पडलें विस्मरण । त्यासी द्यावया आठवण । त्रिगुणात्मकरूप केलें धारण । करावया कल्याण जीवाचें ॥४०॥
तुझिया कृपेसि पार नाहीं । ऐशी वेदशास्त्रें देती ग्वाही । परिसोनि आलों शरण पाहीं । दीना लवलाहीं तारावें ॥४१॥
त्वां थोरीव देवोनि पदासी । गुह्य योगियां सुचवीसी । कांहीं बोलावें येविषीं । ऐसें मानसीं वाटलें ॥४२॥
कळावया योगिजना । किंचित परिसिजे वचना । पदभाव प्रकरणा । दावितों खुणा अवधारा ॥४३॥
माता गुरू पिता गुरू । ज्येष्ठ बंधु तोही गुरू । विद्या शिकवी तो विद्यागुरू । मार्ग निर्धारू सांगे तो ॥४४॥
नाना मायिक पसारी । शिकविते गुरू बहुतां परी । गुणार्थ वंदावे निर्धारीं । वदूं कोठवरी पुरें हें ॥४५॥
सद्बुद्धि जो सांगेल । सुगुण अंगीं बोधील । प्रौढ मान्यतेसी आणील । तो बोलिजेल परमगुरू ॥४६॥
जन्मापूर्वीं जीवासी । प्रेरी तरणार्थ दो अक्षरांसी । गुज सांगोनि घाली जन्मासी । परमेष्ठी त्यासी गुरुपद ॥४७॥
ब्रह्मकर्म सर्वांत थोर । तेथें व्रतबंधाचा प्रकार । करितां गायत्रीउपदेश साचार । तो गुरुपदविस्तार परमेष्टी ॥४८॥
परमेष्टी गुरु हें तृतीय पद । पुढील परिसिजे संवाद । तो उगवी सकळ भेद । अंतःकरण शुद्ध करीतसे ॥४९॥
तारक करी उपदेश । बोधविवेक बाणवी विशेष । तुटवी कल्पनेचा लेश । भवपाश तोडी जो ॥५०॥
निवटी दहींचें अज्ञान । तत्त्वप्रकाशीं करवी ज्ञान । दृग् दृश्याचें उडवी भान । बाणवी साधन योगयुक्त ॥५१॥
आला अनुभवीं साक्षात्कार । लक्षीं लक्षवी परात्पर । अविद्येचा पाडोनि विसर । वृत्ती तदाकार रंगवी ॥५२॥
हें परात्पर गुरूचें लक्षण । सारासार केलें निरोपण । यामाजींही एक गुण । पात्र पाहोन दान देती ॥५३॥
गुरु आणि परम गुरु । परमेष्टी आणी परात्परगुरू । यांहोनि अधिक तूं सद्गुरू । जगद्गुरू जगदात्मा ॥५४॥

तूं स्वतः सिद्ध स्वयंभ । होसी सर्वारंभें स्तंभ । निर्मळ निश्चळ जेवीं नभ । त्याहोनि सुप्रभ तूं स्वामी ॥५५॥
आदि अंत तूतें नाहीं । तूं दृश्य-अदृश्याहोनि पर पाहीं । तुज उपमा द्यावया कांहीं । मज सर्वथाही दिसेना ॥५६॥
तूं अनुपम अगोचर । तूं निःसंग निर्विकार । तुज नाहीं आपपर । सम सर्वत्र सारिखें ॥५७॥
ऐसा असोनि श्रीदत्ता । कां न आपंगिसी शरणागता । कैंचि वेगळीक दावितां । मज पाहतां दिसेना ॥५८॥
सर्वां मिळोनि पद एक । तो तुझा तूंच होसी देख । लीलार्थ केलें कौतुक । दाविलें पृथक प्रेमवृद्धी ॥५९॥
असो जो जो कांहीं प्रकार । अवघा तव कृपेचा प्रसर । बोलतां वाढेल विस्तार । म्हणोनि आवर केलासे ॥६०॥
शेवटीं हेंचि विज्ञापना । असे सत्य स्वामीचरणा । श्रमले वत्स कृपाघना । भाग शीणा जाणिजे ॥६१॥
गोरक्ष हीन दीन अपराधी खरा । परी तुज शरण आला जी दातारा । आतां काय शोधिसी अंतरा । अंगीकार करा तयाचा ॥६२॥ अवधूता तूं विश्वमाउली । क्षुधित वत्स प्रेमें न्याहाळीं । तोषवीं त्यातें ये वेळीं । पुरवीं आळी निजकृपें ॥६३॥
तंव नेत्रोदकें करोन । गोरक्षें क्षाळिले दत्तचरण । भक्तिभावें जडलें मन । मिलिंद होवोनि राहिला ॥६४॥
जाणोनि अविनाशें अंतर । कळवळले तेव्हां कृपासागर । मस्तकीं ओपोनि अभयकर । हृदयीं सत्वर आलिंगिला ॥६५॥
बा रे श्रमलासी म्हणोन । स्वकरें कुरवाळिलें वदन । सांडीं भीती जालासि पावन । देहीं अभिमान न धरावा ॥६६॥
धरावी संतसाधूंची संगती । विवेक विवरावा सदा चित्तीं । अवनतीं पडों न द्यावी वृत्ती । स्वरूपस्थितीं जागावें ॥६७॥
विषयभोगीं असावा त्याग । संगीं त्यागिजे क्रोध मांग । आत्मविचारणीं करावा लाग । उन्मनीसंग योगियां ॥६८॥
कामनेपासोनि विरक्त । असावें सच्चिद्वनीं अनुरक्त । मायिकापासोनि विभक्त । भजनीं सक्त असावें ॥६९॥
निंदा द्वेष वितर्क । नसावा कुसंगसंपर्क । भूआकाशा अलिप्त अर्क । ऐसेंचि देख विचरावें ॥७०॥
न पडावें कधीं कवणे सोसीं । लोभ मोहातें नासीं । गुंतूं नये आशापाशीं । फार हांवेसी पेटूं नये ॥७१॥
भार कवणासी न घालवा । कठोर शब्द न बोलावा । न कोण्हातें शीण द्यावा । उपकार न ठेवावा कोणाचा ॥७२॥
विरोध करावा न कवणासीं । हा विचार पाहिजे मानसीं । दंतें चावितां जिव्हेसी । ऐसियासी दंड केंवीं ॥७३॥
आत्मवत् पाहावीं सर्व भूतें । क्षमा दया वरीं शांतीतें । मग रिपुत्व उरे कैंचे तेथें । येती समते सम सर्व ॥७४॥
न धरिजे लौकिक चाड । न घालावी कवणासी आड । भावार्थियाची कीजे जोड । वचनें गोड बोलावीं ॥७५॥
सद्गुरुचरणीं असावी निष्ठा । प्रणाम करावे श्रेष्ठा । देहीं न धरावी गरिष्ठा । सोसावें कष्टा सदेहीं ॥॥७६॥
परातें सेवोनि सुख द्यावें । शरणागतासि तारावें । शम दम अंगीं जिरवावे । उपकार करावे जालिया ॥७७॥
परदोष नाणिजे वाणीं । निंदा द्वेष नाणिजे मनीं । कुष्ट न लाविजे कवणालागुनी । सत्कारकारणीं फुगूं नये ॥७८॥
न मिरवावें थोरपण । मीतूंपणाचें नाहीं कारण । व्हावें लहानाहोनि लहान । करावें वंदन सर्वां भूतां ॥७९॥
अंगीं न धरावा ताठा । चालोनि न बैसावें गेठा । माजवूं नये व्यर्थ चव्हाटा । मार्ग खोटा न धरावा ॥८०॥
अंगीं नसावा आळस । ऐक ठायीं न कीजे वास । देवतीर्थक्षेत्रीं उल्हास । गमनीं त्रास नसावा ॥८१॥
सदा सत्संगें करोनी । इंद्रियें नेमावीं सत्कारणीं । एकाग्रता धरावी ध्यानीं । विकल्प मनीं नाणावा ॥८२॥

सहितीं असावें सादर । न कीजे कवणाचा अनादर । प्राप्त काळ साहावें निरंतर । भरावें उदर भिक्षाटणीं ॥८३॥
या मच्छींद्रकृपें करोन । गोरक्षा तुज आहे सतेज ज्ञान । त्याहीवरी हें क्रियाबोधनिरोपण । हृदयीं संपूर्ण सांठवीं ॥८४॥
गोरक्ष म्हणे तूं दयाळ । अपराध क्षमा केले माझे सकळ । मज बाळाची तूं स्नेहाळ । बोधिलें रसाळ मज दीना ॥८५॥
पुढतीं प्रार्थना चरणासी । पूर्ण कृपादान द्यावें याचकासी । वृत्ति स्ववृत्तीऐसी । करोनि सुखवासी पदीं ठेवी ॥८६॥
मच्छींद्र म्हणे जी दत्तात्रेया । वत्स विनटलें तुमच्या पायां । यावरी कीजे अवीट दया । करी छाया कृपेची ॥८७॥
चंद्रकिरणीं चंद्रकांत । स्वानंदें जेवीं द्रवत । तेवीं महाराज श्रीदत्त । वरदामृत करीं वृष्टी ॥८८॥
घन जेवीं चातकासी । वर्षोनि तोषवी मानसीं । तेवीं उल्हास दत्तासी । द्यावया वरासी तयातें ॥८९॥
जलद मेघाची वृष्टिगर्जना । उल्हास होय जेवीं सहस्रनयना । टाहो शब्द आनंदमना । होय नाचणा सप्रेमें ॥९०॥
तेवीं देखोनि हर्षभरित । गोरक्ष स्वानंदें कर जोडित । योगिवृंद सावचित । मुख अवलोकित दत्ताचें ॥९१॥
अविनाश वदे रे गोरक्षबाळा । तुझी चढती असो योगलीला । वाढती राहो प्रेमकळा । भक्तीं जिव्हाळा सदृढ वसो ॥९२॥
अचल राहो वैराग्यज्ञान । मद्बोध बाणो तुजसी पूर्ण । योगऐश्वर्यसंपन्न । मत्कृपादान पूर्ण फळो ॥९३॥
सदा तव वृत्ति राहो सावध । कळो जीवा तुझ्या बोध । कृपावृद्धी करोत योगिवृंद । पुरो छंद अंतरींचा ॥९४॥
जें जें तव मनींचा लालसा । ती पूर्ण होईल पाडसा । तूं तोडिसील परभवपाशा । दिल्हें तुज निवांत अविनाशपद ॥९५॥
तूं ज्यातें जें देसी । तें सत्य प्राप्त होईल तयासी । हा अभयवर दिधला तुजसी । क्रीडें ससंतोषीं अवनीं या ॥९६॥
या सद्गुरु मच्छींद्रकृपें करून । पूर्वीं संपादिलें विशेष ज्ञान । साधोनि हठयोग तपाचरण । सिद्धी प्रसन्न सर्व केल्या ॥९७॥
त्या सिद्धियोगातें संपादोनि बळ । नाना सिद्धाईचे केले खेळ । वनस्पती साधोनि सकळ । धातु प्रबळ मर्दिल्या ॥९८॥
सिद्ध केल्या सिद्धांत क्रिया । दरिद्र लाविलेंसि विलया । सोडविली मच्छिंद्राची माया । चमत्कार तया दावोनी ॥९९॥
मारोनि पुत्र जीवविला । अवंतीभूप अमर केला । अद्भुत निर्मोनि पिंगला । त्रासवोनि केला जोगी तो ॥१००॥
साधोनि सकळ दैवत । मंत्रावळी केल्या निर्मित । साधनें नेमोनि प्रकाशित । केलें जगात प्रगट तें ॥१॥
जारण मारण उचाटण । स्तंभन मोहन प्रकार भिन्न । गुप्त प्रगट तरण । आयागमन इच्छेचें ॥२॥
हा महिमा सद्गुरुकृपें वाढला । स्वक्रियायोगें वळावला । परिपक्व फळासी आला । उपेगा पडला सर्वांच्या ॥३॥
असो या योगमदें करोन । तुज अंगीं दाटला अभिमान । वागसी कृतांतासमान । कधी न गणून कवणातें ॥४॥
नाना पाहोनि चमत्कार । भयें कांपे सर्वांतर । योगीजन दुतें जोडोनि कर । होवोनि किंकर विनवीती ॥५॥
दर्पें सर्व भयाभीत । वापुडीं होतीं शरणागत । जगीं माजविली कीर्ती बहुत । परी हे शुचिष्मंत नव्हे कीं ॥६॥
जें जें कर्म कांहीं । तें त्रिगुण असे पाहीं । हा विचार न करोनि देहीं । अभिमान ठायीं वाढविला ॥७॥
तरी हे रजतमाचे गुण । अंगीकारोनि केलें आचरण । येणें षड्रिपु जडले येवोन । पावलासि नागवण येणेंचि कीं ॥८॥
तुझे अभिमानें तुज मर्दिलें । विपरीत कर्म अपेश आलें । मेळविलें यश गमाविलें । अपकीर्तीनें वरिलें तुज येथें ॥९॥
कण जावोनि फलकट राहे । तेवीं जाला तुझा काय । पाहती योग्यांचे समुदाय । न कळे काय तुझें तुज ॥११०॥

वाहिलें अभिमानाच्या मारा । तेणें केला तुझा मातेरा । अजोनी तरी सावध वरा । होय अंतरा शुद्ध करीं ॥११॥
तंव गोरक्ष जोडोनि पाणी । लागे अवधूताचे चरणीं । विनविता जाला प्रार्थोनी । करुणावाणी गाय तो ॥१२॥
जी स्वामी दत्तात्रेया । करुणार्णवा गुणालया । त्रितापहारका सदया । निरोपीं उपाया दीनातें ॥१३॥
जें जें वदलेंति आपण । तें मज अंगीं खरेंचि दूषण । त्या फळें दुःख गहन । पावलों पूर्ण मरणांत ॥१४॥
बुडत होतों अभिमानपुरीं। गिळावया वेढिलें दश जलचरीं। न कळे कोण पुण्यें झडकरीं। आलासि कैवारी धांवोनी ॥१५॥
मज देवोनि कृपाकर । काढिलें तुवां मज बाहेर । बुचकळ्या घेतां अपार । उदकसंचार सर्व देहीं ॥१६॥
त्या अभिमानोदकें करोन । फुगलों धुर्मित जाले नयन । तें ओळखोनि तुम्ही चिन्ह । वर्मभेदन मांडिलें ॥१७॥
शांतिचक्रोवरी घातलें । क्षमादंडें फिरविलें । मदोदक अवघें उतरिलें । सावध केलें कृपेनें ॥१८॥
जैं अभिमान मद जाला उतरता । तैं निश्चेष्टित शून्य जाली अवस्था । हें देखोनि कृपावंता । औषधी योजिता होसी तूं ॥१९॥ दिव्य बोधाचें रसायन। करविलें श्रवणद्वारें प्राशन। अनुताप उष्णता दरदरोन । देहीं पूर्ण पावली ॥१२०॥
मग सुप्रबोधिनी मात्रा । मज देता जालासि पवित्रा । तेणें तृप्तता पावली गात्रा । चुकविल्यासि यात्रा नष्ट खट ॥२१॥
सबळ विवेकाचा पाक । तो मज सेवनार्थ दिला चोख । पथ्यें निवेदिलीं अलोलिक । त्याग निःशंक असाराचा ॥२२॥
रोग निवटोनि कृपाराशीं । आरोग्य दिधलें मज दीनासी । तुष्टि पुष्टि प्राप्त व्हावयासी । ब्रह्मरसासी पाजिलें ॥२३॥
ज्ञानामृतें करविलें भोजन । दर्शनप्रसाद पावला पूर्ण । सर्वांपरी मज केलें पावन । भय निवारण केलें जी ॥२४॥
समर्थे अंगीकार केल्यावरी । मग कोण बाधूं शकेल अरी । रसायन पाजी धन्वंतरी । रोग शरिरीं केंवि राहे ॥२५॥
उदया येतां भास्कर । केंवि बाधी अंधःकार । चंद्रबिंब होतां प्रभाकर । मग ते तस्कर न राहती ॥२६॥
तेवीं तुझी कृपा होतां । विकार न बाधी सर्वथा । भय मोह लोभ चिंता । नातळती सवया येयोनी ॥२७॥
सर्व भयाचें निवारण । तें मुख्य तुमचें कृपादान । याहीवरी आतां साधन । मज तों हीन वाटतें ॥२८॥
आधींच स्वामी मच्छींद्रनाथ । तो मज सद्गुरू समर्थ । तयापासोनि सर्व प्राप्त । योग सिद्धांत जाहला ॥२९॥
त्याहीवरी विशेष । तूं मज प्राप्त जालासि अविनाश । तव मुखें बोध सुरस । ऐकतां मानस शुद्ध झालें ॥१३०॥
बोधोनि पाटव्य केलें चित्ता। कृपें आपंगिले शरणागता। अभयपाणी ठेविला माथां। अलभ्य लाभता जोडविली ॥३१॥
याहीवरी करणें जें हित । हें तंव स्वामीचें मनोगत । आपणा दीनाचा कळवळा बहुत । बाळ शोभवीत माउली ॥३२॥
अर्भकाची तहानभूक । हे तंव माउलीच जाणें एक । कांहीं होतां भय दुःख । उपाव चोख करीतसे ॥३३॥
जे जे येती ऋतुकाळ । तैसेंचि भूषवी बाळा प्रेमळ । घुटी आणी काजळ । काय लडिवाळा मागतसे ॥३४॥
परी बाळकाच्या हिता । अहर्निशीं जपे माता । बाहे तान्हुल्याची चिंता । वरखालुता जीव होय ॥३५॥
तेवीं तूं या अनन्यासी । दीनवत्सल माय होसी । लागेल तैसें भूषवी त्यासी । कळवळा तुजसी साच तो ॥३६॥
परिसोनि बाळकाचे बोबडे बोल । माता सुखानंदें देते डोल । तेवीं हा दत्तकृपाळ । वचन प्रेमळ ऐकोनि ॥३७॥
म्हणे रे गोरक्षा निधाना । तुझ्या पूर्ण होतील कामना । निरोपितों बागवीं मना । ते आचरणा तुज शुद्ध ॥३८॥

सकळ योग परिपक्व जाले । ते जेणें वांया गेले । ते गुण सोडोनि वहिले । शांतीस अंगिकारिलें पाहिजे ॥३९॥
क्षमा दया विरक्ती । दृढ वसवावी चित्तीं । भक्तिमार्ग वाढवावा प्रीतीं । संतसंगती प्रेमभावें ॥१४०॥
सर्वांभूतीं नमन । सद्गुरुपदीं निष्ठा पूर्ण । अहर्निशीं करावें भजन । पूजन ध्यान मंत्रजप ॥४१॥
जे जे जाले साधुसंत । त्यांनीं जगत्कल्याणार्थ वेलें ग्रंथ । काव्य केलें नाना भात । पाहोनि अर्थ ग्राह्य कीजे ॥४२॥
त्यांतील जें सारसार । तो वाणविजे देहीं विचार । सलीलें बोधपर । निघतां उद्गार वदावे ॥४३॥
अद्वयपणें असावें । अभेदपणें वावरावें । मधुर वाचें वदावें । तोषवावें सर्वांतरा ॥४४॥
जगीं असोनि नसावें । नसेनिया वसावें । आराम शरणागता द्यावे । सांप्रदाय वैभवें रक्षिजे ॥४५॥
शोधोनिया भूमीसी । बीज पेरावें वाफेसी । जीवनें वाढविजे त्यासी । परी कोमासी पाहोनी ॥४६॥
जेणें होय त्याचें रक्षण । योजना कीजे विचारोन । वाढविजे टेका देवोन । थीरा बंधन राखिजे ॥४७॥
ऐशा युक्तीनें वाढविजे । विस्तारल्या छाया भोगिजे । शोभा लक्षांत आणिजे । उपसर्गी चुकविजे प्रयुक्तीं ॥४८॥
वरी येतां पुष्पभार । तया झोंवतील फळें अपार । रक्षावीं सावधानें वृक्षावर । पाड साचार लागे तो ॥४९॥
मग तीं होतील रसभरीत । परिपक्वतेसी समस्त । सेवितां सेवणारे होतील तृप्त । नाम विख्यात वृद्धि पावे ॥१५०॥
सेवितां जीवची बहुतांसी । आनंद इहीं परत्रासी । पार नाहीं त्या सुखासी । पदकैवल्यासी हें गुज ॥५१॥
दत्त म्हणती सावधान । गोरक्ष तुज हें केलें निरोपण । या गुजा हृदयीं धरोन । आचरें पूर्ण सानंदें ॥५२॥
गोरक्षा होनां तुझा संवाद । अनेक योगें निपजला आनंद । त्यासुखें सुखावले योगिवृंद । लाभ विविध पावले ॥५३॥
धन्य धन्य तूं मच्छींद्रयोगिया । धन्य निर्मिलें गोरक्ष गुणवर्या । तंव कृपें कल्याण असो या । जेणें आमुची दया संपादिली ॥५४॥ मज थावया दरुषण । येणें जालें तुम्हांलागोन । लाभें लाभ जोडला गहन । संतुष्ट मन जाहलें ॥५५॥
आतां स्वस्थळीं कीजे निवास । शरणागताची पुरविजे आस । लोभ वाटविजे विशेष । सुचविलें सर्वांस सारिखें ॥५६॥
अविनाश म्हणे जीवीं धरा । आम्हां प्रयाणीं असे त्वरा । हे परिसोनि सर्वांतरा । उदासी योगेश्वरा उदेली ॥५७॥
म्हणती दयाळा कृपाघना । स्वामी श्रीदत्तापतितपावना । दीनपालका भवभंजना । सानंदसुवना जगद्गुरो ॥५८॥
तूं सदय मूर्ति असोनि करुणेची । उपेक्षा कां मांडिली दीनांची । वेळ आणिली प्रयाणाची । सोय आमुची सांडोनी ॥५९॥
तूं आमुचा होसी प्राण । तूं आमुच्या जीवींचें जीवन । सांगा कोठें करितां प्रयाण । आम्हां सांडून अनाथां ॥१६०॥
बोलतां झरे नेत्रीं वाहती । मुखें करुणा पुटें गाती । आर्तभाव देखोनि प्रीतीं । कळवळा चित्तीं अविनाशा ॥६१॥
म्हणे चिंता न करा मानसीं । मी भेटोनि येतों मानेसी । रेवेसन्निध तपराशी । करूं नेमासी बैसली ॥६२॥
ते अनसूयानामें विख्यात । बहु काळ तप आचरत । तिचे चरणीं मी शरणागत । तिष्ठें सेवेंत सर्वदा ॥६३॥
तेथें जाणें असे दर्शना । आठव जाला असे मना । याल्तव योजिलें प्रयाणा । अन्य कामना नसेची ॥६४॥
तेथें आमुचा सेवाभाव । येथें आम्हां विश्रांतिठाव । ऐसें बोलतां दत्तराव । तंव योगिसमुदाव विनवी त्या ॥६५॥
जी गोरक्षें आपणा प्रश्न केले । तें सन थोरीं काय बोलिलें । आतां नूतनचि स्थापिलें । नवल वाटलें ऐकतां ॥६६॥

स्वामी हा कैसा प्रकार । तो आम्हां निरोपा सत्वर । अवश्य वदे तैं दातार । श्रवणीं सादर असा जी ॥१६७॥
मूळींचें साच केलें निरोपण । तें निवृत्तीचेंचि प्रमाण । आतां प्रवृत्तीचें प्रकरण । तेंही सावधान अवधारा ॥१६८॥
हा दत्तकथामृतरस । गोड सर्वांहोनि विशेष । जैसें शेंड्याकडोनि सेवितां बुडास । गोडी इक्षूस अधिकची ॥१६९॥
हें गोडाहोनि अतिगोड । सेवनीं प्रेमळ जाणती सुरवाड । भक्तभाग्याथ्यांसी याची चाड । स्वाद निवाड ज्ञातियां ॥१७०॥
येर अधम जे मंदमती । मूढ अभाविक पापरती । तयां नुपजे येथें प्रीती । कागा न रुचती आम्रफळें ॥७१॥
अभाग्या निर्दैव्यासी । तया खापरें कोळसे धनराशी । तो लाभ भाग्यवंतासी । जोडे अप्रयासीं ऐश्वर्य ॥७२॥
तेवीं या गिरनाळपर्वतीं । अवघे भाग्यवंत विराजती । षड्गुणैश्वर्य दत्तमूर्ती । बोळला त्याप्रती सद्रूप ॥७३॥
जाणोनि योगिसिद्धांचा हेत । निरोपणीं तोषवील श्रीदत्त । तें पुढिले प्रसंगीं गोड बहुत । श्रोतें चित्त देइजे ॥७४॥
दत्त अविनाश दातार । तोषवी सकळांचें अंतर । न करी अनन्याचा अव्हेर । अंगीकार करीतसे ॥७५॥
जैसा जयाचा भक्तिभावार्थ । प्रेमनिष्ठा भजनीं रत । तैसाचि त्यालागीं होत । पूर्ण मनोरथ करावया ॥७६॥
दत्त योगियांचा राणा । पुरवी अनन्याची कामना । न पाहे तो दोषगुणा । शुद्ध भावना निरखीत ॥७७॥
तो शुद्ध भाव मूर्तिमंत । संत योगी सिद्धांपाशीं वसत । म्हणोनि गिरिनाळपर्वत । दत्ता आवडत विश्रांति ॥७८॥
दत्ता भाविकांची गोडी । सिद्धसाधुयोग्यांची आवडी । कधीं न तो हें स्थळ सोडी । प्रेमसुरवाडीं रंगला ॥७९॥
यालागीं संत सेवावे । कृपें त्यांच्या संपादावें । निद्रावंतीं जागावें । सुख पावे सहजची ॥१८०॥
संत सुखाचे सागर । संत दीनांचें माहेर । संत सर्वस्वीं उदार । संत दातार भाविकांचे ॥८१॥
यापि- धर्मातें जाणोन । अनंतसुत जाला शरण । संतचरणीं लक्ष ठेवोन । सेवादान मागतो ॥८२॥
धन्य संत या त्रिजगतीं । धन्य धन्य त्यांची ख्याती । जे सद्भावें यांतें भजती । ते उद्धरिती पामरा ॥८३॥
अनुपम महिमा संतांचा । शेषहि वर्णूं न शके वाचा । तेथें कोण केवा पामराचा । पार त्याचा पावेल ॥८४॥
परी अल्पमती मी हीन । सकळ अनाथांमाजीं दीन । पदीं होऊं पाहें लीन । परी न आंगवण अधिकार ॥८५॥
तथापि आगांतुकापरी । धीट होवोनी बैसलों द्वारीं । तुम्ही साधु यजमान कोमळ अंतरीं । पंक्तिभीतरीं पावन करा ॥८६॥
वळें म्हणवितों तुमचा दास । सदया पुरविजे कृपें आस । उदारा न कीजे निरास । अनंतसुतास अंगीकारा ॥८७॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ ॥ परिसोत संत श्रोते महंत ॥ नवचत्वारिंशोध्यायार्थ गोड हा ॥१८८॥

॥ इति नवचत्वारिंशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ५० वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीदत्तजगद्गुरवे नमः ॥

जयजय सद्गुरु अनंता । अनंतरूपा श्रीदत्ता । आदि अनादि अपरिमिता । मायातीता विश्वंभरा ॥१॥
जय निर्विकारा निरंजना । आनंदरूपा चिद्घना । सर्वसाक्षी सनातना । भवभंजना जगद्गुरो ॥२॥
जय शुद्ध सात्विक पवित्रा । विमळरूपा सर्व सूत्रा । षड्भुज पाणी कमलनेत्रा । सिद्ध स्वतंत्रा सर्वज्ञा ॥३॥
जय परब्रह्म परमात्मने । तव महिमेतें कोण जाणे । वर्णितां शिणलीं पुराणें । अष्टदशगुणें द्वय मार्गे ॥४॥
दश शतांचा शिणला । तत्त्वमुखीही मागला । वेदवक्ता थकित जाला । ऋतूंचा दडाला कपारी ॥५॥
तेथें मी मतिमंद अज्ञान । मूढ अशक्त बुद्धिहीन । केवीं वर्णूं तुझे गुण । पावले शीण थोर थोर ॥६॥
तुझे गुण अवाचित अपार । वर्णितां न लगे त्यांचा पार । शिणले श्रुतींचे जिव्हार । जाल्या स्थिर मौनची ॥७॥
वर्णितां न वदती बोल । नेत्रीं स्वरूप तरी पाहूं निश्चळ । पाहावया मांडिला न्याहाळ । विकाशोनि प्रबळ कमळातें ॥८॥
द्वय नेत्रें पाहतां भला । तेणें एक गमविला । म्हणे एक तरी राहो आपुला । न देखवे पळाला तेथोनी ॥९॥
चौनेत्री तो जागला । पराक्रमें पाहूं आला । तोही स्वरूपें लोपला । मंदावला घुर्मित ॥१०॥
मध्यें त्रिनेत्र उघडोन । एक आलासे धांवोन । न साहवें त्यालागोन । एक आच्छादोन राहिला ॥११॥
अनेक पावावया करूं युक्ती । म्हणोनि गेला मागुतीं । मग पांच नेत्रें त्वरित गतीं । पाहतां निश्चितीं पाहवेना ॥१२॥
दीपोनि जाला सरता । तंव अष्टनेत्री आला अवचितां । तोही निर्बुजला देखता । न पवे अंता कांहीं तो ॥१३॥
मागुतीं पावला दशधारी । तरी न देखवे निर्धारीं । मग द्वादशाचा लाग करी । तोही अंधारी पावला ॥१४॥
मग सहस्रें घरोनि आंगवण । रूप पाहीन म्हणे निरखोन । मजपुढें तुम्ही हीन । रूपा तुलीन मीच आतां ॥१५॥
तेणें रूपा अवलोकितां । सर्व कमळीं पावला मंदता । दोन दिव्य उरतां । होय पळता निजस्थाना ॥१६॥
द्वयसहस्रा मात कळली । तेणें घुमघुमोनि चांव घेतली । नेत्र लावितां न्याहाळीं । तंव तेज कमळीं सांटवेना ॥१७॥
देखोनि रूपातें म्याला । पाहतां अभिमान गळाला । मग भूतळवटीं जाबोनि रिघाला । तो राहिला अद्यापी ॥१८॥
तुझे गुण रूप अद्भुत । त्यांचा न कळेची पार अंत । थोर थोर जाले श्रमित । तेथें मी अनाथ कायसा ॥१९॥
हाचि हेतु महंतांलागून । रूपगुणेंसी घडावें भजन । ऐसें जीवमात्रीं लागले ध्यान । परी उपाव कोण न कळे त्यां ॥२०॥
देखोनि भक्तिप्रेमलालसा । तुज कृपा उपजली अविनाशा । साकाररूपें सर्वेशा । धरिसी परेशा सर्वोत्तमा ॥२१॥
अवताररूपें घरोनि सगुण । नाना चरित्रें दाविसी पूर्ण । तेणें तोषविसी सकळांचें मन । दुःख निवारून सुख देसी ॥२२॥
दुष्ट दुर्जन मर्दिसी । अधर्मातें निवटिसी । धर्मसंस्थापना करिसी । निजप्रेमें तारिसी भक्तजना ॥२३॥
दीन हीन अनाथ पतित । प्रेमळ सात्विक शरणागत । सिद्ध साधु योगी भक्त । मोळे संत आपंगिसी ॥२४॥
गोब्राह्मणांचें पालन । करावया करिसी अवतारधारण । हें चराचरीं महिमान । गावया गुण प्रगटविलें ॥२५॥
लीलालाघवी पुरुषोत्तम । षड्गुणैश्वर्यमंडित उत्तम । भक्तिप्रेमार्थ जालासि सुगम । होसी उगम सर्वांचा ॥२६॥

सुखानंदाची तूं राशी । पावन करावया जीवांसी । त्रिगुणात्मकरूप अविनाशी । प्रगटलासी अवधूता ॥२७॥
त्वां नाना सगुणरूपातें धरिलें । यश कीर्तीतें विस्तारिलें । अनंतनामें जें शोभलें । वर्णनीय सांपडलें महंतांसी ॥२८॥
ते सज्ञान पंडित विचक्षण । दक्ष लक्षें प्राज्ञ पूर्ण । ते महाकवि गुणव्याख्यान । करिती निपुण वक्तृत्वें ॥२९॥
जाले सिद्ध साधु योगेश्वर । त्यांनींही गुण गाइले प्रियकर । तोषविलें तुमचें अंतर । तूं कृपाकर बोळलासी त्यां ॥३०॥
भाविक संत तुझे प्रेमळ लाडके । त्यांतें वाढविलें कौतुकें । लळे पुरवोनि निकें । केलें सुखें सुखरूप ॥३१॥
हा परिसोनि बडिवार । तुज शरण भी पामर । होवोनि प्रार्थितों जोडोनि कर । कृपा दीनावर करा जी ॥३२॥
मी अनाथ दुर्बुद्धि खळ । अधम दुष्ट परम चांडाळ । पापी दुराचारी कुश्चळ । निंदा द्वेष मळ अंतरीं ॥३३॥
यापरी अनेक दोषभरित । काया वाचा मन चित्त । मजऐसा अनाथ पतित । नसे त्रैलोक्यांत दुसरा ॥३४॥
परी नेणें कोण पुण्य गांठीसी । जाला उद्धार निजमानसीं । शरण जावें संतांसीं । दत्तपदासी भजावें ॥३५॥
ही भावना उद्भवतां । तुज बोबडे बोलें प्रार्थितां । प्रेम आविर्भाव मनीं दाटतां । तूं समर्था जाणसी ॥३६॥
तुज अनाथाची माया । हृदयीं कळवळसी दत्तराया । कीर्तननिमित्त करवोनिय । गुण गाया लाविलें ॥३७॥
तें हें तुझें सच्चरित्र । पुण्यपावन परम पवित्र । वर्णविसी मुखें विचित्र । आधारसूत्र तव कृपा ॥३८॥
मूढाहातीं घ्यावी सेवा । हें तुज वाटलें कृपार्णवा । रस निपजविला नित्य नवा । सकळ जीवां तारक तूं ॥३९॥
श्रोता आणि वक्ता । तूंचि होसी गा अवधूता । पत्रमशी लिहितां । तूंचि दत्ता सर्वही ॥४०॥
आरंभापासोनि आजवरी । तुझें चरित्र त्वांचि रचिलें निर्धारीं । कृपा आधारें वदविसी वैखरी । वसोनि अंतरीं गुरुदत्ता ॥४१॥
पुढील कथेची आस । श्रवणीं उपजली श्रोत्यां सिद्धांस । तोषवी त्यांचें मानस । वर्षोनि रस अनुपम ॥४२॥
गताध्यायीं प्रार्थना । सिद्ध करिती दयाघना । ते अवधारोनि मना । तोषवी कामना पूर्ण करीं ॥४३॥
अभय देवोनि सावध केले । श्रवणीं सिद्ध असती टपले । निरोपी चरित्र पुढलें । मानस रंगलें तव पदीं ॥४४॥
सिद्ध प्रार्थनेसी मान । देवोनि दत्त बोलती आपण । सकळ श्रोते सावधान । दीजे अवधान श्रवणार्थीं ॥४५॥
दत्त वदे योगियांसी । वचन कल्पना उद्भवली मानसीं । ते निवारणार्थ निवेदितों तुम्हांसीं । एकाग्रतेसी देइंजे ॥४६॥
जे पूर्वीं गोरक्षें प्रश्न केले । तेही निरोपणीं कळतील भले । आपुलेंहि मन निर्बुजलें । स्वच्छ केलें जाईल ॥४७॥
त्रिविधतापें दुःख जीवासी । भ्रमला भोगी हा लक्षचौऱ्यासीं । उसंत नाहीं तयासी । करुणा मानसीं मांकितो ॥४८॥
त्या मातें जाणावया । उपाव न सुचे कांहीं तया । म्हणोनि उपजली मज दया । उद्धरावया जीवातें ॥४९॥
जीव मायावर्तीं पडिला । सबळ अज्ञानदशेतें पावला । विकारयोगें भ्रांत जाहला । मूळींच्या विसरला ठायासी ॥५०॥
नवतें तेंचि पाहिलें । होतें तें गमाविलें । पुढलियातें चेवलें । अधिकाधिक जडलें ग्रुपजे त्या ॥५१॥
मायेनें नवल केलें । सत्य तें लोपविलें । असत्य तें सत्या आणिलें । चोजविलें मोहलोभें ॥५२॥
जीवा पडली पूर्ण भ्रांती । नोव्हे सावध कल्पांतीं । दुःखभरें करी ग्लांती । भोगी विपत्ती अनिवार ॥५३॥
जवळींच तारक आहे । परतोनि त्याकडे न पाहे । जन्मप्रवाहीं उगलाचि वाहे । किती काये भोगावा ॥५४॥

यदर्थ या जीवाची करुणा । पावली पहा मूळ स्थाना । जीवाची चुकवावी यातना । याचि कारणा योजिलें ॥५५॥
करावया जगदोद्धार । येणेंचि आला अवतार । पाहोनि निमित्ताचा आधार । प्रगट साचार साकारें ॥५६॥
त्या निमित्ताचें कथन । परिसिजे करितों निरोपण । जो क्षीराब्धिवासी नारायण । शेषशयन म्हणती ज्या ॥५७॥
जो कमलेचा निजभर्ता । तो कमलनाभ कमलधर्ता । ज्याची सुखशय्या होणें अनंता । तो जनिता विधीचा ॥५८॥
तयाचे नाभिकमलापासोन । ब्रह्मा झालासे उत्पन्न । म्हणोनि त्या नांव कमळासन । विरंची चतुरानन हीं नामें ॥५९॥
त्या विधिची संतती । त्याची तंव नसेचि गणती । सकळ सृष्टीची उत्पती । झाली निश्चितीं जाणिजे ॥६०॥
तया प्रजापतीचा कुमर । अत्रिनामें मुनीश्वर । महा तपस्वी सुशीळ अंतर । तेजें भास्कर दूजा तो ॥६१॥
शांत दांत विरक्त । आत्मनिष्ठीं अनुरक्त । प्रपंचीं असोनि असक्त । लोभमोहत्यक्त नैराश्य ॥६२॥
अंतरनिष्ट तत्त्वज्ञाता । शास्त्रज्ञ आणि वेदवक्ता । निरभिमानी समता । सर्व भूतां सारिखी ॥६३॥
सुशीळ त्याची गृहिणी । पवित्र पतिव्रता लावण्यखाणी । सेवानिष्ट पतिचरणीं । शांत मनीं सर्वदा ॥६४॥
पतिआज्ञा नुल्लंघी कदा । राखी स्वामीची मर्यादा । न करी वादविवादा । भेदाअभेदा न जाणें ॥६५॥
पति तोतें देवासमान । पितृवत् येर संपूर्ण । कोणतेंही नेणें पापाचरण । करी पूजन सम सर्वां ॥६६॥
उभयतांही आनंदभरित । प्रपंचीं असोनि परमार्थी रत । पांथिकांचे श्रम हारित । मधुरोक्तीं तोषवीत तयांतें ॥६७॥
अन्नार्थियां देती अन्न । तृषार्तियां करविती उदकपान । सदा सर्वदा आनंदघन । उद्विग्न मन कधीं नसे ॥६८॥
घ्यावया अवतार । हें स्थळ अतिसुंदर । हे जाणोनि विचार । करविला संचार परिसा तो ॥६९॥
होणारा ऐसें सूत्र । सहजें फिरतें स्वतंत्र । तें लाघव अति विचित्र । त्यांतील आत्र निवेदितों ॥७०॥
अकस्मात् एके दिनीं । सिंहाद्रीं पावला नारदमुनी । अत्रिऋषींचे सदनीं । प्रगट येवोनि जाहला ॥७१॥
अत्रि अनसुया उभयतां । अर्चोनि तोषविती नारदचित्ता । उभयांचें आचरण पाहतां । जीवीं सुखावता पैं होय ॥७२॥
नारद म्हणे या त्रिजगतीं । धुंडितां उपमे न दिसती । धन्य धन्य हे अनसूयासती । तप आचरती पतिसेवा ॥७३॥
उभय आचरण देखोनि शुद्ध । हृदयीं झाला परमानंद । मग अत्रीस पुसोनि नारद । निघे आल्हादयुक्त तेव्हां ॥७४॥
सहज भ्रमतां नारदमुनी । अकस्मात् पावला कैलासभुवनीं । उमामहेश्वर प्रेमें नमोनी । शिवें आसनीं बैसविला ॥७५॥
शिव म्हणे वो नारदऋषी । तूं त्रैलोक्यीं भ्रमण करिसी । अद्भुत करा कांहीं कीर्तनासी । आनंद मानसीं होय जेणें ॥७६॥
पार्वतीसी देखोनि सन्निधान । नारदें मांडिलें कीर्तन । अत्रिअनसूयेचे गुण । करी व्याख्यान सप्रेमें ॥७७॥
म्हणे जी स्वामी पंचानना । म्यां त्रैलोक्यींच्या देखिल्या ललना । परी या अनसूयेची तुलना । नये कोणा स्वामिया ॥७८॥
अद्भुत आचरणें निची थोरी । एकही युवती न पवे सरी । धन्य धन्य ते त्रिपुरारी । सर्वांवरी मुकुटमणी ॥७९॥
यापरी नारद कथितां । संतोष वाटला पटास्यताता । परी त्या अपर्णेच्या चित्ता । संतापता पावली ॥८०॥
क्रोधें म्हणे नारदा । एकी वाणुनी इतरां निंदा । कांहीं न धरोनि मर्यादा । आगळें चदा बहुतसें ॥८१॥
जगीं म्हणविसी साधुसंत । आचरण तुझें विपरीत । ती तुज आवडली गुणवंत । इतर कथित् लेखिल्या ॥८२॥

तंव नारद बोले अपर्णेसी। थोर म्हणों जरी तुम्हां तिघांसी। तरी अनसूयेच्या न साजा दासी। ऐसें मजसी वाटतें ॥८३॥
ऐसा नारदाचे तिखे बोलें। जगदंबेचें चित्त क्रोधावलें। करीं शापोदक घेतलें। म्हणे भस्म ये वेळें करीन तुज ॥८४॥
तंव नारद बोले उतावेळ। माझे असत्य करिसील बोल। तरीच तुझा शाप मज बाधील। कासया जळ नासिसी ॥८५॥
ऐसें बोलोनि विधिसुत। शिवआज्ञा घेवोनि त्वरित। मुखें नामस्मरण करीत। झाला प्राप्त सत्यलोका ॥८६॥
महासावित्री दर्शन। होतांचि केलें उभयां नमन। तंव विधि म्हणे अद्भुतकथन। कांहीं श्रवण करवीं का ॥८७॥
सन्मुख देखोनि मातापिता। अत्रिअनसूयेचीच निवेदी वार्ता। शिवलोकींची अवस्था। नारद कथिता जाहला ॥८८॥
तेथें नारदें करोनि उत्तर। वैकुंठीं पावला सत्वर। तंव तो भक्तसखा श्यामसुंदर। करी सत्कार नारदाचा ॥८९॥
नारदा प्रार्थी चक्रपाणी। कांहीं गोड कथामृत पाजा श्रवणीं। अत्रिअनसूयाख्यान तत्क्षणीं। कमलेसी देखोनि निरोपिलें ॥९०॥ परिसोनि कमळा कोपली। शाप द्यावया उदेली। नारद वदे शब्दावळी। असत्य काळीं शाप मज ॥९१॥
हरीसी करोनि नमन। नारद गेला कळी लावोन। मागें तिघींचें जळजळे मन। म्हणती उपाव कोण करावा ॥९२॥
आगलाव्या नारदमुनी। आमुच्या तेजा आणिली हानी। यासी हेचि आतां करूं करणी। सत्त्वहानी अनसूयेची ॥९३॥
तें प्रार्थिलें पतिपायां। गांजवा जावोनि अनसूया। पति म्हणती हे वांया। कां अपाया योजितां ॥९४॥
तें पतीवरीं त्या रुसल्या। क्रोधभरें अत्यंत फुगल्या। समजावितां विरुद्ध बोलल्या। ऐकोनि कवळिल्या प्राणनाथें ॥९५॥
कामिनी कामाचें मोहन। तेणें वचनीं पावलें बंधन। रक्षावया कांतेचें मन। पावले येवोन सिंहाद्रीं ॥९६॥
अत्रि नसतां मंदिरीं। अतीतवेषें पावले द्वारीं। नग्न भिक्षा ते अवसरीं। मागती सत्वरीं अनसूये ॥९७॥
येरी जाणोनि विपरीत। कीं पावले करावया सत्वघात। मग सन्मानोनि तिघां त्वरित। उठे भिक्षार्थ जननी ती ॥९८॥
पतिचरणोदक होतें संचित। तें तयांवरी आणोनि सिंचित। ते तिघे तात्काळ बाळें होत। पाहोनि चित्त तोषलें ॥९९॥
बाळरूपें देखतां नयनीं। नसतां मोहें पान्हा आला दरदरोनी। कंचुकी टाकिली काढोनी। स्तनपानी तृप्त केलें ॥१००॥
तैलाभ्यंग त्यातें केलें। उष्णोदकें न्हाणिलें। पालख सज्ज करोनि ते वेळें। तिघे पहुडविले त्यामाजीं ॥१॥
नानापरी हाल्हर गातां। तों आश्रमीं अत्रि जाला येता। तेणें मंगल गीत ऐकतां। म्हणे नवल कांता काय करी ॥२॥
अनसूये पुसतां वचन। येरी म्हणे करा अवलोकन। येरें पाहतां विलोकिलें चिन्ह। म्हणे सगुण कैसे हे ॥३॥
येरीं आचंत सांगतां। वत्सलें ऋषीचिया चित्ता। म्हणे एक सृष्टिकर्ता। एक पाळिता मारिता एक ॥४॥
असो कीजे यांचें पालन। परी हे पुढतीं करितील गमन। आणिक होईल जें कारण। तें सावधान अवलोकीं ॥५॥
असो इकडे फिरतां भ्रमण। पाहोनिया पाताळभुवन। पावला नारदमुनी येवोन। अनसूया दर्शन घ्यावया ॥६॥
दोघे आलिंगनीं मिसळले। आसन देवोनि बैसविले। अनसूयेनें ते वेळें। तिन्हीं बाळें दाविलीं ॥७॥
देखोनिया नारद आचंबित। त्या बाळांतें अवलोकित। म्हणे अनसूये हे सुत। तुज प्राप्त केथवां ॥८॥
कांहीं विनोद भाषण। करोनि निवेदी वर्तमान। साकल्य करोनी अवधारण। म्हणे धन्य धन्य तूं माता ॥९॥
ब्रह्मा विष्णु रुद्र देख। प्रतापें तिघेही केले बाळक। पुढें होईल अति कौतुक। तें अलौकिक पाहसी ॥११०॥

आपुल्या स्वहिता जागोन । जातां घे वरदान मागोन । यायोगें लालसा पूर्ण । होईल भूषण कुळाचें ॥११॥
यापरी ब्रह्मऋषी । सांगोनि गेला स्वर्गासी । म्हणे त्रिलोकूं कारणें कैसीं । त्रिधानासी शोधून ॥१२॥
रमा उमा सावित्रीप्रती । गेल्या मार्गे कोण गती । चितानळें तिघी आहळती । न येती पती म्हणोनिया ॥१३॥
बहु तयांतें शोधिलें । तयांचें वृत्त कांहीं न कळे । धुडितां सेवक श्रमले । कोठें गेले कळेना ॥१४॥
परम सखेद होवोनि मानसीं । एकाग्र बैसल्या तपासी । भोग त्यजोनी अहर्निशीं । आगम साधनासी पतीच्या ॥१५॥
हें नारदें जाणोन । घेतलें तिघींचें दर्शन । वंदोनियां चरण । पुसे अनुष्ठान कवण काज ॥१६॥
येरी म्हणती नारदा । तव निरोपणाची भोगितों बाधा । गेले पती न लागे शोधा । नाहक क्रोधा भरलों तुज ॥१७॥
असो तुझें त्रिलोकीं गमन । कोठें जालें कीं काय दरुषण । शोध सांग आम्हांलागोन । त्यावीण प्राण कासावीस ॥१८॥
नारद म्हणे पाताळासीं । गेलों होतों न भेटले मजसी । तुम्हीं पाठविले असतलि कार्यासी । तें तुमचें तुम्हांसी ठाउकें ॥१९॥
तंव त्या म्हणती नारदासी । पाठविलें अनसूयासत्वहरणासी । तुम्ही जावोनि शोधा त्यांसी । अतिवेगेंसी सत्वर ॥१२०॥
नारद वंदोनि निघाला । अनंसूयासदना पावला । तीतें सावध करिता जाहला । आपुले स्वहिताला जपावें ॥२१॥
सावित्री आणि उमारमा । ह्या येतील तव आश्रमा । सत्कार करोनि वाढवीं प्रेमा । या गुणधामां दाखवीं ॥२२॥
ते मागती तुज सौभाग्यदान । पति ऐसें न करीं तयांलागून । आपुला अधिकार पाहोन । त्यांचें श्रेष्टपण रक्षावें ॥२३॥
आक्षेप करितां बोलावें । जी आपुले ओळखोनि घ्यावे । विनोद होईल स्वभावें । पूर्ववत् करावें पुढें त्यां ॥२४॥
जातां प्रार्थोनि तोषविजे । ते प्रसन्न होतील सहजें । अपेक्षित मागोनि घेइंजे । पालख शोभविजे कुळवृद्धी ॥२५॥
यापरी अनसूये सांगोन । नारद निघाला तेथून । त्वरें तिघींसी जाऊन । करी निरोपण साकल्य ॥२६॥
तुमचे पती छळावया गेले । ते अनसूयासतीनें केलीं बाळें । हें देखोनि उतावळें । भयाभीत पळें तेथोनि मी ॥२७॥
तंव त्या म्हणती ब्रह्मऋषी । कोण युक्ती करावी त्यासी । केवीं पती प्राप्त होतील आम्हांसी । चिंता मानसीं अद्भुत ॥२८॥
आम्हीं नायकिलें तुमच्या बोला । वृथाचि तुम्हां कोप केला । घात आपला आपण योजिला । अनुभवीं आला कळोनी ॥२९॥ आतां यातें कैसें करावें । नारदा वर्म आम्हां सांगावें । तें म्हणे तो बहु बरवें । संगतों धरावें जीवीं आतां ॥१३०॥
अनसूया पतिव्रतानिधान । तिसी जावें तुम्ही शरण । करील तुमचा बहु सन्मान । न करी अवमान तुमचा ॥३१॥
वचन मानल तिघींसी । म्हणती नारदा चाल दावीं स्थळासी । मग नारदें आणोनि सिंहाद्रीसी । अत्रिआश्रमासी दाविलें ॥३२॥ तिघीही वेष पालटोन । द्विजस्त्रियाऐसीं रूपें धरोन । पावल्या अनसूयेचें सदन । तिनें देखोन नमियेल्या ॥३३॥
आसन देवोनि पूजा करी । प्रार्थी त्यांतें जोडोनि करीं । तोषवी सप्रेमें नम्रोत्तरीं । कोण अंतरीं हेतु सांग ॥३४॥
तिघी अनुसूयेतें वदती । सौभाग्यदान दे आम्हांप्रती । बाळें केलीं त्यां आमुचे पती । हे निश्चितीं आज्ञा तुज ॥३५॥
येरी म्हणे तुम्ही कोण । काय आपुलें नामाभिधान । कोठोनि जालें आगमन । तें संपूर्ण सांगा जी ॥३६॥
तंव तिघी देती प्रत्युत्तर । त्रिदेवांच्या जाया आम्ही सुंदर । स्थळ सत्य वैकुंठ कैलासपुर । नाम प्रकार परियेसी ॥३७॥
सावित्री आणी रमा उमा । पतिप्राप्ति आलों तवाश्रमां । देवोनि वारीं आमुच्या श्रमा । करीं क्षमा अपराध ॥३८॥

सहज विनोदें तिघां धाडिलें । तीं तात्काळ तुवां केलीं वाळें । ऐसें ऐकोनि ते वेळें । मन द्रवलें सतीचें ॥३९॥
तात्काळ आणोनि बाळकें । पुढें ठेविलीं कौतुकें । पाहिलीं त्रैलोक्यमानिकें । अंतरकळिके आनंद-॥१४०॥
तंव नारद पावला येवोन । करी विस्मित हास्यवदन । म्हणे घ्या जी आपुले ओळखून । कां अनुमान करीतसां ॥४१॥
तंव कोण्हा न ये ओळखीसी । उग्याच पाहती एकमेकींसी । एक पडूं पाहे त्यांसी । चुकुर मानसीं घ्यावया ॥४२॥
परीक्षोनि त्यांच्या चित्ता । अत्रिमुनी होय बोलता । अनसूये द्या तुझ्या स्वसा असतां । कां विनोदता मांडिली ॥४३॥
जिचा तिज करीं अर्पण । न शोधीं अंतरलागोन । येरी अवश्य म्हणोन । दे उचलोन जिचा त्या ॥४४॥
तें उचलोनि अनसूया देतां । बाळें क्षुधानळें करिती आकांता । कंचुकी चांचपडोनी पाहतां । जाल्या लज्जिता तिघीही ॥४५॥ बाळें कांहीं न राहती । मग प्रार्थिली अनसूयासती । तिनें तृप्त केलें तिघांप्रती । नवल करिती सर्वही ॥४६॥
नारद म्हणे कीजे त्वरा । घेवोनि चला आपुल्या घरा । पूर्ववत् तिघांतें करा । खोंचल्या अंतरा तिघीही ॥४७॥
अपर्णा वदे नारदासी । अनसूयेनें बाळें केली वैसीं । पूर्ववत् जरी करील तैसीं । तैं आम्हांसी साच वाटे ॥४८॥
त्रिदेव गेल्यापासोन । स्वर्ग पडिलें होतें शून्य । चिंतार्णवीं देव संपूर्ण । तंव हा सुदिन पावला ॥४९॥
आतां त्रिदेव होती पूर्ववत । न्यावया पावले देव समस्त । विमानें दाटलीं अद्भुत । संभार अमित सुमंगल ॥१५०॥
तों इकडे नारदऋषी । वदे तेव्हां अनसूयेसी । मुक्त करा वडिलांसी । सुख स्वसांसीं देइंजे ॥५१॥
तंव अनसूया अवश्य म्हणोन पूजी भावार्थे पतिचरण । आज्ञा घेतली नमोन । केलें सिंचन पदतीर्थे ॥५२॥
त्याच तीर्थे केलीं बाळें । पूर्वरूप तीर्थेंच केलें । एकचि जयजयकार जाले । वाजों लागलें वाद्य नभीं ॥५३॥
अमर कुसुमें वर्षती । गंधर्व विद्याधर राग गाती । अप्सरा विमानीं नाचती । देवांगना उजळिती आरत्या ॥५४॥
सिद्धता जालिया परी । अत्रि देवांची पूजा करी । सद्गद अनसूया अंतरीं । प्रेम सांवरी सांवरेना ॥५५॥
तंव नारद विनवी तिघांतें । कृपें अवलोकिजे अनसूयेतें । देखोनि कळवळा उपजला त्यांतें । जाले पुसते सतीसी ॥५६॥
प्रेमाश्रूंची करिसी वृष्टी कोण अर्थे सांगें पोटीं । तंव अनसूया गुह्य गोष्टी । जोडोनि संपुटी सांगत ॥५७॥
आपण लीलालाघव दाविलें । मिथ्या मोहांत घातलें । सेखीं पालख रितें राहिलें । गोड मानलें काय तुम्हां ॥५८॥
परिसोनि सतीचें वचन । म्हणे पालख तुझें सत्य पूर्ण । आम्हां करविलें पयःपान । तोपेल मन स्वस्थ राहें ॥५९॥
ऐसी होतां अभयता । वारिली अनसूयेची चिंता । तैं हर्ष जाला समस्तां । पावले स्वस्थानता सर्व देव ॥१६०॥
तंव कोण्ही एक दिनीं । अनसूया दिसे गर्भिणी । मासकळा आल्या भरोनी । तमोगुणी प्रगटला ॥६१॥
नाम तया दुर्वास । सदा सक्रोध राहे उदास । लोटतां कांहीं संवत्सरांस । दिसे गर्भास राहिली ॥६२॥
तो मायालाघवी गर्भ पाहीं । पूर्ण मास भरले नवही । तो सत्त्वगुण लावलाहीं । दाविला देहीं भावमात्र ॥६३॥
त्रिगुणात्मक हा अवतार । बाळरूपें प्रगटलो साचार । तो जन्मसोहोळा अपार । आनंद थोर सर्व लोकां ॥६४॥
कांहीं एक अवधी सारोन । नंतर प्रगटला रजोगुण । तया चंद्र नामाभिधान । एवं नंदन अत्रीचे ॥६५॥
बाह्य प्रकार गर्भाचा । परी अयोनिसंभव साचा । हा क्रम अवतारमालिकेचा । पदर भ्रांतीचा फाटिला ॥६६॥

जेथें प्रगटलों साचार । ते अत्रिअनसूया मातापितर । त्यांचे चरणीं तत्पर । रंगलें अंतर सेवेसी ॥६७॥
त्या अनसूयेचें करावें कल्याण । यदर्थ केलें तीतें बोधन । प्राप्त करविले सद्गुरुचरण । ज्ञानसंपन्न जाली ते ॥६८॥
तीतें सद्गुरूंनीं केलें पावन । आणि आज्ञापिलें जपानुष्ठान । निवेदिलें योग्य ध्यान । साधी साधन ह आतां ॥६९॥
माता विनवी सद्गुरुपायीं । जी तप करावें कवणे ठायीं । तें स्थळ मज नेमोनि देईं । कधीं नुठवी कोण्ही तेथें ॥१७०॥
वदे सद्गुरु दीनोद्धार । तपासि योग्य रेवातीर । तेथें तप आचरें निरंतर । बहु योगेश्वर तपताती ॥७१॥
सेवेलागीं हा दत्त । जाणोनि वर्तेल मनोगत । तोषवील सर्वदा तुझें चित्त । मजही आज्ञापीत तैसाची ॥७२॥
करावें अनसूयेचें सेवन । राहवें तिची आज्ञा वंदोन । रेवातीर परम पावन । तपाचरण करावया ॥७३॥
पवित्र निरामय पहावें स्थळ । न लागे उपसर्ग अळुमाळ । मग अवश्य म्हणोनि तात्काळ । पितृचरणकमळ वंदिलें ॥७४॥
मग मातेसी सवें घेतलें । उभय तीर रेवेचे दाविले । उगमापासोनि सतेज स्थळें । दृष्टीं निरखिलें मातेनें ॥७५॥
महापर्वत निबिड कानन । देवदेवालय क्षेत्रस्थान । गुन्हा कुटिका वटिका विराजमान । माजीं ऋषिगण तपताती ॥७६॥
यापरी अवलोकित । उल्लंघिले विपिनपर्वत । ॐकारक्षेत्र विख्यात । ममलेश्वर दैवत अनादि ॥७७॥
कावेरीसंगमीं करोनि स्नान । महापर्वत दऱ्या उल्लंघोन । सहस्रार्जुनाचें दाविलें स्थान । तेथोनि गमन पश्चिमे ॥७८॥
उत्तम स्थळें बहु असती । वास्तव्यासी माते न वागती । मग पुढें चालिलों पश्चिमपंथीं । स्थळोंस्थळीं तपती तापस ॥७९॥
तों अकस्मात नयनीं । दुरोनि देखिला शूळपाणी । दक्षिण रेवातीरस्थानीं । उंचपणीं शोभिवंत ॥१८०॥
अति कठिण तें स्थळ । सीतारेवासंगम प्रबळ । मध्यें कैलासतुल्य विशाळ । पर्वत शूळ शूळपाणी ॥८१॥
तीन शिखरें तेथें असती । पर्वतीं वस्तीस कोण्ही नसती । दर्शना तापसी नित्य येती । शिवा पूजिती आदरें ॥८२॥
घेवोनि तेथींचे दरुषण । करनाळ क्षेत्र पाहिलें जाण । तेंही दक्षिणतीरीं अतिपावन । संगम पूर्ण योरेचा ॥८३॥
स्नानविधी संगमासी । चक्रतीर्थ पाहिलें वेगेंसी । तेथोनि भृगुक्षेत्रासी । पाहतां चित्तासी आनंद ॥८४॥
पुढें रेवासागरसंगम । पुण्य पावन तो उत्तम । उभय तटीं आश्रम । घ्यावया विश्राम ऋषींचे ॥८५॥
कर्णाळीचे सन्मुख । उत्तरतटीं चांदोद देख । तेथोनि पश्चिमेसि योजन साम्यक । स्थळ सुरेख पर्वतीं ॥८६॥
तें अनसूयेसी आवडलें । वास्तव्यस्थान तेथें केलें । तप सतेज आरंभिलें । वृक्ष शोभले सभोंवते ॥८७॥
दरी कंदरी उंच स्थान । तपारम्य शोभायमान । तेथें निरामय आनंदघन । जननी आपण बैसली ॥८८॥
तिची सेवा करावयासी । मज राहणें निश्चयेंसी । आश्रमापासोन जावया तीरासी अर्धक्रोशी परिमित ॥८९॥
अंबिकेचें वास्तव्य होतां । आणि सेवेसी मातें पाहतां । आनंद तापसां समस्तां । देणें निष्पता दर्शन ॥१९०॥
पुढें द्वापारांत माझारीं । व्यास पावले ऋषिमारीं दर्शन घेवोनि सत्वरीं । रेवातीरीं वास केला ॥९१॥
अनसूयेचें जें स्थान । तेथोनि पूर्वे अर्धयोजन । करूं बैसले तपाचरण । आनंदघन मानसीं ॥९२॥
तैसाचि शुक वेगीं धांवला । प्रेमें दर्शनासि पावला । सर्व तापसांचा पाळा । देखोनि सुखावला स्थळीं त्या ॥९३॥
नित्य सन्मुख व्हावें दर्शन । हेंचि मानी त्याचें मन । वास्तव्य स्थळ योजिलें पाहोन । सन्निधान सन्मुख तें ॥९४॥

रेवेचे दक्षिणतीरीं । निरामय स्थळ पर्वतोंदरीं । उभयतां सन्मुख तप करी । निर्विकारी निःस्पृह ॥९५॥
द्रुणें रणीं विटंबिला । पिसाटपणीं जो भ्रमला । तो अश्वत्थामा तेथें आला । तोहि राहिला रेवातीरीं ॥९६॥
तो न धरी एक स्थान । रमे भृगुक्षेत्रापासोन । सकळ करोनि अवलोन । करी गमन शूळपाणी ॥९७॥
अवनी न पुरे भ्रमतां । कांहीं आसरीं वास्तव्यता । भिक्षा मागे एक घृतां । मस्तकक्षतालागीं पैं ॥९८॥
तो या कलियुगांती । व्यासपीठ पावेल निश्चितीं । निवेदील कथा पुढिल्यांप्रती । चिरंजीवप्राप्ती पद तया ॥९९॥
असो नर्मदा केवळ शंकरी । शिवस्वरूप भरली कंकरी । अन्य तीर्थे न पावती सरी । कृपा करी तपियांतें ॥२००॥
जै वत्सातें गाउली । कीं वाळका जेवीं माउली । सदा प्रेम पान्हावली । तापसा दुभली हे तैसी ॥१॥
ही सर्वां ठायीं पुनीत । परी ॐकारापासोनि भृगूपर्यंत । अतिपावन त्रिस्थानांत । महिमाम्दुत नर्मदेचा ॥२॥
तिहींमाजीं उत्तमोत्तम । म्हणती जया थोर संगम । क्षेत्र करनाळी अनुपम । मोक्षधाम पावन तें ॥३॥
त्यामाजीं विशेष एक आहे । मुरलीसंगम दिव्य पाहें । स्नानेंचि मुक्ती लाहे । अंतीं होय पदप्राप्ती ॥४॥
तेथें करितां तपाचरणा । रेवा पुरवी सकळ कामना । यास्तव निवास योगीजना । उपासना वाणली ॥५॥
क्षेत्रतीर्थे भूमंडळीं । अधिकाधिक आपुले स्थळीं । परी या नर्मदेची नव्हाळी । कदा काळीं तुकेना ॥६॥
सर्व तीर्थे असती पावन । साधक साधिती तपाचरण । परी रेवातटीचें महिमान । कोण वर्णन करूं शके ॥७॥
कोठें द्वादश संवत्सर । कोठें चोवीस निर्धार । करितां तपाचे संभार । न ये सर रेवेची ॥८॥
एक संवत्सर रेवेतटीं । इतर ठायीं कल्पकोटी । हे जाणोनि तपरहाटी । निवडली श्रेष्ठीं रेवाचि ही ॥९॥
अर्थ हेतु धरोनि अंतरीं । बहुतीं यज्ञ केले रेवातीरीं । तपाचरणें निर्धारीं । फळ सत्वरीं पावले ॥२१०॥
मुक्ती मुक्ती रेवा देत । मनोरथ सर्वही पुरवीत । बहु श्रम नेदी निश्चित । पावन करीत सर्वांसी ॥११॥
अघोर पातकी चांडाळ । अधम दुष्ट असो खळ । स्नानेंचि करी त्या निर्मळ । पापाचळ भस्म करी ॥१२॥
तपनिष्ठा स्वल्पांत पाहे । सुप्रसन्न त्या वेगीं होय । अपेक्षितिया साद्दश्य राहे । महिमा काय किती वाणूं ॥१३॥
महिमा अद्भुत रेवेचा । जाणोनि वास त्या अनसूयेचा । आम्हां उद्योग त्या सेवेचा । उच्चाट मनाचा त्या हेतु ॥१४॥
मातेच्या दर्शना उद्युक्त । चंचल जालें असे चित्त । त्वरा प्रयाणीं निश्चित । आज्ञा त्वरित देईजे ॥१५॥
तंव योगी म्हणती दत्तराया। तुझा गोड संग आम्हां सखया। तोडेनि जासी आमुची माया। अंतराय पायां पडूं पाहे॥१६॥
आम्हां जातां मोकलून । न राहवे येथें काळ कंठोन । देवोनि भेटी मोहिलें मन । निष्ठुर होवोन जासि आतां ॥१७॥
तव संगातें पावलों । अनुपम लाभातें लाभलों । अपार सुखा भोगिते जालों । वांया गेलों काय आतां ॥१८॥
तुम्ही जातां आम्हां सोडोन । मग न करवे आम्हां काळक्रमण । काया सांडोनि त्यजणें प्राण । हें दिसोन सत्य आलें ॥१९॥
तूं आमुचा प्राण होसी । आम्ही तव काय निश्चयेंसी । यातें त्यागोनि जातोसी । उरी कैसी उरेल ॥२२०॥
वचन बोलतां कासावीस । प्रेम न साहवे योगियांस । हें देखोनि अविनाश । आश्वासी तयांस ते काळीं ॥२१॥
म्हणे उदास न व्हावें चित्तीं । मज फिरणें दिनरातीं । तें परिसाजी निगुतीं । तुम्हांवीण विश्रांती मज नाहीं ॥२२॥

नित्य, प्रभातें उठोन । प्रयागीं करणें स्नान । मनकर्णिके संध्यावंदन । आनंदवन पाहावें ॥२३॥
माध्यान्हीं ते गोदावरी । आन्हिक उरकावें त्र्यंबकेश्वरीं । तिलक रेखावा पंढरपुरीं । भिक्षा करवीरीं मागावी ॥२४॥
तुळजापुरीं भोजन । पांचाळेश्वरीं करप्रक्षाळण । विश्रांतीसी गिरिनाळपावन । तुमचें दर्शन नित्य येथें ॥२५॥
येथोनि मातेचे सेवेसी । नित्य नेमें जाणें आम्हांसी । सायान्हिक कृष्णातीरासी । निद्रासुखासी मायापूर ॥२६॥
मूळ मातेचें चित्रकूटस्थान । तेथेंही नित्य करणें गमन । अथैव जे कोण्हीं करिती स्मरण । तयांचे सन्निधान पावणें ॥२७॥
जाणोनिया मद्भावा । जे:औदुंबराची करिती सेवा । निष्ठा देखोनि प्रसाद बरवा । देवोनि अनुभवा दाखवीं ॥२८॥
वृक्षांमाजीं औदुंबर । तो मद्रूप होय साचार । तेथें निष्ठेनें सेवितां नारीनर । तोपर्वी अंतर त्यांचें मी ॥२९॥
गाणगापुर दक्षिण देशीं । तेथें अवतरलों पाहोनि भक्तीसी । पावन केलें निश्चयेंसी । गुह्य तयांसी बोधिलें ॥३०॥
तें माझें प्रसादप्राप्तीचें स्थान । तेथें श्रीसद्गुरुपादुका स्थापन । अद्यापि घेणें दर्शन । विश्रांतिस्थान तेंहि माझें ॥३१॥
ते स्थळमाहात्म्य विशेष । पुरवी सकळ कामनेस । परम संकटाचा करोनि नाश । दे सुखास शरण त्या ॥३२॥
सेवितां हेतु पुरवी । कामना अंतरींची पुरवी । अज्ञानतमातें हारवी । ज्ञान भरवी प्रकाशक ॥३३॥
तें महापवित्र तारक स्थान । तेथें करावें अनुष्टान । भवदुःखाचें होय निरसन । येर कोण राहे मग ॥३४॥
वक्ता विनवी श्रोत्यांसी । तेथील माहात्म्य वर्णावें विशेषीं । तरी कथा वर्णिल्या गुरुचरित्रासी । असती सकळांसी श्रुत त्या ॥३५॥ यद्यपि वर्णितां वाढेल ग्रंथ । यदर्थी जाणविलें येथें किंचित । जयासी श्रवण करावें हा मनोगत । तेणें तो निश्चित पहावा ॥३६॥ तो ग्रंथ परम पावन । वरप्रसादें सफळित पूर्ण । कामना धरोनि करितां पठण । हेतुपूर्ण होतसे ॥३७॥
सहजें जरी पठण करितां । मग संपूर्ण फळली कथा । प्रेम आविर्भावे दाटतां । दया श्रीदत्ता उपजे त्याची ॥३८॥
भक्तिभावना सत्य जडे । त्यासी अवधूतदर्शन घडे । त्याचे अनुभव जना रोकडे । निवारी सांकडें भक्ताचें ॥३९॥
जैसा ज्याचा भक्तिभाव । तैसाचि त्या होतसे अनुभव । दत्त कृपाळु दयार्णव । लीला अपूर्व तयाची ॥४०॥
गिरिनाळपर्वतीं सिद्धांसी । निरोपणीं शांतवी अविनाशी । मग आश्वासन देतसे तयांसी । निर्भय मानसीं असावें ॥४१॥
तुमचा भक्तिप्रेमा पाहोन । मी तुष्टलों तुम्हांलागोन । तुम्हांवेगळें विश्रांतिस्थान । मज तों आन असेना ॥४२॥
जें कां नेमिलें नित्यानित्य । तें मज आचरणें सर्व कृत्य । विश्रांति घ्यावया सत्य । येथें अगत्य येणेंची ॥४३॥
त्यांत तुम्ही माझे प्राणप्रियकर । सिद्ध मुनी योगेश्वर । हे गोरक्षमच्छींदर । आणि ऋषीश्वर संत साधु ॥४४॥
मीही जीवप्राण सर्वांचा । कुडावा करी अनन्याचा । साह्यकारी गांजिल्याचा । यदर्थ साचा अवतार हा ॥४५॥
बालोन्मत्त पिशाचवत । ये जनीं वागे सर्वांत । प्रेमळ देखोनि भाविकभक्त । लळे पुरवीत तयाचे ॥४६॥
कलियुग हें अति दुर्धर । केवळ पापाचा संभार । येणें गांजिलें नारीनर । भव दुस्तर न तरवे ॥४७॥
त्या दीनार्थ कळवळलों । साकाररूपें प्रगटलों । जगदोद्धारार्थ पावलों । भाविकां पावलों तुम्हांऐसा ॥४८॥
येऱ्हवीं मी निराकार निरंजन । निर्विकार निःसंग पूर्ण । निराभास सच्चिद्घन । परी जालों सगुण तुम्हांसाटीं ॥४९॥
तुम्हीं आनंदें वसावें येथें । ये ठायीं नित्य येणें मातें । निष्ठामात्रें वाढवा प्रेमानें । वर्म तुम्हांतें निवेदिलें ॥५०॥

न करा येथोनि उद्विग्न मानस । स्वानंदरूपीं करा विलास । न राहें विसंबूनि तुम्हांस । मत्सुखास पाविजे ॥५१॥
यापरी सर्वां बोधून । सकृपें देवोनि आश्वासन । ध्यावया अनसूयेचें दरुषण । जगत्पावन निघाला ॥५२॥
योगी सिद्ध शरणागत । भावें करिती प्रणिपात । आनंदें दत्तासी बोळवीत । गुण गात सप्रेमें ॥५३॥
दत्त तेथोनि निघाले । अनसूयाक्षेत्रीं पावले । प्रेमें मातेतें वंदिलें । सेवे तिष्ठले अद्यापि ॥५४॥
आणीक एक कथन । श्रवण कीजे सावधान । हिंदु आणी मुसलमान । भाग दोन जाणिजे ॥५५॥
जैसीं देव दैत्य असती । तैसींच भूलोकीं हे वसती । भक्तिप्रेमा मात्र निश्चितीं । सर्वां चित्तीं सारिखा ॥५६॥
जैसी ज्याची भावना । इष्टत्वें करी आराधना । तैसेंचि रूप धरणें नाना । त्या स्वानंदघना सर्वेशा ॥५७॥
गिरिनाळपर्वतीं असतां दत्त । सर्वेही होती शरणागत । यवन फकीर आराधित । प्रेमळ भक्त देखिले ॥५८॥
ओळखोनि त्यांचें अंतर । कृपें द्रवला दिगंबर । नाम धरोनि दातार । भेटी सत्वर दिधली त्या ॥५९॥
हिंदु आणि मुसलमान । यांसाठीं रूपें दोन । दत्त दातार अभिधान । द्वय स्थान शोभविलें ॥२६०॥
तीन शिखरें असती सुंदर । त्यांचे वेगळाले प्रकार । जो गिरिनाळपर्वत उंच थोर । तेथें दिगंबर अवधूत ॥६१॥
दाताररूपें एक शिखरीं । यवनार्थ राहिले निर्धारीं । आतां तिसऱ्याची परी । वसती सुंदरी हिंगळजा ॥६२॥
गोरक्षाचे साह्यासाठीं । अंबा पावली उठाउठीं । अविनाशलीला देखोन दृष्टीं । कल्पना निवटी जाली तिची ॥६३॥
नित्य दत्ताचें होय दर्शन । या हेतुस्तव राहिली आपण । तें तिसरें शिखर शोभायमान । वसतें स्थान अंबेचें ॥६४॥
तेथें राहती योगेश्वर । गोसावी वैरागी फकीर । यात्रेचे समूह येती थोर । निरंतर दर्शना ॥६५॥
जो निश्चय धरोनि तेथें राहे । त्याची दत्तचि जाणे सोय । न सोडितां जीवें पाय । तो सुखिया होय प्रसादें ॥६६॥
दत्त दिगंबर अवधूत । पूर्ण दयाळू कृपावंत । महिमा याचा अत्यद्भुत । तुम्ही साधुसंत जाणतां ॥६७॥
या अवधूतदयें करुन । जालें येथवरी निरोपण । तें ज्याचें त्यासी अर्पण । कर्ता कारण करविता तो ॥६८॥
मी येथें म्हणावयासी । पाहतां ठाव नाहीं निश्चयेंसी । त्याचा तोचि वदवी वाचेसी । जगदोद्धारासी कथा हे ॥६९॥
दत्तकथा गोड गहन । भवरोगियां रसायन । जे करितील आदरें पान । होती पावन अविनाशीं ॥२७०॥
दत्तनामाचा प्रताप । स्मरणें पळती त्रिविधताप । स्मरतिया देखोनि काळ कंप । म्हणे बाप धन्य तुम्ही ॥७१॥
जे अवधूतरंगीं रंगले । ते तारक या जगतीं भले । त्यांचीं वंदावीं पाउलें । भावबळें आपुल्या ॥७२॥
नामरूपीं जडलें चित्त । दत्तचि जाणे जो सर्वांत । तयासी व्हावें शरणागत । कृतकृत्य होय तेणें ॥७३॥
धन्य धन्य ते सज्जन । दत्तरूपीं सदा निमग्न । ते या जगतीं पावन । करिती कल्याण अनन्याचें ॥७४॥
त्या कल्याणमूर्ती साधु संत । योगी सज्जन सिद्ध महंत । तुमचे मेळीं वसे अवधूत । आनंदभरित सर्वदा ॥७५॥
तुमची प्रीती तयासी । तुम्ही संलग्न त्या पदासी । यास्तव तिष्ठे तुम्हांपाशीं । तो अहर्निशीं अविनाश ॥७६॥
तुम्ही साधु भाग्यवंत । दयाळू उदार समर्थ । अनन्याचे पुरवितां अर्थ । हे तो कीर्ती त्रिभुवनीं ॥७७॥
कीर्ति एकोनि विख्यात । पदीं विनटला अनंतसुत । जीवेंभावें प्रार्थित । करुणा भाकित संतांसी ॥७८॥

जी· संत तुम्ही उदार धीर । सर्वज्ञपणें गुणगंभीर । केवळ कृपेचे सागर । अंबुधर चकोराचे ॥७९॥
तुम्ही पतितपावन दयाळ । तुम्हां शरणागताची कळकळ । तुम्ही दीनांचे स्नेहाळ । कर्ते प्रतिपाळ माझे तुम्ही ॥२८०॥
तुमच्या वरप्रसादें करून । यथामति जालें निरोपण । तें तुमचें तुम्ही केलें श्रवण । गोड कथन दत्ताचें ॥८१॥
पुढले सेवेसी हा किंकर । प्रार्थी, जोडोनि दोन्ही कर । कीजे स्वामी अंगीकार । आज्ञाधर तुमचा ॥८२॥
अनंतसुत दास संतांचा । म्हणवी काया मनें वाचा । रस या बोगरोनि कृपेचा । वदविजे वाचा दत्तकथे ॥८३॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणोंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविकभक्त ॥ पंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२८४॥

॥ इति पंचदशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ५१ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय अविनाश दिगंबरा । परब्रह्मरूपा परात्परा । निर्विकल्पा करुणाकरा । जगदोद्धारा नमो तुज ॥१॥
जय सद्गुरो विश्वजीवना । प्रणवरूपा सनातना । आनंदकंदा सच्चिद्घना । उदारसंपन्ना नमो तुज ॥२॥
जयजय स्वामी श्रीदत्ता । अनसूयात्मजा । गुणमंडिता । भवच्छेदका अनाथनाथा । कृपावंता नमो तुज ॥३॥
तुझे सुकुमार चरणकमळ । तेथें रुंजी घालिती संत प्रेमळ । तयांवरी तूं कृपाळ । होवोनि आळ पुरवीसी ॥४॥
मी अनाथ तुझा दीन । तव पदीं जालों अनन्यशरण । लडिवाळ मागें कृपादान । भातुकें पूर्ण हें धावें ॥५॥
तूं सकळ ऐश्वर्यनिधी होसी । काय उणें गा तुजपाशीं । सदय सदा याचकासी । तृप्त करिसी अनन्या ॥६॥
तुझ्या भाग्यासी नाहीं पार । वात्सल्यें होसी कृपासागर । अंतरीं करुणावाद्ध उदार । दाता थोर विश्वाचा ॥७॥
अनन्यातें सांभाळिसी । हीनदीनातें पाळिसी । नाना संकटें वारिसी । लळे पुरविसी दातारा ॥८॥
तुज अनन्यभावें विनटतां । कृपा करिसी श्रीदत्ता । अपेक्षित देसी न मागतां । भयचिंता वारिसी ॥९॥
अनन्याचा देखोनि प्रेमा । कृपा करिसी सर्वोत्तमा । अपराधांची करोनि क्षमा । मंगलधामा आपंगिसी ॥१०॥
तुझी कृपा अत्यद्भुत त्याचा न कळे पार अंत । दिठुवा हा जेथें झळकत । होय समर्थ भाग्यनिधी ॥११॥
धन्य धन्य तुझी उद्धारशक्ती । पावनची करूं आला जगतीं। त्यांत अनुपम लीला गती । दाविली प्रीती वाढावया ॥१२॥
करावें दीनांचें उद्धरण । म्हणोनि अतर्क्य करिसी विंदान । नाना रूपांतें धरोन । करिसी पावन निजबोधें ॥१३॥
कितेक पावन जाले दर्शनीं । कितेक उद्धरिले स्पर्शनी । मुक्त जाले कितेक भजनीं । कितेक पूजनीं पैलपार ॥१४॥
कितेकां देवोनि प्रसाद । कितेकां दर्शनीं आल्हाद । कितेक स्वर्मी केले सावध । कितेक स्वच्छंद छंदानें ॥१५॥
कोठें वैराग्य वाणविसी । कोठें निजभाग्य समर्पिसी । कोण्हा ज्ञान उपदिशसी । भक्ति प्रतिपादिसी कितीकां ॥१६॥
नाना विधि प्रसंग योग । दावोनि केले वीतराग । नाना कौतुकें बोध चांग । करोनि पांग फेडिसी ॥१७॥
अनेक योगें जीवांसी । पात्र केलें प्रसादासी । परी अनुग्रह दिधला चौघांसी । चौ युगांसी चार ते ॥१८॥
कृतयुगामाजीं पावन । यदु केला असे पूर्ण । त्रेतायुगीं सहस्रार्जुन । केला संपन्न अभेद तो ॥१९॥
यांतें गुज गुह्य निरोपिलें । आत्मत्व तया अर्पिलें । द्वय युगीं दोघे पावन केले । द्वापारीं योजिलें शुद्ध बोधा ॥२०॥
निजबोधें बोधिली माता । लीला दाविली समस्तां । तेणेंचि लाविलें भक्तिपंथा । कृपावंता स्वामिया ॥२१॥
या कलियुगामाजीं जाण । देवगडनिवासी जनार्दन । त्याचा निग्रह देखोन । केला पावन अनुग्रहीं ॥२२॥
निजबीज सांगोनि कानीं । ज्ञान ठसविलें हृदयभुवनीं । स्वात्मानुभव देखणीं । स्वानंद लेणीं लेवविलीं ॥२३॥
हा निर्णय भागवतीं । एकादशस्कंदीं निश्चितीं । वर्णन केलें एकनाथीं । प्रसादप्राप्ती दत्ताची ॥२४॥
दत्तप्रसाद दासोपंता । दत्तप्रसाद झाला एकनाथा । दत्तप्रसाद शरणागता । होय लाभता अद्यापि ॥२५॥
दत्त कृपेचा सागर । अनन्या देतो अभयकर । सेवा आज्ञापि कीर्तिपर । जगदोद्धार व्हावया ॥२६॥

श्रोते म्हणती कलीत । दत्त जाले ज्या कृपावंत । तें निरोपी येथें किंचित । पुरवीं हेत आमुचा ॥२७॥
तंव वक्ता करीत विनवणी । भाविक श्रोतियां कर जोडोनी । आपण आज्ञा करितां मजलागोनी । यदर्थ प्रार्थनीं प्रार्थितें ॥२८॥ जी पूर्वी महिपतबावा साधु थोर । ताहाराबाजीचा राहणार । चैतन्यसांप्रदायी सुंदर । तयासी कृपाकर तुक्याचा ॥२९॥ तेणें भक्तिप्रेमें करोन । प्रसन्न केला रुक्मिणीरमण । त्याचें पावोनि अभयदान । केलें कथन बहुतची ॥३०॥
भक्तिविजय भक्तलीलामृत । संतविजय संतलीलामृत । पृथक चरित्रें विख्यात । रसभरित वर्णिलीं ॥३१॥
दत्तकृपेचें महिमान । तयामाजीं असे वर्णन । तें श्रवणें श्रुत तुम्हांलागुन । त्यावरी निरोपण काय कीजे ॥३२॥
तंव श्रोते म्हणती विचक्षणा । हे कासया पाहिजे कल्पना । या दत्तप्रबोधीं रचना । पाहिजे सुजाणां आवश्यक ॥३३॥
हा दत्तलीलाप्रबोध । गोड येथिंचे आम्हां संवाद । यथामति धुंडोनि शुद्ध । त्यां प्रसिद्ध कथिले कीं ॥३४॥
या काळींचें निरोपण । करावया कां अनुमान । म्हणसी ग्रंथ वाढेल गहन । तरी सार कथन करावें ॥३५॥
ही दत्तकथा परम गोड । ऐकिली ऐकावया चाड । उपजली पुरवीं आवड । घेऊं सुरवाड तेथींची ॥३६॥
जेवीं वर्षतां धनधारा । आनंद उपजे चातकमयूरा । तृप्त होतसे तेणें धरा । सकलांतरा संतोष ॥३७॥
तेवीं दत्त बोळला दयाघन । तव मुखें वृष्टी गोड कथन । भाविक प्रेमळ मुमुक्षुजन । चातक पूर्ण मयूर हे ॥३८॥
श्रवणानंदें नाचती । संत साधु उल्हासती । श्रवणीं रसा सांठविती । सर्वांगीं होती तृप्त येणें ॥३९॥
श्रवणें तृप्त करीं क्षुधित । सेविलेंचि सेवावें वाटत । अवीट हें गोड कथामृत । खीकारूं निश्चित तव मुखें ॥४०॥
व्यासोक्ति हें पुराण । शुकमुखें गोड गहन । द्वितीय अनुभव अमृतफळा जाण । गोड पूर्ण शुकमुखें ॥४१॥
तेवीं अनेक ग्रंथीं दत्तकथा । त्या दत्तप्रबोधीं होसी बोलविता । तव मुखें ती श्रवण करिता । गोडी समस्तां आगळी ॥४२॥
धेनू असे भरल्या रसीं । परी ते द्रवे मोहें वत्सासी । मग तो प्राप्त सकळांसी । तुष्टिपुष्टीसी कारण ॥४३॥
कासेसी वत्स न लागतां । येर स्पर्शनीं मारी लाता । सायासें रस काढितां । नोव्हे निपजता चोरी ते ॥४४॥
वत्साचेंचि लागतां झटें । मग धेनूसी पान्हा फुटे । रस अधिकची सुटे । भरती पोटें येरांचीं ॥४५॥
तैसी हे दत्तमाउली । तुज अनन्यासीच पान्हावली । तव मुखें आम्हां दुभली । अद्भुत नव्हाळी रसाची ॥४६॥
येणें सकळांचे पुरती अर्थ । आपुलाच न साधी स्वार्थ । आदरें करावा परमार्थ । हा परमार्थ करीं का ॥४७॥
तंव वक्ता म्हणे जी किती । भूषणें वाढवितां निजप्रीतीं । हीं तुमचीं तुम्हां योग्य शोभती । अधिकार निश्चितीं मज नाहीं ॥४८॥ मी हीन दीन पामर । तुमचा म्हणवितों किंकर । पादुका वाहोनी समोर । जोडोनि कर सेवें उभा ॥४९॥
आपुली आज्ञा मज प्रमाण । केउती होईल उल्लंघन । कृपें ध्याल जरी सांभाळोन । तरी निरोपण चालेल ॥५०॥
हीन दीन मी अनाथ । बुद्धिदाता तो श्रीदत्त । त्याहीवरी साह्यार्थ । अभयहस्त आपुला ॥५१॥
आपण संत श्रोते सज्जन । दयासिंधु कृपघन । तुमचे प्रसादें निरोपण । होईल श्रवण करावें ॥५२॥
देवगडवासी जनार्दनपंत । परम सात्त्विक गृहस्थ । तेणें श्रवण केले बहु ग्रंथ । सप्रेमभरित सद्भावें ॥५३॥
सद्गुरूसी जावें शरण । त्याचें संपादावें कृपादान । सद्गुरु तारक जीवालागोन । भवबंधन तोडीतसे ॥५४॥

सद्गुरु आपणत्व देती । मीपणत्व सर्व हारिती । निर्विकल्प मानस करिती । भ्रांती नुरविती कांहींच ॥५५॥
छेदोनियां मायापडळ । दिव्य दृष्टी देती निर्मळ । बोध ठसावोनि प्रबळ । वारिती तळमळ अंतरींची ॥५६॥
निजबीज प्रेरिती कानीं । मस्तकीं ठेविती अभयपाणी । अंतर्बाह्य लेवविती लेणीं । आत्मभूषणीं भूषविती ॥५७॥
धन्य कृपाळ सद्गुरुदाता । वारी जन्ममरणादि अवघी चिंता । परात्पर होय भेटविता । अद्वय अभेदता पाववी ॥५८॥
असो सद्गुरु हा समर्थ । सकळ देवदेवांचें दैवत । त्यापासोनि ध्यावा परमार्थ । पदीं अर्थ अर्पावा ॥५९॥
सद्गुरु असावा संपन्न । तत्त्ववेत्ता ज्ञानघन । शांत दांत विरक्त पूर्ण । समसमान सर्वात्मकीं ॥६०॥
उदार धीर गंभीर । कोमळ दयामृत अंतर । केवळ शांतीचा सागर । सर्व सारासार जाणता ॥६१॥
ऐसा जैं सद्गुरु भेटे । तैंच भ्रांती सर्व फिटे । अज्ञान समूळीं आटे । मग कैंचें झटे उरतील ॥६२॥
लाभतांचि सद्गुरुराव । जन्ममरणाचा पुसी ठाव । दृश्य पदार्थ होईल वाव । देईल ठाव स्वपदीं तो ॥६३॥
हें तापत्रय अतिदारुण । येथें मोहपाशाचें बंधन । जन्ममरणासी कारण । दुःख पूर्ण भोगवी ॥६४॥
येथील कठिण वेव्हार । भोग भोगवी अतिदुस्तर । हा तरावया भवसागर । न सुचे विचार प्राणिया ॥६५॥
पडतां भवार्णवाचे आवर्तीं । अनंतावधि भोंवरे फिरती । तळावर प्राणिया नेती । कैंची विश्रांती जीवातें ॥६६॥
अनिवार हें मायाजाळ । विपरीत कर्में विटंबी काळ । जीवा न सोसवे व्याकुळ । कर्म प्रबळ न सुटेची ॥६७॥
एक योनी कोटि फेरे । एवं लक्षचौर्‍यांशींचे घेरे । प्रारब्धें जैं ओसरे । मग जीव भरे नरदेहीं ॥६८॥
स्वहित अथवा अनहित । होणें तें या नरदेहांत । यदर्थीं श्रेष्ठीं दाविला पंथ । साधावा स्वार्थ परमार्थी ॥६९॥
या नरदेहांत येऊन । जावें सद्गुरुपदातें शरण । त्याची लाधतां कृपा पूर्ण । तुटे भवबंधन मुक्त तो ॥७०॥
जो सद्गुरुसी शरण न जाय । तया ओढवती सर्व अपाय । जन्मोनि पुष्ट गंधर्वकाय । मुंकता होय मलतैसा ॥७१॥
न गेला सद्गुरुसी शरण । त्याचें न पहावें कदा वदन । सहजें जालिया दर्शन । सचैलस्नान करावें ॥७२॥
जे सद्गुरुसी विन्मुख । त्या करींचें न घ्यावें अन्नोदक । त्यांची वपु दोषदायक । स्पर्श निःशंक नसावा ॥७३॥
सद्गुरुनिंदा ज्याचे वदनीं । तो सर्व पापांचा होय खाणी । न जावें त्याचे अंगणीं । शब्द कानीं न पडो त्याचा ॥७४॥
यापरी नाना ग्रंथ ऐकतां । उपरती जाली जनार्दनाच्या चित्ता । म्हणे अहा जन्म गेला वृथा । काय आतां करावें ॥७५॥
सदा विषयीं गुंतलें मन । नाहीं गुरूसि गेलों शरण । माझा परिणाम तरी कोण । छेदील बंधन कोण माझें ॥७६॥
हे विषयभोग भोगितां । पावलों मोहलोभें भ्रमतां । कर्माचरणीं पावलों सक्तता । स्वात्मस्वहिता विसरलों ॥७७॥
या विकारविषयसंगें करोनी । अनर्थिक कर्में आली घडोनी । यम दंडील निर्दयपणीं । सोडविता कोण्ही दिसेना ॥७८॥
अहा वृथाचि वाहिला भार । न केला कांहीं स्वहितविचार । माझा मीच जालों दावेदार । बुडविलें घर माझें म्यां ॥७९॥
माझा मीच जालों घातकी । मजसमान दुजा नसे पातकी । काळें मुख जालें उभय लोकीं । पडेन कुंभीपाकीं रौरवीं ॥८०॥
अहा दुःख भोगावें दारुण । सेखीं प्रारब्धा आलें जन्ममरण । भवपंक्तीं गर्त होईन । काढील कोण तेथोनी ॥८१॥
ऐसा अनुतापें तापला । देखोनि स्वकर्मा जाजावला । भवभयें भयाभीत जाला । विचारीं पडिला दुर्धर ॥८२॥

म्हणे आतां म्यां काय करावें । कवणालागीं शरण जावें । माझ्या धांवण्या कोण धांवे । कोण पावे मज आतां ॥८३॥
पाहे भोंवतीं दीनवाणी । अनुतापें बाष्प वाहती नयनीं । पुसे वार्ता भेटल्या जनीं । तारिता कोण्ही मज सांगा ॥८४॥
प्रबुद्धें जाणोनि भावासी । म्हणती भवभयातें म्यालासी । तरी शरण जाय सद्गुरुपदासी । ते भवतापासी वारिती ॥८५॥
सद्गुरु सच्चिद्घन दिगंबर । अवधूत सत्पात्र भेटेल जर । त्याचा होना कृपाकर । चिंताकांतार दग्ध होय ॥८६॥
सहजें बोलतां जन । जीवीं धरी तेव्हां जनार्दन । अनुतापें विषयभोग त्यागोन । उदासी व्यापोन राहिली ॥८७॥
खरा अनुताप अंगीं बाणला । दृढ संकल्प मनीं केला । आराधीन त्या श्रीदत्ताला । म्हणोनि बैसला अनुष्ठानीं ॥८८॥
जाओनिया सरोवराचे तटीं । बैसला न्यग्रोधवृक्षातळवटीं । दत्तस्तोत्रकवच परिपाठीं । नाम होठीं जपे सदा ॥८९॥
नारदभृगूंनीं वर्णिलें ध्यान । तेंचि हृदयीं करी धारण । एकाग्र करोनि मन । लक्षी चरण अहर्निशीं ॥९०॥
आहारनिद्रेतें सोडिलें । विकार देहींचें मोडिले । प्रेमभक्तीं मन जडलें । व्हावया अडलें दर्शन ॥९१॥
ऐसा निग्रह दृढावला । यांहीं ककाळ आचरणीं लोटला । आला दत्तमाउलीसी कळवळा । तया अनन्याला देखोनी ॥९२॥
निश्चय दखोनी द्रवली । वत्सासाठीं धांव घाली । चित्त परीक्षावया ते वेळीं । नाना केली करीतसे ॥९३॥
नाना रूपें दावितां । न वागे जनार्दनाच्या चित्ता । म्हणे ये गा धांव दत्ता । पाव आतां मज दीना ॥९४॥
दत्तनामें करितां पाचारण । तंव भलतैसा टाकी येऊन । म्हणे पाचारिसी काय कारण । बोल वचन मज आतां ॥९५॥
जनार्दन निरखोनि पाहात । तंव ध्यानाऐसें न दिसत । पुनरा नेत्र झांकित । भजनीं रत सप्रेमें ॥९६॥
माता न दिसतां डोळ्यां । तें शोक उपजे त्या बाळा । त्यातें तोषवी ती बहु अवळा । परी तो सोहोळा न मने त्या ॥९७॥
अतिचांगट जरी ललना । खेळ भातुकें देतां नाना । तेथें न जडे बाळभावना । कुरूप हीन माता गोड ॥९८॥
तेवीं त्या जनार्दनासी । अन्य रूप नावडे मानसीं । हें वर्म ओळखोनि अविनाशी । प्रगट रूपासी करीतसे ॥९९॥
त्रिगुणात्मक दिगंबर । अजानबाहु षड्कर । त्रिवदन षण्नेत्र । त्रिवर्ण विचित्र भव्य तो ॥१००॥
त्रिशुळ डमरू विराजित । दंड कमंडलु शोभिवंत । शंख चक्र लखलखीत । तो मध्यस्थ घननीळ ॥१॥
स्फटिक रुद्राक्ष मुक्तामाळा । कासे कौपीन वरी पिंवळा । अंगीं जडली दिव्य मेखळा । मुगुट मौळीं सतेज तो ॥२॥
कर्णीं कुंडलें डोल देती । बाहुभूषणें मिरवती । पदकें हृदयीं टाळ देती । प्रकाशविती भास्करा ॥३॥
मस्तकींहूनी कुरळ सुटले । तेजघनी येवोनि पावले । जटाजूटार्थ वळिले । भस्में शोभलें भव्यरूप ॥४॥
तोडर शोभला चरणीं । पदांगुली विराजे भूषणीं । पदीं पादुका जडितमणी । धराकर्णी शोभत ॥५॥
भिक्षेस्तव सवें झोळी पात्र । द्रव कामधेनू पवित्र । उपवीत आणी कटिसूत्र । मुद्रिका स्वतंत्र कराग्रीं ॥६॥
एवं सर्व भूषणमंडित । स्वरूपें सतेज लावण्यवंत । मुनि वर्णित ध्यान नेमस्त । तैसाचि दत्त प्रगटला ॥७॥
अनन्याची देखोनि आवडी । भक्तिप्रेमास्तव घाली उडी । म्हणे बा रे नेत्र उघडीं । पाहें निवाडी मज आतां ॥८॥
नेत्र उघडोनि जनार्दन पाहे । तंव प्रभा नेत्रीं न समाये । म्हणे पाहावया करूं कैसें काये । करोनि उपाये रूप दावीं ॥९॥
तात्काळ अवधूतें कृपा केली । सतेज दृष्टी निर्मळ जाली । सावयव मूर्ती पाहिली । साक्ष बिंबली ध्यानाची ॥११०॥

परम हर्षित जालें मन । प्रेमें हेलावले लोचन । गहिंवरें हृदय आलें दाटोन । धांवोनि चरण धरियेले ॥११॥
दरिद्रया सांपडला द्रव्यघट । भिंदुकाळिया मिळालें अन्न मिष्ट । कीं मरतिया अमृतघोट । लाभ उत्कृष्ट आनंद त्या ॥१२॥
तेवींच त्या जनार्दनासी । आनंद हर्ष जाला मानसीं । विनय होवोनि पदांसी । गाय करुणेसी त्यापुढें ॥१३॥
साभडे शब्दें करोन । कळे तैसें केलें स्तवन । मग म्हणे जी आपण । नाम खूण सांगावी ॥१४॥
तैं बोले तो अवधूत । नाम तरी गिरिधरनाथ । गिरिकंदरीं निवास सत्य । आणि विश्रांत वागतों ॥१५॥
कधीं बाळ कधीं उन्मत्त । कधीं नग्न कधीं पिशाचवत । कधीं जगरूप जगांत । वावरतों यथार्थ नाना रूपीं ॥१६॥
योगी सिद्ध साधु जन । तापसावृंद ऋषिगण । भक्त भाविक प्रेमळ सज्जन । तें अधिष्ठान आमुचें ॥१७॥
इच्छेऐसा आम्हां प्रवास । एक स्थळीं नसे निवास । आमचे स्वच्छंदीं विलास । अंतरीं उदास निष्काम ॥१८॥
आम्हां वसणें विश्वाठायीं । विश्व आम्हामाजीं पाहीं । द्वैत अणुमात्र येथें नाहीं । मी तोही तूंचि कीं ॥१९॥
जीवें धरिलें अहंपण । कर्माकर्मीं जन्ममरण । आम्ही त्याहोनि असों भिन्न । नामाभिधान ठेवि त्याचें ॥१२०॥
आम्हां नामरूप तातमात । हा शब्दची मुळीं भ्रांत । परी प्रेम वाढावया संकेत । वाढविली सत्य नामरूपें ॥२१॥
आतांचि पहा पहा रोकडें । नामें पाचारिती उघडें । तेंही परीयेसी निवाडें । पुरतसे कोडें स्मरत्याचें ॥२२॥
दत्त दिगंबर अवधूत । योगी अविनाश महंत । अनसूयात्मज अत्रिसुत । नामें विख्यात असती ॥२३॥
अनेक असती नामावळी । तुज गिरिधर सांगितलें ये वेळीं । साधक जपती हृदयकमळीं । आनंदमेळीं सर्वदा ॥२४॥
तुझा भक्तिप्रेमा पाहोन । प्रगटलों तो मी पुढें येऊन । तूंतें जालों सुप्रसन्न । माग वरदान इच्छित जें ॥२५॥
तंव जनार्दनें जाणीतलें । निरोपणीं मन विश्वासलें । पुनरा सप्रेमें चरण धरिले । स्तवन आरंभिलें स्वहितार्थ ॥२६॥
जयजय सद्गुरु दिगंबर । अविनाशरूपा सर्वेश्वरा । वेदवंद्या परात्परा । निखिलसारा सर्वोत्तमा ॥२७॥
जय अनुपमरूपा आनंदकंदा । पूर्ण ब्रह्म सच्चिदानंदा । गुणत्रयव्यापका स्वतः सिद्धा । भेदाभेदातीत तूं ॥२८॥
जय गुणातीत गुणज्ञा । स्वांतर व्यापका सर्व सुज्ञा । अखिल अभंगा प्राज्ञा । अनुज्ञवरज्ञा प्रियकरा ॥२९॥
जय भक्तमानसचकोरचंद्रा । उदार धीरा कृपासमुद्रा । अमंगलनाशक सुभद्रा । सिद्ध योगेंद्रा वंद्य तूं ॥१३०॥
जय अनाथरक्षका करुणाघना । दीनबंधो जगत्पावना । येऊं दे पामराची करुणा । जालों चरणशरण मी ॥३१॥
त्रिविधतापें मी तापलों । विषयविकारें गांजलों । भवभयातें परम भ्यालों । म्हणोनि आलों शरण तुज ॥३२॥
प्रपंचरंगीं रंगतां । अन्योन्यकर्में जालों आचरता । आशालोभमोह जाला वेष्टिता । येणेंचि अवर्ता योजिलें ॥३३॥
कर्मभोग हा अतिदुस्तर । वासना फिरवी दारोदार । माया भ्रांती दुर्धर । कांहीं विचार सुचों नेदी ॥३४॥
दुष्ट कर्में आचरतां । यमप्रहार बैसे माथा । तेथें कोण्ही नसे सोडविता । जन्मीं भ्रमतां शिणलों ॥३५॥
नेणों कोण पुण्य उदेलें । कर्मविपाक श्रवण जालें । माझें मज आठवलें । भयाभीत जालें मन स्वामी ॥३६॥
आतां या भवतापापासोन । मज सोडविता तरी असे कोण । तैं श्रवण केलें श्रेष्ठ वचन । सद्गुरुदयाघन तारिता ॥३७॥
त्याचा होतां वज्रपंजर । भवभीति नाहीं अणुमात्र । होवोनि राहे काळकिंकर । अजरामरपद पावे ॥३८॥

यापरी करितां श्रवण । दृढ विश्वासलें मन । तारक प्राप्त व्हावयाकारणें । निश्चय धरून बैसलों ॥३९॥
जाणोनि दीनाचा निश्चय । स्वामी तूं बोळलासि सदय । मज अनाथातें दाविले पाय । अर्पिला काय तेथें हा ॥१४०॥
अनन्यभावें जालों शरण । मज पामरा कीजे पावन । मागतो अनुग्रहाचें दान । न करोनि अनुमान अंगीकारा ॥४१॥
शरणागत धरा हातीं । वारा सकृपें भवभीती । फेडिजे प्रबोधें भ्रांती । हेचि विनंती दातारा ॥४२॥
यापरी सप्रेमें विनवितां । चरणीं ठेविला नुचली माथा । तें दया उपजली अवधूता । अनाथनाथा दिगंबरा ॥४३॥
द्वय करें जनार्दना उचलोन । हृदयीं सप्रेमें धरिला कवळोन । अभयकर मस्तकीं थोपोन । सावधान पैं केला ॥४४॥
सुमुहूर्त अभिजित अमृतवेळा । अनुताप सद्भाव प्रेमकळा । हा समय देखोनि डोळां । दत्त उत्तावेळ बीज प्रेरी ॥४५॥
तारकमंत्र श्रवणीं । अर्पिता जाला जनार्दनीं । ज्ञानबोधाचीं लेणीं । कृपें करोनी लेवविलीं ॥४६॥
स्वात्मानुभवालागोन । दिधलें वटवृक्षातळीं आसन । प्राणायामातें साधवून । शुद्ध अंतःकरण करविलें ॥४७॥
त्यजावया बाह्य प्रकार । चौ देहांचें बुजवी द्वार । लक्ष करवी एकाग्र । धरवी धीर निजकृपें ॥४८॥
साहतां साहिली काळ । तंव पावला प्रभातकाळ । प्रकाशें उजळलें मंडळ । बिंब निढळ उगवलें ॥४९॥
प्रकाश होतां मान । अंधःकार गेला पळोन । पाहती आपणा आपण । गेली हारपण अंधारीची ॥१५०॥
असो जनार्दना समाधी । साधवोनि आत्मत्व बोधी । तोडिली सकळ आधिव्याधी । केला उपाधीरहित तो ॥५१॥
दत्तकृपें तो निवाला । लाभ पदांचा जोडिला । जनीं जनार्दन होवोनि ठेला । पूर्ण सुखावला स्वानंदीं ॥५२॥
कृपा करोनि अविनाशी । आनंद सांप्रदाय सांगे त्यासी । म्हणे वागें निर्भयेंसी । स्मरतां तुजपाशीं पावेन ॥५३॥
जनार्दना ऐक गोष्टी । लाभ गुह्य ठेवीं पोटीं । न मोडीं प्रपंचराहाटी । पाहिलें दिठीं सांडूं नको ॥५४॥
करावया जगदोद्धार । प्रगटलों होवोनि साकार । अनेक दावोनि प्रकार । करितों व्यवहार उद्धरणीं ॥५५॥
परी या मुख्य रूपें करून । तुजसह तिघे केले पावन । यदु आणि सहस्रार्जुन । तूं जनार्दन तीसरा ॥५६॥
प्रबोधरूपें बहुत । उद्धरिले त्यां नाहीं गणित । भक्ति भाव प्रेमा हेत । तयां प्राप्त मी होय ॥५७॥
निष्ठा सदृढ पाहोनि । तयां करितों कृपादान । मानसीं वर्म जाणोन । सांप्रदायज्ञान उपदेशीं ॥५८॥
वैराग्यरंगें रंगवीं अंतर । बाह्य राहाटे लौकिक प्रकार । भजनीं न पडो विसर । लेखी आपपर समत्वें ॥५९॥
विषयीं राहावें विरक्त । अंतरीं असावें दयाभूत । सत्पदीं व्हावें सदा रत । शांति चित्तांत वसवावी ॥१६०॥
विवेक कार्जी करावा । अहंकार जीवीं न धरावा । सद्गुण हृदयीं भरावा । लेप नुरावा द्वेषाचा ॥६१॥
भूतमात्रीं व्हावें लीन । शरणागताचा हरावा शीण । न मिरवावें थोरपण । स्वहितकारण लक्षावें ॥६२॥
प्रबोधवचनें दिगंबर । बोधोनि निववी अंतर । जनार्दनें जोडोनि कर । केला नमस्कार दंडवत ॥६३॥
अवधूत पुढती उठवोन । म्हणे या राहें तूं आनंदघन । आमुचें स्वइच्छें रमण । करितों गमन सिंहाद्रीसी ॥६४॥
श्रीसद्गुरुआज्ञा वंदोनि शिरीं । सुखरूप जनार्दन वागे संसारीं । जें गुह्य बोधिलें कृपाकरीं । लक्ष त्यावरी सर्वदा ॥६५॥
नित्य आनंदें करून । सप्रेमें करी ध्यान भजन । स्वस्वरूपीं वृत्ति तल्लीन । निर्द्वंद्व आचरण सर्वात्मकीं ॥६६॥

संत साधु सज्जनांशीं । प्रेम वाढवी दिवानिशीं । प्रपंचीं राहोनि परमार्थासी । सावध मानसीं सर्वदा ॥६७॥
असो प्रतिष्ठानापासोनि दूरी । ईशान्यकोणा माझारी । दौलताबादनामें नगरी । योजनें निर्धारीं चार से ॥६८॥
अतिदुर्गम जुनाट स्थान । अलिकडे राज्य करिती यवन । जनार्दन जाला तेथिंचा दिवाण । कृपें करून दत्ताच्या ॥६९॥
स्वामीचें जाणोनि मनोगत । आज्ञेप्रमाणें कार्य करीत । त्यासी ठेवी संतोषभरित । प्रजा रक्षीत सक्रपें ॥१७०॥
राहोनि यवनदरबारीं । निजबोधें धर्मवृद्धी करी । पांथिकांचे श्रम हरी । करुणा अंतरीं दीनांची ॥७१॥
स्वामिकार्जीं सावध चित्त । यवनां विश्वास बाणला निश्चित । सर्व ठायीं यशवंत । जनार्दनपंत होय तो ॥७२॥
जो सद्गुरूसी सत्य शरण । त्यासीच प्राप्त यश कल्याण । जिकडे तिकडे जनार्दन । काज कारण बोलवी ॥७३॥
सर्व कार्य क्रमें करीत । परी ध्यानीं मनीं वाचें दत्त । दत्तहि त्यावरी कृपावंत । घडे एकांत उभयांचा ॥७४॥
बाळ क्षुधार्थी जाणोन । माता धांवे काज सांडोन । तान्हया करी तृप्त येवोन । तेवीं दत्त दयाघन तोषवी त्या ॥७५॥
एवं त्या दौलताबादनगरीं । जनार्दन सकुटुंब वास्तव्य करी । दिवा स्वामिकार्यातें सारी । रजनी भीतरीं स्वहितार्थ ॥७६॥
गड शिळा अति दारुण । परिघ सभोंवता गहन । तयावरी वास्तव्यस्थान । वसे जनार्दन ते ठायीं ॥७७॥
त्या स्थानाचे शिखरीं । दक्षिणेचे बाजूवरी । रम्य निरामय स्थळ निर्धारीं । योजिली वोवरी एकांता ॥७८॥
नित्य नेमें जनार्दन । रजनींत घाली तेथें आसन । जप ध्यान आणि भजन । आनंदपूर्ण भोगीत ॥७९॥
भोगावया समाधिसुखासी । स्थान नेमिलें विश्रांतीसी । अद्यापि साधु जाती दर्शनासी । येती अविनाशी नित्य तेथें ॥१८०॥ जना दावी प्रपंचभान । परी अंतरीं विरक्त पूर्ण । भक्ति ज्ञान वैराग्यसंपन्न । जनार्दन ते ठायीं ॥८१॥
ज्याचे शब्द ऐकतां । संतोष होय जनांच्या चित्ता । म्हणती येवढें भाग्य असतां । ज्यासी अहंता नसे कीं ॥८२॥
घरा येती संतजन । त्यांचें प्रेमें करी सेवन । कथाकीर्तनपुराणश्रवण । धर्मदान द्विजातें ॥८३॥
कधीं मना नुपजे कांटाळा । समान सर्व नरनारीबाळा । धन्य धन्य हा भाग्यागळा । ऐसा डोळां न देखों ॥८४॥
गृहस्थी असोनि साधु खरा । क्षमा दया ज्याच्या अंतरा । भक्त ज्ञानी विरक्त पुरा । सार विचारा जाणता ॥८५॥
जैसा जो जाय भेटीसी । पाहतां तैसाचि दिसे तयासी । प्रिय वाटे सर्वांसी । येती दर्शनासी जन लोक ॥८६॥
दत्तकृपा यासी पूर्ण । कीर्ति जाली प्रभावमान । ते श्रवणीं परिसोन । भाविक जन पाहूं येती ॥८७॥
त्यांमाजीं एक द्विजसुत । ऐकोनि पावला भेटीसी त्वरित । जनार्दनासन्मुख प्रेमयुक्त । घाली दंडवत आदरें ॥८८॥
कौमार अवस्था तया देख । पाणी जोडोनि उभा सन्मुख । जनार्दनें देखोनि कौतुक । पाचारोनि सम्यक पुसे त्या ॥८९॥
म्हणे तूं कवणाचा नंदन । यावया येथें काय कारण । सांगें तुझें सर्व कथन । कीं रुसोन आलासी ॥१९०॥
सद्गद हृदयीं प्रेमळ । होवोनि जोडी करकमळ । विनवितें जालें पुढें बाळ । श्रोते सकळ अवधारा ॥९१॥
परिसा स्वामी सावधान । मी ऋग्वेदी द्विजनंदन । शाखा माझी आश्वलायन । वास्तव्यस्थान गोदातटीं ॥९२॥
जनस्थान म्हणती ज्यासी । तेथें राहणें पूर्वजांसी । जन्म भानुदासवंशीं । प्रपितामहासी तो होय ॥९३॥
जेणें पांडुरंग केला सखा । भास्कर आराधिला देखा । अनागोंदीहूनी वैकुंठनायका । सुखदायका आणिलें ॥९४॥

तो महाराज भानुदास । पुत्र चक्रपाणी तयास । तेथें जन्म मत्पित्यास । जाला रमेशकृपेनें ॥९५॥
त्याचें नाम सूर्यनारायण । तयाची कांता नामें रुक्मीण । उभय प्रसादिक हा पिंड जाण । एका म्हणोन पाचारिती ॥९६॥
देखोनि प्रपंचाते भ्यालों । वाटे कामक्रोधीं वेष्टिलों । आशा लोभ वासनें गुंतलो । भ्रमित जालों मोहगर्तीं ॥९७॥
भवार्णव हा अतिदारुण । मायादेवीचें होता आधीन । कैसा जाईन तरोन । यमपाशबंधन बांधील कीं ॥९८॥
कर्मे भोग भोगितां । नाहीं कोण्ही सोडवितां । ऐसें मम मानसीं वागतां । झोंबली चिंता अनिवार ॥९९॥
हा निबिड पडिला मज अंधःकार । तेथें तव कीर्तिरूपें उदेला भास्कर । त्या प्रकाशें पावलों येथवर । तुम्ही कृपाकर भेटलेती ॥२००॥ वडिलांतें रुसलों नाहीं । परी बुडालों वाटतें भवडोहीं । त्या भीतीस्तव लवलाहीं । पावलों पाहीं तारीं मज ॥१॥ परिसोनि याळबोला । आश्चर्य वाटे तैं सकळ्यां । धांवोनि जनार्दनें कवाळिला । पोटासि धरिला लडिवाळ ॥२॥
म्हणती बाळा येथें राहसी । अवश्य म्हणोनी लागे पदासी । सेवा करीन अहर्निशीं । आपंग दीनासी स्वामिया ॥३॥
तैंपासोनि एकनाथ । जनार्दनपंताची सेवा करीत । निष्कपट शुचिष्मंत । आज्ञा नुल्लंघित तयाची ॥४॥
प्रभातकाळीं उठोन । करावें सदनीं संमार्जन । उष्णोदक सिद्ध करोन । ठेवी आणोन प्रक्षाळनीं ॥५॥
शौचस्थळ पाटव्य करीत । रंगमाळावरी घालित । सुवासिक द्रव्यें तेथें ठेवित । उदकपूरित पात्र ठेवी ॥६॥
हस्त पाद मुख प्रक्षाळनासी । आसन मृत्तिका दे उदकासी । वस्तु दंतधावनासी । लागे तैशी देतसे ॥७॥
करें करोनीं पाद क्षाळी । वस्त्रें पुसोनी वंदी भाळीं । स्नान करोनी उतावेळीं । सारी गंगाळीं उष्णोदक ॥८॥
होतांचि सद्गुरूचें स्नान । त्वरें मांडी संध्यापात्र आसन । उत्तरी वस्त्र वेगीं पिळोन । निर्मळ पुसोन अंगकाढी ॥९॥
पादुका पदीं लेववीत । वस्त्रधारणेसी करीं देत । पूजाद्रव्या सिद्ध करीत । उपकरण शोभिवंत अर्चनीं ॥२१०॥
होतां संध्यावंदन तर्पण । आराध्य पुढें ठेवी मांडोन सद्गुरु करितां पूजन । साहित्य आणोन दे पुढें ॥११॥
धूप दीप होतां अर्पित । नैवेद्य घेवोनि त्वरें येत । जोंवरी तेथें अर्चन होत । तोंवरी तिष्टन बद्धांजुळी ॥१२॥
पूजा ध्यान पठण । हें होतांचि परिपूर्ण । पूर्ववत ठेवी सर्व आवरोन । पादुका पुसोन पुढें ठेवी ॥१३॥
पादुका जंव स्वामी लेती । तंव पाकशाळे प्रवेश निगुतीं । पाट मांडोनि सत्वर गतीं । पात्र प्रीतीं विस्तारीं ॥१४॥
अन्नें समर्पितां भोजन । करूं बैसती त्वरें करोन । आपण मक्षिका करी निवारण । उदकपान देतसे ॥१५॥
तृप्त होतां भोजनरुची । त्वरा करी उष्णोदकाची । मुख कर प्रक्षाळन होतां त्याची । आचमनाची सिद्धता ॥१६॥
आचमनें होतां पवित्र । मुखशुद्ध्यर्थ अर्पी तुळसीपत्र । वेगीं काढी उच्छिष्टपात्र । भूमि सर्वत्र शुद्ध करी ॥१७॥
शत पाउलें जंव होत । तंव तांबूल आणोनि समर्पित । पीकपात्र पुढें ठेवीत । सद्गुरुनाथ पाहती ॥१८॥
कृपें द्रवोनि आज्ञा देती । जाय प्रसाद सेवीं निगुतीं । येरें नमोनि पदांप्रती । त्वरित गती पैं गेला ॥१९॥
परम प्रीतीं करोन । शेष प्रसाद केला सेवन । परी लक्ष वेधलें सेवेलागोन । त्वरें सन्निधान पावला ॥२२०॥
शयनार्थ शय्या सिद्ध केली । वरी सद्गुरुमूर्ति पहुडली । चरणसेवा आरंभिली । भाळीं वंदिली चरणतळें ॥२१॥
निद्रा लागतां नयनीं । आपण बैसे विषयपटणीं । लिपिका सिद्धपर्य लेखनीं । लक्ष लावोनी बैसत ॥२२॥

री सर्वदा सन्निधान। साचोल दृष्टी ओळखोन। आज्ञान्वयें कार्य कारण। सावधान करी सेवा ॥२३॥
निद्रा सरतां उदक। आणोनि ठेवी सम्यक। चंदन करावया तिलक। तांबूल आवश्यक त्यावरी ॥२४॥
सभावस्त्रें आणोनि देत। कचेरी जातां सवें वागत। मुत्सद्दीसवें लिहीत। परी चित्त आज्ञेकडे ॥२५॥
सभेमाजी सद्गुरूसी। मागतां तांबूल दे वेगेसी। समीप ठेवी पीकपात्रासी। लागल्या आत्रासी पुरवीत ॥२६॥
होतांचि सभा विसर्जन। सद्गुरु उठतां सांडोनि आसन। पादुका पुढें ठेवी पुसोन। करी वंदन क्षणक्षणां ॥२७॥
देवदर्शनालागीं जातीं। आपण वागे त्या संगतीं। कथा कीर्तन पुराणें होतीं। जाणें निगुतीं तत्कामें ॥२८॥
मल्लकामीं सद्गुरु बैसतां। आपण सन्मुख राहे तिष्ठता। रामापुढें वातसुता। शोभा पाहतां तैशीच ॥२९॥
एवं होतां अस्तमान। सद्गुरु आश्रमीं करिती गमन। तंव शौचकूपीं पात्र ठेवून। पादुका सरसावोन उभाची ॥३०॥
सभावस्त्रें उतरितां। त्वरें घेवोनि होय ठेविता। पद क्षाळणी उष्णोदक देता। पदक्षाळिता आपणची ॥३१॥
आपण करोनिया स्नान। उदक दे स्नानालागोन। वस्त्र करावया परिधान। पादुका धारण करवीत ॥३२॥
संध्यावंदनादि पात्रें। पूजासाहित्य स्वतंत्रें। अर्चन सारितां पवित्रें। मांडिलीं पात्रें प्रसादा ॥३३॥
पूजापात्र आवरोन। सद्गुरुसन्निध उभा राहोन। भोजनीं करवी उदकपान। चंचल मन होऊं नेदी ॥३४॥
भोजन सरतां तात्काळ। करमुखप्रक्षाळनीं उष्ण जळ। वस्त्र दे पुसावया करमुखकमळ। तुळसीदळ अर्पित ॥३५॥
सवेंचि तांबूल अर्पित। प्रसादालागीं आपण जात। सत्वर आटपोनि कार्जे येत। सिद्ध करीत शय्येतें ॥३६॥
सद्गुरु निवांत स्थाना जाती। ध्यानीं निमग्न तेथें होती। आपण रक्षी द्वाराप्रती। आठवी चित्तीं सद्गुरुपदा ॥३७॥
होतांचि ध्यान विसर्जन। बाहेर येतां करी नमन। आश्रमा येती परतोन। करिती शयन मंचकीं ॥३८॥
चरणसेवेसी एकनाथ। सप्रेमभावें विनटत। निद्रा लागतां निश्चित। पाना ठेवीत उदक उशा ॥३९॥
जिकडे स्वामीचे चरण। आपण निजे त्यां सन्निधान। निद्रा करी सावधान। हांकारीं जोडून कर उभा ॥२४०॥
नमनीं लक्ष सर्वदा। कधीं न प्रवर्ते कोण्हाशीं वादा। सदा पाळीतसे मर्यादा। बोलतां सुधा वोगरे ॥४१॥
न मागे कदा कवणासि कांहीं। संतोषमान सदा देहीं। कार्या कधीं न म्हणे नाहीं। सेवीं तोही विटेना ॥४२॥
कार्यकृत्याचा न वाहे शीण। जीवना सोडोनि न जाय मीन। तेवीं सद्गुरुचरणी संलग्न। अंतरे प्राण क्षणार्धीस ॥४३॥
टवाळी निंदा द्वेष। यांचा नुपजे देहीं लेश। कधीं न राहे चित्तीं उदास। म्हणवी दास जनार्दनाचा ॥४४॥
जेंवी श्रीरामाचें सेवन। जीवेंभावें करी अंजनीनंदन। स्वामीपदा वेगळें आन। नेणे साधन दूसरें ॥४५॥
कीं कचनामें गुरुसुत। शुक्रसेवा प्रेमें करीत। आलस त्यजोनी अनुचित। सदा रत सेवेसी ॥४६॥
कीं मच्छींद्राचे चरणीं। सप्रेमें गोरक्ष लागे सेवनीं। कधीं वीट नाणी मनीं। वत्सभोजनीं नेत्र दे ॥४७॥
तेवींच हा एकनाथ। जनार्दनचरणीं जाला रत। दिवानिशीं आनंदभरित। सेवा करीत उल्हासें ॥४८॥
तयाची सेवा पाहोन। आश्चर्य करिती सकळ जन। म्हणती बाल्यअवस्था असोन। कितीं सावधान दक्ष हा ॥४९॥
असो यापरी बहु दिवस। सेवा करितां सावकाश। उल्हासयुक्त मानस। जीवीं त्रास नुपजे त्या ॥२५०॥

तंव कोणे एके काळीं । सभे बैसली मंडळी । पीकपात्र नव्हतें जवळी । जनार्दन न्याहाळीं एकनाथा ॥५१॥ मुखीं तांबूलाचा उगळ । एकनाथ जाणे तात्काळ । पुढें वोढवोनि करकमळ । खाकर तांबूल झेलिला ॥५२॥ जनार्दनाचा मुखप्रसाद । पावतां एकनाथा आनंद । प्राशन करी नाणोनि बाध । सेवितां आल्हाद मानसीं ॥५३॥ योग देखोनि सेवनाचे । कुसमुसिलें मन सकळ्यांचें । म्हणती केव्हढें धारिष्ट याचें । निर्विकाराचें कृत्य हें ॥५४॥ याहीवरी लोटतां कांहीं दिवस । जनार्दन बैसले सभेस । तांबूल भक्षितां बहुवस । पीकपात्रास भरियेलें ॥५५॥ तंव जनार्दन आज्ञापिती । पात्र शुद्ध करीं सत्वर गतीं । अवश्य म्हणोनि प्रीतीं । पात्र हातीं उचलिलें ॥५६॥ तंव सभा बैसली घनदाट । जावया न मिळे तया वाट । कार्य साधावया झटपट । कर्म आचाट मांडिलें ॥५७॥ पृष्ठी वेगें फिरवोन । मस्तकीं वस्त्र केलें धारण । पीकपात्र मुखीं लावोन । घटघटोन प्याला तो ॥५८॥ अंगुलीनें निपटोन चाटिलें । हें कितेक जनीं कर्म देखिलें । येरें पात्र शुद्ध चोखट केलें । सन्निध ठेविलें स्वामींच्या ॥५९॥ तंव सद्गुरु म्हणती एकनाथा । पीक कोठें जालासि टाकिता । येथोनि न पाहिलें तुज जातां । तंव तो वार्ता न बोले ॥२६०॥ जोडोनिया पाणिद्वयासी । अधोमुख केलें वदनासी । म्हणे काय वदूं मी स्वामीसी । नाहीं पात्रासी घूतलें ॥६१॥ हा अपराध जाला खरा । म्हणोनि कांपे थरथरां । सद्गद हृदय नेत्रीं धारा । शब्द उच्चारा नये तो ॥६२॥ सद्गुरु म्हणती जाल काय । येरू धांवोनि धरी पाय । म्हणे दाटणीमुळें उपाय । न चले स्वामिराय सत्य माझा ॥६३॥ तंव समाजन विनविती । एकनाथाची अद्भुत कृती । ती निवेदितों स्वामीप्रती । बरवी चित्तीं जाणिजे ॥६४॥ आपण आज्ञा केली त्यालागोनी । वेगीं पिकपात्र धुवोनी आणीं । येरें उचलोनी तत्क्षणीं । वेगीं क्षालनी जाऊं पाहे ॥६५॥ जातां मार्ग न मिळे तयासी । पाहतां दुःख न दे परासी । धुतां उशीर लागेल पात्रासी । विचार मानसीं करोनी ॥६६॥ मग तेणें काय केलें । पीकपात्र स्वयें प्राशिलें । करें चाटोनि शुद्ध केलें । पुढें ठेविलें स्वामींच्या ॥६७॥ प्राशितां न कुसमुसी अंग । हृदयीं सांठविला येणें रंग । निर्विकार याचें मन चांग । पाहतां दंग आम्ही जालों ॥६८॥ धन्य याची अनुपम सेवा । कांटाळा करितां नाणी जीवा । तत्पर वागे रजनीं दिवा । तुकितां तुकावा कोण यातें ॥६९॥ हा निष्पंक असे अंतरीं । सेवेसि सदा जोडोनि करी । याची दया येऊं द्या अंतरीं । पदांबरी पडिला पहा ॥२७०॥ तंव जनार्दनपंत वळवळले । उचलोनि त्यातें हृदयीं धरिलें । बा रे सेवितां तुज कैसें लागलें । मन कांटाळलें नसे तुझें ॥७१॥ सद्गुरुवचना परिसोन । एकनाथ विनवी तैं प्रार्थून । जीं गुरुवर्या करितां प्रसादपान । आनंद पूर्ण वाटतो ॥७२॥ काय वर्णूं याची गोडी । वाटे अमृत यातें कर जोडी । येर ते रस काय बापुडी । मज तो आवडी सेवनीं या ॥७३॥ येचविषीं स्वामीसी । प्रार्थितों जोडोनि करासी । सतत आज्ञा व्हावी सेवनासी । प्रिय मजसी बहु फार ॥७४॥ दिवानिशीं स्वामी सेवन । करावया लुब्धलें मन । नित्य या रसाचें घडो पान । आनंदघन येणें मी ॥७५॥ या प्रसादाचा महिमा । वर्णूं न शके मघवा ब्रह्मा । तो दैवें लाधला आम्हा । आज्ञा सर्वोत्तमा मज व्हावी ॥७६॥ सद्गुरु परीक्षक जो हरी । रत्न परीक्षिलें अंतरी । म्हणे हें योग्य अलंकारीं । भूषणा धारी याचेनी ॥७७॥ म्हणती या रे एकनाथा । दत्तीं होय दं लिहिता । दिशेव राखी प्रेमभरिता । आज्ञा आतां हे तुज ॥७८॥

अवश्य म्हणोनी ते क्षणीं। मस्तक ठेविला नाथें चरणीं। करीं घेवोनी दौत लेखणी। बैसला जावोनी त्याहाखया ॥७९॥
लिहितां साधिला तेणें आवर। जनार्दनाचें सांभाळिलें दफ्तर। सद्गुरु योपितां कारभार। तोही अंगीकार पै केला ॥८०॥
सांभाळोनि गुरूचें सेवन। करी दरबारींचें काज कारण। कोठें पडों नेदी न्यून। ही कृपा पूर्ण सद्गुरूची ॥८१॥
सकळही नवल करिती। धन्य धन्य याची ज्ञानशक्ती। सेवा फळली निगुतीं। जडली प्रीती यवनाची ॥८२॥
ऐसे कांहीं एक दिवस जाले यवनराज्यीं परचक्र आलें। हें यवनातें कळलें। तेणें जाणविलें जनार्दना ॥८३॥
तैं जनार्दन होते ध्यानस्थ। तें जाणोनी एकनाथ। स्वयें होवोनि जनार्दनपंत। दावी कृत्य आगळें ॥८४॥
न कळवितां सद्गुरूसी। रूप धरिलें वेगेंसी। मिरवोनि शस्त्राभरणांसी। सन्मुख सद्गुरूसी लक्षिलें ॥८५॥
करोनि सद्गुरूसी नमन। गेला यवनापाशीं सिद्ध होऊन। तया कुरनिसा करोन। कर जोडोन विनवीत ॥८६॥
जी काय आज्ञा बोलत। यवन पाहतांचि खुप वक्त। म्हणे परचक्र आलें राज्यांत। तें निर्गत करावें ॥८७॥
अवश्य म्हणोनि ते अवसरीं। ठोकिल्या संग्रामसंकेतभेरी। सेनासमुदाय सत्वरीं। महाद्वारीं दाटला ॥८८॥
एकनाथें तये वेळां। निघतां वंदिलें अधिपाळा। तैं आश्चर्य वाटे तयाला। हा युद्धकळा काय जाणे ॥८९॥
मग रूपधारका वचन। स्वयें अधिपति बोले आपण। अहो हें संग्रामींचें कर्म कठिण। विप्रआंगवण न चले कीं ॥१९०॥
पुनरा बोले मायिक पंत। जी आपुली कृपा समर्थ। वरी सद्गुरूचा अभयहस्त। असतां जयवंत सहजची ॥९१॥
सिंहाचिया बाळका। काय जंबुकाचें भय देखा। देखोनिया बिडाळिका। खगनायका दर्प कैंचीं ॥९२॥
आपुला असतां वज्रपंजर। पडल्या आकाशा देऊं धीर बाळ आनि न म्हणावा निर्धार। जाळी कांतार पेटल्या ॥९३॥
परिसोन नाथाचें वचन। म्हणे या यश ध्वज उभा रोन। येरे करोनिया वंदन। निघे आपण चपलत्वें ॥९४॥
आठवोनि सद्गुरु समर्था। वहनीं जाला आरूढता। समुदाय शोभे सभोंवता। आनंद चित्ता युद्धार्थी ॥९५॥
नाना वाद्यें पुढें वाजती। डंके निशाणें फडकती। पुढें धांवती पदाती। अश्वपती त्यामागें ॥९६॥
मानिकीं शोभलें गजदळ। उल्हाटयंत्रे सर्व प्रबळ। शक्ती तोमर पट्टीश सरळ। सोडोनि सकळ वीरसिद्ध ॥९७॥
गिरिकंदर उल्लंघोन। शोधोनि फाटीती परसैन्य। संग्रामीं त्यातें पाचारून। साम संधान योजिलें ॥९८॥
नानापरी करोनि बोध। सेडी आरंभिला भेद। परी न मनवी मतिमंद। सकळ विरुद्ध मांडिलें ॥९९॥
हें परिसोनि एकनाथ। सेनेलागीं आज्ञा देत। जरी न मानिती उन्मत्त। युद्धीं बळ हत करावें ॥२००॥
ठोकिल्या तेव्हां संग्रामभेरी। खाकाईलें रणमोहरीं। नाद दुमदुमिला अंबरीं। केली वीरीं गर्जना ॥१॥
सिंहनाद करोनि थोर। उल्हाटयंत्राचे करविलें मार। सवेंचि धांवले अश्वस्वार। परिघ तोमर पडताळिले ॥२॥
पायभार पुढें लोटला। तेणें योजिल्या भिंडी माळा। शक्ती पट्टीश सरळा। बाणजाळा टाकिलें ॥३॥
उभय दळांचे मेळीं। वीरीं मांडिली हातफळी। शस्त्रघायें महावळीं। भूमितळीं पाडिले ॥४॥
एकनाथाचे वीर दुर्धर। निकुरें घाव घालिती निष्ठुर। परसैन्याचा करिती संहार। न धरवे धीर वीरांतें ॥५॥
परवीर करिती अवलोकन। तंव अद्भुत चमू दिसे त्यांलागुन। मार होती चहूंकडोन। अति निर्वाण मांडिलें ॥६॥

शस्त्रपर्व घनदाट । नाथ दळें पुरविली पाठ । पळावया नाहीं वाट । अनिवार भट यवनाचे ॥७॥
अचाट देखोनि मारे । परवीरां सुटलें भयवारें । म्हणती पळा रे पळा रे । जीव वरें वांचवा ॥८॥
बळ देखोनि अद्भुत । मारितां तृण दांतीं धरीत । कितेक आडमार्गी पळत । न करा घात नाथ वदे ॥९॥
कितेक वीर रणीं पडले । कितेक प्राण घेवोनि पळाले । परसैन्य नागविलें । ऐश्वर्य लुटिलें तयाचें ॥३१०॥
सद्गुरुप्रसाद नाथा थोर । रणीं जाला जयजयकार । सुमंगल शब्दें वाद्यजर । गर्जती वीर स्वानंदे ॥११॥
यशध्वज फडकती । भाट वंदिजन गुण वर्णिती । चमूसह नगरीं येती । पुढें दूतीं जाणविलें ॥१२॥
जाल्या युद्धाचा वडिवार । अधिपा निवेदिती काठीकर । कंदन करोनि अनिवार । केले परवीर जर्जर रणीं ॥१३॥
असंख्य वीर अटिले । कितेक जीव घेवोनि पळाले । दांतीं तृण धरितां सोडिले । वीर नागविले लुटोनी ॥१४॥
आपुले कृपें करोन । यशध्वज आले उभारोन । अधिपें ऐकतां वर्तमान । वस्त्रें भूषण दिधलीं त्या ॥१५॥
मानीक धाडिले सामोरे । तें पंतासी परम सत्कारें । आणिले परमानंद गजरें । केले मुजरे अधिपातें ॥१६॥
खडी ताजीम दिधली पंता । समोर जाला बैसविता । हर्ष न माये यवनचित्तां । ऐश्वर्य अर्पिता पंत होय ॥१७॥
आणिलें केलें निवेदन । पाहतां यवन संतोषमान । वस्त्र अलंकार भूषण । कृपें करून देतसे ॥१८॥
आज्ञा अधिपाची घेतली । नाथमूर्ती गृहा आली । मूर्ती सद्गुरूची वंदिली । नाहीं निवेदिलीं कृतकर्में ॥१९॥
सद्गुरूचें जालें ध्यानार्चन । भोजन शय्या कर्में सारोन । सभेप्रती केलें गमन । ताजिमीलागून अधिप उठे ॥२०॥
जनार्दना वाटे नवल । तंव अधिप आनंदें बोलें बोल । धन्य तुमचें युद्ध प्रबळ । अरि सकळ नाशिले ॥२१॥
येवढें परदळ अरिष्ट आलें । तयातें रणीं तुम्हीं जिंकिलें । ध्वज यशाचे उभविले । नांव रक्षिलें आमुचें ॥२२॥
धन्य तुमचे काजकाम । साधिला पुरुषार्थ उत्तम । धन्य आजिचा पराक्रम । आमुचा श्रम रक्षिला ॥२३॥
जनार्दन म्हणती काय जालें । गौरविनां वचनी मज न कळे । मानिकानी ते वेळे । आद्यंत कळविलें पंतासी ॥२४॥
ऐकतां सर्व समाचार । जनार्दनें शोधिलें अंतर । म्हणे हा एकनाथाचा कारभार । कळला साचार येथवां ॥२५॥
ओळखोनि एकनाथाचे कारण । मनीं जालें आनंदघन । अधिपा म्हणती भाग्य गहन । आलें दिसोन मज खरें ॥२६॥
पुण्यें यश संपादिलें । सहजें लाभ हातां आलें । योग्यतेसी चढविलें । सर्वही फळलें हरिकृपें ॥२७॥
जनार्दनें जाणोनि वर्म । गुप्त ठेविलें कृतकर्म । म्हणे हा अवतार उत्तम । भवभ्रम नाशक ॥२८॥
अननारूपें मूर्तिमंत । वरी नांव एकनाथ । अनाथा करावया सनाथ । प्रगट जगांत जाहला ॥२९॥
जनार्दन होवोनि सद्गदित । आणिलें आंत मुरवीत । आश्रमीं जावया त्वरित । आज्ञा मागत अधिपातें ॥३०॥
पुनरा वस्त्र अलंकार । देवोनि अधिप करी सत्कार । शिबिका आणोनि सुंदर । केला आदर पंतांचा ॥३१॥
आज्ञा होतां पंतांसी । आनंदें पावले आश्रमासी । वृत्त विचारिलें नाथासी । तेणें पदांसी निवेदिलें ॥३२॥
तें गुह्य गुप्त ठेविलें । कांहीं दिवस वरी लोटले । एकनाथ सेवेंत रुळे । परी न मळे मन त्याचें ॥३३॥
सर्व सेवेचें आचरण । नयनीं पाहे जनार्दन । त्यांत नीच कार्य आलें आढळोन । शौचसदन पाटव्य ॥३४॥

म्हणे ऐसें हें कोण करी । शोधितां तो एका सांवरी । जनार्दनें देखोनि सत्वरीं । मग पाचारी एकनाथा ॥३५॥ नाथासि बोलती उत्तर । तूं काय आहेसी हलालखोर । म्हणोनी ही सेवा वारंवार । करितो साचार सांग मज ॥३६॥ परिसोनि एका लागे पदासी । म्हणे मी काय हरामखोर आढळलों तुम्हासी । वागल्या दंड करा दासासी । मज दीनासी ठाव हा ॥३७॥ वचनीं हर्षनिर्भर । म्हणती सान वय कोमळ कुमर । विद्या संपादोनि जाला रणधीर । सेवा अपार केली येणें ॥३८॥ याची निष्ठा आमुचे पदीं । साहिली आमुची सर्व उपाधी । सर्व कारणीं तीव्र बुद्धी । अंतरशुद्धी धन्य याची ॥३९॥ हें कृपें योग्य असे पात्र । बीजप्रेरणेसी उत्तम क्षेत्र । यासी भेटवावा त्रिवक्त्र । दत्त सत्पात्र जगद्गुरू ॥३४०॥ जनार्दन दयेचा सागर । कळवळलें प्रेमें अंतर । पुढिले प्रसंगीं अभयकर । देतलि उदार युक्तीनें ॥४१॥ सद्गुरु समर्थावांचोन । पतितासी पावन करील कोण । जीवा तारक सद्गुरूचरण । करावें सेवन अहर्निशीं ॥४२॥ तप तीर्थ व्रत नेम । याग यज्ञ क्रिया दानधर्म । गुरुसेवेहुनी उत्तम । हे अनुक्रम न होती ॥४३॥ सद्गुरुसेवा अति थोरें । मुगुटमणी सर्वांवर । त्या सेवे जे वेधले नारीनर । त्यांचा पादधर अनंतसुत ॥४४॥ अनंत संतसाधुमहंत । त्या पदांचा सुत अंकित । म्हणोनि कृपाळु श्रीदत्त । होवोनि ग्रंथ वदवीतसे ॥४५॥ पुढील प्रसंगीं गोड गहन । रसाळ होईल निरोपण । तैं प्रेमळ भाविकांलागोन । लाभ संपूर्ण जोडेल ॥४६॥ इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । सदा परिसोत भाविक भक्त । एकपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥३४७॥

॥ इति एकपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ५२ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीसद्‌गुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय सद्‌गुरु दत्त दयाळा । अनाथनाथा त्रिभुवनपाळा । तूं सकळांचा जिव्हाळा । तव चरणकमळा प्रणम्य ॥१
सज्जन जीवना सुखसागरा । धीरगंभीरा उदारा । स्वपददायका दातारा । अनन्यासि तारा कृपानिधे ॥२
जयजय भवतापमोचका । शुद्ध सत्त्वा सर्वात्मका । कोण पावे तुझिया तुका । सर्वाधिका सर्वज्ञा ॥३
तुझा अनुपम सोहोळा । अतर्क्य तुझी सर्व कळा । कोणा वर्णवे तुझी लीळा । वेद वरळा तरळत ॥४
तेथें मंदमती मी अज्ञान । वर्णूं पाहें तुझे गुण । जेंवीं पिपीलिकेची आंगवण । कवळीन गगन कवळींत ॥५॥
मत्कुणें धरिली हांव । म्हणे मी आणितों सागरतळठाव । चिलटें केला उठाव । दिनराव भेटीचा ॥६॥
तेवीं अर्भक मी बुद्धिमंद । अधिकार न जाणोनि घेतला छंद । रत्नपरीक्षी न म्हणे अंध । पांगुळ भेद करूं पाहे ॥७॥
हे मिथ्याचि वार्ता सारी । मूढें हांव धरिली अंतरीं । तळमळ जीवीं खरी । जाणता निर्धारीं तूं होसि दत्ता ॥८॥
तूं चित्ताचा चाळक । तूंचि सर्वात्मीं परीक्षक । सत्ता मात्र तुझी देख । दास रंक मी तुझा ॥९॥
तुज उद्देशें तपाचरण । नाहीं केलें अनुष्ठान । नाहीं केलें जप ध्यान । व्रत दान नाहीं केलें ॥१०॥
कांहीं न केली तुझी सेवा । वळें मागतों प्रसादमेवा । अर्चिल्यावांचोनि ठेवा । कैसा निर्दैवा लाभेल ॥११॥
माझे मज अवगुण । कळों येताति संपूर्ण । अपराधी आगळा सर्वांहोन । अनाथ दीन हीन मी ॥१२॥
तुझी कृपा व्हावया । कांहींच न जाणेंचि उपाया । परी तुजचि उद्भवली दया । करुणालया गुणनिधे ॥१३॥
सदया केलासि बुद्धिभेद । लाविला निजनामीं भजनीं छंद । दिधला प्रेमा हृदयीं आल्हाद । सत्संग शुद्ध जोडविला ॥१४॥ लागतां संतांचे चरणीं । जाली पातकांची धुनी । मन रंगलें भजनीं । श्रवण कीर्तनीं विरूढलें ॥१५॥
तेथें तूंचि बुद्धिदाता । जालासि कृपाळू श्रीदत्ता । आपुली आपण निरोपिली कथा । प्रसंग अर्था पाहोनी ॥१६॥
तदर्थ आज्ञा वारंवार । करिता होसी तूं दिगंबर । लिहुनी ठेवीं विस्तार । प्रबोधप्रकार लीलादि ॥१७॥
सेवा घ्यावी दीनाहातीं । सद्‌गुरु तुमच्या वागलें चित्तीं । म्हणोनि ग्रंथीं देवोनी स्फूर्ती । चालविसी प्रीतीं गूढमुखें ॥१८॥
साहित्याची पूर्णता । तुझा तूंचि करिसी समर्था । मज पुढें करोनि निमित्ता । होसि निरोपिता तुझा तूंची ॥१९॥
येथील कथेचें नवलाव । जाणती श्रोते अपूर्व । चाड त्यांतें अभिनव । श्रवणीं समुदाव माविकांचे ॥२०॥
ग्रंथ सरोवर पावन । कथा कुमुदिनी विकासमान । अर्थ मकरंद करूं सेवन । रुंजी घालून भ्रमर श्रोते ॥२१॥
यांची जाणोनि लालसा । पाजीं स्वकथामृतरसा । तूं दयार्णव स्वामी अविनाशा । वदवीं यशा आपुल्या ॥२२॥
गत कथाध्याय अंतीं । समर्थी एकनाथा यशप्राप्ती । जनार्दनें आलिंगिला निजप्रीतीं । कळवळा चित्तीं उपजला ॥२३॥
हें श्रोतीं परिसिलें कथन । येथोनि श्रवणीं व्हावें सावधान । गोड कथारस गहन । करा पान सानंदें ॥२४॥
जनार्दनें पाहिलें कृपा दृष्टीं । परी आणिक चोजवाळ्यें वाटे पोटीं । दिवसेंदिवस राहाटी । काज कंठीं घातलें ॥२५॥
एकनाथें आज्ञा वंदोनी । दिवारात्री सेवा साधोनी । आनंद संतुष्ट सर्वदा मनीं । स्वकर्माचरणीं जागृत ॥२६॥

जनार्दन विचारिती मानसीं । हा सर्वस्वें गुंतला सेवेसी । कांहीं न मागे द्रव्य आम्हांसी । मातापितरांसी धाडावया ॥२७॥
नैराश्य अंतर ओळखिलें । प्रपंचार्थ द्रव्य पाठविलें । न्यून परिपूर्ण त्याचें केलें । न कळविलें एकनाथा ॥२८॥
उभय सेवेसी एकनाथ । न्यून पडों नेदी किंचित । तारुण्यअवस्था जाली प्राप्त । परी विपरीत नाचरे ॥२९॥
दिवा निशीं काजकारण । तेथेंचि रत सेवेंत मन । सहजें होतसे इंद्रियदमन । कुसंग धारण नावडे ॥३०॥
अंतर्बाह्य सदा शुद्ध । न जाणे कदा रळी विनोद । स्वरूपगुणें प्रसिद्ध । पाहतां आल्हाद सर्वांसी ॥३१॥
तंव त्या नगरीं माझारीं । अद्‌भुत जाली नवल परी । विप्रकन्या गत भर्तारी । रूपसुंदरी सुकेशा ॥३२॥
होती लावण्य नवयौवन । तिजपासोनि घडलें दुराचरण । उदरीं जाला गर्भ धारण । आला कळोन तिजप्रती ॥३३॥
दिवसेंदिवस आगळा । गर्भ तिचा वाढों लागला । गुजबुज फुटली जनाला । शोध केला सकळिकीं ॥३४॥
साच कळतां गर्भिणी । गृह त्याज्य केलें तें ब्राह्मणीं । म्हणती कळवावें दिवाणीं । योग विचक्षणीं मांडिला ॥३५॥
हें कळतां जारिणीसी । परम भय पडली मानसीं होईल आतां विटंबनेसी । काय ऐसियासी करावें ॥३६॥
जो लंपट होता यार । तो पूर्वी यवनाचा कामदार । जनार्दनपंतासी देतां अख्त्यार । यवनें दूर त्यासि केलें ॥३७॥
त्या दिवसापासोन । तो पाहात होता पैशून्य । याचा लाग न पवे जाण । जळे पूर्ण मानसीं ॥३८॥
असतां दत्तकृपेची छाया । कोण दुष्ट करूं शके अपाया । संकटीं घालितां पंडुतनया । कौरव ठायां मुकले ॥३९॥
देव सतीसी छळितां । सकुळेंसी रावण पावला घाता । सुग्रीवासी गांजितां । पावला प्राणांता वाली तो ॥४०॥
ज्याची कुबुद्धी त्यासी मारी । ज्याची सद्‌बुद्धी त्यासी तारी । हें वर्म नेणोनि दुराचारी । दुष्ट भरीं भरताती ॥४१॥
असो एके दिवशीं रजनीं । जारासि भेटली जारिणी । सकळ वृत्त त्यालागोनी । निवेदोनी रडतसे ॥४२॥
येरू म्हणे कां भीसी । युक्ति सांगेन जरी ऐकसी । निर्भीड होइजे मानसीं । करीं जा ऐसी गोष्टी हे ॥४३॥
तुज दिवाणीं नेती धरून । जबानी घेतां लिहून । तरी धैर्य मनीं धरोन । बोलें वचन हेंच पैं ॥४४॥
कीं जनार्दनपंत कारभारी । त्याचा एकनाथ वागे दरबारीं । याची कृपा हे मजवरी । गर्भ निर्धारीं त्याचा हा ॥४५॥
हें दृढ धरोनि मानसीं । लिहून देतां निश्चयेंसी । तो प्रिय आहे यवनासी । ऐकोनि तुजसी सोडतील ॥४६॥
जनार्दन आमचा रिपु जाण । त्याचा होईल अवमान । माझें काम मज सोंपून । तुझें कल्याण करीन मी ॥४७॥
यापरी सुचवूनि मात । आपुलाले आश्रमीं जात । नारी अर्भका निश्चित । विचार मनांत कैचा त्या ॥४८॥
आधींच मर्कट जाण । त्यावरी जालें मदिरापान । वरी वृश्चिकाचें ताडन । वेडेचार कोण पुसावे ॥४९॥
आधींच मूढ पामर । त्यावरी पिसाट तामस घोर । वरी जाला भूतसंचार । धरिता वेडेचार काय उणें ॥५०॥
तेवीं आधींच ते नारी । त्यांत प्रवर्तली व्यभिचारीं । त्यावरी दुष्ट बुद्धीतें प्रेरी । अनर्थ करी काय उणें ॥५१॥
असो इकडे कमिसातें । कितेकीं जाणविलें वृत्तांतातें । सकेशा विधावा धरी गर्भातें । विपरीत कर्मातें आचरली ॥५२॥
कोतवाल काजीक यवन । त्यांनीं तीतें आणिलें धरोन । पुसती हें कर्म कोण । घडलें फोडून सांग तें ॥५३॥
येरी म्हणे काय पुसतां । बोलावें परी नये सांगतां । कठिण असे हे वार्ता । दुःख समर्था लागेल ॥५४॥

कामीक म्हणती तिज । कर्मारंभीं सांडिसी लाज । आतां कायसी त्याची ओज । फोडी गुज अंतरिंचें ॥५५॥
येरी म्हणे द्या अभय । माझी न विटंबावी काय । तरी सांगेन कैसें काय । यथार्थ होय तेंचि पैं ॥५६॥
ते बोलती सत्य बोलतां । तुजसी कैंची भयचिंता । जालें कर्म निवेदीं आतां । पडेल माथां ज्याचें त्या ॥५७॥
मग कुबुद्धी ते नारी । सद्गद कंपित शरीरीं । बोलतां नेत्र भरले नीरीं । मुखें उच्चारी कर्मातें ॥५८॥
म्हणे मी काय बोलूं बोला । मजवरी घातला घालें घाला । आम्ही स्त्रीजाति निर्बळा । उपाव सत्तेला नाहींच कीं ॥५९॥
अधिपाचा दिवाण । त्या जनार्दनाचा प्रिय प्राण । एकनाथनामें करोन । योग पूर्ण त्याचा हा ॥६०॥
हा तरी भूपांचा प्रिय । वदावें म्यां कैसें काय । चहूंकडोनि माझा अपाय । बोलतां धाय मोकलिली ॥६१॥
कामीक म्हणती हे अद्भुत । कर्म आचरेल काय एकनाथ । येरी म्हणे मी असत्य । होतां प्राणांत न बोलें ॥६२॥
मग लहानथोरीं केला विचार । गुप्त न ठेवावा प्रकार । घाला अधिपाचे कानावर । घडेल निर्धार घडो तैसें ॥६३॥
तात्काळ शहाणे उठले । त्यांनीं अधिपाचे कानीं घातलें । लिखित वाचोनी दाखविलें । श्रवणें गजबजलें मन त्याचें ॥६४॥
म्हणे योग्य तो जनार्दन । एकनाथ तोही अति सुज्ञ । ऐसें कर्म त्यापासोन । कैसें घडोन येईल ॥६५॥
न जाणों हे काळगती । कैसी फिरली नेणों मती । काय करावी यातें युक्ती । कुंठित मती बोलावया ॥६६॥
स्थिर राहोनि क्षणभर । म्हणे जनार्दनपंता पाचारा सत्वर । जाती वेगें आज्ञाधर । जोडिते कर पंतातें ॥६७॥
जी आपणा सभेसी । पाचारिलें अति वेगेंसी । जनार्दनपंत शिबिकेसी । बैसोनि त्वरेंसी पावले ॥६८॥
अधिपानें ताजीम देवोन । बैसतां अन्योक्ति करी भाषण । बोलतां जबानी करीं देवोन । करावें मनन आज्ञापी ॥६९॥
गर्भ अवलोकन केला । तात्काळ मुखेंदु उतरला । म्हणे आणा सभें ब्राह्मणीला । विचारूं तिजला स्वमुखें ॥७०॥
आणितां सभें ती खट । म्हणती बाई बोलें स्पष्ट । येरीं आधींच उन्मत्त धीट । सरसावे नीट बोलावया ॥७१॥
म्हणे घेवोनी सर्व लाज । समारंगणीं आणिलें मज । आतां भिडेचें काय काज । जबानी गुज खरें तें ॥७२॥
तुमचे एकनाथपंत शहाणे । बलात्कार केला मज तेणें । जमीं मिरविलीं भूषणें । थोरपणें आपुल्या ॥७३॥
सत्तेपुढें शहाणपण । काय करील बळ क्षीण । आजवरी ठेविलें संकोचोन । परी ओढवोन आलें पुढें ॥७४॥
करितां येलें अविचारकर्म । सभें विचारितां मज वर्म । हा काय वडीलपणाचा धर्म । प्रणांत शम किती धरूं ॥७५॥
परिसोनि अर्भकेचें उत्तर । जनार्दन मनीं जाले क्रूर । हीनत्व आलें अपार । न राहवे स्थिर कांहीं त्या ॥७६॥
पाचारोनि सांगे दूता । म्हणे वेगीं पाचारा एकनाथा । म्हणे सन्मुखासन्मुख आनां । विचार पुसतां जाणवेल ॥७७॥
दूतें पाचारोनि एकनाथासी । वेगीं आणिलें सभेसी । येरें नमोनि जनार्दनासी । तस्लीम यवनासी बजावी ॥७८॥
जोडोनियां दोन्ही कर । उभा राहिला समोर । जी कवण कार्याची जरूर । ते आज्ञा सत्वर मज कीजे ॥७९॥
तेव जनार्दनपंतें जबानी । सन्मुख दिधली भिरकावोनी । येरू दिरसा वंद करोनी । पाहे वाचोनी मथितार्थ ॥८०॥
वाचितां गद्गदां हांसे । जनार्दन म्हणती सांग कैसें । असत्य वदतां दुर्दशे । पार नसे उभयांच्या ॥८१॥
एकनाथ म्हणे जी दातारा । मानेचा ठेव्ळ करितां घरा । परी वंद छपावणीस हा थारा । योजिला खरा सत्य हें ॥८२॥

मातेचें अनिवार वंड । कळेल तें करील कुभांड । एवढें वाढविलें ब्रह्मांड । करा दंड विचारें ॥८३॥
परपुरुषावरी आळ । घालोनि लाविती विटाळ । व्यभिचारी परम चंचळ । अनिवार प्रबळ ढालगज ॥८४॥
सत्पुरुषातें निजवोन । येर कृत्यीं रममाण । परम कौटाळी हे जाण । लाविलें दूषण भल्यातें ॥८५॥
तुम्ही मानितां इचा विश्वास । मान्य करणें आलें आम्हांस । परी नसतां अंगीं स्थापावा दोष । विचारीं मानस न घाला ॥८६॥ इच्या वचनें विश्वासतील । आपण बुडोनि येरां बुडवील । सर्वेशीं पाहतां नागवील । घेरीं घालील समजावें ॥८७॥ इची अद्‌भुत जाचणी । कितेक घातले कांचणीं । इचे न नाचावें नाचणीं । वित्तसांचणीं सांचों नदी ॥८८॥
ज्यांनीं इतें ओळखिलें । दुरखोनि परते राहिले । तेच इजपासोनि वांचले । पूर्ण पावले सुखातें ॥८९॥
ऐकोनि एकनाथाची मात । जनार्दन हृदयीं निवांत । परी यवनाचें चित्त । विकल्पित राहिलें ॥९०॥
तें निर्मळ व्हावयालागुन पुनरा पंतें करूं आदरिलें भाषण । तें श्रोतीं कीजे श्रवण । सावधान होवोनी ॥९१॥
जनार्दन म्हणे तैं ब्राह्मणीसी । एकनाथ काय बोले सभेसी । मातापद दिधलें तुजसी । वागलें मानसीं कीं नाहीं ॥९२॥
येरी म्हणे मी न वदें असत्य । एकनाथाचेंच हें कृत्य । येर नसे मातें भर्त । गर्भ सत्य या बीजें ॥९३॥
वचन जरी न वाटे प्रमाण । तरी सांगाल तें दिव्य देईन । एकनाथें सोडिला इमान । मजसीं बैमान होवोनी ॥९४॥
कर्म करोनी निराळा । पाटव्यपणाची दावितो कळा । साधु होवोनि बगळा । मत्स्यीं डोळा ध्यान दावी ॥९५॥
मैंद मार्गीं साधु होऊन । कथी भाविकां ब्रह्मज्ञान । परी वित्तहरणीं सदा मन । घेतसे प्राण क्षणार्धें ॥९६॥
तुम्ही सभासद सर्व ज्ञाते । विश्वासलां मदांध वचनातें । हें उचित नोव्हे तुम्हांतें मज गाईतें गांजितां ॥९७॥
बोलतां होय ती सद्गदितें । परिसोनि फिरलें जनांचें चित्त । म्हणे ऐकोनि बोले एकनाथ । तरी वृत्त खरें हें ॥९८॥
ही लावण्यसुंदर कुरंगनयनी । आणि बाळ तारुण्य यांलागोनी । अधिपाचे बळें करोनी । विपरीत करणी केली हे ॥९९॥
सवें उभी राहोन । असत्य केवीं बोलेल कामीन । चातुर्यतेचें धीटपण । एकनाथ आपण बोलतो ॥१००॥
एक म्हणती हा जोडा । वराच मिळाला पडिपाडा । दोन उणे दोही कडा । कासया विघडा करीतसां ॥१॥
एकनाथा नाहीं कामिनी । भ्रतार नसे इजलागोनी । यांत पाहातां द्विजयोनी । समय गुणी युक्त हे ॥२॥
ऐक्यपणीं लग्न लागलें । सभामंडपीं पूर्ण सोहाळे । जनार्दनाचें भाग्य आगळें । सम्हमेळें लाभ खरा ॥३॥
एक म्हणती सावधान । जाले साक्षी सर्व वर्ण । सभे बैसलेती यजमान । गौरव पूर्ण त्यां हातीं ॥४॥
लग्न सुनमुख जाले साडे । श्रवणें तृप्त जालीं वऱ्हाडें । सजवा चक्रधराचें घोडें । वरात निघाडे काढावी ॥५॥
ऐकोनि जनांच्या गोष्टी । यवन क्रोधावला पोटीं । पाहे जनार्दना क्रूर दृष्टीं । म्हणे शेवटीं हेंचि काय ॥६॥
वदे जनार्दन एकनाथा । सत्य वदे वेगीं आतां । सांडी तर्कट वाउगी वार्ता । पावसील घाता या गुणें ॥७॥
परिसोन सद्गुरुवचन । प्रार्थी पुन्हा कर जोडोन । सत्य मिथ्या उभय वचन । कैंवी कळोन येईल तुम्हां ॥८॥
वास्तव माझी विनंती । गर्भेचि करील निवृत्ती । त्या श्रवणें फिटेल भ्रांती । या विपत्ती वाढवितां ॥९॥
परिसोनि गर्भाचें भाषण । करणें तें करा दंडन । ऐसें ऐकोनि नाथवचन । विस्मित मन सकळांचें ॥११०॥

ऐकतां वाटते नवल । म्हणती गर्भ कैसा बोलेल । श्रेष्ठ म्हणती कळेल । कासया चळवळ करा उगीं ॥११॥
एकनाथ म्हणे समोर । आणा गर्भीण ती सत्वर । कंकणालागीं आदर्श कर । कासया निर्धार पाहिजे ॥१२॥
तवं सन्मुख तीतें आणिलें । एकनाथें प्रेमें नमिलें । उदरीं करातें फिरविलें । स्मरण केलें सद्गुरुचें ॥१३॥
म्हणे परियेसी गर्भस्था । कोठोनि जालासी संभवता । ते सत्य सत्य बोलोनि वार्ता । वारीं चिंता सर्वांची ॥१४॥
तूं सर्वात्मक सर्वेशा । वारीं वारीं या अपेशा । तोडीं तोडीं संकटपाशा । न पाववीं नाशा निरर्थक ॥१५॥
माझें आचरणीं केउतें चित्त । यातें सद्गुरु साक्षीभूत । प्रारब्धें ओढवला हा अनर्थ । निर्धूतपंथ व्हावयाचा ॥१६॥
गर्भा होय तूं निधडा । करीं वदोनि निश्चय निवाडा । न धरीं कवणाच्या भिडा । धरिली सोडा मौनमुद्रा ॥१७॥
ऐसी एकनाथ बोलतां वाणी । शब्द जाला गर्भांतुनी । सावध परिसा तो श्रवणीं । शब्द कोण्ही न करावा ॥१८॥
यवन म्हणे सांडा गोष्टी । नवल पाहा उगें दृष्टीं । शब्द सांठवा कर्णपुटीं । निर्णय शेवटीं कोणता ॥१९॥
गर्भ म्हणे जी आइका । अनृत भाषणी ह्या नायका । यांचा विश्वास धरूं नका । न सोडिती जनका भोगितां ॥१२०॥
स्त्रीचरित्रासी नाहीं पार । देवादिकां न कळे विचार । केंवि जाणे बापुडा नर । यांचे वेव्हार सर्व खोटे ॥२१॥
एकांतीं लोकांतीं जाण । इशीं न करावें गुह्यभाषण । हें भलतेंच लावी दूपण । करवी पतन नरकवासीं ॥२२॥
इचा होतां किंचित संग । महा तपिये पावले भंग । इचे अद्‌भुत असती रंग । गाइले प्रसंग पुराणीं ॥२३॥
आतांचि पहा पहा रोकडें । एकनाथ रत्न चोखडें । त्यातें तुम्हां हातीं लाविलें वेडें । रचोनि कुडें कुभांड ॥२४॥
एकनाथ सद्गुरुदास । निर्विकार त्याचें मानस । निरहंकार निर्दोष । पाप लेश नाचरे ॥२५॥
तो पवित्र सर्व अंगीं । तारक जन्मला या जगीं । रंगलासे सेवारंगीं । विपयउद्योगी नसे हा ॥२६॥
ही रांडचि असे नष्ट । इचा भर्तार तोहि पापिष्ट । उभयमिळोनी दिधले कष्ट । रचिलें अरिष्ट साच हें ॥२७॥
गर्भसंभव जेथोनि जाला । तोहि निरोपितों सकळां । प्रथम दिवाण जो अधिपाला । रत जाला तो इतें ॥२८॥
रमत होते बहुदिवस । पाप न सहे जगतास । ते आणावया उदयास । संभव गर्भास जाहला ॥२९॥
गर्भ वृद्धीतें पावतां । जगीं फांकली ते वार्ता । सकळीं रचिलें संमता । पळवावें आतां दिवाणी ॥१३०॥
कामिकां यावें दाखवोन । ते दंटितील इतें नेवोन । ऐसा नेम होतां पूर्ण । तो इजलागोन श्रुत जाला ॥३१॥
जावोनि भेटली भर्त्यासी । म्हणे काय करूं ऐसियासी । तो बोधिता जाला इसी । न भीं मानसीं म्हणतसे ॥३२॥
अधिपाचा मी दिवाण । परी प्रस्तुत वागे जनार्दन । त्याचें माझें वैरत्व जाण ओटवीं विघ्न हें तेथें ॥३३॥
एकनाथ त्याचा किंकर । तो वयें रूपगुणें सुंदर । त्या नावें करीं गजर । नेतां निर्धार सभें तुज ॥३४॥
तेथें चर्चे भेदी वैखरी । पुसतां बोले याच उत्तरीं । एकनाथें बलात्कारीं । केला मजवरी अनर्थ हा ॥३५॥
ते बुद्धि दृढ धरोन । सभें बोलतसे ही वचन । हे दुराचारी भ्रष्ट जाण । न्याय दंडन करावें ॥३६॥
एकनाथ महापुण्यशीळ । अंतर्बाह्य पवित्र निर्मळ । यासी लावितां न लागे मळ । भानुमंडळ जैसें शुद्ध ॥३७॥
यापरी गर्भ वदला । सर्वेचि मौन्यतें पावला । सभें निवाडा निवडला । आनंद जाला अधिपातें ॥३८॥

खालावल्या दुर्जनमाना। वनिता जाली तैं म्लानवदना। हर्ष इतरांच्या मना। गाती गुणा आनंदें ॥३९॥ जयजयकारें पिटली टाळी। एकनाथा भेटती तये वेळीं। म्हणती चिंतेची काजळी। फेडोनि उजळीं केलीं मुखें ॥४०॥ जनार्दन एकनाथा। निजप्रेमें जाला आलिंगिता। येरू चरणीं ठेवोनि माथा। जाला वंदिता सद्भावें ॥४१॥ अधिपें दोघां अंलिंगिलें। म्हणे वृथाचि म्यां यांतें गांजिलें। हे तंव असती सत्त्वा आगळे। कौतुक दाविलें स्वनिष्ठें ॥४२॥ मग वस्त्रें आभरणें देवोन। केला उभयतांचा सन्मान। जारजारिणीतें आणोन। केलें विटंबण तयांचें ॥४३॥ पारिपत्य उभयांचें केलें। काळें मुख जगीं जालें। रासभीं बैसोनि मिरविलें। कर्म फळें ज्याचें त्या ॥४४॥ एकनाथ जनार्दन। यश पावले परिपूर्ण। हें सद्गुरुकृपेचें महिमान। तारी आचरण निष्ठावळें ॥४५॥ असो अधिपातें मुजरे। करोनि आज्ञा घेती त्वरें। येरू स्वानंदगजरें। लावोनि तुरे बोळवी ॥४६॥ आनंदें आश्रमा जावोन। नित्य नेमें वर्तती पूर्ण। आपुलालें ध्येय ध्यान। करिती अर्चन भजन तें ॥४७॥ दिवाणमाजी एकनाथ। जनार्दन आज्ञें काज करित। यवनाशीं प्रेमा वाढवित। तोषवी चित्त सद्गुरूचें ॥४८॥ सेवेंत पडों नेदी अंतर। तैसाच काजकृत्यें राखी दरबार। आज्ञा वंदोनि राहे सादर। अणुमात्र अंतर पडों नेदी ॥४९॥ सेवा पाहोनि आनंदघन। जाले स्वामी जनार्दन। म्हणती याचें उत्तम लक्षण। अवतार धारण मानवी ॥१५०॥ असो कांहीं एक दिवस लोटतां। जनार्दन आज्ञापी एकनाथा। हिशेब सिद्ध करोनि आता। दावीं गुणवंता मजलागीं ॥५१॥ अवश्य म्हणोनि ते अवसरीं। काढिलीं दप्तरें झडकरी। खर्डा खतावणी पाहे वरी। सिद्ध करी झडतीतें ॥५२॥ आकार करोनि जमेचा। पाहे मेळ त्या खर्चाचा। निकाल काढिला बाकीचा। ताळा त्याचा मेळवीत ॥५३॥ बेरजा त्वरें सिद्ध करितां। तंव अडका चुकला पाहतां। तैं दिनमणी गेला अस्ता। आवरोनि ठेविता होय तैं ॥५४॥ नित्यान्वयें गुरुसेवन। करितां होय प्रेमें आपण। शेवटीं शयनशय्या करोन। उदक भरोन ठेविलें ॥५५॥ सद्गुरु मंचकीं पहुडतां। चरणसेवे होय आरंभिता। जनार्दन निद्रें निमग्न होतां। हिशेबकार्यार्थी लागला ॥५६॥ दीपज्योती सरसावोन। हिशेब ताळा पाहे शोधोन। पाहावया अडक्याचा ठिकाण। लक्ष लावोन बैसला ॥५७॥ अडक्यानें वृत्ति वेधिली। काळजी जीवा अति लागली। दचकें निद्रा पळाली। चिंता व्यापली देहातें ॥५८॥ तीन प्रहर रजनी होतां। जागृती आली जनार्दनपंता। उदक प्राशोनि पाहे एकनाथा। जाली तल्लीनता हिशेबीं ॥५९॥ क्षणभरी उभें राहोनि। पुन्हा प्रवर्तले शयनीं। परी न कळे नाथालागोनी। मन वेधोनी गेलेंसे ॥१६०॥ तंव एकाग्रें शोध करितां। ताळा पडिला अवचितां। हर्ष न माये एकनाथा। गद्गद हांसतां टाळी पिटी ॥६१॥ त्या आल्हादातें देखोन। जनार्दन बैसले उठोन। म्हणती कोण लाभ जाला तुजलागोन। आनंदें भुवन गाजविलें ॥६२॥ एका बोले तये वेळां। हिशेबीं होता अडका चुकला। तो तुमच्या कृपें सांपडला। मिळाला ताळा बेरिजीं ॥६३॥ म्हणोनि आनंदें हर्षलों। गजरें टाळी पिटिता जालों। सुखसमाधान पावलों। पार पडलों हिशेबीं ॥६४॥ तंव बोलती जनार्दन। जैसें आडक्याकडे वेधलें मन। तैसें श्रीकृष्णचरणीं होतां तल्लीन। स्वहीत पूर्ण लाधेल कीं ॥६५॥ हें श्रवणीं वाक्य ऐकतां। अनुताप जाला एकनाथा। म्हणे हेंचि होतें माझ्या चित्ता। ती आज्ञा आतां पावलों ॥६६॥

धन्य माऊली तूं कृपावंत । जाणसी बाळकाचें चित्त । तैसाच पुरविसी आर्त । चुकविसी अवर्त दुःखाचे ॥६७॥
अभय देवोनि तारिलें । विकृति लोभ मोहा वारिलें । भवार्णवापासोनि रक्षिलें । तुम्हीं आपंगिलें या दीना ॥६८॥
मज अनाथाची दया । तुम्हां उपजली जी सद्‌गुरुराया । करोनि कृपेची छाया । मज उपाया सांगितलें ॥६९॥
मज सावध केलें आपण । तरी तें शिरसा वंद्य मज वचन । हिशेब देतों ध्या पाहोन । सिद्ध करोन ठेविला ॥१७०॥
मग एकनाथें दौत लेखणी । अर्पिली सद्‌गुरुचरणीं । भावें जोडोनियां पाणी । उभा राहोनी हिशेब दे ॥७१॥
सावधान होवोनि श्रोतें । लक्ष द्यावें हिशोबातें । लिहिणें लिहिलें एकनाथें । या झडतीतें परिसा जी ॥७२॥
सालमजकुर हा नरदेह पाहीं । पूर्व गुदस्त रुजूं कर्म ये ठायीं । प्रेमपत्र अक्षर हृदयीं । जाला तोही खर्च येथें ॥७३॥
न धरिलें फळआशेसी । म्हणोनि रुजू जालों स्वामिपदांसी । ब्रह्मार्पण सर्वस्वेंसी । अर्पिलें मानसीं तेंही न कळे ॥७४॥
मुनीस येथील विचार । लिहितो सावधपणें साचार । सद्‌गुरु कृपेचा मनसुर । हिशेब निर्धार पुसिला ॥७५॥
एवं नरदेहाचा झाडा । अज्ञानबाकीचा करोनि निवाडा । तुमचे चरणीं मारिला दडा । व्यापार खुडा करोनिया ॥७६॥
आब्रह्मस्तंभपर्यंत । आपुलेंच स्वामित्व निश्चित । सकळ व्यापार होत जात । कृपा समस्त तुमची ॥७७॥
त्या कृपेचें मज दान । आज्ञापिलें कृष्णस्मरण । येणें स्मृती मज पूर्ण । जाली निवेदन करितों जी ॥७८॥
खुदखत सोहं अक्षरीं । तें स्वामी म्यां वंदिलें शिरीं । तें मज नोपविलें प्रेमांबरीं । यांहीं उरी नुरवोन ॥७९॥
निजबोध विडा दिधला मज । तेणें भवभयपीडा वारिली सहज । कैवल्यप्राप्तीचें घडलें काज । चैतन्य सतेज पावलों ॥८०॥ स्वानंद तहसिल केली । रसीद स्वामीपदीं भरली । सत्संगें वसूल बाकी जाली । हुजत पावली भक्तीची ॥८१॥
तेणें पूर्वकर्म साह्य जालें । रामनाम मुखासि आलें । येणेंचि व्यापार लाधलें । स्वानंदें रंगलें मन आतां ॥८२॥
आवंन निवेदलें पाईं । शेष उरविलें नसे कांहीं । अनन्य शरण पदा ठायीं । अर्पिली डोई स्वामियां ॥८३॥
परिसोन एकनाथवाणी । विस्मयो जाला जनार्दनीं । म्हणे अनुग्रहालागोनी । पात्र दिसोनी आला हा ॥८४॥
निजप्रेमें ते वेळां । एका जनार्दनें हृदयीं धरिला । तारकमंत्र उपदेशिला । मंत्रमाळा रामकृष्ण ॥८५॥
नें गुज सांटविता श्रवणीं । विश्वास धरिला पूर्ण मनीं । तत्पर जाला भजनीं । सद्‌गुरुसेवनीं सदट ॥८६॥
जनार्दनें कसनीं कसिला । जें परीक्षेसी उतरला । तें तात्काळ पावन केला । अंगीकारिला उपदेशीं ॥८७॥
परीक्षेवांचोनि घेणें । कदा न करिती शाहाणे । प्रस्तुत मांडिलीं दुकानें । कीं ज्या लावणें कापूर ॥८८॥
उगाच माजवोनि मेळ । घालिती भलतैसा गोंधळ । केवीं फिटे येणें विटाळ । जीवीं तळमळ उभयांतें ॥८९॥
गुरु लाभलोभीं असे भरला । मागेल म्हणोनी शिष्या सरला । आशायोगें भ्रष्टला । लाभीं घाला येणेंची ॥१९०॥
उभय पक्षीं ओशाळ कर्म । तेथें कैंचा धर्माधर्म । पाठीं लागलें दुस्तर कर्म । तारक वर्म विसरलें ॥९१॥
ऐसें वदतां निंदा घडे । यास्तव न वदें विशेष उघडें । स्वार्थ स्वहित रोकडें । अंतर चोखडें होतांची ॥९२॥
उभय अनुतापीं संपन्न । विवेक वैराग्य परिपूर्ण । निरास निर्लोभ उदासीन । तेथेंचि कारण घडोनि ये ॥९३॥
सेवाभजनीं तत्पर । स्वहित बोगते तोचि विचार । नावडे निरर्थक व्यापार । साध्य सार तेथेंची ॥९४॥

ऐसे पाहतां धुंडोन। लक्षांमाजीं विरळा जाण। प्रस्तुत एकां जनार्दन। धन्य महिमान तयांचें ॥९५॥
ती हे अद्भुत गुरुशिष्यलीला। मार्गे सोज्वळ आचरणाला। किंचित निरोपणी निरोपिलों। भाग पुढिला परिसिजे ॥९६॥ एकनाथ करितां सेवाभजन। वृत्ती होतसे तल्लीन। नाहीं प्रपंच देह गेह आठवण। सदा निमग्न हरिरंगीं ॥९७॥
लक्षितां त्या आचरणांसी। म्हणती मनुष्य कोण म्हणेल यासी। प्रगटला विश्वोद्धारासि। विष्णुअंशी सांच हा ॥९८॥
तरी यातें कृपादान। करवावें श्रीअवधूतापासोन। ऐसे भावोन जनार्दन। पाचारी आनंदोन एकनाथा ॥९९॥
म्हणे तूतें दत्तभेटी। करवावी हा हेतु पोटीं। येरें चरणीं घातली मिठी। जोडोनि संपुटी विनवीत ॥२००॥
मातेसि लागे गोड रस। तो आदरें पाजी बाळास। तेवींच कळवळोनि मानसें। लाभ विशेष करवीत ॥१॥
जनार्दन म्हणे एकनाथा। तुज दर्शन करवितों चाल आतां। परी विकल्प नाणीं चित्तां। तया समर्था पाहोनी ॥२॥
चालोन्मत्त पिशाचवत। नाना याति वर्णे रूप धरित। त्या आचरणांसी नाहीं मीत। भल अघटित दाविती ॥३॥
तूं न जाणसी ते परीक्षा। परी इतुकेंच आणीं लक्षा। मी स्वीकारीन जया पक्षा। न करोनि उपेक्षा अंगीकारी ॥४॥
यापरी एकनाथा बोधोन। चालिले तेव्हां सवें घेवोन। उल्लंघितां वनोपवन। विश्रांतिस्थानें पावले ॥५॥
तंव तेथें दुरोनि येतां। देखिलें जनार्दनें अवधूता। रेडा बैसवोनि वृद्ध माता। आला अतीता पांथिक ॥६॥
यांपी आरामें देखोन। उतरला पांथिक आपण। अद्भुत मांडिलें विंदान। श्रुतिहीन बीभत्स ॥७॥
मातेसि बोले पेटोनि क्रोधा। म्हणे मज चालतां लागली क्षुधा। निवारण करीं हे बाधा। नोव्हे सुदा विलंबी मी ॥८॥
मातेनें मांडोनि तीन दगड। वरी ठेविलें एक गुंडें। अग्नि पेटविला धडधड। मेळवोनि लांकुड शुष्क तें ॥९॥
उचंबळोनिया पेटारें। मुरग्यां कातिल्या खबुतरें। उपडोनि पर स्वकरें हांडींत त्वरें घातली ॥२१०॥
माता म्हणे न भरे हांडी। येरें मेषाची तोडिली मुंडी। छेदोनि घातलें पात्रतोंडीं। त्यावरी अंडीं पक्ष्यांचीं ॥११॥
तेंहीं शिजवितां गळालीं। वृद्धा म्हणे रिक्त राहिली। पुत्र श्वान मांजरी भरलीं। शिजोनि गेलीं तळवटा ॥१२॥
देखोनि मनीं क्षोभावला। रोंवे रेडा जावोनि तोडिला। तोही खांडोनि हांडींत घातला। परी नये पूर्णतेला कांहींच ॥१३॥
तेंहि पचोनि बैसलें। मग वृद्धेतें संहारिलें। शकलें तोडोनि हांडींत भरिलें। तळीं न उरलें कांहींच ॥१४॥
पचवोनि हांडी सिद्ध जाली। भोजनपात्रें मांडिली। सभोंवतीं विलोकी ते वेळीं। दृष्टी गेली दोघां त्यां ॥१५॥
वाणी बोलि यवन भावो। आवो वखत खाना खावो। ऐकतां जनार्दनें सोडिला ठावो। प्रसाद पावो पावला ॥१६॥
एकनाथें विपरीत देखोन। भयेंचि केलें पलायन। दूरि बैसला जायोन। लक्षी दुरीन उगला ॥१७॥
जनार्दनपंत त्वरित। त्यासंगें प्रसाद सेवित। आनंदें बोलती गुह्य मात। अवधूत पुसत कोण तो ॥१८॥
तयातें प्रसादा पाचारीं। जनार्दन पालथी त्यातें फरीं। एकनाथ पळती दुरी। विकल्प अंतरीं शिरलासे ॥१९॥
प्रसाद सारितां पूर्ण। दत्त जाले अदृश्यमान। एकनाथा जवळी जनार्दन। पावले येवोन पुसती त्या ॥२२०॥
कां रे भिऊन पळालासी। सांगितल्या वर्मी चुकलासी। प्रत्यक्ष होता तो अविनाशी। लाभा मुकलासी ये वेळां ॥२१॥
मार्गी चालतां सांपडला हिरा। अभाग्यातें भासती गारा। चिंतामणी लाभतां परां। निर्दैव सेरां गोफणीत ॥२२॥

तैसी तुवा केली करणी । त्यागोनि पळालासि मोक्षदानी । तंव एकनाथ जोडोनि पाणी । लागोनि चरणीं विनवीत ॥२३॥
म्हणे जी सद्गुरु दातारा । त्याचा अनर्थकारक योग खरा । भासला मातें तुम्ही विस्तारा । विकल्पधारा मोडिजे ॥२४॥
सद्गुरु म्हणती तो अवधूत । वृद्धा ती माया निश्चित । उत्पत्तियोग सर्वे बहुत । खेळ समस्त मायेचे ॥२५॥
रज तम सत्त्व गुण । त्रयमूर्ति त्रय कारण । स्थिति पालन संहारण । आधिपत्य जाण या रीतीं ॥२६॥
तो त्रिगुणात्मक हा दत्त । वेष धरोनि विपरीत । बोधावया जीव समस्त । क्रिया दावीत कळावया ॥२७॥
रजोगुणें उद्भविलें । सत्त्वगुणें पाळिलें । तमोगुणें संहारिलें । प्रत्यक्ष दाविलें आचरोनीं ॥२८॥
दगड त्रिगुणाचे तीन । हांडी ते सकळ्यांची सांठवण । तेज अग्नि भडकावोन । लोभमोहइंधन जाळिलें ॥२९॥
प्रकृति मुर्गी संहारी । विकार पाखरें जीवें मारी । भेदअभेद मांजरें कुतरीं । अंडींही निर्धारीं तुरवीच ॥३०॥
अहंकार वधिला रेडा । दोष निंदा मेंढी बोकडा । शेवटीं मातेचा केला तोडा । पाक धडफुडा एक ठायीं ॥३१॥
जें ज आहे दृश्यमान । तें सर्व जाईल विरोन । लोकलोकाधिपती आटोन । जाईल सर्व पचोन येच रीतीं ॥३२॥
पंच महाभूतें उरलीं । सेखीं एक एकानें ग्रासिलीं । शून्यीं अवघीं गिळिलीं । तेवींच अटिली गुणमाया ॥३३॥
प्रकृति पुरुषीं लीन । पुरुष निराकारीं मीन । निरालंबी निरंजन । एवं समोन राहिले ॥३४॥
तो हा परब्रह्म परेश । जगद्गुरु अवधूत अविनाश । ते कृपेचा सर्व रस । स्वात्मसुखास पावविता ॥३५॥
तो निजलाभ मज होतां । तूं पळालासि पाचारितां । तुज सावध केला असतां । भ्रांति पावता जालासी ॥३६॥
अजून तरी सावधान । पुनरा तुज करवीन दर्शन । ऐसें उभय मार्गीं वदोन । आश्रमा येवोन पावले ॥३७॥
यासि लोटतां कांहीं दिवस । हेतु जाला जनार्दनास । मागुती म्हणती एकनायास । चाल दत्तास भेटावया ॥३८॥
ऐकतांची सद्गुरुवचन । एकनाथमनाचे आनंदें करोन । उभयतां निघाले आश्रम सोडून । दूर कानन पावले ॥३९॥
मार्गीं सांगती हित । मी त्यासी करीन एकांत । त्याचे पद धरीं तूं त्वरित । कल्पना मनांत नाणीं कांहीं ॥४०॥
एकनाथ म्हणे स्वामिया । आतां कल्पना करूं कासया । निश्चयेंसी धरीन पायां । करोनि दया भेटविजे ॥४१॥
तों एकाएकीं अकस्मात । सन्मुख पावले अवधूत । जनार्दन एकनाथा बोलत । आतुचा स्वामिनाथ ओळखिजे ॥४२॥
तों अश्वावरी बैसोन । मार्गीं पावला पठाण । करीं शस्त्रें विराजमान । विशाळ नयन आरक्त ते ॥४३॥
घोडा पिटीत मार्गीं आला । एकाएकीं उतरला । जनार्दनें वंदिला । एका दचकला देखोनी ॥४४॥
यवनी भाषें करोन । बोले अनसूयेचा नंदन । चाल क्षुधा लागली आम्हांलागोन । म्हणे जनार्दन सिद्ध मी ॥४५॥
तात्काळ निर्मिला थाट । पक्वान्नें काढिलीं चोखट । भरिलें कनकाचें ताट । बैसविला निकट जनार्दन ॥४६॥
पठाणाचें होतां दर्शन । एकनाथ दूर राहिला भिऊन । तंव ते दोघे एकताटीं बैसोन । करिती भोजन आनंदें ॥४७॥
सद्गुरु जनार्दना म्हणती । पैल कोण तो असे निश्चितीं । मानसीं वागल्या त्वरित गती । प्रसादान्नी पाचारीं ॥४८॥
उभय वास्य एकनाथें । ऐकोनि म्हणे न दिवो त्यातें । पाचारितील ते मातें । म्हणोनि ठायातें सोडिलें ॥४९॥
भय पावोन गेला दूर । हें देखोनियां सत्वर । अदृश्य जाला दिगंबर । केला अव्हेर एकनाथें ॥५०॥

जेवीं अंजनीचा सुत । तुळसीदासा जाला कृपावंत । भेटवितां त्या रघुनाथ । म्लेंच्छ भासत तयातें ॥५१॥
तेवींच भासे एकनाथा । लाभ गमावी आला हातां । एवढा सद्गुरु जागविता । परी भ्रांति चित्ता पडतसे ॥५२॥
असो यवन अदृश्य होतां । नवल वाटलें एकनाथा । सद्गुरुचरणीं ठेवी माथा । म्हणे समर्था कोण होतें ॥५३॥
मज तो दिसला पठाण । नेमोनि केलें तुम्हीं प्रसादसेवन । जनार्दन गद्गदां हांसोन । म्हणे अत्रिनंदन होता तो ॥५४॥
याचिया दर्शनासाठीं । तपिये तपती गिरिकपाटीं । आहारा त्यजोनी होती हिंपुटी । परी त्यां दृष्टीं न पडे हा ॥५५॥
जयालागीं नाना साधन । व्रतस्थ राहती योगीजन । नाना अट्टहास्य करितीं दारुण । तयां दर्शन न घडेची ॥५६॥
तो तुजसाठीं दोन वेळां । भेटी द्यावया पावला । परी काय म्हणावें तुजला । अनादर केला तयाचा ॥५७॥
तुज लाभ व्हावा त्याचा । हा हेतु पूर्ण मनींचा । आळस न केला प्रयत्नाचा । सांडिसी हातींचा लाभ तूंची ॥५८॥
अवचित मार्गी धनराशी । दिसतां वलांडोनि जाय त्यासी । सुधारस मिळतां प्राशावयासी । दांतखिळीसी बैसवी ॥५९॥
ऐसें आलें मज दिसोन । वृथा श्रमविला तो सनातन । तूं त्यातें नोळखोन । जासी अव्हेरोन दूरी कीं ॥२६०॥
काय म्हणूं आतां तुजला । अलभ्य लाभ गमविला । बोधितां संशय नाहीं गेला । भ्रम जाला तुज कैसा ॥६१॥
जयाच्या दर्शनासाठीं । बहु होताती हिंपुटीं । तो न पडे कवणाचे दृष्टीं । होती कष्टी बहुसाल ॥६२॥
तो तुजलागीं सहज । कृपें ओळला सद्गुरुराज । त्वां न जाणीतली त्याची ओज । हातींचें निज सांडिलें ॥६३॥
देखोनि तुझें सेवन । माझें कळवळलें सत्य मन । सायासें घडविलें दर्शन । न लाभ जोडोन घेतला ॥६४॥
काय माझा येथें उपाय । सांगतां न जाणसी लाभ सोय । तुझी कल्पनाचि करी अपाय । करूं काय आतां मी ॥६५॥
विचित्र असे कर्मगती । पाहतां निधानें विंचू दिसती । शोधूं जातां वनस्पती । सर्पाकृती भासत ॥६६॥
काय म्हणूं तुझ्या आचरणा । कां तुज ऐसी विपरीत भावना । काय करोनि केलें सेवना । प्रारब्धहीना काय कीजे ॥६७॥
धिग् धिग् तुझें शहाणपण । धिग् चतुरता धिग् ज्ञान । धिग् बुद्धि धिग् मन । धिग् जिणे जन्मोनी ॥६८॥
यापरी सद्गुरु धिक्कारितां । पश्चात्ताप जाला एकनाथा । सद्गदित होवोनि चित्तां । पायीं माथा ठेविला ॥६९॥
म्हणे स्वामी दयानिधी । मी अभागी हीन बुद्धी । आपण साधविली लाभसंधी । निर्दैव्या उपाधी वाटे ते ॥२७०॥
काय करील खापरा परीस । स्पर्शमणी पाषाणास । लेंकरूं न होय वांझेस । शब्द भ्रतारास असेना ॥७१॥
तेवीं तुम्हांकडे बोल नाहीं । हा तंव दोष माझेचि ठायीं । मजसारिखा अन्यायी । त्रिभुवनांत कांहीं दिसेना ॥७२॥
मी चांडाळ पापराशी । अनधिकारी मलिन मानसीं । तिमिर कोंदलें नयनासी । लाभ ऐसियासी कोठोनी ॥७३॥
माझें कर्मचि दुस्तर । आडवें येतसे वारंवार । कायसा करूं आतां विचार । तो मज निर्धार कळेना ॥७४॥
धिग् धिग् माझें जिणें । मजचि जालें लाजिरवाणें । आतां कायसें वांचणें । भलें मरणें याहूनी ॥७५॥
ऐसा होतांचि अनुताप । सद्गद हृदयीं भरला कंप । नयनीं वाहती बाष्प । पाहे सकृप जनार्दन ॥७६॥
उपजला सद्गुरुसी कळवळा । हृदयीं धरिलेंल्या प्रेमळा । सदयें संबोखोनि स्नेहाळा । करें मुखकमळा कुरवाळी ॥७७॥
म्हणे सांडीं सांडीं शीणभाग । दर्शनीं पुन्हा साधवीन लाग । दवडीं दवडीं विकल्प काग । प्रसाद चांगला घ्यावया ॥७८॥

ऐसा गुह्य गोष्टी बोलत । आश्रमा पावले त्वरित । सद्गुरुपदांबुज एकनाथ । प्रेमें सेवीत नित्यनेमें ॥७९॥
सेवेपरतें साधन । एकनाथांसी न मने आन । जपतपादि अनुष्ठान । ओंवाळून सांडावीं ॥२८०॥
अनन्यभावें करिती सेवा । त्यासि प्राप्त प्रसादमेवा । तो पुढिले प्रसंगीं लाभ बरवा । लाधेल ठेवा एकनाथा ॥८१॥
तो कथारस गोड बहुत । प्रेमळ भाविकांतें प्राप्त । भाग्य केवीं लाधती दैवहत । सभागी भोगीत ऐश्वर्या ॥८२॥
या दत्तकथेचें महिमान । जाणती साधु संत सज्जन । दत्तरूपीं ते निमग्न । सुखसंपन्न दत्तरूपें ॥८३॥
दत्त संतांचें माहेर । संत दत्ताचे प्रियकर । काया अवयव प्रकार । द्वैत निर्धार असेना ॥८४॥
यालागीं संतांचें सेवन । प्रीतिनिष्ठें करावें जाण । सद्भाव पदीं करावा अर्पण । तनमनधनसहित पैं ॥८५॥
हे द्रवतां संतसागर । मग फळें फळतील अपार । मग दूरें दैन्या ओसर । भाग्यें संभार अमित ये ॥८६॥
संतकृपा होतां । मग कैची भयचिंता । अद्भुत लाभ येती हातां । तळमळ व्यथा कैची उरे ॥८७॥
हाचि योग जाणोन । अनंतसुत विनवी कर जोडोन । तुम्ही संत पतित पावन । करितां पालन दीनांचें ॥८८॥
तरी मी दीनाहोनि दीन निश्चित । अनाथांहोनि असें अनाथ । पतितांहोनि अतिपतित । जालों शरणागत तुम्हांसी ॥८९॥
तुम्हांपुढें जी दयाळा । जोडोनिया करकमळा । ग्लांति करितों वेळोवेळां । येऊं द्या कळवळा पामरांचा ॥२९०॥
तुम्ही संत सभाग्य उदार । मी याचक उभा धरोनि द्वार । यातें देवोनि अभयकर । तोषवा अंतर स्वामिया ॥९१॥
मम अंतरींची वासना । तेचि करितों विज्ञापना । चरणसेवा मागतों दाना । हेचि कामना पुरविजे ॥९२॥
अनंतसुत विनवी संतांस । मज मागण्याची हेचि आस । धरली तुमची सदृढ कास । म्हणवा दास आपुला ॥९३॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ ॥ श्रोते परिसोत अखंडित ॥ द्विपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२९४॥

॥ इति द्विपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# निवेदन

भगवान अत्रिनंदन श्री दत्तात्रेय यांचेच केवळ कृपेने तयार झालेल्या श्री दत्तप्रबोध ग्रंथाचा ६ वा भाग अध्याय ४६ ते ५२ आजच्या शुभमुहूर्तावर जनता जनार्दनाचे चरणी अर्पण करण्यास आम्हास फार आनंद होत आहे. या भागाची वर्गणीही रु. १-५० पैसे ठेविली आहे. हा भागही अत्यंत अल्पावधीत व सुंदर छापून दिल्याबद्दल श्री रामदास मुद्रणालय, दादर व श्री समर्थ प्रेस, ठाणा येथील प्रेमी मंडळींचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. विशेषतः छापखान्याचे मालक माननीय श्री. स. पो. जोशी यांचे आमचे मंडळावर अत्यंत उपकार आहेत. केवळ त्यांच्या सौजन्यामुळें व निरलस कार्यामुळेच हा एक अप्रतीम व प्रासादीक ग्रंथ भाविक जनतेस उपलब्ध होत आहे. त्यांचे आभार मानण्यास आमचे शब्द अपुरे पडतात. व ज्या प्रभूचें कार्य त्यांनी एवढ्या आत्मीयतेनें व प्रेमाने केले आहे व करीत आहेत त्यांचे सर्वांगीण कल्याण भगवान दत्तात्रेयानी करावे अशी त्या प्रभूचे चरणी आम्ही नित्य प्रार्थना करीत आहोत. आता फक्त दोन भाग राहिले आहेत व ते येत्या दीपावलीपर्यंत पुरे करण्याचा आमचा मानस आहे. अर्थात सत्य संकल्पाचा दाता भगवान या उक्तीप्रमाणें ही आमची इच्छा प्रभू पुरी करतील यात शंका नाहीं. केवळ श्री दत्त प्रबोधच भाविकांना न देता त्याचे बरोबर भगवान दत्त प्रभूंची उपासनाही प्रार्थनेच्या रुपाने देत आहोत. आणखी एका व्यक्तींचे आभार मानल्याशिवाय रहावत नाहीं आणि ते म्हणजे परम भागवत श्री कावडीबुवांचे बडोदा येथील मंदिराचे विश्वस्त माननीय श्री सुंदरनाथ माधवराव व श्री जगन्नाथ माधवराव राजापूरकर हे होत. त्यानी बडोद्यास या ग्रंथाचा अप्रतीम प्रचार केला आहे व दिवसे दिवस तो वाढतोच आहे. तसेंच प्रत्येक बारीक बारीक गोष्टींत त्यांचा अमोल सल्ला आम्हास सतत मिळत आहे. त्यांचे आमचे मंडळावर निरतिशय प्रेम आहे हेच हे कार्य नेटाने नेणेस आम्हास उद्युक्त करीत आहे. शेवटी ज्या प्रभूच्या कृपेने हा भाग तयार झाला त्या श्री दत्तदेवांची प्रार्थना करून हे निवेदन संपवितो.

श्री नारळी पौर्णिमा शके १८८७

श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, मुंबई.

卐 सूचना :—या पुढील ७ वा भाग शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध होईल. 卐

# -: ध्यानाष्टक :-

त्रिभुवन पूर्ण प्रकाशा सर्वेश्वर जगदीशा ।
दत्तात्रय दत्तात्रय जय त्रैलोक्यपते ॥१॥
परमात्मा परंज्योति सद्गुरु श्री त्रैमूर्ती ॥२॥ द. ॥
मुनिजन मानस चंद्रा गुरुवर धैर्य समुद्रा ॥३॥ द. ॥
निर्गुण निर्विकारा पूर्णानंदावतारा ॥४॥ द. ॥
अवतार श्रीवल्लभ नरहरी त्रिभुवनी दुर्लभ ॥५॥ द. ॥
करुणानिधी कमलाक्षा त्रिगुणात्मक यतिदक्षा ॥६॥ द. ॥
काषायांबर वसना सुभस्म रुद्राक्षा भरणा ॥७॥ द. ॥
दंडकमंडलु करधर षडविध आयुध परिकर ॥८॥ द. ॥
किरीट कुंडल मंडित षड्भुज मूर्ति विराजित ॥९॥ द. ॥
कृष्णासंगमी नरवर श्रीसरस्वती गुरुवर ॥१०॥ द. ॥
दृष्कृतहृत गुरुभक्त पदी नव कृतमुक्त ॥११॥
दत्तात्रय दत्तात्रय जय त्रैलोक्यपते ।

प्रकाशक : प. न. झुरळे, श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, ब्लो. नं. १४२, बिल्डिंग नं. १४,
सेंट्रल गव्हर्नमेंट सर्व्हंटस् रेसिडेन्शिअल क्वार्टर्स, व्यायरोड, घाटकोपर, मुंबई नं. ७७.
मुद्रक : स. पां. जोशी, रामदास मुद्रणालय, शिवाजी पार्क रोड नं. ३, दादर–मुंबई २८.




॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परमभागवत

श्री अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा

विरचित

# श्री दत्तप्रबोध

## भाग ७ वा

अध्याय ५३ ते ५८

# अर्पण-पत्रिका

परमपावन योगीराज सद्गुरु

## श्री पंतमहाराज बाळेकुंद्रीकर

यांचे पवित्र चरणी

श्री दत्तप्रबोधरूपी कमलपुष्पातील सप्तमदल अर्पण

# निवेदन

परमपावन भगवान अत्रिनंदनाचेच केवळ कृपेने तयार झालेला श्री दत्तप्रबोधाचा सातवा भाग अध्याय ५३ ते ५८ दत्तना जनार्दनाचे चरणी आमच्या शुभप्रसंगी अर्पण करण्यास आम्हास फार आनंद होत आहे. या भागाची वर्गणीही रु. १॥ ठेविली आहे. आता फक्त एकच भाग राहिला आहे. तो शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध करून भगवान श्री दत्त त्रेयांचेच केवळ कृपेने हाती घेतलेल्या ग्रंथाची समाप्ती होईल. पुढील भागात श्री दत्त प्रबोधाचे तीन अध्याय ५९, ६० व ६१ येऊन श्री कावडीबाबांचे चरित्र, त्यांचे हस्ताक्षराचा नमुना, त्यांचे इतर स्फुट वाङ्मय वगैरे सुंदर मजकूर येणार आहे. या भागाचे प्रकाशनाचे कामी श्री रामदास मुद्रणालय दादर व श्री समर्थ प्रेस ठाणा येथील कामकरणारी प्रेमी मंडळींनी अत्यंत सुबकपणे व अल्पावधीत केल्याबद्दल त्यांचे व प्रेसचे मालक माननीय श्री. ग. पां. जोशी यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. या पुढील भागही अल्पावधीत बाहेर पडेल. अशी प्रार्थना श्री दत्त चरणी करून हे निवेदन संपवितो.

श्री विजया दशमी शके १८८०

श्री नृसिंहसरस्वती सेवा मंडळ, मुंबई.

सूचना :—या पुढील ८ वा भाग शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध होईल.

# ॥ श्री दत्त प्रबोध ॥

## अध्याय ५३ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय सद्गुरु लंबोदरा । अविनाशरूपा कृपासागरा । दत्त दयानिधे विघ्नहरा । निगम सागरा सर्वज्ञा ॥१॥
जय अखिल अभंगा एकदंता । अभयवरदा अनाथनाथा । जय निर्विकल्पा समर्था । सदय दाता नमो तुज ॥२॥
जय परब्रह्मरूपा चिंतामणी । अनन्य शरण मी तव चरणीं । निवास तुझा हृदयभुवनीं । अखंडितपणीं सुशोभो ॥३॥
जयजय सुमुखा सुमंगला । ज्ञानप्रकाशका निर्मला । दे सद्बुद्धि प्रेमळा । गावया लीला शुद्ध मती ॥४॥
तुझ्या कृपाकटाक्षें करून । गोड होतसे निरोपण । यास्तव चरणां जालों शरण । देईं दान कृपेचें ॥५॥
हेंचि मागणें तूतें । अखंडित देइजे मातें । तेणें रस होतील निपजते । सेवितील श्रोते अतिप्रेमें ॥६॥
त्यांसी श्रवणाची चाड । मज कीर्तनीं असे आवड । तव लीला अत्यंत गोड । पुरवीं कोड सुखकरा ॥७॥
श्रोता आणि वक्ता । तूंचि होसी स्वामी दत्ता । मज पुढें करोनि निमित्ता । होसी वर्षता कथामृत ॥८॥
तव कथामृत गोड गहन । भवरोगाचें करी नाशन । त्रिविधताप प्रमोचन । करी खंडन द्वैताचें ॥९॥
तव कथा ह्या अघनाशक । कलिमलदोषांसि दाहक । प्रेमळ भाविकां सुखदायक । आनंदकारक श्रोतियां ॥१०॥
जया श्रवण मनन निदिध्यास । त्याचे तुटती सत्य पाश । त्या कृपा करिसी तूं अविनाश । स्वसुखविलास अर्पिसी ॥११॥
ऐसिया लाभातें लक्षोन । श्रोते बैसले सावधान । त्यांचें तृप्त व्हावया मन । चालवीं निरोपण कृपायोगें ॥१२॥
तुझे कृपेवांचोनी । केवीं वदूं शके ही वाणी । गात्रयंत्रालागुनी । चाळविता धणी तूंच कीं ॥१३॥
तुझिया सत्तेवांचोन । न हाले वृक्षाचें पान । तुझे कृपाबळें करोन । विश्व संपूर्ण वावरे ॥१४॥
काष्ठयंत्रें काय करिती । कैची तया पराक्रम शक्ती । परी धन्य सूत्रधाराची गती । सूत्रेंच त्याती करवीत ॥१५॥
तेवीं सर्व तुझी लीला । फिरविसी तैसी फिरे कळा । तूं सर्वज्ञ होसी दयाळा । वदवी कोकिळा कथारसीं ॥१६॥
मागां द्विपंचदशोध्यायीं निरोपण । एकनाथासी वदले जनार्दन । शेवटीं दिधलें आश्वासन । करवीन दर्शन दत्ताचें ॥१७॥
दोन प्रकार दाविले । पाहतां एकनाथ भ्रमले । प्रसादीं पावन न जाले । धिक्कारिलें जनार्दनें ॥१८॥
तें अनुतापें तापला । बहु ग्लानि करितां भागला । आला गुरुमायेसी कळवळा । एका तोषविला अभयदानें ॥१९॥
म्हणे एक वेळां तूंतें । दर्शन करवीन आगुतें । विपरीत नाणीं मनातें । सावध चित्तें धणी घेईं ॥२०॥
ऐसें होतां आश्वासन । एकनाथ उल्हासे पूर्ण । नित्यानंदें सद्गुरुसेवन । करी आपण निजप्रेमें ॥२१॥
सेवें पडों नेदी अंतराय । झिजवी दिनरात्र स्वकाय । सोडोनि कोठें कधीं न जाय । न विसंबे पाय श्रीगुरुचे ॥२२॥
आसनीं शयनीं भोजनीं । काया मन प्राण गुरुचरणीं । वाचा रंगली सदृढ भजनीं । सावध साधनीं या पंथें ॥२३॥
जागृतीं स्वप्नसुषुप्तींत । अवघाचि भजे सद्गुरुनाथ । विषयपदार्थीं विरक्त । सर्व अवलोकित गुरुरूप ॥२४॥
गुरु माता गुरु पिता । गुरु पितृव्य भ्राता । गुरु गणगोत आप्तता । देवदेवता गुरु माझा ॥२५॥

दत्त होवोनि सुप्रसन्न । एकनाथा दिधलें वरप्रदान । जनार्दनातें तांबूल देवोन । अदृश्य आपण जाहले ॥८२॥
तंव जनार्दन म्हणे एकनाथा । अनुभव पावला कीं तुज आतां । येरू म्हणे जी समर्था । कृपावंता तारिलें ॥८३॥
कृपा करोनि जी दयाळें । पुरविले अनाथाचे लळे । पूर्ण केले मनींचे सोहळे । आनंदमेळें आपुल्या ॥८४॥
मी कांहीं न मागतां । दया उपजली सद्गुरुनाथा । आपुले प्रिय अर्थे समर्था । होसी लेववितां मज दीना ॥८५॥
तंव जनार्दन पुसत । बा रे तुज प्रसाद करविलो प्राप्त । तो सेविलासि कीं सांग सत्य । येरू दुश्चित राहिला ॥८६॥
सद्गुरु पुसतांचि जाण । येरू जाला म्लानवदन । तंव एकनाथ बोले प्रार्थून । अपराध घडोन आला जी ॥८७॥
तो निवेदितों पदासी । आपण प्रसाद देतां मजसी । म्यां निरखिलें यवनफकिरासी । विकल्प मानसीं वागला ॥८८॥
कीं आपुला ब्राह्मणवर्ण । कैसें फकिराचे सेवावें अन्न । मग म्यां दिधला तों फेंकोन । प्रमाद घडोन आला हा ॥८९॥
पुढें अवलोकितां त्यासी । लीला आली अनुभवासी । मग पश्चात्ताप जाला मानसीं । व्यर्थ प्रसादासी त्यागिलें ॥९०॥
यापरी जाला अपराध खरा । महिमा नेणोनिया दातारा । घडला मज अनादरा । दुःख अंतरा वदवेना ॥९१॥
हातींचा घेवोनि जातां बाण । सांवर घटेल त्या कोठून । मी परम भाग्यहीन । प्रसाद कोठून लाभेल ॥९२॥
दुष्ट कर्माचा हा घाला । कैकेयीहातिंचा पिंड गेला । तोचि योग मातें घडला । अहा अदृष्टाला काय म्हणों ॥९३॥
जी मी अपराधी अतिदीन । अन्याय घडला मजपासून । तुम्हांवांचोनि क्षमादान । देईल कोण स्वामिया ॥९४॥
एका होवोनि सद्गदित । सद्गुरुपदा दृढ धरित । म्हणे त्राहि त्राहि शरणागत । वागेल चित्तांत तें करा ॥९५॥
सद्गुरु सद्रूप दयार्णव । जाणतो सर्वहि उपाय । देखोनि एकनाथाचा आर्द्रभाव । घाली कर ऊठ म्हणे ॥९६॥
अवघूतें दिधला तांबूल । मुखीं चर्वणी होता कवळ । तो काढोनिया उगळ । दिधला तात्काळ प्रसाद तो ॥९७॥
तो महाप्रसाद मुखीं पडतां । संतोष जाला एकनाथा । म्हणे दिनदयाळा कृपावंता । मज अनाथा सांभाळिसी ॥९८॥
अनन्य बाळाचें हित । जाणे माउलीचें चित्त । भातुकें मुखींचें घालित । प्रतिपाळित सप्रेमें ॥९९॥
या अन्वयें गुरुनाथा । मज होसी प्रतिपाळिता । माझी तुज सर्व चिंता । भारव्ययां वाहसी ॥१००॥
सद्गुरु जाले आनंदभरित । एकनाथा अभय देत । तुज साह्य होईल भगवंत । पूर्ण मनोरथ होतील ॥१॥
असो यापरी स्वानंदभाषण । करीत आश्रमा पावले परतोन । उभयतांही सुखसंपन्न । करिती भजन दत्ताचें ॥२॥
नेमें पूर्ववत । एकनाथ सद्गुरुसेवा करीत । जनार्दन होवोनि कृपावंत । प्रबोध करीत निजदासा ॥३॥
नाना परीचे प्रबोध । एका अंगीकारी सावध । तेणें अंतर जालें शुद्ध । नित्य वाग्वाद उभयांचा ॥४॥
जनार्दनाचा नित्य नेम । एकांतस्थानीं घे विश्राम । तें अंतरींचें गुह्य प्रेम । तेथें उपरम नपाचा ॥५॥
तें ऐका जातसे सांगातीं । आसनीं वैसतां सद्गुरुमूर्ती । एकनाथ बाह्य रक्षिती । परी वर्म त्याप्रती न कळे तें ॥६॥
देखोनिया गुह्य आचरण । सद्गुरुसी प्रार्थी कर जोडोन । म्हणे परिसा माझा प्रश्न । बोबडें भाषण बाळाचें ॥७॥
अहो जी स्वामी सद्गुरुनाथा । आपण गुह्य गुप्त नेमें वैसतां । मी न जाणें त्या मथितार्था । ते मज वार्ता प्रबोधीं ॥८॥
हें कोण असे साधन । त्यामाजीं तो लोभ कोण । हें मज करा जी निरोपण । क्षुधित श्रवण श्रवणार्थी ॥९॥

जें जें आवडे तुम्हांसी । तें सकृपें समर्पिलें मजसी । इतुकेंचि कां हें बाळासी । वंचोनि ठेविसी दातारा ॥११०॥ कीं नाहीं मातें अधिकार । म्हणोनि गुह्य ठेविला हा विचार । कीं मज योग्य नोव्हेचि साचार । म्हणोनि अंतर ठेविलें ॥११॥ हें कोणाचें सांगा धन । याचे अधिकारी तरी कोण । तें निरोपा सकृप होवोन । वंदितो चरण तुमचे ॥१२॥ परिसोनि एकनाथाची विनंती । दत्तआज्ञा आठवली चित्तीं। जनार्दन म्हणे बा शुद्ध मती । अद्भुत प्रीती तुझी हे ॥१३॥ त्वां छंद घेवोनि प्रश्न केला । ऐसाचि उमेनें शिव प्रार्थिला । तेवींच मच्छींद्र विनटला । जालंदर अनुसरला यासाठीं ॥१४॥ ते गुह्य गुज वार्ता । हंस विधीस झाला बोधिता । विधि निवेदी आपुल्या सुता । अत्रि अवधूता तोषवी ॥१५॥ तें गुह्य गुज आत्मज्ञान । दत्तात्रेयें केलें मज अर्पण । त्याचा निदिध्यास मजलागोन । धरोनि ध्यानीं बैसतां ॥१६॥ तें ज्ञान नसतां कांहीं । सर्व कर्म निरर्थक पाहीं । भेद न वजे कदाहीं । न शोधितां ठायीं आपुल्या ॥१७॥ मायामय अवघा बाजार । पंच महाभूतांचा विस्तार । त्रिगुणवेष्टित प्रकार । दोषांचा भर भरलासे ॥१८॥ ऐका आतां सावधान । तुज करितों निरोपण । एकाग्र करीं श्रवण । अन्य व्यवधान सांडोनी ॥१९॥ आज्ञा वंदोनि सत्वर । एकनाथ श्रवणीं सादर । बैसतां निरोपणविस्तार । चालवी उदार सद्गुरु ॥१२०॥ निखिल ब्रह्म निराकार । निःशून्यासी शून्य अकार । तेथें उद्भव उंकार । चैतन्यसार इच्छा ते ॥२१॥ तेथोनि मकार महातत्त्व माया । त्रय अंश मिश्रित ठाया । ॐकार सिद्ध नटोनिया । प्रणव तया बोलती ॥२२॥ मायाप्रकार असती दोन । छाया आणि आवण । प्रकृतिपुरुष नामाभिधान । अद्वय असोन पृथक्त्वें ॥२३॥ तत्पद आणि त्वंपद । सएव मिळूनी असिपद । पाहतां मुळींच अभेद । परी प्रेमें वृंद वाढविला ॥२४॥ चैतन्य तोचि परमात्मा । प्रत्येक चैतन्य जीवात्मा । त्रिगुणभूत साधनात्मा । प्रपंच उत्क्रमा योग हा ॥२५॥ महातत्त्व तेंचि माया । ॐकारनामें पडला ठायां । प्रगट अर्धमात्रा अन्वया । गुणत्रया प्रकाशवी ॥२६॥ अकार उकार मकार । तेंचि रज सत्त्व तम सार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । एवं प्रकार एकचि हे ॥२७॥ आतां यांची पृथक । व्यवस्था असे देख । ते तुज निवडोनि चोख । सांगतों ऐक सावधान ॥२८॥ मूळ प्रकृति देह जाण । ॐकार मातृकेचें ठाण । परा वाचा ईश्वर साभिमान । अवस्था पूर्ण सर्वसाक्षी ॥२९॥ मायादेही निरुता । मकारमात्रा पर्श्यंती वाच्यता । रुद्र अभिमानी दैवता । प्रळय अवस्था ते ठायीं ॥१३०॥ आतां त्या हिरण्यगर्भदेहीं । उकार मातृका पाहीं । विष्णु साभिमान स्थिति ठायीं । वाचा तेही मध्यमा ॥३१॥ विराटदेहीं मात्रा अकार । ब्रह्मा साभिमानी सृष्टी प्रकार । वैखरी वाचेचा प्रसार । उद्भव विस्तार सर्वांचा ॥३२॥ रजोगुणी विधि उद्भविता । सत्त्वगुणीं विष्णु पाळिता । तमोगुणें रुद्र संहारिता । एवं व्यवस्था त्रिकांडी ॥३३॥ या विश्वअहंकारापासोन । विस्तार जाला तो कोण । तोही करितों निरोपण । श्रवणीं सावधान सांठवीं ॥३४॥ सात्त्विक अहंकारापासाव । अंतःकरणपंचकाचा उद्भव । ते पृथक सांगतों नांव । श्रवणा वाव न करीं तूं ॥३५॥ अंतःकरण आणि मन । बुद्धि चित्त अहंकार जाण । हे आम्यापाडे रिघोन । करिती कारण विवेकादि ॥३६॥ आतां जो राजस अहंकार । त्याचा दशधा प्रकार । आणि पंच मात्रा सुंदर । तो विस्तार इंद्रियत्वें ॥३७॥

श्रवण आणि घ्राण । चक्षु रसना त्वक् जाण । हें पंच ज्ञानेंद्रिय पूर्ण । आतां मात्रा श्रवण करीं का ॥३८॥
शब्द स्पर्श रूप रस । गंध पंच मात्रा सरस । आतां कर्मेंद्रियविशेष । निरोपितों त्यास परियेसी ॥३९॥
वाचा पाणि पाद । उपस्थ आणि गुद । सांगितलें तुज विविध । सरला संवाद येथींचा ॥१४०॥
सुखदुःखादि भोग । या द्वारें होती चांग । पुढिले निरोपणीं वेग । करीं लाग श्रवणार्थी ॥४१॥
आतां तापस अहंकारापासून । पंच तत्वें जालीं निर्माण । त्यांचें सांगतों निरोपण । तेंही श्रवण करावें ॥४२॥
तामस शून्यापासोन । गगन जालें निर्माण । त्या आकाशासी उद्भवला पवन । वायोपासोन तेज जालें ॥४३॥
तेजीं आप निपजलें । तें उदक पृथ्वीतें व्यालें । हें पंच भूत प्रकाशलें । आणिक विस्तारिलें तें ऐका ॥४४॥
एकएका तत्वापासाव । जाला पांचपांचा उद्भव । त्या पांची पांचां मिश्र भाव । निरोपितां लाघव सावध हो ॥४५॥
पृथ्वीतत्वापासून । रोम नाडी त्वचा जाण । मांस अस्थि प्रमाण । हे पांच गुण उद्भवलें ॥४६॥
रोमीं अंश आकाशाचा । नाडीमाजीं वायूचा । त्वचेमाजीं तेजाचा । मासीं आपाचा जाणिजे ॥४७॥
पृथ्वी अस्थीचे ठायीं । हें मिश्र ओळखोनि घेईं । आतां पृथ्वीचे योग आणीक तेही । निरोपितों ठायीं जाणिजे ॥४८॥
पीतवर्ण घर स्वाधिष्ठान । जिव्हा मुख स्वाद गोडपण । रस आहार शस्त्र जाण । फरशांकुश धारण तयांचे ॥४९॥
आतां आपतत्वाचा । निवाडा ऐकिजे साचा । श्रवणीं न करीं काचा । भाग त्याचा सांगतों ॥१५०॥
वीर्य आणि लाळ । रक्त मूत्र प्रबळ । पांचवा स्वेद निश्चळ । मिश्र सकळ ऐक ते ॥५१॥
वीर्य आकाशापासून । वायु तत्वीं लाळ जाण । रक्त तेज मूत्र आपीं पूर्ण । स्वेदगुण पृथ्वीचा ॥५२॥
आपाचें नाभी घर । मुख उपस्थ स्वाद क्षार । श्वेतवर्णी मैथुन आहार । सुरी शस्त्र जयाचें ॥५३॥
आतां तेजाची उत्पत्ती । निद्रा मैथुन कांती । क्षुधा तृषा आलस्य गती । भाग मिश्रिनीं दावितों ॥५४॥
आकाशीं निद्रा वायु मैथुन । तेजीं क्षुधा आपीं शोषण । पृथ्वी आलस्य खूण । आणिक प्रकरण तेजाचें ॥५५॥
लाल वर्ण वास हृदय । मुख नेत्र आहार पाहें । स्वाद तीक्ष्ण होय । शस्त्रघाय भाला तो ॥५६॥
आतां वायुतत्वाची मांडणी । प्रसरण चलन गमनीं । भ्रमण आकुंचनीं । मिश्रिन विंदानीं लक्ष हे ॥५७॥
आकाशाचें प्रसरण । चांचल्य वायुगण । तेजीं आयागमन । असें भ्रमण आपाचें ॥५८॥
आकुंचन पृथ्वीचें । प्रकार आणिक व्यवस्थेचे । मुख घर नासिकाचें । आहार परिमळाचे नेमस्त ॥५९॥
स्वाद तरी आम्लक । शस्त्र खांडा देख । एवं वायुतत्वीक । तुज आवश्यक निवेदिलें ॥१६०॥
येथोनि आकाशतत्वाचा । प्रकार ऐक नेमाचा । भय द्वेष क्रोध साचा । लोभमोहाचा विस्तार ॥६१॥
याचे मिश्रनेचे गुण । आकाशीं भय वायुद्वेषण । तेजीं क्रोध लोभीं जीवन । मोह पृथ्वीपासोन उदेलासे ॥६२॥
आकाशाचें घर ललाट । श्रवण त्याचें मुख नीट । आहार ऐकणें स्पष्ट । स्वाद कडवट जाणिजे ॥६३॥
वर्ण तरी काळा कृष्ण । शस्त्र तयाचा तो बाण । हें पांच तत्वांचें विवरण । आणीक श्रवण करीं पुढें ॥६४॥
आप निजे पृथ्वी बोले । तेज देखे वायु चाले । आकाश ऐकोनि डोले । काजें आपुले ठायीं ठायीं ॥६५॥

एवं रचिला पिंड प्रमाण । औट कर मांडणी जाण । यामाजीं पंचप्राण । त्यांचें नामकारण अवधारीं ॥६६॥
प्राण टाकी श्वासोच्छ्वास । आहारीं सेवीं अन्नोदकास । अपान सारी मळमूत्रास । व्यान रसधातु पुष्टी ॥६७॥
उदान देह अंतकाळीं जागा । येन्हवीं तो निद्रिस्त उगा । सावध होतां करी सीमगा । दाहवी अंगा शंखमार्गें ॥६८॥
समान राखी समता । एवं पांचांची हे कथा । पंच उपप्राणांची व्यवस्था । तेही आतां सांठवी ॥६९॥
नाग कूर्म कृकट । देवदत्त धनंजय नामें चोखट । उद्भव कारणें स्पष्ट । निवडितों नीट जीवीं राखीं ॥१७०॥
आकाशाचा कृकट पाहीं । हास्य रुदन तये ठायीं । वायूचा नाग अंगमोडा देहीं । उरले तेही लक्षिजे ॥७१॥
कूर्म तेजाचा ढेंकर । देवदत्त जळाची जांभई थोर । पृथ्वीचा धनंजय निर्धार । शिंकेचा प्रहर गांजवी ॥७२॥
एवं प्राणपिंड रचिला । विस्तार सर्व निरोपिला । अनंत ब्रह्मांडीं विस्तारिला । प्रकृतिपुरुषमेळ्या सर्व जाणे ॥७३॥
यातें चैतन्य चाळक । प्रेमतत्त्व असे पाळक । होवोनि राहिलें व्यापक । साक्षित्वें देख कृत्याचा ॥७४॥
त्यावांचोनि कांहीं । अणुमात्र रितें नाहीं । ओतप्रोत भरलें पाहीं । पाहतां ठायीं न पडेची ॥७५॥
मूळ बीजची विस्तारलें । पत्रपुष्पीं संभारलें । सेखी सफळित फळलें । फळीं व्यापलें बीजचि कीं ॥७६॥
विस्तार समूळेंसी जाय । तोचि बीजीं सांठवोनि राहे । येण्याजाण्याची सोय । तेथेंचि होय निर्धारें ॥७७॥
असो जेथोनि हें औडंबर । त्या औडंबरींच सर्वेश्वर । व्यापोनि उरलासे साचार । परात्पर म्हणती ज्या ॥७८॥
श्रुतिशास्त्रें जया गाती । वेद वाचें मौनावती । पुराणें जया भाटीव करिती । परी न पवती निश्चया ॥७९॥
तो जगदात्मा सच्चिद्घन । तो सकळांचा निवास पूर्ण । त्यासी जाणावयालागोन । करिती प्रयत्न श्रेष्ठ महा ॥१८०॥
जो का मुळीं निराकार । तोचि नटला साकार । अनेक केला विस्तार । जीव समग्र उद्भविलें ॥८१॥
जीवांचें जाणोनि जीवन । वस्तुत्वें नटला आपण । त्यांतें तोषवी परिपूर्ण । लडिवाळ म्हणोन आपुले ॥८२॥
जें जें जीवा दिसे गोड । ते तें संपूर्ण पुरवी कोड । जीवांहोनि आणिक जोड । दुजी पडिपाड असेना ॥८३॥
कर्म अकर्माचें यंत्र । ज्याचें त्या हातीं दिधलें स्वतंत्र । तेवींच हालवी सकळ सूत्र । लीला विचित्र अनुपम ॥८४॥
सर्व करोनी अकर्तेपण । साक्षित्वें राहिला आपण । पाहे जीवांचें लक्षण । ओळखिता कोण मज आहे ॥८५॥
पाहतां पाहे सर्वपणीं । तंव माया वसे जीवभ्रमणीं । विकृती विकारीं गेले लुब्धोनि । पुढिल्या देखणीं लांचावले ॥८६॥
मागें परतोनि न पाहती । मूळ ठाया न शोधिती । पडिले जावोनि अज्ञानगर्तीं । घोर आवर्तीं दुर्धर ॥८७॥
लक्ष चौऱ्यांशींचा राहाट । कर्म अकर्माचें माळाचव्हाट । तेथें जीवकुंभ गुंतले स्पष्ट । फिरता कष्ट पावती ॥८८॥
तेथें नाहींच विश्रांती । धेरे घेतां नाहीं नीती । एक एक योनी कोटी भोगिती । लक्षचौऱ्याशीं फिरती पंक्ति या ॥८९॥
येथें प्राधान्य कर्माचरण । भोगितां भोग नोव्हे सावधान । मग तो सर्वज्ञ दयाघन । कळवळे देखोन युक्ति काढी ॥१९०॥
चौऱ्याशींलक्षांचा शेवट । मनुष्यदेह हा श्रेष्ठ । जेवीं माळेचा चोखट । मेरु वरवंट शोभला ॥९१॥
येथें सर्वाधिकार जाण । आधिपत्य ओपिलें ज्ञान । सरूपतेचें दिधलें दान । वसतें स्थान योजिलें ॥९२॥
हा लाभ प्राप्त व्हावयासी । समान पुण्य पाप पारख्यासी । ही योजना नेमोनि निश्चयेंसी । सर्व सुखासी अर्पिलें ॥९३॥

सर्वांमाजी हा उत्तम । येणें जाणावा माझा क्रम । मग त्यानें पूर्ण विश्राम । निजसुखधाम पावेल ॥९४॥ सद्गुरु म्हणती एकनाथा । निती सर्वेश्वरी करवाळुता । येणें सर्वस्व अर्पिलें नराच्या माथां । आपुली सन्निधता ठेवोनी ॥९५॥ जेवीं वडील चोजविती बाळका । प्रीति वाटवोनि देती सुखा । जपती त्याच्या देहदुःखा । प्राणसखा म्हणती त्या ॥९६॥ सुरवाड करोनि निवाडें । पुरविती त्यांचें सर्व कोडें । सर्वस्व अर्पिती रोकडें । मनीं कुडें नाणोनि ॥९७॥ सर्व कार्यी आपणासमान । प्रौढ केला देवोनि ज्ञान । त्यातें अणुमात्र न वंचोन । केला सधन सुखाचें ॥९८॥ हा आम्हांतें भजेल । जीवन आमुचें जाणेल । कीर्ति जगीं वाढवील । धन्यता पावेल येणें आम्हां ॥९९॥ हा करील आमुची सेवा । श्रम त्याचा देईल विसांवा । वाढवील आमुच्या कीर्ति नांवा । संसार बरवा साधील ॥२००॥ हाचि लोभ धरोनि मानसीं । वाढवील प्रेमें विश्वासी । उत्तम दिधलें नरदेहासी । जाणतील मजसी म्हणोनियां ॥१॥ तंव हे विषयसुखा द्रुभोन । गेले न होती सावधान । मोहमदिरा केली प्राशन । नाहीं आठवण त्यांची त्यां ॥२॥ कामकर्दमीं लोळती । अनीति क्रोधें खवळती । मदें उन्मत्त न मानिती । मत्सरी धुसकती उरगसे ॥३॥ दंभें न मानिती कवण । मी चतुर प्रवीण शाहणा । इतरां नाणोनि मना । ठायींच माना असोदित ॥४॥ अहंकाराचा अंगीं भर । तेणें भोपणाचा सोसी भार । म्हणे मजवांचोनि न चाले संसार । कर्ता कारभार मीच की ॥५॥ माझ्या शहाणपणापुढें । येर कोण तें बापुडें । मूढ अज्ञान दिसती माकडें । माझ्या उजेडें हे सर्व ॥६॥ ऐसा षड्विकारें माजला । अष्ट विकृतींनीं भ्रष्ट केला । आपुले स्वहिता मुकला । उपेगा आला नाहींच तो ॥७॥ न मानोनि वडिलांतें । सांगतां कांहीं दे लातें । न मानी श्रेष्ठ बोलातें । बोध हेलातें कायसा ॥८॥ नवसें करोनि मागितलें । तें उपेगातें न आलें । तें मूळा नाशक जालें । वांया गेलें जन्मोनी ॥९॥ जन्मोनिया नरदेहीं । स्वहित सार्थक करावें कांहीं । सार्थकाचें वर्म ठायीं । असोनि नाहीं जालेंसे ॥२१०॥ सार्थक म्हणसी तरी काय । तरी जेणें दिधला तुजसी नरकाय । आणि सौख्यार्थ केले उपाय । जाणें सोय जीवाची ॥११॥ ऐसा जो जगदानी । जेणें सर्व लेवविलीं लेणीं । त्यातें गेला विसरोनी । थोर हानी यायोगें ॥१२॥ यदर्थ बा रे सावधान । साधु संत योगीजन साधिती एकाग्र साधन । प्रसादें पूर्ण सद्गुरुच्या ॥१३॥ शिवविरंची ध्यानीं ध्याती । सनकसनंदन महामूर्ती । नारदादि वैष्णवांप्रती । शुका इच्छिती हा योग ॥१४॥ जप तप याग यज्ञता । दान धर्म करितां व्रता । पूजा सेवा आचरतां । परी न ये हातां हा योग ॥१५॥ उदंड साधनें जरी साधिलीं । दैवतेंही प्रसन्न केलीं । वेदशास्त्रपुराणें धुंडिलीं । काया दंडिली तरी नोव्हे ॥१६॥ सायासें जरी भोगी शीण । जरी सोडिलें अन्नपान । कीं असंख्य द्रव्य वेंचिलें जाण । लाभ घडोन न येतो ॥१७॥ तो लाभ येतांचि हातां । तुटती जन्मकर्मांची वार्ता । परब्रह्मीं होय समरसता । नये मागुता गर्भवासा ॥१८॥ हा लाभ साधावयासाठीं । मानुषजन्म दिधला शेवटीं । म्हणोनि सावध उठाउठीं । करवोनि सांठी करवीली ॥१९॥ जो सनातन परब्रह्म । जो सकळ जीवांचा विश्राम । तो पूर्ण करावया भक्तकाम । बावया विश्राम प्रगटला ॥२२०॥ तो जगद्गुरु जगन्निवास । सच्चिद्घन अविनाश । तोडावया भवभय पाश । सगुण वेष जयाचा ॥२१॥

दत्त दिगंबर अवधूत । तो मज जाला कृपावंत । निजगुज हृदयीं प्रेरित । स्वात्महित साधवी ॥२२॥
एके दिवशीं प्रगट होवोन । सकृपें दिधल दर्शन । मज केलें पूर्ण पावन । अभयदान दीधलें ॥२३॥
पाहोनि रूप अद्भुत । सप्रेमें चरणीं जालों विनीत । नाममुद्रा पुसतां प्रगटित । गिरिधरनाथ निवेदी ॥२४॥
त्या उदार सकृपें मजला । स्वात्मअनुभवीं वोध केला । अनुभव अंगीं बिंबविला । तो वा सोहोळा अनुपम ॥२५॥
त्या कृपें मी लाभ लाधलों । मजमार्जीच मी सुखावलों । ब्रह्मैवाहं पद पावलों । जीवीं घालों धणीवरी ॥२६॥
आपीं आपणां पाहिलें । तेंचि विश्वीं कोंदलें । जनीं जनार्दनत्व लाधलें । नाम शोभविलें जनार्दन ॥२७॥
धन्य या सद्गुरुची कृपा । मज मार्ग दाविला सोपा । चुकविल्या तेणें जन्मखेपा । ज्ञानदीपा उजळिलें ॥२८॥
दृष्टी देखोनिया चोख । माझें मज केलें प्रकाशक । रवी तारा शशि पावक । उपमे तुक न साहे ॥२९॥
अनंत तेजाची सांडणी । सांडाची वरी ओंवाळोनी । तें अलक्ष्य लक्षितां लक्षणीं । चिद्रत्नखाणी चिन्मय तें ॥३०॥
डोळां भरतांचि चिन्मय । वृत्ति होतसे तन्मय । सांगतां न ये सुखसोय । विरोनि जाय सैंधवसें ॥३१॥
सद्गुरु अविनाश संपन्न । मज अविनाश पावलें निधान । तेणें केलें आपणासमान । बाणवोनि ध्यान मुद्रा हें ॥३२॥
ध्यानीं रंगलें सदा चित्त । म्हणोनि आवडे एकांत । याचा न करावा लोकांत । साधिजे स्वहित गुप्त गुह्य ॥३३॥
ऐकतां सद्गुरुचें निरोपण । एकनाथें दृढ धरिले चरण । न सोडी न उठे तेथून । म्हणे जी दान द्यावें हें ॥३४॥
जी हा अनन्य शरण स्वामिपदीं । अजोनि उरवितां पाठीं व्याधी । हें उचित नोव्हे तुम्हां कृपानिधी । तोडा उपाधी पुढील ते ॥३५॥ तुम्ही सद्गुरु सर्वेश । हा सेवक म्हणवी तुमचा दास । न टेविजे यातें उदास । धरिली कास न सोडीं ॥३६॥
ऐसा देखोनि निर्धार । द्रवलें सद्गुरुचें अंतर । म्हणे वा तूं होसी प्रियकर । दत्त अभयकर पावलासी ॥३७॥
तेंच आज्ञा मातें जाली । पाहिजे यावरी कृपा केली । गुह्य गुप्त हृदयकमळीं । तें या युगळीं दाविजे ॥३८॥
तरी एकनाथा सावधान । तुज निरोपितों तें साधन । निवांतपणें घालोनि आसन । एकाग्र मन करीं का ॥३९॥
एकनाथ सादर होतां । तात्काळ दाविलें मीनपंथा । दोघांचुगला दढावितां । बाण भेदितां कळ साहे ॥४०॥
चौघां भेदोनि जावें । पुढिल्यातें लक्षावें । अदळयोगें दळावें । मळ न चळावें पाहोनी ॥४१॥
*नाना चक्रें नाना रंग । निरखणी होय जाय तरंग । कीं व्योमाकृति योग । मुक्त भाग रत्नावळी ॥४२॥*
विद्युत् उरगाची पिली । कीं पुढें नाचती जालीं । लाभवेळा सवेग आली । तेथें न चुळबुळी पाहिजे ॥४३॥
धीटें व्हावें नीट । कदा न मानोनियां वीट । सुवर्णकमळपीठ । तेथें फट निरखितां ॥४४॥
तो हंस अंगींचा डोळ्यं । पावेल एकाएकीं विमळा । अद्भुत फांकेल कळा । तेज उमाळा अनुपम ॥४५॥
भानु तरी न जाळी । चंद्र ना शीतळी । अग्नि तरी न पोळी । आनंदकल्लोळीं सुखठाव ॥४६॥
तया पोटीं रिघावा । करितां सुनीळ वरवा । मसुराकृती प्रभावा । प्राणेश्वर पाहावा तोचि तो ॥४७॥
त्या सुखासी नाहीं पार । असंभाव्य तेज अपार । वृत्ति होय तदाकार । मागील प्रकार हारपला ॥४८॥
तो सच्चिदानंद । सुखकल्लोळ ब्रह्मानंद । मी तूं पणाचा हारपला भेद । वादसंवाद खुंटला ॥४९॥

मकार उकार अकार । येथें सरला साचार । पुढें पाहे निराकार । निबिड अंधःकार दाटला ॥२५०॥
पुढील कैसें होय । विराटापासाव सोय । स्थिर निदर्शीन राहे । महाशून्य विये गगनातें ॥५१॥
निरखितां सुनीळ गगन । मार्जी ग्रहनारांगण । शुक्रतत्प्रभाय-ान । निरंजन ज्योतिरूप ॥५२॥
हें सकळाचें बीज । येयोनि अवघें चोज । हेंचि योगी संत साधु सिद्धांचें निज । हे गुह्य गुज वेदाचें ॥५३॥
हें मंज गिरिधरनाथें । आज्ञापितां बोधिलें तूतें । आणीक नसे यापरतें । सप्रेम रत ये ठायीं ॥५४॥
या निर्गुणापासव सगुण । विस्तारीं विस्तारिलें आपण । समारोपीं हेंचि स्थान । तें तुज संपूर्ण लेखविलें ॥५५॥
येथें ने धरीं तूं अभाव । हाचि मोक्ष मुक्ताचा ठाव । हा सकळ जीवांचा जीव । घेईं अनुभव अनुभवोनी ॥५६॥
जें का अध्यात्मज्ञान । तें नित्यानित्य अभ्यासन । त्याचें हेंचि बापा कारण । तत्त्वदर्शन व्हावया ॥५७॥
त्या मंथनींचें नवनीत । तुज करविलें प्राप्त । अभ्यासें भोगीं गुह्य गुप्त । आनंदयुक्त अंतरीं ॥५८॥
यापरी एकनाथा । सद्गुरु जनार्दन जाला दाता । त्या कृपें लाभ जाला पावता । सुख समता स्वानंद ॥५९॥
हे सद्गुरुकृपेवीण । लाभ न लभेचि जाण । जीवेंभावें करितां सेवन । ते कृपाघन वोळती ॥२६०॥
सद्गुरुसेवा मुख्य सार । याहोनि नसे तप थोर । परी निर्विकल्प घडावें साचार । मग लाभा पार असेना ॥६१॥
हें एकनाथें साधिलें । अलभ्य लाभ तेणें पावले । तथापि सेवे नाहीं सोडिलें । अंतर्बाह्य रंगलें मन त्याचें ॥६२॥
स्वामी सद्गुरु जनार्दन । सेवेसि तिष्ठे एका आपण । एकमेकांचें ऐक्यपण । समरसोन राहिलें ॥६३॥
कनक आणी कांती । दीप आणि ज्योती । प्रकाशप्रभा निश्चितीं । तेवीं विलसती गुरुशिष्य ॥६४॥
कीं रत्न आणि कीळ । कीं उदक आणि कल्लोळ । कीं गव आणि निराळ । तेवीं प्रेमळ ऐक्यत्वें ॥६५॥
की दुग्ध आणि पय । परिमळ मकरंद होय । जेवीं देह आणि काय । भिन्न ठाय नसेची ॥६६॥
एवं दोघां ऐक्यपण । नामें मात्र दिसती दोन । विचारें तेंही अभिन्न । एका जनार्दन एकची ॥६७॥
जीवनावेगळी मासोळी । कदा न जीवे ती निराळी । तेवीं दोघें ऐक्यमेळीं । ब्रह्मकल्लोळीं सुखावले ॥६८॥
सद्गुरु एकनाथाचें जीवन । एकनाथ सद्गुरुचा प्राण । स्वात्मतत्त्वीं सावधान । स्वरूपीं निमग्न डुल्लती ॥६९॥
असो सद्गुरु विचारिती मानसीं । एका पावला पूर्णतेसी । आतां न घ्यावें सेवेसी । न करावें आइसी कांहीं या ॥२७०॥
आत्मतत्त्वीं जालासे तत्पर । परी घडावा सगुणसाक्षात्कार । यदर्थ योजोनि विचार । आज्ञा निर्धार करीतसे ॥७१॥
म्हणे एकनाथा ऐक वचन । देवगड पर्वतीच दरी जाण । सरोवर पवित्र विराजमान । तेथें अनुष्ठान करीं जा ॥७२॥
पूर्वीं मार्कंडेयऋषी । तेणें तप केलें या ठायासी । हें स्थळ उत्तम तापसांसी । तूं निश्चयेंसी जाय तेथें ॥७३॥
तुज जो मंत्र दिधला पाहें । तो जपोनि निष्ठें राहें । शीत उष्ण पर्जन्य साहें । क्षुधा धायें मिळाल्या ॥७४॥
सद्गुरुचरणा वंदोन । एकनाथ बैसले तेथें जावोन । आज्ञेऐसें अनुष्ठान । साधी तो साधन एकाग्रें ॥७५॥
जातां सद्गुरु आज्ञा करिती । अद्भुत आलिया अनुभूती । मग परतोनि यावें निश्चितीं । लाभ मजप्रती सांगावया ॥७६॥
सद्गुरुवचनीं निर्धार । धरोनि राहिला मानसीं थोर । तंव एक कृपी माविक थोर । करवी आहार पय नित्य ॥७७॥

एकनाथ ध्यानीं निमग्न । देखोनि धांवे महाफण । स्वशरिराचें नाथा वेष्टन । फड पसरोन छाया शिरीं ॥७८॥
नाथ सावधान होतां । उरग होय तेथोनि जाता । परी तें न कळे एकनाथा । दिवस लोटतां बहु गेले ॥७९॥
तंव दुग्ध घेवोनि प्रभातकाळीं । एके दिनीं कृषी पावला जवळी । तंव नाथ वेष्टिले व्याळीं । येरें आरोळी मारिली ॥२८०॥
संकट देखोनी अद्भुत । कृषी कंपित जाला आक्रांत । महाशब्दातें करीत । फण न हालत कांहीं केल्या ॥८१॥
ध्यानाचें होतां विसर्जन । उरग गेला तेथोन । एकनाथ जाले सावधान । कृषियें नमन पैं केलें ॥८२॥
वृत्तांत नाथा कळविला । तें एकनाथें स्तव केला । गरुडध्वज प्रगटला । आलिंगिला एकनाथ ॥८३॥
सर्वें कृषीसि जालें दर्शन । उभय जाले आनंदघन । सक्रपें बोले नारायण । एकनाथा धन्य तूं होसी ॥८४॥
मी सर्व भावें साह्य तुजसी । सत्यपणें राहें मानसीं । मीच फणिरूपें रक्षीं तुजसी । बोलोनि हृषीकेशी गुप्त जाला ॥८५॥
था साधुसेवेनें भला । कृषियालागीं लाभ जाला । दुग्ध पाजोनी नाथाला । क्षेत्रासि गेला वंदोनी ॥८६॥
एकनाथ म्हणती यापरता । विशेषात्मकें लाभ कोणता । जावें भेटावें सद्गुरुनाथा । विलंब न लावितां निघाले ॥८७॥
त्वरें मार्गातें क्रमोन । वंदिले येवोनि सद्गुरुचरण । जालें तें केलें निरोपण । परिसोनि जनार्दन संतोषले ॥८८॥
कांहीं दिवस लोटतां । पुनरा आज्ञा करिती एकनाथा । सर्व यात्रा करोनि मागुतां । ये अतौता वत्सा तूं ॥८९॥
आज्ञा वंदोनि शिरसीं । एकनाथ गेले यात्रेसी । पूर्व पश्चिम दक्षिण उत्तरेसी । चारी धामांसी पाहती ॥२९०॥
तंव एकनाथपित्याचा पिता । येऊन भेटला जनार्दनपंता । दीनपणें जाला स्तविता । म्हणती समर्था कृपा करीं ॥९१॥
आमुचें जालें वृद्धपण । एकनाथ करितो येथें सेवन । आम्हां सांभाळिता कोण । हें सर्व आपण जाणतां ॥९२॥
वृद्धपणीं असावा जवळी । म्हणोनि प्रार्थितों चरणकमळीं । जनार्दन कळवळो ते वेळीं । आज्ञापत्र जवळीं दिधलें ॥९३॥ एकनाथ यात्रा करोन । येतां दावा त्यालागोन । तो कधीं न करी अमान्य । देऊं पाठवून आल्यां येथें ॥९४॥
ऐसी होतां अभयता । संतोष वृद्धाचिया चित्ता । मग पुसोनि जनार्दनपंता । जाला पावता प्रतिष्ठानीं ॥९५॥
तंव यात्रा सर्व उरकोन । प्रतिष्ठाना पावले एकनाथ । गुप्त वृद्धा येवोनि नमीत । जावोनि त्वरित बाह्य राहे ॥९६॥
वृद्धें पाठीं धांवोन । बैसले ठायीं तया वेढोन । सद्गुरुचें पत्र दावी त्यालागोन । येरें शिरीं वंदन पैं केलें ॥९७॥
मग तेच ठायीं राहिला । भजन पूजन करी कथेला । सभोंवता भाविकांचा पाळा । श्रवणीं बैसला सादर ॥९८॥
जे सद्गुरूंनीं लाविली पद्धती । त्यापरी नित्यानित्य आचरती । स्वकर्मे प्रभातें सारिती । मग त्या आर्चिती सर्वेश्वरा ॥९९॥
तृतीय प्रहरीं पुराण । एकनाथ निरोपिती आपण । नारीनर करिती श्रवण । रात्रौ भजन निजछंदें ॥३००॥
यापरी आचरतां निश्चितीं । परी कीर्तनीं कोण्ही नाहीं साथी । हें जाणोनि रुक्मिणीपती । वेष धरिती द्विजाचा ॥१॥
पुराणसमयीं येवोन । करूं बैसले श्रवण । नाथ विचारिती त्यालागोन । कोठील कोण सांगावें ॥२॥
कोठें जाणें तुम्हांसी । कोण परिवार सांगा आहे तुसी । हें परिसोन हृषीकेशी । काय नाथासी बोलती ॥३॥
माझें नाम केशव पाहीं । परिवार कुटुंब मातें नाहीं । एकटा एकला उदास देहीं । सत्संग सोधी वागतों ॥४॥
तुम्ही भगवद्भक्त महामूर्ती । देखोनि आनंद वाटला चित्तीं । अभय घाल जरी मजप्रती । राहीन निश्चितीं सेवेसी ॥५॥

आम्हां धनाची नाहीं चाड । न मागें उत्तम धडगोड । वैष्णवसंगतीची आवड । पुरविजे कोड एव्हढें ॥६॥
परिसोनियां एकनाथ । परम हर्ष रहा म्हणत । केशवासी हर्ष जाला बहुत । सेवेसी वागत नाथाच्या ॥७॥
कीर्तनीं उभा राहे पाठीसी । झेली सम तुक वचनासी । अद्भुत रंग ओढवे कथेसी । येती श्रवणासी जनलोक ॥८॥
दिवसेंदिवस वाढती कळा । हरि करी भक्ताचा सोहोळा । ध्यान लाविलें नरनारी बाळां । वेद सकळां नाथाचा ॥९॥
वैदिक शास्त्री पंडित । अवघेचि होती कीर्तनीं मोहित । भक्तिभावें प्रेमळ सेवित । भावें अर्पित सर्व कांहीं ॥३१०॥
तंव पावली कृष्णजयंती । नाथें सद्गुरुसी पाठविली विनंती । ते साहित्यासह येती । महोत्साह प्रीतीं आरंभिला ॥११॥
प्रतिपदेपासोन । नित्य होतसे कथाकीर्तन । अष्टमीस जन्मनिरोपण । सोहोळा जन अवलोकिती ॥१२॥
नवमीस पारणें केलें । प्रतिष्ठानवासी तृप्त जाले । प्रसाद समस्तां पावले । रात्रौ आरंभिलें कीर्तन ॥१३॥
दशमीदिनीं योजिला काला । प्रसाद लाह्या वांटिती गोपाळा । हांडी फोडोनि संपविला । आनंदें सोहोळा सकळांतें ॥१४॥
एकादशीस छबीना । परम गजरें मिरवील देवराणा । द्वादशीं तृप्त केलें ब्राह्मणां । रजनींत योजना ललिताची ॥१५॥
त्रयोदशीं होतां प्रभात । पायघडिये पाउलें पूजित । तीर्थप्रसाद सकळां वांटित । प्रेम अद्भुत वर्षलें ॥१६॥
यापरी उत्साह संपादोन । निघते जाले जनार्दन । तों वृद्ध बोलती नम्र वचन । कुळ संतान वाढवावें ॥१७॥
जाणोनि त्यांचें मनोगत । जनार्दन एकनाथा आज्ञापीत । गृहस्थाश्रम संपादावा त्वरित । आज्ञा सत्य मानावी ॥१८॥
अवश्य म्हणोनि वंदिले चरण । सद्गुरु देवगडा गेले पूर्ण । जातां गृहस्थाश्रमधर्म केलें बोधन । पुढें गमन मग केलें ॥१९॥
सद्गुरुकृपें करोनी । प्रार्थीत वधू पावली सदनीं । विवाह संपादिला आनंदें करोनी । फिटलीं पारणीं वृद्धांचीं ॥३२०॥
कांता गिरजा मिळाली उत्तम । नाथचरणीं तिचें प्रेम । जाणोनि मनोगताचें वर्म । पतिव्रताधर्म चालवी ॥२१॥
संत साधु द्विज अतीत । यांचे पुरविती मनोरथ । सदाचरणीं आनंदभरित । प्रेमा अद्भुत हरिपदीं ॥२२॥
असो कर्नाटक देशांतुनी । श्रीपांडुरंगमूर्ती घेवोनी । आला गृहस्थ नाथसंनिधानीं । भाळ चरणीं ठेविला ॥२३॥
नाथ साकल्य पुसतां त्यासी । तंव गृहस्थ निरोपी नाथासी । पांडुरंगें स्वप्न दिधलें मजसी । मज दे प्रतिष्ठानासी एकनाथा ॥२४॥ हें परिसोनि आनंदलें मन । मग मिळवोनि द्विजगण । सुमुहूर्तें वेगीं पाहोन । उद्धवालागोन आज्ञापिती ॥२५॥
उद्धव मातुळ भगवद्भक्त । एकनाथ आज्ञे सदा पाळित । द्वापारींची आवडी मनांत । पूर्ण करीत तो येथें ॥२६॥
कृष्ण तोचि एका होय । उद्धव सेवी त्याचे पाय । सेवेंत झिजवी स्वकाय । आज्ञा होय पाळिता ॥२७॥
आज्ञा वंदोनि नाथाची । सिद्धता केली साहित्याची । प्राणप्रतिष्ठा पांडुरंगमूर्तीची । केली द्विजवरांचीं अर्चनें ॥२८॥
मंत्रघोष वाद्यगजर । षोडशोपचारें पूजिला सर्वेश्वर । पक्वान्न नैवेद्य प्रकार । पात्रीं सविस्तर विस्तारिले ॥२९॥ तंव नाथें नवनीत करीं घेवोन । प्रेमें प्रार्थिला जगज्जीवन । म्हणे गोकुळीं भक्षिले चोरोन । ते सकळांलागोन कळावें ॥३३०॥
भक्षी नवनीत एव्हढें हरी । तंव मूर्ति हांसे ते अवसरीं । जिव्हा काढोनि बाहेरी । नवनीत करी भक्षण ॥३१॥
हा नवलाव पाहतां । आश्चर्य वाटलें कर्णाटकस्थां । आनंद झाला समस्तां । धन्य धन्य नाथा म्हणताती ॥३२॥
धूप दीप नैवेद्य समर्पोन । फल तांबूल दक्षिणा ठेवोन । मंगळ आरत्या उजळोन । ओवाळिलें पूर्ण हरीतें ॥३३॥

करोनि आरतीगजर । पुष्पांजळी अर्पिती द्विजवर । प्रदक्षिणा करोनि नमस्कार । पाहती सुंदर रूप नयनीं ॥३४॥
करोनि दक्षिणादान । समस्तीं सारिलें भोजन । विडादक्षिणा देवोन । बोळविलें संपूर्ण द्विजांतें ॥३५॥
कर्णाटकींचा गृहस्थ । आदरें नाथासी प्रार्थित । आम्ही रुक्मिणी करितों निर्मित । कन्यका अर्पित हरीतें ॥३६॥
हरी जाणा तुमचा कुमर । रुक्मिणी कन्या आमुची सुंदर । परमानंदें करूं स्वयंवर । मानला विचार नाथातें ॥३७॥
येरू आज्ञा घेवोनि गेला स्वस्थानीं । तात्काळ प्रेमें निर्मिली रुक्मिणी । तिथिनिश्चय करोनी । पत्रिका लिहुनी धाडिली ॥३८॥ सहपरिवारें नाथ गेले । मंगलकार्य हरीचें साधिलें । तेणें अपार धन वेंचलें । तोषविलें सर्वांसी ॥३९॥
एक मास राहोनि एकनाथ । जन भक्तीसी लाविले समस्त । कीर्तनबोधें केलें तृप्त । निघाले त्वरित पुसोन ॥३४०॥
शिबिकेंत विठ्ठलरुक्मिणी । मार्ग क्रमिती आनंदें करोनी । भाविक अर्चिती प्रेमपणीं । मुहूर्ते प्रतिष्ठानीं पावले ॥४१॥
गृहप्रवेशीं पूजिलें लक्ष्मीसी । तृप्त केले प्रतिष्ठानवासी । परमानंद जाला सर्वांसी । गुणकीर्तीसी वाखाणिती ॥४२॥
नित्यानित्य नाथसदनीं । आनंदवृष्टी राहिली होवोनी । द्वादश वर्षे टाळ धरोनी । चक्रपाणी राहिले ॥४३॥
तों पंढरीक्षेत्रीं अनुष्ठान । करिता जाला एक ब्राह्मण । इच्छून पांडुरंगाचे दर्शन । निग्रहें निरसन आरंभिलें ॥४४॥
तेथें देवीनें दिधला दृष्टांत । प्रतिष्ठानीं एकनाथ । त्याचे आश्रमीं निवांत । पंढरीनाथ राहिले ॥४५॥
केशव धरोनि नामाभिधान । टाळ वाजवी करितां कीर्तन । जाय तेथें होईल दर्शन । येरू विश्वासोन चालिला ॥४६॥
मार्ग क्रमोनी पैठणीं पावला । येवोनि नाथासी भेटला । म्हणे केशव कोठें दावीं मजला । चरणकमळा वंदीन ॥४७॥
साकल्य एकनाथें विचारिलें । अनुष्ठानियानें निवेदिलें । नाथें केशवा पाचारिलें । येतां धरिले चरण द्विजें ॥४८॥
तात्काळ हरी प्रगटला । चतुर्भुज मूर्ती सांवळा । शंख चक्र करकमळां । कांसे पिंवळा तोडर पदीं ॥४९॥
मुगुट कुंडलें विराजमान । मीनासुर शोभे वदन । आलिंगिला प्रेमें करोन । समाधान पावले ॥३५०॥
द्विजासी बोले वनमाळी । मी वरा होतों ये स्थळीं । तूं कोठोनि पातलासि ये वेळीं । सेवा अंतरली पैं माझी ॥५१॥
नाथ म्हणती दयाळा । किती करिसी भक्तसोहोळा । तुज अनाथाचा कळवळा । पाळिसी लळा वत्साचा ॥५२॥
हरि म्हणे तुम्हांवीण । मज जिवलग आहे कोण । आन न गमे तुम्हांवांचून । एक क्षण सत्य पैं ॥५३॥
ऐसें बोलोनि गुप्त जाला । द्विजें एकनाथ आलिंगिला । नाथ म्हणती जी दयाळा । लाभ जाला तुमचेनी ॥५४॥
आनंदें करोनि भापण । द्विज गेला आज्ञा घेऊन । एके दिवशीं कर्जदार येवोन । शपथ घालोन तो गेला ॥५५॥
एकनाथें ऐकोनि शपथ । ठायींच बैसले निवांत । चाचया न चले कोठें हात । नाथ न सेवीत अन्नातें ॥५६॥
उद्धवें बहु योजिलें प्रयत्नासी । कार्य न घडेच त्या दिवशीं । क्षेत्र घडलें तें सर्वांसी । जाणे हृषीकेशी संकट तें ॥५७॥
तीन प्रहर होतां रजनी । उद्धवाचें रूप धरी चक्रपाणी । जावोनि वाण्याचे सदनीं । करी त्यालागोन जागृत ॥५८॥
म्हणे खत वेगीं काढीं । घे द्रव्य मोजोनि तांतडी । म्हणे प्रभात जाल्या करा फेडी । पारख चोखडी होईल ॥५९॥
हरी म्हणे नाथांसी । शपथ घालोनि निजे विलासी । ते अद्याप उपवासी । लाज तुजसी न वाटे ॥३६०॥
ऐसें परिसोनि योला । वाण्यासी पश्चात्ताप झाला । तात्काळ दुकानीं गेला । रोखा काढिला सत्वर ॥६१॥

खतीं भरपाई करोन । द्रव्य घेतलें मोजोन । श्रीनामाक्षरें फाडोन । केले स्वाधीन उद्धवाच्या ॥६२
भगवद्गीतेमाझारी । खत आणोनि ठेवी हरी । गुप्त जाला मुरारी । भक्तकैवारी दीनबंधू ॥६३॥
इकडे होतांचि प्रभात । वाणी पावला अकस्मात । नायासि करोनि प्रणिपात । म्हणे अपराधी निश्चित मी खरा ॥६४॥
घातली शपथ मानोन । आपणां घडलें निरसन । उद्धवजी रात्रीं येवोन । द्रव्य मोजोन दीधलें ॥६५॥
मी खतरजनींत फाडिलें । भरपाई करोनि उद्धवा दिधलें । तंव उद्धवाचें मन दचकलें । काय बोले भलतेंचि हा ॥६६॥
नाथ म्हणती उद्धवासी । कोठें खत दाखवा आम्हांसी । द्रव्य दिधलें वाण्यासी । तें अम्हांसी श्रुत करा ॥६७॥
उद्धव म्हणे वो समर्था । मी न या वार्तेसी जाणता । साक्ष चरण सद्गुरुनाथा । असत्य वदतां वाणी म्हणे ॥६८॥
नाथ करिती मनीं विचार । हें वर्म जाणे सर्वेश्वर । वाण्यास म्हणती तुझें भाग्य थोर । तुज श्रीधर भेटला ॥६९॥
करितां गीतेचें पठण । तंव खत निघालें पत्रांतोन । सद्गदित जाले लोचन । म्हणती धन्य देवराया ॥३७०॥
आम्हां अनाथांची करुणा । वाहसी किती नारायणा । किती चोजविसी सेवाहीना । दीनपालना दयार्च्चे ॥७१॥
वाणी म्हणे कृपाराशी । म्यां वृथा छळिलें तुम्हांसी । मी अपराधी शरण पायांसी । करा बक्षिसी अपराध ॥७२॥
नाथ म्हणती धन्य होसी । तुज भेटला तो हृषीकेशी । ऐकोनि पश्चाताप मानसीं । झाला नाथासी शरण तो ॥७३॥
आणिक एक नवल झालें । पितृतिथीस फकीर जेवविले । तिन्ही देव भेटले । हें वर्म न कळे कवणातें ॥७४॥
निमंत्रिले ब्राह्मण । तेणें नाथा लाविलें दूषण । म्हणती तुमचे पितर करतील भोजन । आम्ही न भोजन करूं आतां ॥७५॥
नाथ म्हणती तुमची वाणी । तैसीच ईश्वरा करणें करणी । आगंतव्यं म्हणतां ते क्षणीं । पितर येवोनि पावले ॥७६॥
पितृयज्ञ पूर्ण झाला । नवलाव सकळांतें वाटला । म्हणती वृथा अभिमान धरिला । तेणें लाभ गेला हातींचा ॥७७॥
मग नाथातें स्तविलें । तें नाथें सकळां तोषविलें । पार नाहीं संतलीले । ते वर्णिले नव जाय ॥७८॥
ऐसें होतां कांहीं दिवस । पुन्हा सेवार्थ पावला जगन्निवास । धरोनिया द्विजवेष । आला आश्रमास नाथाच्या ॥७९॥
तो पुढील प्रसंगीं रस । वाढविता सद्गुरु अविनाश । तो सेविजे सावकाश । श्रवणीं उल्हास धरोनिया ॥३८०॥
बाप कृपाळू जगज्जीवन । संतसंगीं राहिला रमोन । सदा संतसन्निधान । उभा नारायण तिष्ठतो ॥८१॥
म्हणोनियां अनंतसुत । संतपदीं शरणागत । दान सेवेचें मागत । पुरवी हेत दीनाचा ॥८२॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । परिसोत संत भाविक भक्त । त्रिपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥३८३॥

॥ इति त्रिपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ५४ वा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय सद्गुरु पूर्ण ब्रह्म । अज अजित सर्वोत्तमा । अखिल अभंगा विश्रामा । नाम अनामातीत तूं ॥१॥
तूं सच्चिद्घनविलासी । नामें प्रगटलास अविनाशी । जगदोद्धार करावयासी । सकृपें पावलासी दातारा ॥२॥
दीन दयाळ करुणाघन । तूं होसी पतितपावन । तुझे तारक जीवां चरण । तेथें नमन पैं माझें ॥३॥
दत्त दिगंबर अवधूता । ये धावोनि समर्था । पुरवीं दीनांचिया अर्था । मनोगता जाणोनी ॥४॥
तूं सदय उदार योगिराया । अनन्या करीं कृपेची छाया । श्रोते श्रवणार्थी सदया । तोषविजे तयां निरोपणीं ॥५॥
तुझी लीला कथारस । तो पाजीं या प्रेमळांस । चातकापरी पाहती वास । कृपामृतास वर्षवीं ॥६॥
त्रिपंचदशोध्यायीं निरोपण । एकनाथभक्ती पाहोन । सेवेलागीं आपण । द्विजनंदन जालासी ॥७॥
देखोनि निजभक्ताचा प्रेमा । त्या घरीं दास आलासि सर्वोत्तमा । अर्जुनाचें सारथ्य मेघःश्यामा । पुरवितां कामा न लाजसी ॥८॥ तुज दासाची आवडी । भक्ति देखोनि चोखडी । अंगीं घालिसी येवोनि उडी । अति तांतडीं देवराया ॥९॥
न धरोनि थोरपणा वा अभिमान । प्रसंगाऐसें करिसी रूप धारण । करिसी निजभक्ताचें काजकारण । तेथें योग्य हीन न म्हणसी ॥१०॥ तूं प्रेमळांचा होसी सखा । दुःख नासोनि देसी सुखा । तव गुणाचा न करवे लेखा । सहस्रमुखा न वर्णवे ॥११॥ कृपाळू सदय तूं जगदीश्वर । तुझा आगमनिगमा न कळे पार । तो तूं एकनाथा जोडिसी कर । सेवे सादर राहोनी ॥१२॥ एकनाथ केवळ शांत दांत । प्रपंच मानी उदास विरक्त । भक्तिभावें प्रेमळ चित्त । स्वरूपीं रत सर्वदा ॥१३॥
देह गेह प्रपंचभान । न गुंते लोलुप्य लोभीं मन । न रुचे पुत्र दारा धन । मानापमान न पाहे ॥१४॥
कामनावर्जित भावना । रंगली हरीचिया स्मरणा । अद्वयमानसीं वासना । संत सज्जना भजावें ॥१५॥
दया क्षमा शांती । निःसीम बाणली उपरती । ध्यानीं मनीं कृष्णमूर्ती । वाणीं गीतीं सुरम्य ॥१६॥
निंदा द्वेष मोह भ्रम । त्यागोनि वृत्ति निष्काम । सर्वां भूतीं सर्वोत्तम । आत्माराम निरखीत ॥१७॥
संत साधूंची धरोनि संगती । कीर्तनीं प्रेमा वाढविती । पंढरीक्षेत्रा वारसी जाती । रुक्मिणीपती पाहावया ॥१८॥
तें भूवैकुंठ पंढरपुर । असे साधुसंतांचें माहेर । शरणागतांचा सोयरा सर्वेश्वर । उभा विटेवरी समचरणीं ॥१९॥
कर ठेवोनिया कटीं । आल्या गेल्या देतो भेटी । सदा सर्वदा कृपादृष्टीं । पाहे जगजेठी भक्तांतें ॥२०॥
वाम बाहीं भीमककन्यका । सह शोभती अष्टनायका । सन्मुख गरुड मारुती देखा । लक्षोनि पादुका तिष्ठती ॥२१॥
तो महाद्वाराचा मंडप विस्तीर्ण । भजनानंदीं साधु सज्जन । मध्य द्वार उल्लंघोन । राउळें संपूर्ण त्याआगीं ॥२२॥
मध्य मंडपामाझारी । जय विजय शोभती द्वारीं । समीप मंडपांतरीं । दिव्य साजरी रंगशिळा ॥२३॥
सन्निध असे दक्षिण द्वार । होती भजनाचे गजर । मंडपीं दर्शनासि दाटी फार । सांवळा समोर उभा तो ॥२४॥
मध्यस्थ अल्प गाभारा । तेथें दाटणीचा उबारा । पैल जातां पैस खरा । पैं आढवी सुंदर लाट ते ॥२५॥
तीतें जातां ओलांडून । भव्य शोभे सिंहासन । विटेवरी जगन्मोहन । होय अलिंगन-सुखातें ॥२६॥

धन्य तेचि भाग्यवंत । वारी पंढरीची साधित । त्यांचे पदीं व्हावें नत । जेणें पंढरीनाथ पाहिला ॥२७॥
सन्मुख वाहे भीमरथी । दक्षिणवाहिनी तटें शोभती । माजी पुंडलीकमुनी वसती । संत गर्जती नामघोषें ॥२८॥
चंद्रभाग वाळवंटीं । चहूंकडे यात्रेची दाटी । एकमेकां होते भेटी । चरणीं मिठी घालती ॥२९॥
दिंड्या पताका चहूंकडे । साधुसंत गर्जती पवाडे । भजनीं प्रेमा सर्वां जडे । वाडेंकोडें नाचती ॥३०॥
प्रदक्षिणेलागीं जातां । आनंद उपजे क्षेत्र पाहतां । अन्य वासना नुपजे चित्ता । निर्विकल्पता प्राप्त होय ॥३१॥
पुष्पावतीचे पैलतीरीं । कालाप्रसाद गोपाळपुरी । गोपाळांचे मारीं । खेळे हरी ठाव तो ॥३२॥
उभे केले गोवृंद । खडकीं उमटलें पद । तेथें सारिजे प्रसाद । आम्हां गोविंद वाट पाहे ॥३३॥
नारद व्यासाचें ध्यावें दरुषण । पाहावें विष्णुपद पावन । स्थळोस्थळीं तुळसीवन । विश्रांतिस्थान रम्यतें ॥३४॥
हा वेणु नादाचा योग । दर्शनीं गोमटा प्रसंग । महाप्रसादाचा प्राप्त भाग । सुरवर लाग साधिती ॥३५॥
पद्माळें तीर्थ पश्चिमेसी । स्नान वंदनें त्या तीरासी । नमिजे भावें पद्मावतीसी । पापतापासी नुरविते ॥३६॥
रुक्मिणीचें तपस्थान । तें उत्तरेसी ध्यावें दरुषण । मुळींचें हें दिंडीरवन । दंडकारण्य दंडकाचें ॥३७॥
श्रीहरि सहपरिवारेंसी । आला पुंडलिकाचे भेटीसी । गुंतोनि त्याचे भावेंसी । जगदोद्धारासी राहिला ॥३८॥
तो हा पांडुरंग मायबाप । होवोनि शरणागता सकृप । दर्शनें निवटी सकळ ताप । चुकवी खेप जन्माची ॥३९॥
तें हें महाक्षेत्र पंढरी । अनुपम इची थोरी । धन्य धन्य वारकरी । अधिकारी मोक्षाचे ॥४०॥
आयोध्या आणि मथुरा । काशी कांची अवधारा । माया अवंती सुंदरा । सिंधुतीरा द्वारावती ॥४१॥
ह्या मोक्षपुऱ्या नेमिल्या सात । परी पंढरीची सरी न पावत । येथील महिमा अतिअद्भुत । जीवन्मुक्त नरनारी ॥४२॥
येथें नित्यानंद गजर । नामघोष निरंतर । एकादशी पर्व थोर । कथा जागर होताती ॥४३॥
आषाढीकार्तिकीचा मेळा । अद्भुतची आनंदसोहळा । तो पहावया डोळां । भाविकप्रेमळां आल्हाद ॥४४॥
हें सकळांचें सुखस्थान । साधुसंतसमाज करिती गमन । घ्यावया पांडुरंगदर्शन । प्रफुल्लित मन सकळांचें ॥४५॥
यात्रा समाज आनंदें जात । त्यासवें निघाले एकनाथ । पंढरीक्षेत्रा पावले त्वरित । स्नान सारीत चंद्रभागें ॥४६॥
पाहतां पुंडलीकमुनी । आनंद न समायेचि मनीं । संतपदातें नमोनि । आलिंगनीं मिसळले ॥४७॥
नामदेव चोखा निरखिला । मंडपीं गरुड हनुमंत नमिला । जयविजयरंग शिळा । पाहतां डोळां आल्हाद ॥४८॥
पाहतां सन्मुख शोभा । हरि विटेवरी दिसे उभा । रूपें सुंदर गगनगाभा । दैदीप्य प्रभा विराजे ॥४९॥
पाहतां सप्रेम अंतर । नयनीं पाहिला सर्वेश्वर । नमोनि आलिंगिला सुंदर । सोडावा विचार नमनेंची ॥५०॥
दर्शन पित्याचें घेवोनी । माता वंदिल्या प्रेमें करोनी । सर्व स्थानें पाहिलीं नयनीं । संतसज्जनीं सुखावले ॥५१॥
यात्रा करोनि समस्त । प्रतिष्ठाना जाती एकनाथ । वारीलागीं समस्त । आदरें जात आपण ॥५२॥
असो नित्य करितां कृष्णस्मरण । तंव तो सेवाधारी द्विजनंदन । स्मरणासरिसा धांवोन । ये जोडोन कर राहे ॥५३॥
एकनाथ म्हणती त्यासी । वारंवार कां उगा येसी । येरू म्हणे पाचारण श्रवणासी । पडतां मज सी येणेंचि कीं ॥५४॥

तंव एकनाथ म्हणती बाळा । मज कृष्णस्मरणाचा चाळा । तूं कां येसी वेळोवेळां । नाम तुजला हेंचि काय ॥५५॥
येरू म्हणे जी दातारा । तुम्हीं नामें वाढविलें विस्तारा । शब्द ऐकतांचि खरा । जोडोनि करा तिघुणें ॥५६॥
तंव नाथ म्हणती नोव्हे ऐसें । काम तरी होईल कैसें । येरू म्हणे आज्ञे जैसें । कराल तैसें करीन ॥५७॥
नाथ म्हणती मजलागुन । प्रगट करीं तव नामखूण । कार्यप्रसंगीं पाचारीन । नेम वचन सत्य दे ॥५८॥
परिसोनि नाथाचें उत्तर । भाव जाणे सर्वेश्वर । करिता जाला विचार । नामप्रकार सांगावया ॥५९॥
करितां कार्या कारण । तैसेंचि जालें नामधारण । सेवा करावयालागोन । प्रगटलों येवोन नाथगृहीं ॥६०॥
येथें सर्व कार्यातें करोन । देतों श्रीखंड उगाळोन । हें म्यां साधिलें वतन । करोनि साधन नाथाचें ॥६१॥
ऐसा विचार करोनि मानसीं । म्हणे श्रीखंड्या नाम मजसी । ऐकोनि हास्य नाथासी । विनोद सर्वांसी वाटला ॥६२॥
असो त्या हास्यविनोदें । नाम पाचारितां छंदें । अंगीकारिलीं परमानंदें । आनंदकंदें भक्तप्रीतीं ॥६३॥
दिवानिशीं करी सेवन । जाणे अंतरींचें कारण । कोठें पडों नेदी न्यून । तोषवी पूर्ण एकनाथा ॥६४॥
असो एकनाथ ज्ञानखाणी । भगवद्भक्तशिरोमणी । रत सदा कीर्तनभजनीं । सदाचरणीं वर्तत ॥६५॥
त्याचे चरित्र वर्णितां सकळ । ग्रंथ वाढेल विशाळ । अनेक ग्रंथीं त्या कथा रसाळ । वदला निर्मळ महिपती ॥६६॥
म्हणोनि येथें निर्धार । न करीं कथेचा विस्तार । परी किंचित् सारासार । जोडोनि कर निरोपितों ॥६७॥
गृहीं पुरातन पांडुरंगमूर्ती । एकनाथ तिसीं सप्रेमभक्ती । सर्वोपचारें नित्य पूजिती । भजन करिती तिजपुढें ॥६८॥
नित्य पुराण कीर्तन । भाविक करूं येती श्रवण । प्रेमळ एकनाथ जाणोन । म्हणती धन्य साधु हा ॥६९॥
सद्गुरुप्रसाद एकनाथा । अभंग पदें करी कविता । श्रोत्यांसि प्रेम वाटे ऐकतां । आनंद चित्तां भाविकांच्या ॥७०॥
कितीक स्तुति स्तवातें करिती । कितेक दुष्टमतीनें निंदिती । परी दोहीं ठायीं सम प्रीती । विमळ चित्तीं सर्वदा ॥७१॥
सप्रेम मिट भाषण । कवितेमाजी रस पूर्ण । देखोनि तोषे नारायण । निद्रेंत येऊन जागवी ॥७२॥
स्वामी रामरूप दाविलें । लेखणी पत्र करीं दिधलें । वाल्मिकें शतकोटी विस्तारिलें । तें प्राकृत जालें पाहिजे ॥७३॥
निघेल तव मुखांतुन । तें मज गोड लागेल श्रवण । तव प्रेमभावार्थ कथन । भावार्थरामायण नाम त्याचें ॥७४॥
नाथ होवोनि जागृत । रघुनाथ आज्ञा शिरीं वंदित । सद्गुरुसी करोनि प्रणिपात । टीका रचीत रामायणीं ॥७५॥
कथा करितां निरोपण । सीताशुद्धीस जाय वायुनंदन । शोधीत अवघें कानन । पावला येवोन महेंद्रा ॥७६॥
पैल जावयां लंकेप्रती । तेथोनि उडाला मारुती । तो आविर्भाव नाथाप्रती । उडोनि पडती परसदनीं ॥७७॥
तंव ती रजनी दोन प्रहर । जागृत गृहस्थ आला बाहेर । तेणें पाहिला तो विचार । करीं पत्र लेखणी ॥७८॥
पत्रींचा देखोनि वृत्तांत । म्हणे हें जालें अविर्भावभरित । म्यां निंदिलें यातें सत्य । परी धन्य कृत्य साधु हा ॥७९॥
मग एकनाथा उचलोन । नेवोनि पाववी त्यांचे सदनीं । संकल्प करी आपुले स्थानीं । घ्यावा यापासोनी उपदेश ॥८०॥
मग तो नित्यानित्य प्रार्थना । करी एकनाथासन्मुख जाणा । म्हणे उपदेश करा मज दीना । नये मना नाथाच्या ॥८१॥
सद्दुग्ध रसाळ देखोनि गाय । तिची सेवा करिता होय । हे परमार्थिक नसती उपाय । वदूं काय या मूर्खा ॥८२॥

परिक्षिल्यांवीन । पदरीं बांधूं नये जाण । हिरा साहे जंव घण । योग्य कोंदण कीजे त्या ॥८३॥ मग बहिर्दिशेहोनी येतां । नाथ होय परीक्षिता । हुंकारें होय उदक मागता । जवळीं असतां नेदी तो ॥८४॥ यापरीं त्यातें परीक्षोन । करोनि बोळविलें मिष्ट भाषण । म्हणती उपदेश दांभिकालागोन । कल्पांतीं जाण न करावा ॥८५॥ भाविक प्रेमळ अनाथ । यावरी व्हावें कृपावंत । अनन्य भावें शरणागत । येतां परमार्थ द्यावा त्या ॥८६॥ असो कांहीं एक दिवस लोटतां । एकनाथाचीं वृद्धें अतौता । भूलोक सांडोनि वैकुंठपंथा । सुखसरूपता पावले ॥८७॥ यावरी लोटतां संवत्सर । अद्भुत जाला चमत्कार । तो श्रोतीं परिसिजे सादर । किंचित सार निवेदितों ॥८८॥ सांवत्सरिक आली पितृतिथी । एकनाथ द्विजां क्षण देती । उदयीक यावें कृपामूर्ती । अवश्य म्हणती द्विजवर ॥८९॥ एकनाथ सदना येवोन । आज्ञापी स्वपत्नीलागोन । उदयीक आहे पितृयज्ञ । सावधान असावें ॥९०॥ पतिआज्ञा वंदोनि शिरीं । संमार्जनें गृह शुद्ध करी । पात्र घूतां ते अवसरीं । श्रीखंड्या भरी उदकातें ॥९१॥ करोनि साहित्य सिद्धता । आरंभी पाका प्रभात होतां । न्यून पूर्ण करणें अनंता । अनाथनाथा भक्ताचें ॥९२॥ पाकीं श्रीखंड्या ब्राह्मण तेथें उत्तम पक्वान्न निर्माण । मधुर मघमघीत दिव्य अन्न । अनुपम पूर्ण जालेंसे ॥९३॥ पाकसदनपृष्ठीसी । अंत्यज झाडी मार्गासी । कांता भरितां फेरासी । तंव स्वाद तिजसी फावला ॥९४॥ पतीसी म्हणे ती कामिन । आज नाथगृहीं स्वादिष्ट अन्न । जालें वाटतें निर्माण । तें आपणां कोठोन प्राप्त होय ॥९५॥ अंत्यज म्हणे आजि पितृतिथी । तेथें द्विजांचीच भुक्ती । उरलें अन्न पुरोनि टाकिती । केंवीं देती आपणा ॥९६॥ येरी म्हणे मी गर्भिणी । लालसा उपजली त्या अन्नसेवनीं । अंत्यज म्हणे प्राक्तनीं । नाहीं कोठोनि आणावें ॥९७॥ तंव एकनाथ उपरीवरी । उभय भाषणें श्रवण करी । दया उपजली अंतरीं । कांते झडकरीं निवेदिलें ॥९८॥ वचन ऐकोनि कांता । पोटीं कळवळली पतिव्रता । म्हणे अंत्यजां समस्तां । पाचारा आतां भोजनीं ॥९९॥ परिसोन आल्हाद नाथासी । अंत्यज पाचारी भोजनासी । गंध अक्षता सुमनेंसी । पूजोनि पात्रासी बैसविलें ॥१००॥ सकळ अंत्यजां करोनि तृप्ती । उरलें अन्न पदरीं घालिती । जनार्दन व्यापक सर्वां भूतीं । देखोनि चित्तीं आनंद नाथा ॥१॥ अंत्यज बोलती वचन । एकनाथ साधु दयाळ पूर्ण । आम्हां दिल्हें अपूर्व भोजन । संतुष्ट नारायण हो येणें ॥२॥ अंत्यज आश्रमा जातां । पुन्हा सडासंमार्जनें अतौता । वस्त्र पात्रीं पाटव्यता । स्नानें समस्तां मागुतीं ॥३॥ अंतर्बाह्य करोनि शुची । नूतन सिद्धता केली पाकाची । सोज्वळ निर्मिली सुरसाची । गोडी त्याची न वर्णवे ॥४॥ इकडे सर्व प्रतिष्ठानांत । गुजगुज फुटली मात । आज असतां पितृतिथ । अंत्यज निश्चित जेवविले ॥५॥ परिसोनि द्विज कोपले । म्हणती भ्रष्टकर्म येणें केलें । आम्हांआधीं त्यां जेवविलें । सर्वी उपेक्षिलें एकनाथा ॥६॥ गृहिणी विनवी नाथासी । वेगीं पाचारा द्विजांसी । नाथ पाचारितां वेगेंसी । न ये भोजनासी विप्र कोण्ही ॥७॥ बहु नाथातें निर्भर्त्सिलें । सहिष्णु करोनी नाथ बोले । पुनः शुचियुक्त पाक केले । आपण आलें पाहिजे ॥८॥ न येऊं म्हणती द्विजवर । तुजला घातला बहिष्कार । कोण ब्राह्मण जेवितील येर । पाहूं चमत्कार तयाचा ॥९॥ परिसोन द्विजांचें भाषण । चिंताक्रांत आले परतोन । तंव श्रीखंड्या बोले वचन । कां उद्विग्न होतसां ॥११०॥

ते न येतां निर्धार । येतील भोजनीं पितर । पूजासाहित्य मांडोनि सत्वर । पाट सुंदर मांडिले ॥११॥
नाथासि करवूनी स्नान । म्हणे आगंतव्यं बोला वचन । वदतां पावले पितृगण । कले पूजनमंत्रोच्चारें ॥१२॥
श्राद्धीं तृप्त पितर जाले । दक्षिणा तांबूल अर्पिले । आशीर्वचनी घोष केले । ते ऐकिले द्विजवरीं ॥१३॥
धांवोनि पाहती येवोन । तंव ते देखिले पितृगण । ज्याचा त्यासी दिसे पूर्ण । आचंबित मन सकळांचें ॥१४॥
वंदिले विप्रां त्यांचें बीज । म्हणती साह्य यासी अधोक्षज । म्हणोनि घडलें अघटित काज । साधु सतेज खरा हा ॥१५॥
आम्हां कर्मठपणाचा अभिमान । वृथा निंदलें एकनाथालागोन । सर्वस्वें जाली नागवण । द्रव्यें अन्न गमाविलें ॥१६॥
प्रार्थोनि आश्रमीं पितर येतां । विशेष जाल्या विनोदवार्ता । ते एकनाथचरित्रीं कथा । जाणविलें संकेता सज्जनां ॥१७॥
एकनाथा प्रार्थिलें द्विजगणीं । वेदाज्ञेतें विरुद्ध नाणीं । प्रायश्चित घ्यावें आचरणीं । मान्य करणी तुझी आम्हां ॥१८॥
अवश्य म्हणती एकनाथ । द्विज देती प्रायश्चित । सुस्नात होती श्रीगंगेंत । तंव नवल अद्भुत वर्तलें ॥१९॥
एक गलित कुष्टी द्विजवर । समूहीं पातला सत्वर । समस्तांसी जोडोनि कर । पुसे घर एकनाथाचें ॥२०॥
विप्र म्हणती काय कारण । आपण आलांत कोठोन । तें सांगा वर्तमान । नाथालागून भेटवूं ॥२१॥
कुष्टी म्हणे त्र्यंबकेश्वरीं । रोगहरणार्थ मी तप करीं । तंव दृष्टांत दिधला शंकरीं । रोगपरिहारीं माझिया ॥२२॥
प्रतिष्ठानीं एकनाथ । तेणें अंत्यज जेवविले बहुत । त्यापाशीं जाय त्वरित । तो भगवद्भक्त दयाळु ॥२३॥
तयातें शरण जावोन । एका अंत्यजाचें मागें पुण्य । तें प्राप्त होतांचि जाण । रोग भस्मोन दिव्य काया ॥२४॥
विश्वास धरोनि मानसीं । आलों तुमचे ठायांसी । तो एकनाथ दावा मजसी । शरण तुम्हांसी मी दीन मी ॥२५॥
ऐकोनि गद्गदा विप्र हांसती । कोण्ही निंद्य अनिंद्य बोलती । काय खमाऐसें उमापती । देईल निश्चितीं वागेना ॥२६॥
ब्राह्मणाहोनि अंत्यज थोर । कोणतेही शास्त्रीं नसे विचार । एक म्हणती पाहा चमत्कार । कासया उशीर पाहिजे ॥२७॥
मग विप्र म्हणती कुष्टयासी । आम्ही प्रायश्चित देतों एकनाथासी । पैल पाहें गंगाजळासी । येरू वेगेंसी धांवला ॥२८॥
करोनि साष्टांग नमन । आयंत निवेदी वर्तमान । म्हणे करा माझें रोगहरण । अंत्यजपुण्य एक वेंचा ॥२९॥
एकनाथें तें अवसरीं । गंगोदक घेतलें करीं । एक अंत्यजपुण्य उच्चारी । अर्पी निर्धारीं त्या द्विजा ॥३०॥
येरू करितां प्राशन मार्जन । रोग तात्काळ गेला जळोन । जेवीं भानुउदयमान । होतां पळोन तम जाय ॥३१॥
तेवीं रोगा होवोनि परिहार । दिव्य जालें विप्रशरीर । आश्चर्य करीत द्विजवर । म्हणती नवल थोर देखिलें ॥३२॥
मानव कोणें म्हणावें यास । हा केवळ ईश्वरी अंश । न जाणोनि दिधला त्रास । घडला दोष आम्हांतें ॥३३॥
एकनाथाची गुणकीर्ती । द्विज मुखें वाखाणिती । आपुलाले स्वस्थाना जाती । वार्ता सांगती जनलोकां ॥३४॥
साधु सत्पात्र एकनाथ । सप्रेमें हरीचे गुण गात । श्रीकृष्ण श्रीखंड्या मूर्तिमंत । सेवे तिष्ठत दिवानिशीं ॥३५॥
जन म्हणती हा ब्राह्मण । लागतो एकनाथाचें ऋण । तें फेडी सेवा करोन । नैराश्यें न मागोन आदरें ॥३६॥
द्वादश वर्षेंपर्यंत । एकनाथाची शुश्रूषा करीत । न कळे कवणासी मात । हा द्वारकानाथ म्हणोनी ॥३७॥
निर्मळ चित्तें करितां सेवा । एकनाथा संतोष बरवा । म्हणे विवाह याचा करावा । हेतु जीवा उपजला ॥३८॥

तंव तापसी एक ब्राह्मण । गोमतीतटीं करी अनुष्ठान । हाचि हेतु मनीं पूर्ण । व्हावें दर्शन श्रीकृष्णाचें ॥३९॥
नया लोटतां बहु दिवस । तंव द्वारावती देखे स्वप्नास । म्हणे आम्हां टाकोनि जगन्निवास । प्रतिष्ठानास पैं गेले ॥१४०॥
सकळ वैभव संपत्ती । रमा कौस्तुभ वैजयंती । हे न रुचती तयाप्रती । भक्त आवडती प्राणसखे ॥४१॥
भक्तप्रेमभावें मोहिले । विनयें प्रीतीनें ध्याइले । बोबड्या शब्दें गाइले । देखोनि भुलले मुकुंद ॥४२॥
सर्योग्यतेतें सांडोन । दास्यत्व त्याचें करिती जाण । आवडी सेवी संतसदन । मूळापासोन हेचि खोडी ॥४३॥
नग्न अन्हीं वनीं पायीं । गौळियाच्या राखिल्या गाई । पोटासाठीं चोरोनि खायीं । दुग्ध दहीं लोणी घृत ॥४४॥
जाला पार्थाचा सारथी । घोडीं घासी आपुल्या हातीं । सुभद्रा होवोनि त्वरित गतीं । कामपूर्ती करीत ॥४५॥
भक्त बळी तो प्रबळ । तेथें भीक मागोनि जाला द्वारपाळ । पुंडलिकें उभा केला निश्चळ । अद्यापि अचळ पंढरिये ॥४६॥
नामदेवाची वाहे गोणी । जनीचें करी शेणपाणी । कबीराची करी पाजणी । लाज मनीं न धरीच ॥४७॥
चोख्याची ढोरें ओढी । गोऱ्याचीं मडकीं घडी । सांवत्याचीं बांधी जुडी । होवोनि गडी रावत ॥४८॥
बोधल्याचें राखी शेत । सेन्याची धोकटी वाहत । ज्ञानदेवाची ओढी भिंत । कांहीं न म्हणत श्रमलों मी ॥४९॥
दामाजीचा पडिवार । होवोनि वेदरंडा करी जोहार । पोते भरूनी म्हणे नफर । निश्चयी प्रियकर पंतांचा ॥१५०॥
आतांचि पाहें पां जावोन । एकनाथआश्रमीं राहे आपण । लौकिक लज्जा सोडोन । भरी जीवन गंगेचें ॥५१॥
आवडीनें वाहे कावडी । चंदन घांसी तांतडीं । कामें करितो लवडसवडीं । लागली गोडी एकनाथीं ॥५२॥
तूं तेथें जाय वेगेंसी । तुज भेटेल हृषीकेशी । ब्राह्मण जागृत सरतां निशी । आठवोनि स्वप्नासी निघाला ॥५३॥
मुखीं स्मरे त्या सर्वेश्वरा । उल्हासें करी गमनीं त्वरा । वेगीं पावला गंगातीरा । विवि नगनगरें पाहिलें ॥५४॥
पैल जातां गोदाउतरोन । तंव कावडी भरोन जाती ब्राह्मण । तयांसी पुसे वर्तमान । एकनाथसदन मज दावा ॥५५॥
तंव कोण्ही तयातें सांगती । पैल कावड्या जाय चपळ गती । तूं जाय त्याचे संगातीं । सदनाप्रती नाथाच्या ॥५६॥
मार्गे पाहे श्रीखंड्या आपण । नयनीं पाहिला तापसी ब्राह्मण । म्हणे हें तों आलें मज विघ्न । जाणे खूण भक्तसखा ॥५७॥
मागें येतां द्विजा पाहे । अति चपलत्वें जाय । तापसी म्हणे हाचि होय । धरावे पाय याचे आतां ॥५८॥
तंव तो चापल्य जगदीश्वर । पावला नाथाचें मंदिर । घागरी ठेवोनि सत्वर । केला संचार सदनांत ॥५९॥
इकडे अंगणीं तापसी । उभा राहोनि पुसे नाथासी । एकनाथें देखोनि तयासी । धांवोनि पदांसी नमियेलें ॥१६०॥
प्रेमें देवोनि आलिंगन । सत्कारें अर्चिला तो ब्राह्मण । म्हणे कोठोनि स्वामींचें आगमन । अर्थ कोण निरोपिजे ॥६१॥
येरू म्हणे कृष्णदर्शन । व्हावया द्वारकें अनुष्ठान । करितां जालें मज स्वप्न । प्रतिष्ठानीं दर्शन पावसी ॥६२॥
तेथें भक्त प्रेमळ एकनाथ । त्याचे गृहीं सेवा करीत । कृष्ण श्रीखंड्या नाम विख्यात । दर्शन निश्चित तुज तेथें ॥६३॥
तुमचें भाग्य ऐकोनि गहन । लाभार्थ आलों त्वरें धांवोन । मज करवा जी दर्शन । क्षुधित नयन पाहावया ॥६४॥
या द्विजाचिया बोलें । एकनाथ मनीं चांकाटले । म्हणे माझें अद्यापि नाहीं कळलें । धिग् धिग् जालें जिणें माझें ॥६५॥
भांडारीं असोनि धन । दारिद्र्य भोगी भाग्यहीन । वस्तु जवळी असतां पूर्ण । अंधालागोन न दिसे ॥६६॥

हेचि जाली आम्हां गती । जवळी असोनि जगत्पती । केवढा भाग्यहीन मी पापमती । नाहीं चित्तीं जाणीतला ॥६७॥
करीं प्राप्त देवें हिरा । परीक्षाहीना भासे गारा । तेवीं म्यां त्रिभुवनसोयरा । नाहीं अंतरा जाणिला ॥६८॥
असो तें एकनाथ । श्रीखंड्यातें पाचारित । ओसरीं मधघरीं पाहत । खोल्या धोंडाळीत सर्वही ॥६९॥
मग चढोनि उपरीवरी । ताही स्थानें शोध करी । कोठें न दिसे मधुकैटभारी । उजेड अंधारीं न सापडे ॥१७०॥
नेत्रीं सद्गद वाहे पाणी । तापसीं नाथा जोडी पाणी । म्हणे मज दावा तो चक्रपाणी । जेणें पाणी आणिलें ॥७१॥
नाथ म्हणती शोधिलें । सकळ स्थान धांडोळिलें । नेणें कैसें काय जालें । गुप्त गेले होवोनी ॥७२॥
तुमचें भाग्य अतिथोर । त्वां श्रीखंड्या ओळखिला सर्वेश्वर । तो व्यापक सर्वांतर । सिंहासनीं समोर पहा तो ॥७३॥
जनीं जनार्दनची वसे । वस्तुतें भिन्न भाव दिसे । पाहें ज्ञानदृष्टीं तोचि असे । वेगळीक नसे तरंग जळा ॥७४॥
पुष्प आणि परिमळ । किरण आणि मंडळ । गोडी आणि गूळ । मुक्ता ढाळ एकत्वें ॥७५॥
तेवीं विश्वीं विश्वंभर । नटला असे सर्वेश्वर । येथें नाणीं द्वैतविचार । निरखोनि अंतर तोषवीं ॥७६॥
द्विज म्हणे हें तुमचें ज्ञान । गोड न लगे मजलागोन । वाचें वदतां अमुप पक्वान्न । तृप्त कोण होईल ॥७७॥
त्या दर्शनीं मज गोडी । ते न पुरतां माझी आवडी । प्राण त्यक्त करीन कुडी । आन जोडी मज नको ॥७८॥
देखोनि द्विजाचा निर्धार । एकनाथ जाले चिंतातुर । म्हणे कोण करूं विचार । अनर्थ थोर ओढवला ॥७९॥
तें सप्रेमें गाती करुणा । म्हणती धांवें रुक्मिणीरमणा । करीं संकट निवारणा । आजि या ब्राह्मणा तोषवीं ॥१८०॥
गुणातीत तूं निर्गुण । सर्व व्यापक सर्वज्ञ । वेदा अगोचर सच्चिद्घन । तो तूं जीवन भरिसी येथें ॥८१॥
नामरूपा नाहीं अंत । म्हणोनि नामें तूं अनंत । तो तूं जगज्जीवन दीनानाथ । गंध उगाळित निजकरें ॥८२॥
वर्णितां श्रुती शास्त्र मौनावती । योगी मुनिजन सिद्ध ध्याती । तो तूं शेषशायी कमलापती । कामें प्रीतीं स्वीकारित ॥८३॥
पांडवयज्ञीं साह्य केलें । उच्छिष्ट पात्रें करीं काढिलें । ते चोज त्वां मातें दाविलें । दिसूं न दिल्हें अंग कांहीं ॥८४॥
द्वादश वर्षेपर्यंत । सेवायोग साधिला सत्य । दर्शन देतां जालासि गुप्त । भेटीस अतीत वाट पाहे ॥८५॥
देखोनि स्वामी आकांता । पावली एकनाथकांता । आक्रोशें आठवी श्रीकांता । अनाथनाथा त्रिजगा ॥८६॥
म्हणे सांवळे कृष्णाबाई । आम्हां दुर्बळांची होसी आई । मज करतळीं राबलीस कान्हाई । किती काई वाणूं तें ॥८७॥
झाडिसी सारविसी काढिसी केर । सदा अंगणीं घालिसी सत्वर । अडचण देखोनि थोर । धुसी चीर स्वकरें ॥८८॥
पाकपात्रें धुवोन । साहित्य देसी सिद्ध करोन । किती आठवूं तुझे गुण । श्रम निवारण करसी तूं ॥८९॥
माझें साह्य तूं करिसी । अडल्या पाकातें सारिसी । वेळोवेळां सांभाळिसी । आतां कां जालासी अदृश्य ॥१९०॥
काय अमुचें पुण्य सरलें । म्हणोनि आम्हांतें उपेक्षिलें । कोण अंतर सांग पडलें । अडचणी गोंविलें आम्हां दीनां ॥९१॥
तुझिया दर्शनालागून । तापसी त्यजितो आपुला प्राण । मग आम्ही तरी काय वांचोन । भोगावा शीण संसारीं ॥९२॥
उभयतां करितां ग्लांती । अश्रुधारा नयनीं वाहती । करुणाशब्दें पाचारिती । धांव म्हणती माधवा ॥९३॥
ये करुणाघना जगत्पाला । अनाथनाथा कृपाळा । धांवें पावें दीनवत्सला । तमालनीळा घनश्यामा ॥९४॥

पितृश्राद्धीं पावलासी । पितृगण आणिलेसि हृषीकेशी । कौतुक दाविलें विप्रांसी । आजि कां मानसीं करुणा नये ॥९५॥
अनंत भक्त तारिले । संकट त्यांचें निवारिलें । दर्शनें अंतर तोषविलें । ब्रीद संभाळिलें पावन ॥९६॥
आतां कां जालासि निष्ठुर । किती चोखाळिसी अंतर । तापसी तुझ्या दर्शनातुर । पाव सत्वर अंबुजाक्षा ॥९७॥
हीं करुणावचनें ऐकोन । प्रगट जाला जगज्जीवन । द्वय करीं माखला चंदन । देवघरांतून निघाला ॥९८॥
दिव्य मूर्ती घवघवीत । कांसे पिवळा मिरवत । करीं शंखचक्र शोभत । मुगुट विराजित मस्तकीं ॥९९॥
सुहास्य वदन कमलनयन । कर्णीं कुंडलें देदीप्यमान । कंठीं वैजयंती वत्सलांछन । झळाळ पूर्ण कौस्तुभाचा ॥२००॥
नव मेघ रंग सांवळा । एकावळी गुंजमाळा । बाहुभूषणी रत्नकीळा । क्षीर पाटोळा सुप्रभ ॥१॥
करीं कंकणेंजडित मुद्रिका । कटीं कटिसूत्र ढाळ पदका । अवयव सांग पदीं पादुका । भूषणीं निका तोडरं ॥२॥
भक्तमानस सुखसिंधू । कृपानिवास आनंदकंदू । प्रगट जाला दीनबंधू । पाहतां आल्हादू सकळांतें ॥३॥
द्विजासह चरणीं घाली मिठी । जाली सप्रेम आनंदवृष्टी । स्तवनीं तोषवीला जगजेठी । कृपादृष्टीं पाहे भक्ता ॥४॥
परमानंदें जयजयकार । तोषोनि हरी वदे वर । संत माझे प्राणप्रियकर । साह्यकारी निर्धार मी त्यांचा ॥५॥
शरणागताचे घरीं । मी काम न सांगतां करीं । जीवनाच्या घागरी । प्रेमभरीं वाहिल्या ॥६॥
एकनाथा परियेसी । हा नेम चालवीन निश्चयेंसी । सांभाळीन भक्तांसी । प्रेमनिष्ठेसी पाहोनी ॥७॥
सन्मुखें बोले नारायण । मी सेवेंत होतों आनंदघन । त्या भाग्याचें हरण । करी हा ब्राह्मण येवोनी ॥८॥
सुखरूप होतों आजवरी । सेवा करोनि तुमचे घरीं । आतां लोभें रक्षा मज अंतरीं । नसेचि दूरीं भजकातें ॥९॥
निजभक्ता देवोनि आलिंगन । अदृश्य झाला जगज्जीवन । एका जनार्दनीं ब्राह्मण । जाला निमग्न सप्रेमें ॥२१०॥
हरिरूप ठसावलें मनीं । वाचा रंगली सदृढ भजनीं । ही दत्तप्रभा दे धनी । नायालागोनी फावली ॥११॥
यापरी एके दिवशीं । ज्ञानेश्वर पावले स्वप्नासी । अंजनवृक्षमुळी कंठासी । ललाटासी झोंबली ॥१२॥
ज्ञानेश्वरी पुढें ग्रंथ । दीपाग्नि तया झळंबत । टीका जाली तेणें गलित । यदर्थी सावचित तुज करीं ॥१३॥
भेद नाहीं तुजमसी । वेगीं येवोनि अलंकापुरीसी । उखळोनि समाधीद्वारासी । निवेदिल्या काजासी करीं शुद्ध ॥१४॥
आज्ञा परिसोन नेमस्त । जागृत जाले एकनाथ । शिष्यसमुदाय घेवोनि त्वरित । जाले प्राप्त अलंकापुरीं ॥१५॥
अन्न पक्की तेयें जाण । नाहीं वाण्याचें दुकान । माध्यान्हिका संकट पूर्ण । सांप्रदायी जन गजबजले ॥१६॥
सिर्चितन्न नाथ मानसीं । वेगीं जावोनि राउळासी । मेळवोनियां ग्रामवासी । वार्ता त्यांसी निवेदिली ॥१७॥
त्यांनीं पाहिलें प्रमाण । सत्य आज्ञा ओळखोन । द्वारशिळा काढोन । नाथें प्रवेशन पैं केलें ॥१८॥
ज्ञानदेव समाधिस्थ पाहिले । नमोनि सर्व निरखिलें । वृक्ष मुळीतें वारिलें । आदरें अर्चिलें ज्ञानदेवा ॥१९॥
उचलोनि पाहतां ज्ञानेश्वरी । आज्ञा ऐसी जाली परी । मग घेवोनि ती झडकरी । आले बाहेर एकनाथ ॥२२०॥
स्वयें मिन्हाडीं जावोन । ज्ञानेश्वरी चालवी लेखन । गळाल्या टीका नूतन । ग्रंथीं योजून लिहिल्या ॥२१॥
संव शिष्यवर्ग बोलती । माध्यान्हिकाची कोण गती । दुकान न दिसे ये वस्तीं । उपाय निधिनी दिसेना ॥२२॥

तंव भक्तकामकल्पद्रुम । विश्वंभर जयाचें नाम । जाणोनि प्रसंगाचें वर्म । घनःश्याम वाणी जाले ॥२३॥
जी जी वस्तु पाहिजे त्यांसी । ती ती हाटीं मांडी हृषीकेशी । एकनाथ आज्ञापी शिष्यांसी । जा शोधासी एक वेळ ॥२४॥
ते तंव आले बाहेर । देखिला तो दुकानदार । पाहतां संतोषलें अंतर । साहित्य समग्र घेतलें ॥२५॥
तंव तयालागीं दाम देतां । वाणी होय बोलता । हिशेब चुकवा तुम्ही जातां । संकोच चित्तां न धरावा ॥२६॥
साहित्य आले घेवोनी । निवेदिली वार्ता नाथचरणीं । प्रसाद सारिला भोजनीं । आनंदें करोनी सकळिकीं ॥२७॥
शुद्ध होय ज्ञानेश्वरीग्रंथ । तोंवरी राहिले निवांत । निघण्याचा केला संकेत । तैं आज्ञापीत नाथ मुखें ॥२८॥
हिशेब उचापतीचा करावा । दाम अवघा चुकवावा । अवश्य म्हणतां तेधवां । जाणवलें माधवा अंतरीं ॥२९॥
हिशेब चुकवावया आले । दुकान सर्व गुप्त जालें । तैं बहुत शोध केले । परी ना गवसलें कवणातें ॥२३०॥
वेद शास्त्र पुराण । शोध करितां भागले जाण । जपी तापसी योगिजन । ब्रह्मादिकां गिंवसोन न ये तो ॥३१॥
विश्वचाळक सूत्रधारी । लीला दावी तो नाना परी । कोणा न कळे चरित्र निर्धारीं । पूर्ण कैवारी भक्तांचा ॥३२॥
असो शोधितां श्रमोन । आले नाथापाशीं परतोन । करिती सर्व निवेदन । नाथें खूण जाणीतली ॥३३॥
सद्गदित जालें अंतर । म्हणे भक्तपाळक सर्वेश्वर । त्याची लीला अघटित अपार । न कळे पार कवणातें ॥३४॥
असो नाथ समाधीन । नेवोनि ठेविती प्रेमें ग्रंथ । कीर्तन करोनि मंदिरांत । आज्ञा घेत जावया ॥३५॥
चरित्र देखोनि नाथाचें । आनंदलें मन क्षेत्रज्ञांचें । पुसतां पुर लोटले प्रेमाचे । समाधान त्यांचें नाथ करी ॥३६॥
आज्ञा ज्ञानेश्वराची घेऊन । वेगीं पावले प्रतिष्ठान । नित्यानंदें करिती कीर्तन । पुराण श्रवण सर्वांतें ॥३७॥
नाथ शांतीचा सागर । निर्विकल्प त्याचें अंतर । येविषींचे प्रकार । किंचित सार परिसिजे ॥३८॥
नित्य प्रभातें गंगास्नानासी । जातां यवनाश्रममार्गासी । तो येतां लक्षी एकनाथासी । थुंके नेमेंसी अंगावरा ॥३९॥
नित्य दोनचार स्नानें होती । परी न मानी कांहीं दुःख खंती । थुंकतां न राहे यवन निश्चितीं । परी नुठे चित्तीं क्रोध नाथा ॥२४०॥ यवन आचरणीं श्रमला । संकोचोनि उगा बैसला । तंव स्नान करोनि उतावेळा । आश्रमातळां नाथ उभे ॥४१॥
उभे राहिले घटिका दोन । तों यवन आला उतरोन । प्रार्थीतसे कर जोडोन । कासया शीण पावतां ॥४२॥
नाथ म्हणती तुझा नेम । तो पूर्ण व्हावा सत्य काम । येरू म्हणे मी अधम । नेणोनि कर्म आचरलों ॥४३॥
आतां अपराधाची क्षमा करा । जाइजे जी आपुल्या घरा । शांतिशीळ तूं खरा । समजलें अंतरा माझिया ॥४४॥
मी दुर्धर अपराधी पाहीं । मज दंड करा जी कांहीं । नाथ म्हणती ऐसें नाहीं । उपकार हाही तुझा मज ॥४५॥
तुझिया आचरणें करून । वारंवार गोदेचें दर्शन । अनायासें घडे स्नान । काय उत्तीर्ण होऊं तुज ॥४६॥
येरें परिसोन नाथवाणी । चरणासन्मुख घेतली लोळणी । म्हणे मी हीन मलिन दुर्गुणी । पापखाणी अमंगळ ॥४७॥
मी अनधिकारी पामर । शरण पदीं जोडोनि कर । कर्में मज भोगणें घोर । दुःख दुर्धर वाटतसे ॥४८॥
तुमचा अपराधी होय । त्यासी सुटावया नाहीं सोय । म्हणोनि लक्षितों तुझे पाय । करितां उपाय तूं दाता ॥४९॥
ऐसें स्तवितां वाणीं । सप्रेम नेत्रीं वाहे पाणी । एकनाथ कळवळले मनीं । अनुताप देखोनी तयाचा ॥२५०॥

मग तया निवेदी तारक उपाय । वरी दिधलें त्या अभय । म्हणती स्वानंदें राहें निर्भय । न बाधी अपाय पुढील तो ॥५१॥
मग येतां जातां बोध । करोनि केलें त्या सावध । उडविला सर्व भेदाभेद । भाव शुद्ध ठसविला ॥५२॥
यवनें मुर्शिद मानोन । बंदगी राहिला करोन । प्रसादहेतु अंतरीं धरोन । कदम लक्षोन अर्ज करी ॥५३॥
ज्या फतमहंमदासी । करणें हेतु हा मानसीं । हुकुम व्हावा नफरासी । कळलें नाथासी वर्म तें ॥५४॥
यासी नाहीं नाहीं म्हणतां । खेद वाटेल याचे चित्ता । यासी बाणली अभेदता । कर्मी पाहतां विरुद्ध ॥५५॥
तरी दोहीं पक्षांनें राखावें । ऐसेंचि कांहीं योजावें । मग त्यातें म्हणे येतों बरवें । विकल्प नाणावे कांहींच ॥५६॥
यवनें आज्ञा वंदोन । वाट पाहे सिद्धता करोन । म्हणे धन्य आजिचा सुदिन । प्रसादीं पावन होईन मी ॥५७॥
शुक्रवाळ एकनाथें । येतां धरिलें कक्षेनें । ताटीं घेतां निवाल्यातें । सोडी त्यातें अवचितां ॥५८॥
तेथें मुख अन्नासि लावितां । यवन दचकोनि जाला उठता । नाथ म्हणती विकल्प चित्ता । आला कोणता मज सांगें ॥५९॥
यवन म्हणे जी स्वामी । शूकर वर्ज आमुच्या कर्मधर्मी । एकनाथ म्हणती सहिष्ण ऊर्मी । न होतां अधर्मी प्रवर्तूं नये
॥२६०॥ करावें स्वधर्म धर्मसंरक्षण । मर्यादा कुळधर्माचीच जाण । लक्षावेंच अभेदलक्षण । तेथें विलक्षण नसावें ॥६१॥
धर्म राखावे जेथिचे तेथें । विरुद्ध आणूं नये त्यातें । सर्वां भूतीं पाहावें एकातें । वर्म तूतें सांगितलें ॥६२॥
वाम सव्य दोन्ही भाग । असती एकाचेंची अंग । परी ज्याचे त्या कार्यप्रसंग । वर्तवितां चांग शुद्ध तो ॥६३॥
मुळीं खरें अवर्ण । विस्तारल्या स्थापिले वर्ण । यासी मर्यादेचें घातलें आवरण । न फेडिजे प्रावरण प्राणांतीं ॥६४॥
जेणें निर्लज्ज नग्न व्हावें । अरिविक्रती मर्दावें । अद्वय अभेदत्व पावावें । तेणेंचि फेडावें प्रावरण ॥६५॥
यासाठीं भलतें न वरीं । असावें सदा विवेकविचारीं । स्वहित साधावें अंतरीं । वदा व्यभिचारीं वर्तूं नये ॥६६॥
ऐसें बोधुनी समाधान । करोनि शांतविला यवन । येरें वंदोन केलें मान्य । पावले सदन एकनाथ ॥६७॥
असो कवणे एके दिवशीं । द्विज म्हणती प्रतिष्ठानवासी । क्रोध कधीं नये एकनाथासी । उपाय यासी काय कीजे ॥६८॥
तंव अकस्मात एक ब्राह्मण । द्रव्यार्थी पावला येवोन । नमोनि अर्थ करी निवेदन । तें ऐकोन बोलती त्या ॥६९॥
जरी क्रोधावसील एकनाथ । तरी द्रव्यें देऊं सप्त शत । येरू म्हणे करा लिखित । साधीन कार्यार्थ सत्य हा ॥२७०॥
सर्व ब्राह्मण मिळोन । आर्थिका दिधलें पत्र लिहून । येरू करिता जाला प्रयत्न । पाहोनि संतर्पण नाथगृहीं ॥७१॥
पात्र मांडिलें नाथासी । आपण वैसे त्या ठायासी । वारिता नायके कवणासी । परी आनंद नाथासी अपूर्व ॥७२॥
पात्रीं वैसतां रोष न आला । प्रथम दिवस व्यर्थ गेला । दुसरे दिवशीं योग केला । अवचट वळ्या अर्भकीं ॥७३॥
ओंवळें अंगीं वसन । चर्मपादुका घालोन । प्रवेशतां वारिती ब्राह्मण । वैसे नायकोन नाथपात्रीं ॥७४॥
ब्राह्मणीं हाहाकार केले । परिसोनि नाथ त्वरित आले । अविचारी कर्म देखिलें । परी न मळे मन त्याचें ॥७५॥
करोनि त्या विप्रा साष्टांग नमन । म्हणे बाजी करितों पादुका रक्षण । आणीक हीं प्रावरण । परम जपून ठेवितों ॥७६॥
येरू म्हणे स्नान केलें । मग ठायींच पाद प्रक्षाळिले । आचमन करवोनि सोंवळें दिधलें । मग अर्चिलें सप्रेमें ॥७७॥
शांतवोनि दिधलें भोजन । विडे दक्षिणा देवोन । ज्याचें त्या अर्पिलें प्रावरण । बोळविला ब्राह्मण आनंदें ॥७८॥

सकळ विप्र तया बोलती । दोन दिवस जाले निश्चितीं । न विघडे नाथशांती । क्रोध चित्तीं नये त्या ॥७९॥
ग्रामवासियां विप्र म्हणे । उदईक सामर्थ्य माझें पाहणें । द्रव्य संग्रहोनि ठेवणें । कार्यांतीं देणें लागेल ॥२८०॥
ग्रामवासी म्हणती दिन एव्हडा । नाहीं तरी तुमचा वरघोडा । येरू म्हणे हा शब्दचि सोडा । घेईन तोडा द्रव्याचा ॥८१॥
तंव तृतीय दिन प्राप्त होतां । पडली ब्राह्मणासी चिंता । दुर्धर प्रयत्न होय योजिता । जो प्राणांता पाववी ॥८२॥
भोजनानिमित्त जावोन । नाथपात्रीं बैसे धुंडोन । क्रोधयुक्त करोनि मन । हेरी कारण नाथरोषा ॥८३॥
नाथें विप्रचर्या पाहिली । तों चंचळ वृत्ति देखिली । रोष न माय नेत्रयुगळीं । शांतवी जवळी बैसोन ॥८४॥
पदार्थमात्र पात्रीं वाढिलें । नाथकांतेनें घृत घेतलें । वाढितां द्विजवरीं देखिलें । क्रोधवर्म आणिलें मानसीं ॥८५॥
नाथ संकल्प सोडिती । सर्वीं घेतल्या प्राणाहुती । येरू मिथ्य दावी गती । नाथ प्रार्थी सर्वांतें ॥८६॥
मागुनी कामिनी जंव वाढी घृत । तंव विप्र धांवला त्वरित । नाथकांते पृष्ठीं बैसत । अकस्मात न कळतां ॥८७॥
तंव नाथ वदे कांतेसी । सांभाळी सांभाळीं विप्रासी । पडों नेदीं सुख दे त्यासी । पुरवीं हेवसी तयाच्या ॥८८॥
आपण द्विजसन्निध येवोन । उभा राहे कर जोडोन । म्हणे जें अपेक्षील तुमचें मन । तो हेतु पूर्ण करावा ॥८९॥
विप्र म्हणे ही घोडी । मी वर सर्व वऱ्हाडी । ऐसें बोलोनि करें ताडी । सकळां हाडबडी जाहली ॥२९०॥
नाथ म्हणे जी कृपा करोनी । बैसवीं सांभाळिजे अश्विनी । मी सेवक सेवेलागोनी । संकोच मनीं न धरावा ॥९१॥
देखोनि ब्राह्मणाचे कर्मासी । क्रोध पावला तैं सकळांसी । परी शांत शीतळ नाथ मानसीं । अणुमात्र तमासी नातळे ॥९२॥ अचळ शांति नाथाची । विनयता पूर्ण भक्तीची । माधुर्य शक्ति वाचेची । बोली प्रेमाची अंतरीं ॥९३॥
जैसें गगन ठायीं निश्चळ । कीं भानु जेवीं निर्मळ । कीं भूवरी अचळ । तेवीं सुशीळ नाथ हा ॥९४॥
द्विजें देखोनि नाथशांती । तात्काळ जाली उपरती । परम अनुताप जाणोनि चित्तीं । नाथाप्रती नमियेलें ॥९५॥
द्विजें करितां वंदन । नाथें धरिले त्याचे चरण । प्रेमभावें दिधलें आलिंगन । करी नमन कांता द्विजा ॥९६॥
विनवी एकनाथाची भार्या । तुम्हां शीण जाला जी द्विजवर्या । चला भोजना स्वामी आर्या । सेवाकार्या सिद्ध आम्ही ॥९७॥
देखोनि उभयांची प्रेमभक्ती । आनंद जाला सकळां चित्तीं । धुंडितां हे त्रिजगतीं । ऐशी शांती न देखों ॥९८॥
अनुताप जाला द्विजवरा । म्हणे अपराधाची क्षमा करा । म्यां व्यासाठीं केलें अविचारा । तो सत्य धारा मोडला ॥९९॥
नाथ म्हणती कोण हेत । धरोनि साधिलें विपरीत । तंव द्विज म्हणे द्रव्यार्थ । तो सतशत बुडाला ॥३००॥
जरी तुम्हांसी क्रोध येता । तरी मज होते हे लाभता । हें परिसोनि एकनाथा । परम चिंता उदेली ॥१॥
नाथ म्हणती द्विजोत्तमा । पूर्वी सुचविलें असतें मज कामा । तरी न चुकलों असतों नेमा । डाव रिकामा गेला कीं ॥२॥
आतां न करीं कांहीं चिंता । भावें भजिजे भगवंता । पूर्ण करील तो मनोरथा । आपण स्वस्थता न सांडावी ॥३॥
मग ब्राह्मण देवोनि भोजन । तांबूल दक्षिणा करिती अर्पण । तंव एक धनाढ्य येवोन । केला ब्राह्मण तृप्त धनें ॥४॥
तो नाथाचा अनुग्रही । परिसोनि सेवा साधिली पाहीं । द्विज आज्ञा घेवोनि लवलाहीं । स्वानंदें गृहीं पावला ॥५॥
जन मुखें वाखाणिती । धन्य एकनाथाची शांती । भक्ति ज्ञान वैराग्य विरक्ती । सप्रेमस्थिती अपूर्व ॥६॥

नायकीर्तीचा ध्वज । निष्ठे उभारिला सतेज । श्रीदत्तजनार्दनाचें कृपाबीज । साह्य गरुडध्वज सर्वदा ॥७॥
गुरु जनार्दनें निरवितां । प्रतिपाळ करणेंचि आलें दत्ता । त्या प्रसादें अभयता । एकनाथा पावली ॥८॥
दत्त दिगंबर अवधूत । तोचि जनीं जनार्दन पूर्ण भरित । नटला अनेकीं एकनाथ । ओतप्रोत अभंग जो ॥९॥
त्या एकनाथाची लीला । वर्णितां वाढे प्रेमकळा । त्या कथा गंगा विमळा । श्रवणें पापमळा नासिनी ॥२१०॥
अद्भुत कथेचा रस । पुढिलें प्रसंगीं वाढेल सुरस । तो श्रवण करितां विशेष । जोडवी लाभास सुखकर ॥११॥
संत श्रोते सज्जन । यांचे लक्षोनि चरण । अनंतसुत मागे दान । सेवाधन मज द्यावें ॥१२॥
हाचि मागणें मज भेवा । निरंतर द्यावी चरणसेवा । रात्रंदिन हाचि हेवा । पावेन केव्हां लाभ तो ॥१३॥
देइजे मज अभयकरा । हेचि विनवणी दातारा । अनंतसुताचा आसरा । चरणधारा तुमचा ॥१४॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ ॥ सदा परिसोत भाविक भक्त । चतुष्पंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२१०॥

॥ इति चतुष्पंचदशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ५५ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः श्रीगुरवे नमः

जयजय सद्गुरुसर्वेशा । समर्था उदारा अविनाशा । सर्वज्ञ तूं मंगलाधीशा । पूर्ण परेशा नमो तुज ॥१॥
तुझें सरोज पदकल्हार । तेथील मकरंद सेवावया साचार । मन गुंजारव करी भ्रमर । विकासकर कृपा तुझी ॥२॥
जयजय सद्गुरु समर्था । होसी अज्ञानतमहर्ता । ज्ञानबोध प्रकाशकर्ता । पुरविसी अर्था दीनाच्या ॥३॥
संत साधु योगीजन । पंडित ज्ञाते विचक्षण । भाविक प्रेमळ कीर्तन । करूं श्रवण बैसले ॥४॥
यास्तव विनंती दातारा । निरोपणीं तोषवी त्या अतरा । पतितपावना दयासागरा । वसे जिव्हारां येवोनी ॥५॥
तव कृपेचें अभयदान । असतां चाले निरोपण । गताध्यायांतीं पूर्ण । शांतिलक्षण नाथाचें ॥६॥
तें श्रोतीं परिसिलें सावधान । आतां पुढें दीजे अवधान । श्रवणा ओढवोनी श्रवण । करा पान कथारस ॥७॥
हे भाविक प्रेमळांसी भलें । कथाक्षेत्र असें पिकलें । अर्थकण पाहिजे सर्वगिलें । हितार्थे आपुले रक्षोनी ॥८॥
प्रेमें या क्षेत्रीं वसावें । स्वलाभासाठीं जागावें । सांवरोनि कणद्वारें भरावें । जपोनि सांठवावें हृदयांत ॥९॥
नवविधा षड्रस अन्न । प्रेमभक्तीं करावें पाचन । श्रवणपात्रीं वोगरून । करावें भोजन सद्भावें ॥१०॥
श्रवण भोजनें हेंचि पाहीं । श्रद्धायुक्तें रुचते घेई । मननें तुष्टी सर्वदाही । क्षुधोद्भव देहीं अवीट ॥११॥
निदिध्यासें पुष्टी जोडे । तृप्तीं अनुभव रोकडे । साक्षात्कारें लाभ जोडे । पुरे कोडें धणीवरी ॥१२॥
म्हणोनि साधकीं साधन । या निरोपणीं राखिजे मन । एकाग्रें कीजे हें श्रवण । महत्साधन लाभाचें ॥१३॥
प्रतिष्ठानी एकनाथपंत । प्रेमळ साधु भक्त विरक्त । ज्ञानी वक्ता पंडित । शांत दांत उदार धीर ॥१४॥
तेवींच त्या क्षेत्रीं श्रीपाद । सर्वज्ञ पवित्र प्रबुद्ध । सर्वां भूतीं अभेद । वादविवाद नातळे ॥१५॥
विकार विकृतिलेश । अणुमात्र नाहीं तयास । देहीं सर्वदा उदास । सम सर्वांस सारिखा ॥१६॥
आत्मतत्त्वीं पूर्ण ज्ञान । सर्वां भूतीं एक अवलोकन । न जाणे मानापमान । आनंदघन मानसीं ॥१७॥
सर्व व्यापक विश्वंभर । हा जयाचा पूर्ण निर्धार । प्रेमभावें नमस्कार । भक्तिपुरस्कर करी सर्वां ॥१८॥
पद माझें थोर असे । मी नमूं येरां कैसें । हें जया मानसीं नसे । ईश्वरचि भासे सर्वां भूतीं ॥१९॥
जें जें दिसे पुढतीं । नमी सद्भावें त्याप्रती । हे उत्तम हे हीन याती । कल्पना चित्तीं न वागे ॥२०॥
ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वाणी । चांडाळादि सर्व खाणी । इतुक्यांचेही चरणीं । प्रीति करोनी वंदित ॥२१॥
संत साधु सिद्ध योगी । तपी तापसी बैरागी । नाना दर्शनें जे जे जगीं । पाहतां प्रसंगीं नमी त्या ॥२२॥
वैदिक शास्त्री पंडित । ज्योतिषी भिक्षुक गृहस्थ । नरनारीबाळांसमवेत । भेटतां नमीत निजनिष्ठें ॥२३॥
जीवजंतू जनावर । अणुरेणु ब्रह्मांडभर । अवघाचि भरला सर्वेश्वर । करी नमस्कार आवडीं त्या ॥२४॥
सर्वां घटीं नारायण । हें तेणें पूर्ण लक्षोन । सदा सर्वदा करी नमन । रिता क्षण जाऊं नेदी ॥२५॥
कर्माचरणीं आणि भोजनीं । स्तोत्रपठणीं शयनीं । स्वरूपस्थितीचे समाधानीं । रिक्त न मनी हा काळ ॥२६॥

तो श्रीपाद सहजीं रमतां । एकनाथासी झाला अवलोकिता । आनंद वाटला फार चित्ता । सुखसमाधानता ये ठायीं ॥२७॥
हें वर्म जाणोनि अंतरीं । नित्य यावें नाथमंदिरीं । भाळ अर्पावा पदांबरी । नाथही करी नमन त्या ॥२८॥
प्रीति उभयांचि अत्यंत । गुह्य भाषणें होती नित्य । आत्मरंगीं रंगलें उभय चित्त । आनंदभरित सर्वदा ॥२९॥
स्वामीस नमनाची गोडी । ती कधीं न विटे आवडी । नेमें सारिती नमन परवडी । वासना कुडी नुपजे त्या ॥३०॥
परी गांवींचे श्रेष्ठ ब्राह्मण । लाविती स्वामीसी दूषण । अहो हे श्रीपाद श्रेष्ठ सर्वांहून । तें रक्षण न करी हा ॥३१॥
आपुला नेमोनि अधिकार । भलत्यासी करितो नमस्कार । न म्हणे हा शूद्र चांडाळ थोर । कोण विचार न कळे याचा
॥३२॥ एक म्हणती हा भ्रंशला । अर्भकपणें नमी सर्वांला । काय म्हणावें नमनी त्याला । आचार बुडविला आश्रमाचा
॥३३॥ एक म्हणे आपणासी । काय वेव्हार करणें त्यासी । जी गोडी लागली जयासी । बोधितां निश्चयेंसी न जाये
॥३४॥ एक म्हणती हें विपरीत कर्म । आपणांस दिसतो अधर्म । त्याचें त्या ठाउकें वर्म । त्यासि तो शर्म नाहीं त्याची
॥३५॥ ऐसें नाना परी जग बोलती । परी कांहीं न वाटे श्रीपाद-चित्तीं । नमन तरी सर्वांभूतीं । वाढे प्रीतीं अधिकाधिक
॥३६॥ ऐसे लोटतां कांहीं दिवस । तंव योग पावला अनायास । वर्षाकाळीं गोदेस । पूर विशेष लोटला ॥३७॥
तया पुरामाजी जाण । मृत गर्दभ आलें वाहोन । तें ओहोटें तीरा लागलें येवोन । अवघे जन पाहती ॥३८॥
तैसियामाजी अकस्मात । श्रीपाद पावले गंगेंत । मार्गीं गर्दभ पडिलें पाहात । तया दंडवत घातलें ॥३९॥
तंव कुश्चित ग्रामवासी ब्राह्मण । त्यांनीं केलें तें अवलोकन । जैसें टोरक्षता देखोन । काग धांवोनि बोभाती ॥४०॥
तैसीं कुटिल धांवोनि आले । त्या श्रीपादातें बोटिलें । म्हणे नमन तुम्ही कोणां केलें । हें तंव मेलें गाढव ॥४१॥
यातें तों चैतन्य नाहीं । नमन व्यर्थ गेलें पाहीं । तुम्हां न कळेचि वर्म कांहीं । उगीच डोई बोडिली ॥४२॥
तुम्हां श्रीपदाचें नाहीं ज्ञान । उगेंचि भगवें टाकिलें नासोन । कोण तुमचा हा भ्रंश पूर्ण । निर्जीवा नमन करावें ॥४३॥
एक म्हणती उगें ढोंग । जगीं दावितोच फार सोंग । अणुमात्र नाहीं ज्ञानअंग । अप्रयोजक प्रसंग सर्व याचे ॥४४॥
एक म्हणती तुम्ही पिसे । स्वामीस दूषण लावितां कैसें । चैतन्याचांचोन नमन नसे । स्वामी कां ऐसें न जाणती ॥४५॥
एक म्हणती बोलतां साखर । गर्दभ तो झाला अ.खर । कैंचा उठे आतां खर । नमन प्रखर वांयाच कीं ॥४६॥
एक म्हणती ऐसें नाहीं । नमन व्यर्थ नव्हेचि कांहीं । श्रीपाद दावील नवलाई । व्यापकत्व ठायीं तयाच्या ॥४७॥
एक म्हणे न करा चावटी । मागिल्याच मागें गेल्या गोष्टी । हें तो ज्ञानियासी साधली हातवटी । वेद रेड्याहोटीं बोलविले
॥४८॥ ती येंची येथें अंगवण । उगाचि कां त्या देतां शीण । एक म्हणती ऐसें म्हणेल कोण । न कळे महिमान तयाचें
॥४९॥ एक म्हणती श्रीपादासी । आपण नमितां सच्चिद्घनासी । तरी जागृत करा खरासी । नातरी नमनासी सोडा
॥५०॥ ऐसें ऐकोनि जनभाषण । हृदयीं चिंतिला नारायण । श्रीपादें मांडिलें स्तवन । म्हणे ये धांवोन दीनानाथा ॥५१॥
तूं सच्चिद्घन तेजोराशी । व्यापकत्वें व्यापलासी । व्यापोनि सेखीं उरलासी । तो कां तूं नससी या ठायां ॥५२॥
व्यापक तूं होसी परिपूर्ण । म्हणोनि सर्वज्ञा केलें नमन । तें काय टाकिसी वांया करोन । मग येईल दूषण व्यापकत्वा ॥५३॥
माझा न मनीं भाव खरा । तुझें सत्य व्यापकत्व दीनोद्धारा । तरी सकळांचे मनोरथ पूर्ण करा । उठविजे खरा लागवेगें ॥५४॥

ऐसें वदोनि भाषण । साष्टांग केलें पुनरां नमन । तंव तो व्यापक सच्चिद्घन । वाढवी महिमान अनन्याचें ॥५५॥ श्रीपाद घालितां नमस्कार । लोळोनि फुर्फुरे उठे खर । अंग झाडोनिया सत्वर । पळे निर्धार मुक्त ॥५६॥ खर मार्गे पळोनि गेला । सकळांलागीं विस्मय झाला । धन्य श्रीपाद म्हणोनि नमिला । जयघोष केला गंगातीरीं ॥५७॥ म्हणती श्रीपाद केवळ ईश्वर । खर उठवोनि दाविला चमत्कार । सत्य करितो हा नमस्कार । आचरण थोर श्रीपादाचें ॥५८॥ श्रीपाद गेले स्नानासी । जन गेले आश्रमासी । मुखें वानिती श्रीपादासी । कीर्ती सकळांसी सांगती ॥५९॥ श्रीपादें करोनि स्नान । स्वस्थाना गेले परतोन । नित्य क्रमातें सारोन । आनंदघन बैसले ॥६०॥ म्हणती आतां पुराणासी । जावें वेगीं नाथाश्रमासी । म्हणोनिया अतिवेगेंसी । येवोनि नाथासी वंदिलें ॥६१॥ नाथें नमिलें त्याच्या पदा । निरखोनि वदती श्रीपादा । म्हणती आजी केला विपरीत धंदा । येणें बाधा बहु वाढे ॥६२॥ गर्दभ उठवोनि उपाधी । लावोनि घेतली सकळ व्याधी । तरी घ्यावी आतां समाधी । थोगे बुद्धीं आमुच्या ॥६३॥ श्रीपाद म्हणती थांगलें मनीं । विलंब न कीजे यालागोनि । नाथ उठले तत्क्षणीं । साहित्य घेवोनी सांगातें ॥६४॥ पिंपळेश्वरासन्निध जावोन । गोदारेती उकरोन । करोनि श्रीपादाचें पूजन । समाधी पुरून टाकिली ॥६५॥ ते मान कळतां विप्रांसी । धावोनि आले नाथापाशीं । नाना दूषणें ठेविती त्यासी । बहिष्कार तुजसी म्हणताती ॥६६॥ कोण अधिकार मंत्र तुजलागोन । जिता संन्यासी टाकिला पुरोन । यतिहत्या घडली तुजलागोन । अभेकारण कोण हें ॥६७॥ नाथ म्हणती ब्राह्मणांसी । श्रीपादें आज्ञापिलें आम्हांसी । आजी समाधी घेणें मजसी । तुम्हीं निश्चयेंसी साक्ष व्हावें ॥६८॥ म्हणोनि आलों निश्चितीं । पूजा करविली आमुचे हातीं । मंत्र त्यांचे तेचि बोलती । समाधी घेती स्वानंदें ॥६९॥ विप्र म्हणती एकनाथा । दोष नाहीं जरी तुमच्या माथा । तरी दिव्य घ्यावें आतां । सर्वां देखतां सांगूं तें ॥७०॥ पाषाणनंदी पिंपळेश्वराचा । चारा भक्षावा तेणें साचा । नाथ म्हणती हेतु तुमचा । पुरवील सर्वांचा मनोरथ ॥७१॥ नाथ म्हणती सर्वेश्वरा । सेविजे हा ठेविला चारा । तोषवा सकळांच्या अंतरा । नंदी फुस्कारा टाकित ॥७२॥ चारा टाकितांचि पुढें । नंदी भक्षिता जाला करवाडें । कवळ टाकितांहि न पडे । मळकुडे मागती ॥७३॥ देखोनि पाखांड्यांचें मानस । एकनाथ प्रार्थी त्या नंदीस । शेणमूत्र घावें दुर्मनीस । प्रायश्चित घ्यावयास त्यांलागीं ॥७४॥ जें जें होतें भक्षिलें । गुदद्वारें मळा टाकिलें । लघवी द्वारें विसर्जिलें । तें घ्या बोले नाथ तयां ॥७५॥ मागिले म्हणती करा जलपान । नाथवचनें नंदी गेला उठोन । डोहांत उडी टाकोन । राहिला अज्ञोन ते ठायीं ॥७६॥ ऐसा पाहोनि चमत्कार । निर्विकल्प जालें अंतर । मुखें करिती जयजयकार । जोडिती कर एकनाथा ॥७७॥ काशीक्षेत्रीं तुळसीदास । हाचि योग घडला त्यास । तेणें जेवविलें विश्वेश्वरनंदीस । प्रत्ययो ब्राह्मणांस दाविला ॥७८॥ ऐसेंच आम्हां हें येथें । चोज दाविलें एकनाथें । अद्भुत दाविलें लीलेतें । दवडिलें विकल्पातें आमुच्या ॥७९॥ धन्य साधु एकनाथ । केवळ ईश्वरचि साक्षांत । यासि होतां शरणागत । चुकती अनर्थ गर्भवास ॥८०॥ कराया जगदोद्धार । प्रगट साधूंचे अवतार । यांसि निंदी जो पामर । तो नर नोव्हे खर जाणवा ॥८१॥ करोनि नाथाचें स्तवन । सर्व आश्रमीं जाती परतोन । नाथ द्विजां करिती नमन । म्हणती कृपा पूर्ण असावी ॥८२॥

अधिकोत्तर नाथकीर्ती । दिवसोदिवस जाली वाढती । द्वितियेपासोनि चढती । कळागती चंद्र जेवीं ॥८३॥
परी त्याचे पाठीं असे क्षय । संतकीर्ती निर्मळ सतेज अक्षय । श्रवणपठणीं पाप जाय । तारक होय मुमुक्षां ॥८४॥
असो आणीक एक कथन । तें किंचित करितों निरोपण । श्रोतीं व्हावें सावधान । देइजे अवधान श्रवणासी ॥८५॥
चांग्या भंगी प्रतिष्ठानीं । स्वकर्मी रत निर्मळ मनीं । नाथद्वारा नित्य येवोनी । झाडलोट करूनी जातसे ॥८६॥
आपण आणि कांता । सेवा करिती उभयतां । संतउच्छिष्ट प्रसाद सेवितां । आनंद चित्तां मानिती ॥८७॥
जंव जंव करिती प्रसादसेवन । तेणें शुद्ध होय अंतःकरण । आवडी उपजे त्यालागोन । करितां श्रवण नामघोष ॥८८॥
द्वारीं उगाचि बैसत । आल्यागेल्यातें नमित । पुराणकथा श्रवण करित । काळ सारित या रीतीं ॥८९॥
दिवसोदिवस प्रेमभाव । अंगीं भक्तीचा उद्भव । वेळ जाऊं नेदी वाव । लालसा अपूर्व भजनीं त्या ॥९०॥
भोळे भाविक येवोनि शरण । जाती नाथाचा उपदेश घेऊन । त्यांसी चांग्या पुसे वर्तमान । मंदिरीं जाऊन काय केलें ॥९१॥
ते सांगती तयास । आम्ही शरण जालों एकनाथास । त्या सद्गुरूचा घेवोनि उपदेश । पावलों प्रसादास स्वामीच्या ॥९२॥
तन मन धन अर्पोनि पदांसी । आज्ञा मागोनि जातों घरासी । निरंतर वागूं सेवेसी । कृपें दीनासी तारिती ॥९३॥
हें चांग्यातें निरोपोन । पुढती आश्रमा केलें गमन । चांग्या परिसोनि त्यांचें वचन । लोलुपलें मन त्या काजीं ॥९४॥
त्या दिवसापासोनी । लक्ष लागलें नाथचरणीं । पावतां नाथसन्निधानीं । करी विनवणी दीनवत ॥९५॥
म्हणे जी स्वामी कृपासागरा । मज अनाथावरी दया करा । पदीं शरण मी दातारा । अंगीकारा दास हा ॥९६॥
जेथें जेथें भेटतां । हेचि विनवणी होय करिता । वर्म त्याचें कळलें नाथा । मनीं चिंता उद्भवली ॥९७॥
येरू वारंवार करी प्रार्थना । हृदयीं सद्गद अश्रु नयना । म्हणे आपगिजे मज दीना । येऊं द्या करुणा अनाथाची ॥९८॥
आपण शरणागत वत्सपावन । केले पाहती माझे नयन । मी पामर द्वार धरोन । उपोषित पूर्ण तिष्ठतों ॥९९॥
नाथ म्हणती तयासी । तूं नित्य सेवनेंचि पावन होसी । भजन श्रवण घडे तुजसी । आणि संतांसी नमन तें ॥१००॥
संत पाहती तुज डोळां । हाचि कृपेचा सोहोळा । उच्छिष्ट प्रसाद नित्य वेळा । लाभीं आगळा होसी तूं ॥१॥
नित्य वंदिजे पदरेण । येणेंचि होय सर्व कल्याण । प्रीति नेमें हेंचि ध्यान । करितां आचरण मुक्त होसी ॥२॥
येरू म्हणे समर्थ भलें । कृपें करोनि आज्ञापिलें । तें तव म्यां शिरीं वंदिलें । परी उरलें जगाऐसें ॥३॥
ती माझी लालसा खरी । पूर्ण करावी हेतु अंतरीं । मग न बोलोनि उत्तरीं । नाथ मंदिरीं प्रवेशले ॥४॥
चांग्या मनीं वाढे चिंता । कैसा मंत्र होईल लाभता । रात्रंदिवस बैसे जागता । म्हणे नाथ एकांतां गांठावे ॥५॥
तंव नाथ नित्य प्रभातीं । गंगास्नानालागीं जाती । आपण जाय संगातीं । करी विनंती लाभार्थ ॥६॥
नाथ ऐकती नित्य श्रवणीं । तोषविती त्या मधुर वचनीं । परी त्याच्या जो अर्थ मनीं । ती धणी न पुरेची ॥७॥
चांग्यानें मनीं केला निर्धार । अर्पीन देह पायांवर । तंव नाथ स्नान करोनी सत्वर । येतां नमस्कार घातला ॥८॥
चांग्या दृढ धरितां चरण । मुखें नाथ वदती रामकृष्ण । मस्तकीं कर केला स्पर्शन । सावध म्हणोन बोलिले ॥९॥
चरण नयनांबुजें क्षाळिले । वाक्पुष्प नाथा अर्पिलें । करपत्र जोडोनि ठेविलें । श्रीफळ वोपिलें भाळ तें ॥११०॥

ऐसा पूजोनि सद्गुरुनाथ । प्रेमें प्रदक्षिणा घालित । नमन करोनि दंडवत । आनंदयुक्त जाहला ॥११॥
मानंद कृपा साधावयासी । कबीर जपे अहार्निशीं । करोनि घे मंत्रलाभासी । गोष्टी तैसी जाली हे ॥१२॥
असो पुन्हा स्नान करोन । नाथ आश्रमा गेले परतोन । इकडे चांग्या आनंदघन । गुरुभजन करीतसे ॥१३॥
कांतेसि सांगे गुह्यमात । सद्गुरु माझे एकनाथ । ते मज होवोनि कृपावंत । बीजगुह्यार्थ मंत्र दिल्हा ॥१४॥
तरी आतां येथोन । मंदिरीं वागावें जपोन । मी उपासक सद्गुरुचा जाण । शुचिर्भूतपण राखावें ॥१५॥
नित्य सडासंमार्जन करावें । गंगास्नानासि नेमें जावें । धूत वस्त्र पाकीं नेसावें । असत्य न वदावें येथोनी ॥१६॥
करोनि द्वारीं वृंदावन । करीत जा तुळसीपूजन । आपुलिया भागांतुन । ग्रास अर्पण गाईंतें ॥१७॥
जें जें मिळे आपुल्या दैवें । तें तें सद्गुरुसी अर्पावें । प्रसाद म्हणोनि सेवावें । प्रेमें भजावें गुरुवर्या ॥१८॥
कांतवचना ऐकिलें । तें साध्वीनें जीवीं धरिलें । आचरण शुद्ध चालविलें । अर्वाच्य त्यागिलें मांसादि ॥१९॥
ऐसें नित्य आचरतां । दृढ बाणलें त्याच्या चित्ता । सदा सर्वदा हरिगुणवार्ता । बोलती उभयतां प्रेमसुखें ॥१२०॥
भागवतसांप्रदाय आचरण । कपाळीं रेखी ऊर्ध्व चंदन । तुळसीमाळा कंठीं धारण । नम्रत्व पूर्ण भूतमात्रीं ॥२१॥
सद्गुरुद्वारींची नित्य सेवा । प्रेमभावें आवडे जीवा । दर्शन हेतु जीवीं बरवा । प्रसादमेवा उच्छिष्ट सेवी ॥२२॥
यापरी हा क्रम । चालविला तेणें उत्तम । प्रेमभावें भक्ती निःसीम । मुखीं नाम स्मरतसे ॥२३॥
असो सांप्रदायीचे गृहासी । सद्गुरु जाती भोजनासी । हें वर्तमान श्रुत कांतेसी । होतां भ्रतारासी विनवीत ॥२४॥
जी स्वामी परिसा वचन । आपण अनुग्रह घेतला पूर्ण । परी अद्यापि न दिल्हें गुरुसी भोजन । सांप्रदायी जन देताती
॥२५॥ चांग्या प्रेमळ भावार्थी । कांता निरोपितां वागलें चित्तीं । म्हणे चुकलों चुकलों या अर्थीं । अपराध निश्चितीं घडला
॥२६॥ आतां सद्गुरुसी प्रार्थून । निमंत्रणें करितों संधी पाहोन । त्वांही सावध असावें जपोन । सिद्ध करून साहित्या
॥२७॥ यापरी सांगोनि कांते । आपण जपे संधीतें । भेटतां विनवी सद्गुरुतें । नेमोनि मातें दिन द्यावा ॥२८॥
माझे सर्व हेतु भले । सकृप समर्थे पूर्ण केले । शेष येव्हढेंचि उरलें । तें दयाळें पुरविजे ॥२९॥
तव सद्गुरु त्यातें बोलती । कोण हेतु सांग चित्तीं । तंव येरू नमोनि प्रीतीं । करी विनंती सप्रेमें ॥१३०॥
मी पददास अनाथ दीन । माझा आश्रम कीजे पावन । सर्व सांप्रदायघरीं गमन । प्रसाद सेवून देतसां ॥३१॥
ते सर्व समर्थ असती । मनोदयान्वयें सेविती । मी दुर्बळ गरीब निश्चितीं । उद्भवली प्रीती पूर्ण व्हावी ॥३२॥
सद्गुरु गद्गदां हांसोन । जा ऐकिलें म्हणती वचन । केलें आश्रमीं प्रवेशन । येरू आनंदघन जालासे ॥३३॥
हर्षे वदे कांतेतें । मानिलें वचन सद्गुरुनाथें । तूं वेगीं करीं गृहशुद्धीतें । आणि साहित्यातें निवडिजे ॥३४॥
कांता म्हणे जी उत्तम । कधींचा सांगा नेमिला नेम । तैसाचि साधीन मी क्रम । तो म्हणे वर्म विसरलों ॥३५॥
या नेमासाठीं । सद्गुरुसी जोडीन करपुटी । वंदोनि द्वाररजलल्लाटीं । निरखीं दृष्टीं दुरोनी ॥३६॥
नाथसदनीं होतसे पुराण । करूं बैसले भाविक श्रवण । तवं चांग्या बोलतसे गर्जोन । प्रसादा कोण दिन सांगा ॥३७॥
तैं सर्व तेथें ऐकती । काय बोले चांग्या निश्चितीं । तंव सद्गुरु सर्वां सांगती । हेतु चित्तीं तुम्हां ऐसा ॥३८॥

त्या हेतूतें ऐकता । गदगदां हास्य पावले समस्तां । म्हणती काय म्हणावें भावार्था । वर्णव्यवस्था न कळे त्या ॥३९॥
शुद्र याची निश्चळ भक्ती । भोळा भाव निर्मळ चित्तीं । अभेदपणें सुशीळ वृत्ती । निष्ठा प्रीती आगळी हे ॥१४०॥
उपजला समस्तां कळवळा।म्हणती जी स्वामी कृपाळा। उच्छिष्टपात्र आपुलें या प्रेमळा। पुरविजे लळा विनयाचा॥४१॥
परिसोनि सकळांचा संवाद। सद्गुरु म्हणती चांग्या सावध। उदयीक संपादीं प्रसाद। ऐकोनि आनंद जाला त्या ॥४२॥
येऊं गेला आश्रमासी। उदयीक नेम सांगे कांतेसी। तंव तिच्या हर्ष न माय मानसीं। शुची आश्रमासी त्वरें करी ॥४३॥
प्रभातकाळीं उठोन । आदी केलें गंगास्नान । आवरिलें सडासंमार्जन । धूत वसन वाळविलें ॥४४॥
पुन्हा स्नानातें केलें । वस्त्र नेसोनि उदक भरिलें । त्वरें साहित्य मेळविलें । मग आरंभिलें पाकातें ॥४५॥
पाक अवघा सिद्ध जाला । म्हणे पाचारिजे सद्गुरुला । येऊं स्नान करोनि उतावेळा । रगमाळा काढीत ॥४६॥
गंध अक्षता पुष्पहार । पाट पात्र मांडिलें सुंदर । धूप दीप प्रियकर । सिद्ध समग्र पैं केलें ॥४७॥
मग द्वारावती त्याला आपण। उत्तरी वस्त्र स्कंधीं घेवोन। उदकेंसी मृण्मय पात्र करीं धारण। जाय पाचारण राउळा ॥४८॥
मार्गीं जातां लोक पुसती । कोठें जासी सत्वर गती । येऊं सांगे तयांप्रती । आजि भोजना येती गुरुनाथ ॥४९॥
त्यांसि जातों पाचारण । विस्मयो करिती सकळ जन । अहो हें विपरीत कारण । केविं घडोन येईल ॥१५०॥
एक म्हणती कौतुक । पाहा उगलेंचि देख । एकनाथ साधु परी अर्भक । नादीं आवश्यक लागतो ॥५१॥
मागें यवनाचे घरीं । भोजनासि गेला निर्धारीं । आतांही मांडिली तीच परी । पाहूं सत्वरीं आतां ते ॥५२॥
मग कुटिल निंदक दुष्ट जन । द्विजसमूह अनेक वर्ण । नाथाश्रमीं पातले येवोन । बैसले वेष्टून सभोंवते ॥५३॥
नैऋत्यमार्जी चांग्या आला । द्वारापाशीं उभा ठेला । म्हणे सिद्धता जाली जी दयाळा। त्वरें चला भोजना ॥५४॥
नवल देखोनि भाविक हांसती । कां हो न कळे या वर्ण याती । लाज न धरोनि चित्तीं । नाथाप्रती पाचारी ॥५५॥
तंव कुश्चित म्हणती हे सद्गुरु । यासीं नाहीं आपपरु । येथें वर्णावर्ण नाहीं विचार। ब्रह्माकार सर्व या ॥५६॥
जे शरण येती अनाथ । त्यांसी करिती हे सनाथ । विकल्प नाहींच मनांत । द्वैत जनांत सांडिलें ॥५७॥
एक म्हणे धन्य नवलाई । भेदाभेद यांसी नाहीं । समसमानत्व सर्वां ठायीं । निर्विकल्प देहीं सर्वदा ॥५८॥
एक म्हणे विदेहस्थिती । सर्व भावें एकनाथीं । दोष अदोष कल्पना खंतीं । विपरीत चित्तीं नाहीं त्या ॥५९॥
नाथ सदय उदार कृपावंत। पुरविती सकळांचे मनोरथ। असो चांग्या वारंवार प्रार्थित । जन विपरीत बोलती ॥१६०॥
शब्द चांग्याचा श्रवणपुटीं।त्यांतहि जनांच्या ऐकती गोष्टी।हृदयीं आठविला जगजेठी। न बोलती होठीं कवणातें ॥६१॥
येऊं पाचारितां प्रार्थोन । नाथें सहजें डोलविली मान । तयाकडे पाहोन । जा जा म्हणोन बोलिले ॥६२॥
त्या चित्तीं ऐसें गमलें । जा येतों हें जाणविलें । पूर्ण मन विश्वासिलें । गमन केलें आश्रमा ॥६३॥
एकनाथावेष्टित । चमत्कार पाहावया जग बैसत । नाथ ज्ञानचर्चा बोधित। आनंदयुक्त सर्वांतें ॥६४॥
इकडे चांग्या पाहे वाट । पदप्रक्षाळणीं झटपट । उष्णोदक मांडिला पाट । सर्व थाट थाटिलें ॥६५॥
नाथ न येती अद्यापवरी । आंत बाहेर येरझारी करी । विलंब लागावया कोण परी । न कळे अंतरीं मज कांहीं ॥६६॥

सद्गुरुचरणीं चांग्याचें चित्त । हें जाणें तो श्रीभगवंत । स्वयें होवोनि एकनाथ । पावले मंदिरांत तयाच्या ॥६७॥
येतांचि येरें वंदिले चरण । केलें सद्गुरुचें पादक्षालन । बैसवी आसनावरी नेवोन । करी पूजन स्वकरें तो ॥६८॥
चंदन गेखिला निढळां । कंठीं सूदल्या पुष्पमाळा । उटी चर्चोनि बुका माळा । अंगपरिमळा अर्गजा ॥६९॥
धूप दीप लाविले । सद्गुरुरूपा ओंवाळिलें । समचरणीं भाळ ठेविलें । कांतेनें वंदिलें निजप्रेमें ॥१७०॥
त्वरें पात्रीं वाढिलें अन्न । सर्व केलें निवेदन । जगदात्मा करी भोजन । येरू कर जोडोन प्रार्थीत ॥७१॥
म्हणे जी स्वामी सद्गुरुनाथा । तुम्हांयोग्य हे नसती समर्था । परी प्रसंगें जाली जे सिद्धता । गोड आतां करोनि घ्या जी
॥७२॥ रुचेल तें सेवावें । लागल्या आज्ञापोनि घ्यावें । तृप्तीवरी पूर्ण धावें । पात्रीं ठेवावें प्रसादा ॥७३॥
सच्चिद्धन सद्गुरुराव । जाणोनि चांग्याचा चोखट भाव । म्हणे पदार्थ जाले अपूर्व । गोड सर्व लागती ॥७४॥
मज भक्तिप्रेमाची आवडी । भाविकांची फार गोडी । प्रियकर लागे आमटी वडी । न्याहीं भात कढी स्वादिष्ट ॥७५॥
असो यापरी भोजन । गोड करी सद्गुरु नारायण । स्वतृप्त घातां आपोशन । उठला घेवोन सर्वेश ॥७६॥
चांग्या उष्णोदक देत । स्वामी पद मुख कर क्षाळित । मुखशुद्धीसी तुळसीपत्र अर्पित । पाट सारित बैसावया ॥७७॥
तंव बोले पतितपावन । जा उभय करा प्रसादसेवन । येरू म्हणे आज्ञा प्रमाण । तांबूल देऊन सेवूं जी ॥७८॥
तांबूलसाहित्य जंव पाही । तंव तें मुळींच आणिलें नाहीं । मग घाबरोनि ते समयीं । पायीं डोई ठेविली ॥७९॥
म्हणे जी विसर पडिला । त्वरें आणितों तांबूला । घेवोनि जाईजे आश्रमाला । बोलोनि गेला बाजारीं ॥१८०॥
लीलानाटकी जगदीश्वर । दाविता जाला चमत्कार । पात्रें टाकोनि सत्वर । पावला मंदिर नाथाचें ॥८१॥
इकडे चांग्या तांबूल घेऊन । आश्रमा आला परतोन । कांतेसि पुसे घाबरोन । सद्गुरु उठोनि गेले का ॥८२॥
येरी म्हणे केव्हां गेले । हें म्यां तंव नाहीं पाहिलें । येरू पाहे तों पात्रें विसरले । हें काय जालें नवल करी ॥८३॥
मग पात्रें आणि विडादक्षिणा । घेवोनि करीं ततक्षणां । कांतेसि म्हणे जातों नाथसदना । देवोनि नमना करोनि येतों
॥८४॥ इकडे नाथाभोंवतीं । मंडळी वेष्टित निश्चितीं । म्हणती भोजना केव्हां जाती । पाचारोनि निश्चित चांग्या गेला
॥८५॥ एक म्हणती सहा कळ । यासी कळतां न लगे वेळ । हा तरी असे क्षुधानळ । उतावेळ येईल चांग्या ॥८६॥
ऐसें सर्व बोलतां । तंव चांग्या पावला अवचितां । म्हणे पात्रें टाकोनि समर्था । विडा न घेतां आलांती ॥८७॥
हीं पात्रें तांबूल दक्षिणा । आणिली स्वामीस अर्पणा । मज आतां कृपाघना । दाविजे चरणा नमनातें ॥८८॥
तंव जन पुसती चांग्यासी । काय वर्तलें सांग आम्हांसी । येरू म्हणे सद्गुरुसीं । भोजन प्रेमेंसी घातलें ॥८९॥
गंध अक्षता पुष्पहार । अर्पोनि पूजिला दातार । नैवेद्यादि सकळ उपचार । तुळसीपत्र मुखशुद्धी ॥१९०॥
तांबूलसाहित्य विसरलों । आणावया त्वरें गलों । मागुतीं आश्रमीं पावलों । न देखतां जालों विस्मित ॥९१॥
पाहतां पात्रें देखिलीं डोळां । मग दक्षिणासहित घेवोनि तांबूला । सरसा पावलों उतावेळां । चरणकमळा नमावया ॥९२॥
ऐसें ऐकोनि ते समई । आश्चर्य जाले आपुले ठायीं । पुसती नाथासि नवलाई । कैसें काई सांग तें ॥९३॥
नाथ म्हणती त्याचा भाव । जैसा तैसाचि जाला देव । त्याची लीला अभिनव । न कळे माव कवणातें ॥९४॥

मोहोनि रूपातें धरिलें । देवां अमृत दानवां ठकविलें । परी वर्म त्यांतें न कळे । पार्था ठकविलें काम्यकवनीं ॥९५॥
कल्पना तरी उघडा द्वार । नयनीं अवलोका जगदीश्वर । ऐकोनि विलोकिती नारीनर । तंव पूजाप्रकार चांग्याचा ॥९६॥
चांग्याकरीं पात्रें नाथाचीं । पूजाही ओळखिली साची । धन्य मात्र जगदीश्वराची । लज्जा भक्ताची राखी तो ॥९७॥
चांग्या तुझें भाग्य थोर । तव गृहीं जेविला जगदीश्वर । नाथ आणि श्रीकरधर । दुजा विचार असेना ॥९८॥
कल्पना समूळ उडाली । भ्रांति आमुची सर्व गेली । एकनाथा साह्य वनमाळी । दूषिलें चांडाळीं वृथा आम्हीं ॥९९॥
जे कोण्ही संता छळिती । काळीं तोंडें त्यांचीं होती । रवरव अघोरीं पडती । यातना भोगिती बहु फार ॥२००॥
ऐसा पश्चात्ताप सर्वांसी । होतां शरण जाले नाथचरणांसी । आज्ञा घेवोनि आश्रमासी । जाता गुणासी वर्णिती ॥१॥
नाथ सद्रूप होऊन । चांग्यासि देती अभयदान । वचनामृतें तोषवून । म्हणती धन्य प्रेमभक्ती ॥२॥
जयाच्या दर्शनासाठीं । कितेक बैसले कपाटीं । भोगिती महा आटाआटी । तयां न शेवटीं भेटे तो ॥३॥
वायुआहार धूम्रपान । करितां नाना तपादि साधन । कितेक करिती जपयज्ञदान । तयां न येवोनि भेटे हा ॥४॥
तो तुझा देखोनि भावार्थ । भोजनीं येवोनि झाला प्राप्त । पूर्ण केले तुझे मनोरथ । भाग्यवंत होसी तूं ॥५॥
येरू म्हणे जी मायबापा । ही सर्व तुमचीच कृपा । काय वाणूं या चरणप्रतापा । भवभयतापा वारक हे ॥६॥
नाथ हृदयीं झाले सद्गद । म्हणती कृपें बोळला तुज गोविंद । तो सेवीं पूर्ण प्रसाद । बोधिला छंद सोडूं नको ॥७॥
सप्रेम चांग्याचें अंतर । दंडप्राय घाली नमस्कार । म्हणे सेवा घ्यावी निरंतर । न पडो अंतर हें मागें ॥८॥
चांगा सद्गुरूसी तें नमोन । आश्रमा गेला आज्ञा घेवोन । भगवत्प्रसाद केला सेवन । आनंदघन उभयतां ॥९॥
यापरीच राण्या महार । तोही नाथचरणीं तत्पर । कृपाघन बोळला त्यावर । अभयकर दीधला ॥२१०॥
भोजना जातां ब्राह्मण टपती । तें रूपें दोन धरोनि निश्चितीं । तोषवोनि अत्यंजाप्रती । ब्राह्मण चित्तीं भ्रमविलें ॥११॥
उभयां सम समाधान केलें । द्विज पाहतां थकित जाले । तें वर्म कोणातें न कळे । कौतुक दाविलें अद्भुत ॥१२॥
सद्गुरुचरणीं भाव जडतां । निष्ठा प्रेमें सेवा होतां । त्याची न पाहोनि याति वर्णता । पावणें अनंता निर्धारें ॥१३॥
एकनाथें केलें गुरुसेवन सद्गुरु । जाले त्यातें प्रसन्न । तेणें करविलें श्रीदत्तदर्शन । वरप्रदान पावविलें ॥१४॥
तो प्रसादक अभयवर । एकनाथ फळला साचार । प्रसन्न होवोनि सर्वेश्वर । सेवेंत निर्भर वागला ॥१५॥
नाथमहिमा वाढवावया । साह्य होणें यादवराया । भक्तावरी पूर्ण दया । करोनि माया निरसी तो ॥१६॥
त्या प्रसादें नाथकीर्ती । प्रभायमान फांकली क्षितीं । ऐकोनि भाविक शरण येती । नाथ करिती पावन त्यां ॥१७॥
करावें शरणागता पावन । ही दत्तआज्ञा पुरवीच जाण । ते एकानाथें शिरीं वंदोन । करी उद्धरण अनन्याचें ॥१८॥
ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वाणी । उपदेशें पावन चारी खाणी । जे शरण येती हेतु धरोनी । त्यासी मोक्षदानी आपंगी ॥१९॥
उत्तमातें अंगीकारिती । हें नवल नोव्हे निश्चितीं । परी चांडाळ हीन याती । कृपा करिती त्यावरी ॥२२०॥
येथें यातिवर्णाचा विचार । पाहणेंचि न लागे साचार । मुख्य भाव भक्ति सप्रेम अंतर । निष्ठा थोर पाहिजे ॥२१॥
नाममंत्र सकळां तारक । भाविकां घावा निःशंक । महा दुराचारी पावन देख । भगवद्वाक्य प्रमाण या ॥२२॥

येथें शंका नाणिजे कांहीं । नाम तारक सर्वां ठायीं । परी पावनत्व अनुग्रहीं । कृपा पाहीं सद्गुरुची ॥२३॥
तो सद्गुरु एकनाथ । अवतार ज्ञानियाचा निश्चित । म्हणोनि टीका ज्ञानेश्वरींत । जाली प्राप्त त्या आज्ञे ॥२४॥
ग्रंथ पाहतां ज्ञानेश्वरी । टीका रचिली गीतेवरी । ते एकनाथें पाहोनि निर्धारीं । उपजलें अंतरीं वेगळेंची ॥२५॥
या भगवद्गीतेवरी आपण । कांहीं चालवावें निरोपण । मग मषीपत्र लेखन । सिद्ध करून ठेविलें ॥२६॥
तो ग्रंथ आरंभावयासी । मुहूर्त पाहिला वेगेंसी । ज्ञानेश्वरी अर्थ मानसीं । निरामयेंसी पाहती ॥२७॥
सपूर्ण ग्रंथा अवलोकिलें । वाटे कांहीं बोलावें आगळें । याहोनि विशेष शब्द चांगले । ऐसें भाविलें मानसीं ॥२८॥
जाणोनियां वर्मासी । काय करिता जाला अविनाशी । नाथ प्रभातें गंगास्नानासी । जाती नेमेंसी त्या संधीं ॥२९॥
लोक अवघे निद्रिस्त । बाजारीं नसे कोण्ही जागृत । लीला प्रगट करी समर्थ । बोधप्रद शरणागता ॥२३०॥
रफुगराचें दुकान । दीप लाविले प्रभायमान । उत्तम थोर महावस्त्रें घेवोन । चालवी संधान रफूचें ॥३१॥
भलतें वस्त्र भलतें ठिगळ । लावोनि भरिती रफूसळ । दुकानीं उभारिले पुष्कळ । अयोग्य सकळ भासावया ॥३२॥
तंव नाथ प्रभातें उठोन । करूं जाती गंगास्नान । वाचें करिती नामस्मरण । पाहती दुकान मार्गात ॥३३॥
रफू करीतसे रफूकर । चित्रविचित्रें अंबर । पाहोनि अन्योन्य प्रकार । पुसती विचार बीभत्स कां ॥३४॥
येरू म्हणे जा मार्ग धरोन । पुसावयाचें काय कारण । थोरथोरांचेंही मन । ऐसेंचि योजून राहिलें ॥३५॥
तयालागीं हें सदन होतें । भलतैसें योजिती ज्ञाने । मग आम्हां कां न जालें करावयातें । न विचारोनि पुरतें पुसतसां ॥३६॥
ऐकोनि तयाचें वचन । मनीं विचारीं पडिले दारुण । करूं गेले गंगास्नान । परी संचित मन जालेंसें ॥३७॥
अहोदिवस केला विचार । म्हणे हा कोण न कळे प्रकार । नाथाचें चित्त नोव्हे स्थिर । तळमळ फार अंतरीं ॥३८॥
पुन्हा प्रभातें उठले । गंगास्नानातें चालिले । पुसावया लक्ष लागलें । दुकानीं पावले येवोन ॥३९॥
तंव त्याचा नित्य वेव्हार । दीप प्रज्वाळिला सुंदर । बैसला योजनीं रफूगार । घेवोनि महावस्त्र अमूल्य ॥२४०॥
तें गुंजाळ आरक्त वर्ण । तया कृष्ण कांबळीचें संधान । तें विपरीत नाथें देखोन । बोई वचन आदरिलें ॥४१॥
अहो जी हें महावस्त्र शालजोडी । त्याची हे काय मांडिली परवडी । रक्टें लाविता याचे जोडी । ही तंव गोडी दिसेना
॥४२॥ तंव बोले तो रफूगार । काय बोलतां वारंवार । थोरां मनीं हेचि विचार । शब्द आम्हांवर नाहीं हा ॥४३॥
नाथ म्हणे हें ऐसें कर्म । कोण विपरीत आचरेल धर्म । कोणा मानलें हें सांगा वर्म । आम्हां शर्म पाहतां ॥४४॥
मग तो गद्गदां हांसोन । म्हणे ऐका जी सावधान । तुम्ही पुसतां म्हणोन । करणें निरोपण आलें हें ॥४५॥
येथें कोण्ही एकनाथनामें असती । ते केवळ साधु भगवन्मूर्ती । ज्ञानी विचक्षण मान्य जगतीं । विख्यात कीर्ती जयांची
॥४६॥ तयांचे आचरणविचार । ते सर्वांस मान्य थोर । आम्ही वर्तूं पाहोनि तो आधार । समर्थ प्रकार तयाचा ॥४७॥
ऐकतां झोंबली मनीं चिंता । म्हणे हा काय वदतो वार्ता । याचें वर्म पुसावें आतां । मज तों शोधितां न कळेची ॥४८॥
नाथ म्हणती रफूगारासी । ज्या आधारें विपरीत आचरसी । तें गुह्य निरोपीं मजसी । यंचोनि त्यासी ठेवूं नको ॥४९॥
तंव तो सरात्र वेषधारी । बोलता जाला मधुरोत्तरीं । अहो एकनाथ सर्व अंतरीं । त्यांची थोरी तयांसी ॥२५०॥

त्यांसी चावया उपमा । मज तों न दिसे कांहीं द्विजोत्तमा । परी त्यांनीं योजिलें कामा । त्या धर्मा निवेदितों ॥५१॥ त्यांनीं पाहिला ज्ञानेश्वरीग्रंथ । जाणीतला सर्व मथितार्थ । तें वागलें त्या चित्तांत । आपणहि गीतार्थ वदावा ॥५२॥ कागद दौत लेखणी । मुहूर्तें ठेविली सिद्ध करोनी । आरंभ करावयाचे योजनीं । एकनाथ मनीं असती ॥५३॥ परी तें कैसें येईल दिसोन । पुसती तरी करितों निरोपण । आमुचें अवलोकिलें संधान । यापरी जाण दिसेल तें ॥५४॥ वचन बोलतों आणीक उघडें । तें तूं ऐकें गा निवाडें । मज न वाटे त्याचें कौतुक कोडें । तें तंव कुडें ऐसें हें ॥५५॥ ज्ञानेश्वराचिया पाठीसी । जो ओंवी मऱ्हाठी रचेल गीतेसी । तेणें सुवर्णाचिया ताटासी । जाण निरोटीसी योजिलें ॥५६॥ शालजोडीस न शोभे रुटें । मंगल अमंगल ओखटें । पक्वान्नीं न सरती तिखटें । नगीं गारगोटें अयोग्य ॥५७॥ यालागीं पाहिजे विचार । तो न जाणोनि प्रकार । भलतैसा करितां प्रस्तर । लोकीं विचपार वाटती ॥५८॥ असो नाथांनीं हें योजिलें । मग आम्हां आचरतां काय जालें । तुम्हीं प्रीतीं विचारिलें । सांगणें आलें यासाठीं ॥५९॥ हें एकनाथें परिसोन । म्हणे ऐसा उपदेश करितां दुजा कोण । तैं तात्काळ धरिले दृढ चरण । म्हणे दर्शन मज व्हावें ॥६०॥ तूं कृपाळु परम होसी । चुकल्यानें मार्ग दाविसी । निजवत्सा सांभाळिसी । प्रबोधें बोधिसी अज्ञाना ॥६१॥ मातें ही लीला दावोन । आपण केलें सावधान । तरी आतां न करीं अनमान । द्यावें दर्शन अनन्या ॥६२॥ एका सद्गद हृदयीं दाटला । चरणीं भाळ सदृढ ठेविला । ऐसें देखोनि ते वेळं । प्रगट झाला गुरुदत्त ॥६३॥ साद्श्य दिधलें दर्शन । ऊठ म्हणे करीं अवलोकन । एकनाथ पाहतां निरखोन । समाधान पावला ॥६४॥ त्रिगुणात्मक दिव्यमूर्ती । षट्पाणी विराजती । भूषणवाणे दिव्य शोमती । सकुमार कान्ती भव्य ते ॥६५॥ रूप पाहतां मनोहर । वृत्ति जाली तदाकार । हें देखोनि कृपासागर । आलंगिलें सत्वर एकनाथा ॥६६॥ म्हणे जनार्दना सन्निधान । तुज दिधलें वरप्रदान । तें तूं गेलास विसरोन । योजिसी कारण भलतेंची ॥६७॥ श्रीमद्भागवत एकादश स्कंद । तो ज्ञानमय असे प्रसिद्ध । त्याचा प्राकृत संवाद । ओंवीबद्ध करीं टीका ॥६८॥ मागिलें करावें रक्षण । पुढें आज्ञापिलें करीं कारण । तें भाविक गातील सज्ञान । होईल मान्य सर्वांतें ॥६९॥ भगवद्गीतेची टीका ज्ञानेश्वरी । त्याचा तो बोलिला या अवतारीं । ती सहज स्वानंदाची लहरी । श्रवणें अंतरीं सांठविजे ॥२७०॥ या जगदोद्धारासाठीं । प्रगट झाली हे त्रिपुटी । त्या प्रसादवाक्याची हातवटी । साधील खोटी गोष्टी हे ॥७१॥ ते मुद्रा शिरीं वाहोन । आदरें श्रवणीं करावें सेवन । फोल नोव्हे तें भाषण । अनुभव पूर्ण साधकां ॥७२॥ या शब्दची रखोनि सोय । पुढिल्यानें चालवीं उपाय । मांझें वर्ते पूर्ण अभय । गातां होय साह्य मी ॥७३॥ ऐसें बोलोनि अमृतोत्तर । अदृश्य जाले योगेश्वर । विराले बोधें नाथअंतर । आनंद घोर जाहला ॥७४॥ अवधूतगुण वर्णीत । गंगास्नानालागीं जात । आन्हिक सारोनि तीरीं समस्त । आश्रमा त्वरित पावले ॥७५॥ माध्यान्हिक सर्व उरकिलें । सर्वेचि प्रसादानें पावले । वामकुक्षी सारोनि बैसले । पुराण आरंभिलें निरोपण ॥७६॥ त्या दिवसापासोन । रसवृद्धी वाढली गहन । श्रोते तन्मय होवोन । आनंदघन वृत्ती ॥७७॥ जैसा नादें वेधे मृग । कीं फण विकासोनि पन्नग । कीं मकरंदीं लुब्धे भृंग । ऐसे अव्यंग सर्वही ॥७८॥

श्रोते आनंदोनि पोटीं । परम स्वानंदें बोलती गोष्टी । आजी जाली अमृतवृष्टी । लागेल दृष्टी एकनाथा ॥७९॥
नाथासी कळला विचार । आजिचे श्रवणीं खला पाझर । हा दत्तकृपेचा प्रकार । माझें अंतर उल्हासलें ॥२८०॥
दत्त दयार्णव शरणागता । सकृपें होय सांभाळिता । निवारीं अंतरींची चिंता । मनोरथा पुरवीत ॥८१॥
वदिले प्रसंगीं निरोपण । अतिगोड अमृताहून । ते वदवील दत्त दयाघन । करा श्रवण निजप्रीतीं ॥८२॥
या संतसाधूंचें मानस । तृप्त करी हा अविनाश । लाडके लडिवाळाची आस । पुरविणें मातेस साच कीं ॥८३॥
दत्तदिगंबराचे आवडते । तुम्ही संत साधु भाविक श्रोते । योगी सिद्ध प्रेमळ ज्ञाते । कधीं तुम्हांतें न विसंबे ॥८४॥
ऐश्वर्य तुमचें अतिथोर । पहा एकनाथ पावले अभयकर । प्रतिपाळ करी सर्वेश्वर । तुम्ही प्रियकर तयाचे ॥८५॥
उदार तुम्ही भाग्यवंत । जाणोनि शरण अनंतसुत । तुमची पदसेवा मागत । मनोरथ पुरवा हे ॥८७॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविक भक्त । पंचपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२८७॥

॥ इति पंचपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ५६ वा

॥ श्रीगणेशाय नमः ॥

जय सद्गुरु दत्त सदया । करुणाघना विश्वनिलया । दे मती तुझे गुण गाया । वंदितों पायां सद्भावें ॥१॥
तूं परब्रह्म परात्पर । तुझिया कृपेसी नाहीं पार । तुझा असतां अभयकर । चालेल सुंदर निरोपण ॥२॥
तुझें कथामृत हें जीवन । करूं इच्छिती श्रोते पान । तें भवभयहारक रसायण । तापप्रमोचन होय जें ॥३॥
तव लीलेचा अद्भुत रस । त्या सेवनीं भाविकां उल्हास । तूं पुरविता त्यांचें मानस । आनंदवी श्रोत्यांस निजकृपें ॥४॥
मागिले अध्याया अंतीं । स्फुरवेषें बोध निश्चितीं । करोनिया एकनाथाप्रती । दर्शन प्रीतीं दीधलें ॥५॥
निजबोधें करून । केलें त्याचें समाधान । वर देऊनी अभयदान । दिधली आठवण मागिली ॥६॥
आज्ञा वंदोनि एकनाथ । सदना पावले हर्षभरित । वरदानमुहूर्त अभिजित । आरंभिला ग्रंथ परम प्रीतीं ॥७॥
श्रीमद्भागवत सुंदर । व्यासोक्ति परम नागर । शुकमुखें रस अपार । करीत स्वीकार परीक्षिती ॥८॥
त्या ग्रंथीं सुरस रसिका । श्रीधरें रचिली दिव्य टीका । तो नृसिंहप्रसाद नेटका । फळे वाचकां सफळित ॥९॥
द्वादश स्कंद भागवत । एकाहूनि एक विशेष बहुत । त्यामाजीं गोड अद्भुत । दशम विख्यात एकादश ॥१०॥
सर्वांमाजीं सार जाण । प्रकृति पुरुष रूपें दोन । कीं या तनूमाजीं पूर्ण । असती प्राधान्य जीवशिव ॥११॥
कीं प्रवृत्तिनिवृत्तिविचार । कीं सगुण-निर्गुण प्रकार । तेवीं हें भागवतीसार । स्कंद निर्धार दोन हे ॥१२॥
दशम स्कंदीं दयार्णव । प्राकृत वाणी बोलिले भाव । ते कृष्णलीला अपूर्व । वर्णिले लाघव अनुपम ॥१३॥
प्रेमरसिक ते वाणी । आल्हादकारक श्रोत्यां श्रवणीं । प्रेमळ भाविकां लाघे घणी । लेववी लेणीं भक्तीचीं ॥१४॥
पुढील जो एकादश । ते भक्तिज्ञान वैराग्यरस । तो आज्ञापी एकनाथास । कृपें अविनाश स्वमुखें ॥१५॥
रची यावरी तूं टीका । ग्रंथ होईल नेटका । मान्य होईल सकळिकां । ज्ञान वाचकां होईल ॥१६॥
यापरी आज्ञा होतां । एकनाथें वंदिली माथां । झाला टीका आरंभिता । सद्गुरुनाथा वंदोनी ॥१७॥
पांच अध्यायपर्यंत । प्रतिष्ठाननगरीं रचिला ग्रंथ । प्रगटोनि जगद्गुरु अवलोकित । पाहोनि वदत सुवरद ॥१८॥
म्हणे हा निर्विघ्न जाईल शेवटासी । तूं चिंता न करीं मानसीं । सर्वभावें हृषीकेशी । सांभाळील तुजसी निजरूपें ॥१९॥
असो प्रतिष्ठाननगरीं एक ब्राह्मण । भाविक गृहस्थ होता जाण । तेणें अध्याय लिहून । घेतले दोन वाचावया ॥२०॥
शुद्ध त्याचा भावार्थ । नित्य नेमें असे वाचित । त्यासी उपजला हेत । विश्वनाथदर्शनाचा ॥२१॥
नाथआज्ञा घेऊन । काशियात्रेसी केलें गमन । करोनि विश्वेश्वराचे दर्शन । नित्य भ्रमण यात्रेचें ॥२२॥
तो नित्य मनकर्णिकेसी । पठण करी नाथकाव्यासी । तंव यतिशिष्य स्नानासी । येती वेगेंसी त्या ठायां ॥२३॥
ते म्हणती कोणता कोण ग्रंथ । टीका वदतां प्राकृत । येरू म्हणे श्रीमद्भागवत । एकनाथकृत टीका हे ॥२४॥
ऐकतां विपरीत भासलें । त्यांनीं गुरुसी मठीं निवेदिलें । त्यांचें मन क्रोधावलें । म्हणे त्या आणिलें पाहिजे ॥२५॥
गुरुआज्ञा वंदोन । नेलें तया पाचारून । स्वामी पुसती वर्तमान । करी निवेदन गृहस्थ तो ॥२६॥

प्रतिष्ठाननगरीं एकनाथ । परम साधु भगवद्भक्त । त्यांनीं टीका हे नेमस्त । केली यथार्थ स्वामिया ॥२७॥
ऐकोनि कोपले संन्यासी । म्हणती प्राकृत टीका भागवतासी । हें अयोग्य कर्म निश्चयेंसी । दंडावें त्यासी आणोनी ॥२८॥
मग प्रतिष्ठाननगरींचे ब्राह्मण । त्यांसी पत्र केलें लेखन । दुजें पत्र नायालागून । सिद्ध करोन पाठविलें ॥२९॥
दोन शिष्य बोलके पंडित । शिक्षा करावया समर्थ । ऐसे पाठविले त्वरित । ते प्रतिष्ठाननगरींत पावले ॥३०॥
अधिष्ठानियांसी पत्र दिधलें । वाचितां वर्म जाणीतलें । म्हणती त्याचें सामर्थ्य आगळें । बळ न चले आमुचें ॥३१॥
आपण त्यासी दंडितां । आमची तुम्हां साह्यता । येरू म्हणती दावावें एकनाथा । आम्ही सर्वथा न भिऊं ॥३२॥
मग एकनाथाचे सदनीं । ग्रामीक पावले त्या घेवोनी । ते काशिस्थ सभ्य देखोनी । नाथ नमनीं प्रवर्तले ॥३३॥
करोनि साष्टांग नमन । प्रेमें दिधलें आलिंगन । विनवी तयां कर जोडून । कोठून आगमन स्वामींचें ॥३४॥
मनीं असे कोण अर्थ । तो दासासी करावा श्रुत । नायनम्रता देखोन बहुत । क्रोध निश्चित विराला ॥३५॥
मग गुरुपत्र दिधलें हातीं । तें नाथ वंदोनि वाचिती । मथितार्थ ध्यानीं आणिती । आनंद चित्तीं पाहिला ॥३६॥
म्हणे विश्वेश्वर सद्रूप झाले । दर्शन द्यावया पाचारिलें । सद्गुरुमायेनें पत्र धाडिलें । त्वरित गेलें पाहिजे ॥३७॥
मग उद्धवातें पाचारोन । अधिपत्य दिधलें सोंपोन । पंचाध्यायी सर्वे घेऊन । केलें प्रयाण एकनाथीं ॥३८॥
सर्वे स्वामीशिष्य काशीकर । सुमुहूर्तें निघाले बाहेर । तंव आणखी उद्धवें दोघे बरोबर । सेवेसी सत्वर धाडिले ॥३९॥
ऐसे पांच मार्गीं जाती । आनंदें मार्गातें क्रमिती । स्वामिशिष्य सुखावती । जडली प्रीती अद्वयें ॥४०॥
काशीक्षेत्रीं पावले । स्नानसंध्यादिकर्म सारिलें । दर्शन विश्वेश्वराचें घेतलें । शिष्य गेले गुरुपाशीं ॥४१॥
करोनि साष्टांग नमन । आद्यंत केलें निरोपण । स्वामी म्हणती त्या आणोन । मठीं घेऊन बैसावें ॥४२॥
यापरी सांगोन शिष्यांसी । स्वामी गेले मठभिक्षेसी । ते शिष्यें एकनाथासी । आणोनि मठासी बैसविलें ॥४३॥
स्वामी भिक्षा परस्थळीं । तीन शत शिष्यमंडळी । तंव मठीहूनि शिष्य तये वेळीं । सांगे स्थळीं आणिलें त्या ॥४४॥
स्वामी वेदशास्त्रसंपन्न । सकळिकां शिष्ट विप्रां प्राज्ञ । ऐसा असोनि सुज्ञ । अविवेक दारुण वेढिला ॥४५॥
मग तीन शत शिष्य पाचारिले । स्वामींनीं तयांसी आज्ञापिलें । एकनाथ मठीं बैसविले । तुम्हीं ये वेळें जाईजे ॥४६॥
आतें हटीं निरखोन । पांच पांच दंडक करा लाग्या । ऐसे पंधरा शतें जांचला तेथून । पुढें पाहून घेजेत्या ॥४७॥
अवश्य म्हणोनि निघती । मार्गीं विचार करिती । काय सद्गुरु आज्ञा देती । तें तों निश्चितीं न मानें ॥४८॥
ताडितां जरी प्राण जाय । मग सहज ब्रह्महत्या होय । ऐसियासी करावें काय । कोण उपाय योजावा ॥४९॥
कोणी म्हणती उगेचि जाऊं । मुखरूपें दर्शन घेऊं । शब्दें त्यातें शोधून पाहूं । अपराधी भिऊं कासया ॥५०॥
प्रल्हादाचिया अंगावरी । हिरण्यकश्यपू घालवी करी । त्यातें दिसों लागले केसरी । मग ते चीत्कारीं पळाले ॥५१॥
कीं अंगीं झोंबवितां पन्नगा । ते धुत्कारितां देखती खगा । मग जीवभेणें फिरती मागां । विपरीत लागा न करिती ॥५२॥
तेवीं एकनाथा दंडावयासी । स्वामी पाठविती शत शिष्यांसी । ते विचार करोनि मानसीं । संचरू मठासी पाहती ॥५३॥
इकडे एकनाथ आनंदभरित । सहजस्थितीं बैसला ध्यानस्थ । हृदयीं कणाम निं निरमीत । ठेवलें चित्त त्या चरणीं ॥५४॥

तंव एक शिष्य मठीं पावला । एकनाथा अवलोकिता जाहला । तंव तो देखिला घनसांवळा । कांसे पिवळा झळाळी
॥५५॥ मुगुट कुंडलें शोभायमान । चतुर्भुज विराजित कंकण । कौस्तुभ वैजयंती बाहुभूषण । उत्तरी वसन क्षीरोदक
॥५६॥ शंख चक्र गदा पद्म । आयुधें शोभलीं चारी उत्तम । रूप लावण्य मनोरम । वाटे विश्राम सकळांचा ॥५७॥
कमलाकृती आकर्ण नयन । भव्य विराजित सुहास्य वदन । जानु जंघा सरळ पूर्ण । सुकुमार चरण पदतळें ॥५८॥
एकावळी सलंबकंठीं । क्षुद्र घंटा शोभती कटीं । करांगुळीं मुद्रिकादाटी । तेज मुगुटीं सुप्रभ ॥५९॥
पदीं वांकी वाळे तोडर । आजानुबाहु उदार । आदि पुरुष विश्वंभर । नयनीं साकार पाहिला ॥६०॥
जो पहूं आला मठांत । तया अनंत भासत । स्तुतिस्तोत्रें करोनि नमित । पादाक्रांत सर्वेही ॥६१॥
मूर्ती पाहतां आनंदघन । निरखितां जालें उन्मन । कैंचें कार्य कैंचें कारण । नयनीं नारायण कोंदटला ॥६२॥
कोणी कोणास न बोलती । तटस्थ जाल्या सकळ वृत्ती । मात्र अभाव जाली भ्रांती । देहस्थिती कैंची त्यां ॥६३॥
बाहेर एक शिष्य होता । तेणें स्वामीस जाणविली वार्ता । पावले सर्वेही मोहना । एकनाथा पाहतांची ॥६४॥
वेडीं जाहलीं पाहतां सारीं । कोणीच नाहीं देहावरी । हें परिसोन ते अवसरीं । स्वामी अंतरीं खोंचले ॥६५॥
म्हणे हें कोण नवल । मजही वाटे घालील मूल । आरंभिलें कर्म होईल फोल । बैसेल खोल योग्य ते ॥६६॥
तरी आतां ऐसें करीं । आसन घाली पडद्यांतरीं । त्याची दृष्टि न पडावी मजवरी । मग त्या द्वारीं आणीन मी ॥६७॥
शिष्यें परिसोनि मात । सांगितल्याऐसें केलें गुप्त । दुसऱ्या द्वारें स्वामी प्राप्त । आसनीं बैसत येवोनी ॥६८॥
कृतांतवत होवोनि मानसीं । रोषें बोले एकनाथासी । अर्भका मूढा अधिकारासी । नेणोनि आचरसी भलत्या कर्मा ॥६९॥
सर्व वेदशास्त्रांचें सार । श्रीमद्भागवत सुंदर । प्राकृत टीका रचिसी त्यावर । परी शिक्षा थोर करीन मी ॥७०॥
उगेंच वंटाव माजविलें । भोळे भाविक भोंदिले । तें येथें आतां न चले । सोडवीन चाळे क्षणमात्रें ॥७१॥
परिसोन स्वामीची रोषमात । विनविता जाला एकनाथ । जी स्वामी तुम्ही म्हासमर्थ । अनाथास नाथ करावें ॥७२॥
दयाळू तूं सद्गुरुमाउली । मज दीनाची दया उपजली । कृपें पाचारणपत्रिका पाठविली । पाहता सुखावली तनु माझी
॥७३॥ आर्तेसरिसा आलों धांवोन । असे मनीं पाहावे चरण । ते कां न दावा वस्त्रालागोन । मी अनन्य तुमचा ॥७४॥
ज्या अर्थी मज आज्ञापिलें । तें आपण पाहिजे पाहिलें । शोधितां अमान्य जरी झालें । तरी न पुढिलें वर्णीन ॥७५॥
पंचाध्यायी निरोपण । झालें पाहावें शोधून । न रुचतां मनकर्णिके नेऊन । द्या बुडवोन स्वामिया ॥७६॥
आधीं घेवोनि परीक्षा । चुकतां करावी शिक्षा । ती संवादावया दीक्षा । न करी उपेक्षा मन तुम्हां ॥७७॥
आपुली शिक्षा प्राप्त ज्यासी । तो मान्य त्रैलोक्यासी । म्हणोनि शरण मी पदांसी । पावन पामरासी करावें ॥७८॥
परिसोनि नाथाचें वचन । म्हणे जागसी भार्यासमाण । हे सर्व बैसले मंद होवोन । यांही मारण न वंदिनी ॥७९॥
नेत्र शिष्य म्हणती स्वामी । तुमचा उपदेश घेतला आम्हीं । त्या पुण्ययोगें आजिची उर्मी । लाधलों परमही लाभ हा
॥८०॥ अनंत जन्मीं करितां त्याग । तरी ऐसा न मिळे कधीं भाग । तापसी दिगंबर मार्गिनी योग । तयांसी संग न घडे हा
॥८१॥ वेदशास्त्रें जया गातीं । विधि हर जपा ध्यानीं । तो परब्रह्म कमलापती । प्रत्यक्ष मूर्ती प्रगट हे ॥८२॥

जो प्रणवरूप परमात्मा । जो व्यापक सर्वात्मा । तो साकार हा दिसे आम्हां । तुम्ही सर्वोत्तमा पाहा जी ॥८३॥ ऐसें ऐकोनि वचन । विस्मयो करी स्वामी आपण । म्हणे हे केवीं करिती भाषण । दूपण भूषण होऊं पाहे ॥८४॥ लालुचलें स्वामींचें चित्त । म्हणे पडदा काढा त्वरित । काढितांचि पाहे अनंत । खराची भक्त बैसला ॥८५॥ पाहतां नेत्रीं निरखोन । सावयव झालें दर्शन । गळाला स्वामींचा अभिमान । उठला नमन करावया ॥८६॥ श्रीहरिरूप नयनीं पाहतां । आनंद न समाये चित्ता । जयजयकार झाला होता । समूळ विकल्पता बुडाली ॥८७॥ वर्पेना झाला आनंद । नेत्रीं पाहिला आनंदकंद । नमूं धांवले तई वृंद । तंव एकनाथ प्रसिद्ध प्रगटले ॥८८॥ स्वामींचा कर वेगीं धरिला । एका सद्भावें नमिता झाला । वाचेसी म्हणे दयाळा । करितां कृपाळा हे काय ॥८९॥ मी अपराधी तुम्हां शरण । मज अनाथा करणें पावन । तंव नाथा देती ते आलिंगन । करिती समाधान वचनोक्तीं ॥९०॥ म्हणती एकनाथ आणि नाथ । हे अद्वयरूप निश्चित । आम्हां भेद झाला वृथा प्राप्त । दर्शनीं पात झाला तो ॥९१॥ असो नाथा जवळी बैसवून । पंचाध्यायीं केली श्रवण । तो अर्थान्वय पाहोन । निर्विकल्प मन झालेंसे ॥९२॥ धन्य धन्य एकनाथ होसी । तूं जगदोद्धारार्थ प्रगटलासी । मानव सत्य तूं नव्हेसी । पूर्ण ब्रह्म कळलासी आम्हांतें ॥९३॥ आतां इतुकें करावें । येथें टीकेतें पूर्ण रचावें । श्रवणें आम्हां निववावें । प्रेमभावें मागूं तुम्हां ॥९४॥ देखोनि सकळांचें प्रेमरहस्य । एकनाथ म्हणती अवश्य । तुमच्या कृपें मज नाहीं आलस्य । स्मरोनि उपास्य आरंभीं ॥९५॥ षण्मास तेथें राहोन । टीका रचिली संपूर्ण । श्रवणें तोषलें यतीजन । भाविक सज्जन तेथींचे ॥९६॥ ग्रंथ संपूर्ण होतां । आनंद झाला यतिचित्ता । मग शिष्यांसि स्वामी होय आज्ञापितां । महोत्सव आतां करावा ॥९७॥ वैदिक शास्त्री पंडित । व्युत्पन्न ज्ञाते महंत । यांतें पाचारा त्वरित । करोनि श्रुत हें वार्ता ॥९८॥ सर्व सरंजाम मेळवून । करूं सरस्वतीचें पूजन । यासी न लाविजे व्यवधान । साहित्य संपूर्ण सिद्ध करा ॥९९॥ शिष्यें आज्ञा वंदिली । श्रेष्ठांतें पाचारणें केलीं । आद्यंत वार्ता निवेदिली । ऐकोनि कोपली मती त्यांची ॥१००॥ भागवतावरी प्राकृत टीका । हें तों न माने आम्हां लोकां । स्वामी कां पावले अविवेका । मान्य सकळिका शब्द ज्यांचे ॥१॥ तेथें स्वामींपाशीं पावले । वंदोनि श्रेष्ठ बोलते झाले । तुम्ही सर्वाधिष्ठ आगळे । प्राकृतीं लुब्धलें मन कैसें ॥२॥ जया भूपतींचें अधिष्ठान । तेणें करावें काय भिक्षाग्रहण । सर्व अलंकारमंडित पूर्ण । तेणें पाषाण कठिण वाहावा ॥३॥ यापरी आम्हां भासलें । हें तुम्हां कैवीं गोड झालें । हीन याती रूप चांगलें । कैवीं वरिलें जाय तें ॥४॥ जरी तुम्ही अंगीकारिलें करोनि प्रीत । आम्ही नायकों तुमची मात । शुद्ध कांचनीं खापर जडित । तें न भूषित योग्यातें ॥५॥ सांडोनि जडित दिव्य अलंकारा । भूषणीं भूषवाव्या काय गारा । त्यजोनि अमृत योगरा । कांजवणी आसारा सेवावें ॥६॥ तुम्ही मान्य कराल प्राकृतें । मग तें वंद्य होईल सकळांतें । कोण पुसेल गीर्वाणातें । घातक आम्हांतें हें कर्म ॥७॥ म्हणोनि न मानों या तुम्हांसी । हें बुडवूं नेवोन मनकर्णिकेसी । मग दुष्टमती उठोनि वेगेंसी । हिसकोनि ग्रंथासी घेतलें ॥८॥ रागें उचलोनि नेला । तो मन कर्णिकेंत भिरकाविला । अघटित ईश्वरलीला । न कळे कवणाला अतर्क्य ॥९॥ विषप्रयोग दुष्टें करोन । उदकीं बुडविला भीमसेन । परी त्या रक्षी नारायण । केला परिपूर्ण दृढ बळी ॥११०॥

कर्मे चित्रांगद बुडविला । तो नागकन्येनें पाताळीं नेला । सर्वेश्वरकृपें तरोनि आला । ऐश्वर्यवळासमवेत ॥११॥
पाषाणीं लोटिलें प्रल्हादासी । बुडविलें शोधूनि सिंधुजळासी । कृपें धांवोनि निजभक्तासी । तारी हृषीकेशी स्वलीलें ॥१२॥ यापरी दुष्टीं तो ग्रंथ । बुडावया टाकिला मनकर्णिकेंत । तंव एकाएकीं अकस्मात । काढिले हात गंगेनें ॥१३॥
जडित कंकणेंमंडित पाणी । येतां ग्रंथ धरी झेलोनी । जैसी माता कळवळोनी । मोहें उचलोनी बाळा घे ॥१४॥
ऐसा तो कोणीं धरितां । कर भागीरथीचे पाहतां । टक पडले तें समस्तां । दुष्ट चिंता विसरले ॥१५॥
भाविक भक्त प्रेमळ सज्जन । चमत्कारें तोषले सकळ जन । जयजयकारें टाळी पिटोन । धन्य धन्य वाखाणिती ॥१६॥
वार्ता कळली स्वामीसी । धांव घेतली वेगेंसी । उडी टाकिली मनकर्णिकेसी । मस्तकीं ग्रंथासी घेतलें ॥१७॥
परम उल्हासें आनंदयुक्त । बाहेरी आले घेवोनि ग्रंथ । येथें योजक दृष्टांत । श्रोते संत अवधारा ॥१८॥
दुरी करावया दूषण । अग्निप्रवेश जानकीलागोन । तीस तेजरूप निघता तेथून । उल्हासलें मन सकळांचें ॥१९॥
कीं अग्नींत टाकिला प्रल्हाद । तो न जळतां निघे बाहेर । शुद्ध तें सकळां जाला आल्हाद । सुरवृंद संतोषती ॥१२०॥
तेवींच हें दिव्य जालें । विशेष जनीं मानवलें । पाखांड्यांचें मुख काळें झालें । यती आनंदले सर्वही ॥२१॥
मस्तकीं घेवोन ग्रंथ । स्वस्थळा पावले त्वरित । मग महोत्सव आरंभिला बहुत । आदरें पूजित सद्भावें ॥२२॥
भोजन देवोनि समस्तां । गौरविलें त्या एकनाथा । क्षेत्रीं मिरविलें ग्रंथा । भेटती संतां सर्वही ॥२३॥
गुण एकनाथाचे गाती । कितेक सांप्रदायी होती । करोनि ग्रंथाच्या प्रती । क्षेत्रज्ञ ठेविती आदरें ॥२४॥
सुखानंदवृष्टी सकळां । सत्संग लाधला प्रेमळां । द्वेष भेद अहंकार खळां । आली अवकळा पळाले ॥२५॥
असो कवणे एके दिनीं । एकनाथ निद्रिस्त सुखस्थानीं । तंव श्रीखंड्या पावला स्वप्नीं । म्हणे सावध वचनीं होईजे ॥२६॥
म्हणे कां जी तुम्ही विसरले । माझें लग्न होणें राहिलें । तुमचे संकल्पा उणें आलें । सावध केलें तुम्हांसी ॥२७॥
ऐसा होतांचि दृष्टांत । सावध झाले एकनाथ । मनीं मागील आठवित । चिंताग्रस्त जाहले ॥२८॥
म्हणे देवाधिदेवा रुक्मिणीकांता । या संकल्पासी समर्था । कैसें करूं सांग आतां । अनाथनाथा श्रीहरी ॥२९॥
या संकल्पाचें निरसन । कैशायोगें करूं जाण । तुजवांचोनि सांगेल कोण । उपाय पूर्ण मज आतां ॥१३०॥
नाथ पडला संकटीं । पुढें प्रगटला जगज्जेठी । येणें प्रेमें चरणीं घातली मिठी । म्हणे या संकटीं पावलासी ॥३१॥
अहो दयाळा पांडुरंगा । सिद्ध संकल्पार्थ उपाय सांगा । वचनीं दया उपजली श्रीरंगा । भक्तभवभंगा अंतरीं ॥३२॥
म्हणे भागवतीं अल्प विवरण । असे रुक्मिणीचें पाणिग्रहण । त्याचें विस्तार व्याख्यान । प्राकृतीं निरोपण करावें ॥३३॥
यापरी एकनाथासी । सांगोनि अदृश्य हृषीकेशी । मग शोधोनि त्या आधारासी । रुक्मिणीस्वयंवरासी आरंभिलें ॥३४॥
रामजयंतीमाझारीं । मनकर्णिकेचे तीरीं । यथासांग विस्तारीं । ग्रंथ निर्धारीं संपविला ॥३५॥
महाक्षेत्र वाराणसी । तेथें संपवोनि द्वय ग्रंथांसी । आज्ञा मागोनि सर्वांसी । निघती वेगेंसी नाथ ते हो ॥३६॥
संन्यासी सज्ञान भाविक ब्राह्मण । सान थोर अवघे जन । करिती नाथाची बोळवण । सप्रेमें नयन वाहती ॥३७॥
करी सर्वां अभिवंदन । निजभावें क्षेत्रज्ञ वंदिले । जयजयकार सकळीं केले । नाथ निघाले तेथोनी ॥३८॥

ऐसें मार्गानें कामिनी । पावले प्रयागा त्वरित गती । भागीरथी येवोनि सांगाती । स्वस्थानपंथीं चालिले ॥३९॥
अतिनिबिड पंथ क्रमोनं । वन अद्रि उल्लंघोन । मार्गीं दासोपंताचें दर्शन । होतां आलिंगन जाहलें ॥१४०॥
जोगाईचे आंब्यासी । वास्तव्य त्या दासोपंतासी । हेतु उपजला मानसीं । प्रसन्न दत्तासी करावें ॥४१॥
मग पुत्र कलत्र व्यापार । त्यजिलें अनुतापें घरदार । पाहोनि निबिड कांतार । तप थोर मांडिलें ॥४२॥
साहोनि शीत उष्ण पर्जन्य । आहार सेवावे गलितपर्णे । नाहीं आसन मृदु शयन । पाषाणीं पडोन राहत ॥४३॥
निर्विषय निष्काम । मुखीं भजे दत्तनाम । देहीं भोगी अरण्यश्रम । न इच्छा आराम कांहींच ॥४४॥
मनुष्याचा पडों नेदी वारा । एक ठायीं न धरी थारा । दत्तदर्शनाचा ध्यास अंतरा । अन्य विचारा न जाय ॥४५॥
ऐसें वीस वर्षेपर्यंत । वास करितां अरण्यांत । क्षतें शरीरा पडलीं बहुत । पीडा भोगित नाना परी ॥४६॥
हे दृढ निष्ठा देखोन । प्रगटला अनसूयानंदन । समीप त्याच्या येवोन । शिणलास म्हणोन आलिंगी ॥४७॥
कृपें कवळोनि पोटीं । निजप्रेमें दिधली भेटी । शरीरव्यथेतें निवटी । दिव्य दृष्टीं पाहोनी ॥४८॥
केला तयाचा अंगीकार । मस्तकीं ठेविला अभयकर । उपासना बाणविली सुंदर । दिधला वर सद्भावें ॥४९॥
दत्त सरूप होतां । येरें चरणीं ठेविला माथा । बोबडे भाषणें होय स्तविता । दत्त ऐकतां संतोषती ॥१५०॥
दत्त होवोनि सुप्रसन्न । म्हणती हो तुझें कल्याण । भक्तिभाग्यें तूं पावन । करिसी कीर्तन सुरस तें ॥५१॥
स्मरतां मी अनन्यापाशीं । वारितों सर्व संकटांसी । त्याच्या पुरवितों मनोरथासी । चिंता मानसीं न करीं तूं ॥५२॥
दासोपंता देवोनी अभयवचन । अवधूत जाले अदृश्यमान । प्रसाद स्वामीचा पावोन । येरू स्वस्थान पावला ॥५३॥
दिवसोदिवस भाग्य थोर । धनसंपत्ती वाढे अपार । कांता पुत्र कलत्र । कामीं कामदार राबती ॥५४॥
अश्वशिबिकादि संपत्ती । दासदासी घरीं वागती । वैगुण्यता नाहीं कोणती । आनंद चित्तीं सर्वदा ॥५५॥
सदय उदार शांत । दत्तभक्तीसी सदा रत । आल्या गेल्याचा सत्कार करित । पुरवी अर्थ सर्वांचे ॥५६॥
प्रतिसंवत्सरीं निश्चितीं । उत्साह करी दत्तजयंती । साधुसंत घरा येती । तयांसी प्रीतीं अर्चित ॥५७॥
भाग्य संपत्ति भक्ति वैभव । मजसी प्रसन्न श्रीदत्तदेव । हा अंतरीं वाहे अहंभाव । म्हणवी सदैव आपणां ॥५८॥
असो त्या एकनाथ दासोपंता । भेटी जाली अवचितां । येरयेरांसी आलिंगितां । सुखसमाधानना पावले ॥५९॥
मग एकनाथा नेलें आश्रमासी । आग्रहें राहविलें तयासी । आदरसत्कार नेमेंसी । अधिकोत्तरासी जाणविती ॥१६०॥
सुग्रास अन्नें भोजना । नूतन नित्य करावें पक्वान्ना । जें रुचेल नाथाच्या मना । तदुपरी अर्चना अर्पित ॥६१॥
नाथमुखें करोन । नित्य होतसे पुराणश्रवण । एकादशस्कंदीं टीका पाहोन । आनंदघन डुल्लती ॥६२॥
उभयतांची एक भक्ती । एक आचरणा तैशीच प्रीती । कीर्तन भजनीं आवड चित्तीं । आनंदवृत्ती समसाम्य ॥६३॥
गुह्य वार्ता विचार । वेदांतवाक्य सारासार । निरोपणीं होती निर्भर । प्रेम अपार उभयतांचें ॥६४॥
तंव कांहीं दिवस क्रमोनी । नाथ म्हणती जावें सदनीं । हें दासोपंतें परिसोनी । मिठी चरणीं घातली ॥६५॥
करी विनंती ते वेळीं । दत्तजयंती आली जवळी । ती शोभा पाहावी कृपाळी । पुरविजे आळी हे माझी ॥६६॥

आग्रह प्रेमा देखोन । नाथ देती तया मान । तंव जयन्ती पावली सन्निधान । शृंगार सदन मांडिलें ॥६७॥
सारवोनि शृंगारिल्या भिंती । मंडपादि छतें उभविती । झालरा मखरें सिद्ध करिती । रम्य रचिती देवागार ॥६८॥
समोंवतील यात्रा जन । पाहावया उत्साह येती ब्राह्मण । नित्य होतसे संतर्पण । कथाकीर्तन भजनघोष ॥६९॥
सहा दिवसपर्यंत गजरसोहळ्या आनंदें होत । वाद्यें नाना तुरें वाजत । घोष होत भेरींचा ॥१७०॥
तेथें एक नवल । होतसे येतां जयंतीवेळ । दत्तपुष्पपूजा खळखळ । रिचवे सकळ पाहती ॥७१॥
देखोनि साक्षात्कार । सर्वही करिती जयजयकार । दासोपंत जोडोनि कर । नाथा चमत्कार पाहा म्हणे ॥७२॥
नेणेंच नाथा जाणलें । यातें अहंभावें पीडिलें । मग मनींचें मनीं टेविलें । हांसोनि छपविलें त्या वर्मा ॥७३॥
देखोनि वायूचें सुवाससंधान । कळे पर्जन्याचें चिन्ह । नयनाकृतीवरोन । जारीक जन समजती ॥७४॥
नाथ परीक्षक चतुर । बोलावरी ओळखिलें अंतर । धीर गंभीर राहती स्थिर । अधीर उत्तर जल्पती ॥७५॥
असो उत्साह होतां संपूर्ण । दासोपंत स्वयें आपण । तृप्त करी याचकजन । देवोनी मान बोळवी ॥७६॥
विदाग्या वांटोनि प्रसाद । पावतां सकळांसि आनंद । बोळविले सकळ वृंद । वंदी संतपद सप्रेमें ॥७७॥
विनवी जोडोनि करपुटी । म्हणे सत्वर मागुतीं द्यावी जी भेटी । असावी इकडे कृपादृष्टी । उल्हास पोटीं माहेरींचा ॥७८॥
होतां सकळांची बोळवण । नाथ म्हणती करूं गमन । येरू आदरसत्कार करोन । वंदी चरण नाथाचे ॥७९॥
म्हणे समर्था मासपर्यंत । लाधली तुमची संगत । ऐसा आनंद पुन्हा प्राप्त । कैंचा होत अमाप्या ॥१८०॥
नाथ म्हणती येथें राहिलों । परम सुखातें आजवरी पावलों । तव भाग्य देखोनि आनंदलों । सुखें धालों संतांच्या ॥८१॥
जातां विनंती तुम्हांसी । कृपा करावी हे आम्हांसी । अगत्य यावें कृष्णजयंतीसी । आळस यासी न व्हावा ॥८२॥
अवश्य म्हणती दासोपंत । येरायेरांची प्रेमप्रीत । परमानंदें आलिंगित । चरण वंदीत परस्परें ॥८३॥
असो नाथ आज्ञा घेवोन । मार्गीं करिती आनंदें गमन । जवळी देखोनि प्रतिष्ठान । गंगास्नान सारिती ॥८४॥
संनिध पावले नाथ । उद्धवासी कळली मात । मनीं होवोनि हर्षभरित । मेळवी साहित्य ते वेळें ॥८५॥
तुळसीपुष्पांचे हार । बुका परिमळ सुंदर । दिंड्या पताका अपार । समाज थोर संतांचा ॥८६॥
ढोल दमामे वाजती । पताका पुढें फडकती । नाना वाजंत्र्यांचे नाद होती । नाद उठती झल्लरींचे ॥८७॥
टाळ विणे मृदंग । सुरताळ अवघे सांग । वदनीं आळविला श्रीरंग । भक्तभवभंग जगदात्मा ॥८८॥
अभंग भजनाची धुमाळी । वैष्णव नाचती आनंदकल्लोळीं । त्यामध्यें रंगला वनमाळी । धुळी निराळीं दाटलीसे ॥८९॥
देखोनि समारंभ थोर । धांवले आबाल वृद्ध नारी नर । करीत भजनानंद गजर । गंगातीर पावले ॥१९०॥
समीप नाथा देखोनी । संत जाती लोटांगणीं । जाली दर्शनाची दाटणी । मंडपघसणी आनंदें ॥९१॥
मिठी पडतां आलिंगनीं । हृदय सद्गद अश्रु नयनीं । प्रेमा न सांवरे कवणालागोनी । अष्ट गुणीं पाझर ॥९२॥
श्रीराम संवेदुनी येतां । प्रेम न सांवरे भरता । अयोध्यावासियां समस्तां । दाटली सद्गदता अपार ॥९३॥
तैसी येथें जाली सकळां । प्रेम नावरे नरनारी बाळां । उद्धवें बुका लावोनि भाळां । कंठीं माळा घातल्या ॥९४॥

सकळ संतां सुमनहार । कंठीं सूदले प्रियकर । बुका निढळीं सुंदर । अर्चोनि जयजयकार पैं केला ॥९५॥
पुढें पताकांचे भार । वाद्यें वाजती अपार । मार्गें गर्जती वैष्णववीर । हरिनामगजर करोनिया ॥९६॥
मध्यें कावडी चाले गंगा । दर्शनें पातक जाय भंगा । नाथ चालती त्या मार्गा । ग्रामीक जनांसमवेत ॥९७॥
छत्रें चामरें ढोलती । प्रेमें छंदें वैष्णव नाचती । आनंदघोषें टाळ्या पिटिती । आल्हादें पावती आश्रमा ॥९८॥
गृहप्रवेश करितां । सिंहासनीं देखिले कृष्णनाथा । नाथें चरणीं अर्पिला माथा । प्रेमें दंडवता घालिती ॥९९॥
मंग ठेवोनी पुढतीं । तुळसी बुका पुष्पें अर्पिती । धूप दीप नैवेद्य त्वरित गती । उजळली आरती स्वानंदें ॥२००॥
सप्रेम गावोनि रामकृष्णा । आरती ओवाळिली रुक्मिणीरमणा । आरत्या गावोनि नाना । तोषविला कान्हा यशोदेचा ॥१॥
राहविला कांहीं गजर । पुष्पांजळीस ओढविले कर । करोनिया मंत्रोच्चार । चरणांवर समर्पिल्या ॥२॥
पुढतीं करोनि गजर नामाचा । समताल जयजयकाराचा । उत्साह थोर ब्रह्मानंदाचा । योग नमनाचा मागुतीं ॥३॥
घोष यापरी शांतविले । सर्वेंचि पात्रतें मांडिलें । स्नान नाथा करविलें । अर्चोनि बैसविलें स्वपात्रीं ॥४॥
उद्धव अन्नातें पुरवित । गिरजाबाई स्वकरें वाढित । वाढणें सरतां घेतलें घृत । नैवेद्य समर्पित सर्वात्मका ॥५॥
घेवोनिया आपोशन । करूं बैसले भोजन । गोविंदनामें ग्रास घेवोन । घाती संपूर्ण धणीवर ॥६॥
यथारुचि अन्न घेती । गिरजा वाढी बहु प्रीतीं । उद्धव प्रार्थना करिती । सुदिन म्हणती आजि आला ॥७॥
आनंदें सारिलें भोजन । करमुख केलें प्रक्षालन । नाथा मुखशुद्धीलागोन । केलें अर्पण तुलसीपत्र ॥८॥
सर्वेंचि सर्वां विडे देती । उद्धव जेविले पंक्तीं । तोंही आटोप होतां निश्चितीं । पुराणा बैसती एकनाथ ॥९॥
नाथ करिती निरोपण । आदरें श्रोते करिती श्रवण । तेंही संपता कीर्तन । आरंभिती आपण देवापुढें ॥२१०॥
या कीर्तनीं अद्‌भुत रस । श्रोते भाविक सेविती सावकाश । आरती करोनि सर्वांस । खिरापतीस वांटती ॥११॥
अस्तमानीं सकळिक । संध्यावंदन करिती देख । श्रीहरीसि धूप दीप नैवेद्य चोख । आरती सोज्वळिक पुष्पांजळी ॥१२॥
सकळीं उपहार प्रसाद । सारितां भजनीं आनंद । तेणें तोषे तो गोविंद । ब्रह्मानंदगजरेसीं ॥१३॥
पुढें ओंवाळिला सांवळा । नमनें सारोनि सकळां । शेजआरतीचा सोहोळा । त्या गोपाळा अर्पिती ॥१४॥
देवा उपचर्ये अर्चोन । तांबूल केला समर्पण । शेजेवरी पहुडवून । मंजुळ स्तवन रंजीक ॥१५॥
सेजें पहुडविले हरी । सेवा जाणती नाथस्वरीं । मग पडदे टाकोनि झडकरी । नमोनि मंदिरीं पावले ॥१६॥
पावतांचि सुखशयनीं । सेवा जाणती प्रेमें पत्नी । रंजवीतसे मधुर वचनीं । स्वानंदें रजनी सारिली ॥१७॥
त्वरें उठोनि उषःकाळीं । पाचे पदोनि भूपाळी । जागवोनिया वनमाळी । काकडा ओंवाळी वाद्यगजरें ॥१८॥
मुख पाद प्रक्षालन । करूं गेले गंगेसि स्नान । सारोनि संध्यावंदन । पावले येवोनि आश्रमा ॥१९॥
नित्य नेम जे प्रसंग । नाथ सारिती सांगोपांग । मानसादि सर्व योग । नित्य उद्योग या रीतीं ॥२२०॥
एकनाथ धरी नामाभिमान । करावया जगदोद्धारण । प्रत्यक्ष अवतरला रमारमण । उरला व्यापोन एकनाथ ॥२१॥
हा विश्वोद्धारासाठीं । प्रगट झाला जगजेठी । तरणोपायार्थ दावी राहाटी । कृपादृष्टीं पाहे सर्वां ॥२२॥

ईश्वरें धरितां अवतार । भक्त त्याचे बरोबर । जिकडे जिकडे भास्कर । रश्मी समग्र त्यासवें ॥२३॥
जळासवें लहरी । प्रकाश दीपाबरोबरी । डोल अवघा समोरी । कीळ तरी रत्नासवें ॥२४॥
तैसे देवासवें भक्तजन । सेवे तिष्ठती रात्रंदिन । ते म्हणाल जरी कोण । उद्धव आपण उभयतां ॥२५॥
कृष्णअवतारीं उद्धव । तयासि सेवेची पूर्ण हांव । नाथपदीं जाणविती भाव । दास उद्धव लक्षा या ॥२६॥
नाथसेवेसि उद्धव सादर । एके दिवसीं जोडोनि कर । म्हणे मावंदें करावें सत्वर । जयंती समोर पावली ॥२७॥
नाथ म्हणती बरवें । वागलें तरी करावें । साहित्य सिद्ध करोनि उद्धवें । निमंत्री भावें विप्रांसी ॥२८॥
पाकसिद्धी सर्व होतां । मग पाचारिलें समस्तां । गंगापूजनीं एकनाथा । पुरवोनि साहित्या बैसविलें ॥२९॥
मंत्रघोषें करोन । केलें श्रीभागीरथीपूजन । वाद्यघोष वाजती पूर्ण । धूप दीप नैवेद्य आपण केलें ॥२३०॥
आरती आणि पुष्पांजली । करोनि दक्षिणा वांटिली । रंगमाळ्या काढोनि उतावेळीं । भोजना मंडळी बैसली ॥३१॥
यथासांग दिधलें भोजन । तृप्त केले अवघे जन । शोभविलें सभास्थान । नाथा आणून बैसविलें ॥३२॥
झाले समस्तांचे अहेर । संपादिला वृद्धाचार । तांबूल दक्षिणा देवोन समग्र । नारी नर बोळविले ॥३३॥
श्रीकृष्णकृपें करोनी । नित्यानंद नाथसदनीं । कांहीं दिवस मास जातां लोटोनी । तंव जयंती येवोनि पावली ॥३४॥
उद्धवासी हर्ष थोर । तेणें शृंगारिलें सर्व मंदिर । नाथ हिंडती घरोघर । प्रेमें प्रियकर निमंत्रिती ॥३५॥
भावें जोडोनि पाणी । सकळां बोलती मधुर वाणी । नित्य प्रसादकीर्तनीं । कृपा करोनी यावें जी ॥३६॥
उत्सव येतां सन्निध । प्रतिष्ठानीं सकळां आनंद । यात्रेसि येतां संत वृंद । तुरें विविध वाद्य नाना ॥३७॥
हाट चव्हाटे बाजार । भरले वस्तूंचे प्रकार । दुमदुमिलें ब्रह्मनगर । उल्हासें अंतर सकळांचें ॥३८॥
मंदिरासन्मुख शोभायमान । मंडप उभारिले विस्तीर्ण । छत्रें झालरी संयोगोन । द्वारीं तोरण लाविलें ॥३९॥
मखरें सुंदर शृंगारिलें । मंडपीं कर्दळीस्तंभ लाविले । हरितपल्लव सभोंवतीं गोंविले । दीपस्थळें बहुविधा ॥२४०॥
सन्मुख योजिलें कारंजें । नगारखाना द्वारीं वाजे । रंगणीं शोभा आली सहजें । यात्रा समाजें बहुशोभा ॥४१॥
केवळ शोभलें वैकुंठभुवन । प्रत्यक्ष विलसे जगन्मोहन । सिद्धी ऋद्धी तिष्ठती येऊन । देव संपूर्ण ते ठायीं ॥४२॥
बुक्का तुळसी सुमनहार । पसारी आणि हलवे फार । देवासन्मुख हे बाजार । शोभा थोर महाद्वारीं ॥४३॥
कीर्तनसमारंभीं वैसका । लोड तिवासे टेकणें सुरेखा । टाळ विणे मृदंग देखा । समाज नेटका उभवावा ॥४४॥
यात्रा शृंगार झाली सिद्धता । प्रसादसाहित्य नाहीं निवंता । कामें ज्याचीं त्याच्या माथा । झाला सोंपिता उद्धव ॥४५॥
यथासित सर्व सिद्ध झालें । उद्धवें एकनाथा जागविलें । नाथ देखोनी संतोष पावले । आणिक आज्ञापिलें उद्धवा ॥४६॥
यात्रेसि येतील थोर लहान । पश्वादिक दीन हीन । ते ईश्वररूप जाणोन । करीं अर्चन योग्य जैसें ॥४७॥
येथें नाहीं हीनभाव । व्यापकत्वें अवघा देव । म्हणोनि नाम त्या वासुदेव । शुद्ध भाव धरी येथें ॥४८॥
पुरविता मनीं निर्धार । हा वाहिजे सदा भार । पूर्ण करिता दाता विश्वंभर । नाम विश्वंभर तयाचें ॥४९॥
भीरगें न म्हणे जागता । केवीं ओळखिसी त्याची सत्ता । शोभे ज्याची त्याची सर्वसत्ता । धरीं लीनता सर्वभावें ॥२५०॥

ुख्य निरोपिलें तुज । पूर्ण करी हरीचोज । करावें लागलें सेवाकाज । राखिता लाज श्रीकृष्ण ॥५१॥
ापरी उद्धवा सुचविलें । आपण देवासन्मुख उभे ठेले । करुणारसें प्रार्थिलें । प्रेमें ध्याइलें हरिपदा ॥५२॥
हणती देवाधिदेवा सर्वज्ञा । नाहीं कर्तव्यपणाची मज प्राज्ञा । गोड करोनि घेईं गुणज्ञा । तुझिया आज्ञा वंद्य सर्वां ॥५३॥
ंगळरूप तुझा सोहळा । पहावया सर्व पावले डोळां । प्रकटोनि आनंदवीं सकळां । दीनदयाळा पावना ॥५४॥
ाळलीलेचि आवड । प्रेमें जननी पुरवी कोड । मातेची तरी हेचि जोड । याचीण गोड आन नसे ॥५५॥
असो यापरी करुणा । गावोनि प्रार्थिला त्रैलोक्यराणा । प्रेमें मिठी घालोनि चरणां । म्हणे नारायणा सांभाळीं ॥५६॥
श्रावण कृष्ण प्रतिपदेपासोन । आरंभ उत्साहा प्रथमदिन । नित्य कथा कीर्तन भजन । प्रसाद भोजन सकळांसी ॥५७॥
नाथ आज्ञा उद्धवा जैसी । सर्वात्मीं सेवा जाणवी तैसी । उणें कांहीं नसे कवणासी । आल्हाद मानसीं सकळांच्या ॥५८॥
तंव स्मरण धरोनि दासोपंत । प्रतिष्ठाना पावले त्वरित । वाजी शिबिका रथ । परिवारासमवेत पावले ॥५९॥
प्रतिष्ठानीं करितां प्रवेश । जिकडे तिकडे आनंद उल्हास । यात्रा मिळाली विशेष । नामघोष सर्वां मुखीं ॥२६०॥
मार्गीं चालतां दाटणी । पुढें वारिती यंत्रपाणी । समूह पाहोनि लोचनीं । आनंद मनीं दाटला ॥६१॥
जिकडे तिकडे जयजयकार । निरखितां पुढें देखिला बाजार । वस्तु भरल्याति अपार । पाहतां अंतर हुलावे ॥६२॥
परम आनंदाचे गजरी । दर्शना जाती नरनारी । एक पडती एकावरी । कैंची वारी मार्गांत ॥६३॥
असो दासोपंत मार्गीं चालतां । महाद्वारा जाला निरखिता । तेथें उभे देखिला श्रीदत्ता । त्रिशूळ हातां मिरवे तो ॥६४॥
पाहतां सद्गुरुतें नयनीं । वेगीं उतरला शिबिकेंतुनी । सप्रेमभरें धांवोनी । विनटला चरणीं दत्ताच्या ॥६५॥
म्हणे जी सद्गुरु दयाळा । येथें कां तिष्ठसी कृपाळा । दत्त म्हणती रे स्नेहाळा । येथिंची कळा अनुपम ॥६६॥
मी येथें देवडी राखोन । आल्याचें करितों नाथा निवेदन । त्याचें आज्ञें प्रवेशन । होय जाण तुजसी ॥६७॥
या एकनाथभाग्यासी । पार नाहीं निश्चयेंसी । हा स्वयें अवतार हृषिकेशी । जगदोद्धारासी प्रगटला ॥६८॥
येथिंचें कौतुक अपार । तें मी सांगूं कोठवर । न पुरे शेषाचें जिव्हार । येर पामर किती वाणी ॥६९॥
पाहावें जरी तुझे मनीं । तरी तें मी दावितों लोचनीं । येरू लाजे लागतां चरणीं । दिव्य देखणी दृष्टि दिल्ही ॥२७०॥
म्हणे उगलाचि येथें उभा राहें । क्षणीवरी कौतुक पाहें । मात्र दाखविली दत्तसदयें । दासोपंत होय पहाता ॥७१॥
वृषभ इंधन कास ओढोनि आणिती । दासोपंता शंकर भासती । जटा मारें काष्ठें ओढिती । आणोनि टाकिती नाथगृहीं
॥७२॥ त्याचें जंव आश्चर्य मानित । तंव कावडी बाहेर कृष्णनाथ । लवडसवडीं पाणी भरित । वरुण सांगात दुसराही
॥७३॥ दत्त दावी करें करोनी । पाहें पाहें त्या कामीं कामिनी । सिद्धि ऋद्धी त्या आंगणीं । पाहतां नयनीं चकित ॥७४॥
तंव करी किलयाघोस । दत्त म्हणे पाहें त्यास । हा कुबेर रक्षी द्रव्यास । पुरवी विशेष कारणीं ॥७५॥
तंव सहस्राक्ष देखिला । म्हणे कोण कार्य सोपिलें याला । तैं अविनाश म्हणे अर्चितां द्विजाला । गंध पुष्प माळा हा देतो
॥७६॥ पैल दिसती हे आचारीलोक । तरी हे अवघेचि पावक । करिती सोज्वळ सुंदर पाक । निर्मिती चोख पक्कान्नें
॥७७॥ रंगवेली काढोनि दे आसना । पात्रें मांडोनि बैसवी ब्राह्मणा । ओळखीं तूं या चतुरानना । श्रीकृष्ण चंदना पुरवित

॥७८॥ उच्छिष्ट काढी घर्मावरीं । तोचि येथेंही काम करी । हा भक्तकाज कैवारी । उणें तिळभरी पडूं नेदी ॥७९॥
धन्य एकनाथाची भाग्यस्थिती । सकळ दैवतें तेथें रावती । कीर्तनसमयीं गणपती । आणि सरस्वती साह्यकारी ॥२८०॥
पैल नारद करितो भोजन । पाहें हे तुंबर सभे करिती गायन । हे किन्नर वाद्यें वाजवोन । करिती तनान आश्चर्य हें ॥८१॥
देवांगना तृतीय प्रहरीं । नृत्य करिती नाना परी । मुख्य त्रैलोक्यपति हरी । सोहळा करी आपुला ॥८२॥
त्या दत्तकृपें करोन । सर्व केलें अवलोकन । अहंभाव गेला विसरोन । म्हणे धन्य धन्य नाथ हा ॥८३॥
करवीं त्याची मज भेटी । दत्त गेले उठाउठीं । मार्गे जावोनि कर्णपुटीं । दासोपंत निकटीं पावले ॥८४॥
ऐकतांचि उठला एकनाथ । नेत्रीं पाहिले दासोपंत । येरें धांवोनि त्वरित । मिठी घालीत चरणांसी ॥८५॥
प्रेमें डौरले नयन । उभयतां जालें आलिंगन । उद्धवें स्थळ योजोन । रहावया स्थान दिधलें ॥८६॥
अन्नसाहित्य मंडळीसी । घास दाणा पशूंसी । जें जें पाहिजे जयासी । तें तें तयासी पाववी ॥८७॥
दासोपंत आणि नाथ । उभयतांचें प्रेम बहुत । नित्य सोहळा आनंदें वर्तत । आनंदभरित पाहोनी ॥८८॥
कृष्णजन्माचा सोहळा । पाहती विमानीं सुरवर डोळां । दाटणी नरनारी बाळां । मेघमंडळां घनवट ॥८९॥
रजनी होतां दोन प्रहर । एकचि झाला जयजयकार । वाद्यें वाजों लागलीं अपार । होत भडिमार उल्हाटयंत्रीं ॥२९०॥
नाथ उभे कीर्तनीं । गुलाल पुष्पें वांटोनी । प्रगटला म्हणतां मोक्षदानी । पुष्प सघनी वृष्टि होत ॥९१॥
पुढें श्रीकृष्णमूर्ति मनोहर । तेज फांकलें अपार । बाळरूप अतिसुकुमार । सुहास्य वक्त्र कमलाक्ष ॥९२॥
ओष्ठ आरक्त प्रवाळ । मस्तकावरी शोभती कुरळ । कुंडलमंडित कर्णकमळ । विजवरा सुढाळ भाळीं तो ॥९३॥
हृदयीं भृगुलत्ता वत्सलांछन । आजानुबाहुमंडित भूषण । मणगटीं विराजती कंकण । जडित कोंदण कोंदिलें ॥९४॥
करतळपत्रें आरक्त । दशांगुळीं मुद्रिका भक्त । मुद्रिका शोभल्या युक्त । अंगुलाग्रीं सक्त द्वितीयेचा ॥९५॥
कंठीं कौस्तुभ वाघनख । वैजयंती एकावळ पदक । उदरीं त्रिरेषा त्रिलोक । नाभि निःशंक रेखुन ॥९६॥
क्षुद्र घंटा कटीं शोभती । जानु जंघायुक्त दिसती । पोटऱ्या सरळ विराजती । भूषण मिरवती पदाब्जीं ॥९७॥
वांक्या तोरड्या तोरड । पावनत्वें करी गजर । तो पतितांचा अधिकार । भूषण थोर हरिपदीं ॥९८॥
द्वय पद सरोज निर्मळ । पदतळ आरक्त रातोत्पळ । युक्त येथें दशांगुळ । चंद्रिका तेजाळ दशधा त्या ॥९९॥
पदकर तळपत्रीं देखा । सामुद्रिकचिन्हेंमंडित रेखा । ध्वज वज्रांकुश पताका । चिन्ह सुरेखा पद्मचक्र ॥३००॥
गंगायमुना सरस्वती । सक परी विभक्त दिसती । हंसपक्षी तीरीं शोभती । याचि विभक्ती परिसिजे ॥१॥
शुभ्रवर्ण तोरड्या सोज्वळ । वाटे वाहे गंगाजळ । शब्द त्याचा तो खळाळ । हंसमंडळ घागऱ्या तटीं ॥२॥
वरील प्रभूचा पदवर्ण । तें यमुनेचें कृष्णजीवन । अंगुळी मुद्रिकानाद खळाळ पूर्ण । नखाग्रीं जडोन हंस तीरीं ॥३॥
चरणतळवे आरक्त शोभती । तेचि वाहे सरस्वती । रेषा लहरिया उठती । हंस चमकती रजकण ॥४॥
पद सरोजनीराज । जयंतीपर्व पावलें आज । महापुण्यकाळ पावला सहज । दर्शन समाज मुक्त हा ॥५॥
पाहा सकळ पाहोन । जीवें केलें निंबलोण । हृदय पालखीं बैसोन । जो जो म्हणोन हालविला ॥६॥

आनंदाचे पालखीं खेळणें । प्रेमसूत्राचें हिंदोळणें । भावार्थाचें गीत गाणें । बाळ पाहणें अनुलक्षें ॥७॥
नाना परीचें विविध गीत । हाल्लर गाइले प्रेमभरित । नामउच्चार कृष्णनाथ । ओसंगा घालित सकळांच्या ॥८॥
महद्भाग्याचा सुदिन । सकळां ओसंगा श्रीकृष्ण । सद्गदित सकळांचें अंतःकरण । वाहती नयन प्रेमजळें ॥९॥
मखरीं मूर्ति वैसविली । सर्वेचि आरती उजळिली । निजभक्तीं ओंवाळिली । कुरवंडी केली एकनाथें ॥२१०॥
नाथासि जालें आलिंगन । आनंद राहिला वर्षोन । संमाप्त करोन कीर्तन । लोटांगण घातलें ॥११॥
मग साहित्य आणोनि ते वेळां । बुक्का लाविला सर्व भाळां । कंठीं सूदल्या पुष्पमाळा । कोण्ही तांबुला वांटिती ॥१२॥
कोण्ही सुंठवडे देती । कोण्ही देती खिरापती । प्रसाद बत्तासे देती हातीं । गुलाल फेंकिती तें सर्वां ॥१३॥
अत्तरगुलाबा सिंपितां । यात्रा नमी एकनाथा । आज्ञा मागोन स्वस्थानपंथा । जातां वार्ता सुखाच्या ॥१४॥
सोहळा पाहोनि दासोपंत । ध्यानीं निमग्न तटस्थ । स्थिर एकाग्र जालें चित्त । वाटे आनंदांत बैसलों ॥१५॥
मग एकनाथें करीं धरिलें । प्रेमें दासोपंता आलिंगिलें । तें प्रीतीवरी आले । चरण धरिले नाथाचे ॥१६॥
असो नवमीचे दिवशीं । पारणें केलें निश्चयेंसी । प्रसाद पावला यात्रेसी । आनंद सकळांसी जाहला ॥१७॥
दशमीस आरंभिला काला । चोरी कर्मगाऱ्हाणीं बाळा । गाई राखोनि खेळती खेळा । बाळगोपाळासारिखा ॥१८॥
खेळ संपवितां संपला । लोणी दिधलें गोपाळा । दहीलाह्यांचा करोनि काला । फेंकिती मेला येरयेरां ॥१९॥
ग्रामवासी जन निश्चितीं । जैसी जयाची असे शक्ती । मिठे खट्टे काले करिती । यात्रे आणिती भरोनी ॥२२०॥
प्रसंग येतां फेंकिती कवळ । तेणें मुखांग भरे सकळ । त्या प्रसादीं नाहीं विटाळ । सेवितां सकळ पाप जाय ॥२१॥
मास येरयेरां तोंडीं । घालोनि उल्हासें फोडिती हंडी । तें पडतसे जनमुखकुंडीं । भिडाभिडी अद्भुत ॥२२॥
उत्तीं घंटीं आल्हाद । निजानंदें पावले प्रसाद । प्रेमें ओंवाळिला गोविंद । आनंदकंद जगदात्मा ॥२३॥
काला संपवोनि भोजन । करिती सकळ वैष्णवजन । मग विश्रांती शयन । तंव एकादशीदिन उदेला ॥२४॥
पूजाविधान सारिती । कथाकीर्तनें आरंभिती । दिंड्या पताका उभारिती । छबिना मिरविती रजनींत ॥२५॥
अग्नियंत्रें नाना प्रकार । झाडें लाविलीं अपार । नळे चंद्रज्योती प्रभाकर । दीपिका सुंदर दो बाहीं ॥२६॥
पुढें वाजंतरें वाजती । त्यांपुढें यंत्रें सुटती । वहनें पाहतां चमकती । झाडें झडकती त्यांपुढें ॥२७॥
नाहीं मरातबीं गरुडटके । मेघडंबर मकरमुखें । चंद्रसूर्यपान तेजें चमके । पताका फडके वातवळें ॥२८॥
तयामागें सुतभार । टाळ विणे मृदंग झल्लर । ढोल दमामे अपार । भजनगजर होतसे ॥२९॥
नळे बाण तेथें सुटती । तारे नभींहूनी पडती । गगन जावोनि पावती । अंश सरतां येती भूतळा ॥२३०॥
तयामागें शिबिकेंत । बैसलासे कृष्णनाथ । वरी छत्रें चामरें ढाळित । कुंचे वारित मयूराचे ॥३१॥
दोहीं बाहीं चंद्रज्योती । अक्षय दीपिका जळती । भाट बंदीजन गर्जती । पवाडे गाती हरीचे ॥३२॥
उदय राये सेवेंत । शिबिकेसवें दासोपंत । भजनीं सप्रेम एकनाथ । मागेंपुढें चालत नरनारी ॥३३॥
जिकडे तिकडे आनंद । विठ्ठलरखुमाईनामें छंद । सद्गद झाला दुःखखेद । भेदाभेद विरला ॥३४॥

ब्रह्मानंदें मिरवत । गातीं नाचती साधुसंत । आश्रमासन्निध सर्व येत । दहीं मुर्दें ओंवाळित सांवळा ॥३५॥
ऐसें होतां सरली निशी । तंव ती पातली द्वादशी । नित्य नेम सारोनि वेगेंसी । भोजनें सकळांसी दीधलीं ॥३६॥
प्रसादीं होतां तृप्त । रात्रीं मांडिलें ललित । सोंगसंपादणी करिती नाथ । स्वमुखें सिद्धांत ज्ञानवदे ॥३७॥
षड्दर्शनाची शाग । त्यांत प्रवृत्तीनिवृत्तीचे भाग । नाथ नित्रडोनि दाविती सांग । अद्भुतांग ओढवला ॥३८॥
शेवटीं अपराधी पतित । श्रीहरिसंगें भांडत । वादविवादें जिंकित । येणेंचि घडत पावनत्वें ॥३९॥
मग पायघड्या घालोन । प्रेमें पादपूजा करोन । षोडशोपचार अर्चोन । द्विजार्चन पैं केलें ॥३४०॥
मग नमोनि संतांसी । पूजा अर्पिली भावें त्यांसी । धनवस्त्रें यथा शक्तीसी । देवोनि त्यांसी तृप्त केलें ॥४१॥
मिळोनि अवघे संतजन । केलें पतितांचें पूजन । देवअंगीचे प्रसाद संपूर्ण । पतिता अर्पण पैं केलें ॥४२॥
तीर्थ प्रसाद पतितांसी । देवोन पावन केलें त्यांसी । तो भगवत्कृपें वांटी सर्वांसी । अधिकार त्यासी प्राप्त जाला ॥४३॥
तीर्थप्रसादें समस्त । एकनाथें केले तृप्त । इतुकीं पदें वदले नाथ । ग्रंथसंमत मिळे त्या ॥४४॥
ऐसी सरतां रजनी । उगवतां त्रयोदशीचे दिनीं । प्रक्षाळणपूजा करोनी । संत भोजनीं तृप्त केले ॥४५॥
ते दिनीं शय्या देवासी । सेवा जाणवोनि वारिती श्रमासी । मग पाठवणी चतुर्दशीसी । करोनि सर्वांसी बोळविले ॥४६॥
तंव दासोपंत विनविती । आज्ञा द्या जी आम्हांप्रती । नाथ म्हणे श्रमलेती । घ्या विश्रांती दोन दिवस ॥४७॥
प्रतिपदेपर्यंत राहविलें । सुग्रास भोजनीं तोषविलें । वस्त्रप्रसादें गौरविलें । तैसेंच आनंदविलें परिवारा ॥४८॥
द्वितीयेचा मुहूर्त पाहोन । भोजनप्रसादा सारोन । येरयेरां करोन वंदन । आलिंगन सप्रेमें ॥४९॥
नाथासि म्हणती दासोपंत । तुमची लीळा अतिअद्भुत । तूं मनुष्य नव्हे मूर्तिमंत । ईश्वर सत्य भाससी ॥३५०॥
येथील सोहळा पाहोन । तटस्थ जालें माझें मन । पावलें देवाचें दर्शन । कृपें करून दत्ताच्या ॥५१॥
लोभ तुमचा असावा । माझा प्रतिपाळ करावा । विसर कधीं न पडावा । मुक्तलों अहंभावा तव कृपें ॥५२॥
बोलतां होती सद्गदित । उभयां प्रेम नावरत । बोळवितां दासोपंत । शिबिकेंत बैसविलें ॥५३॥
नाथाकडे परतोनि पाहती । कृपा असों द्या म्हणे दीनाप्रती । नाथ नेत्रा पदर लाविती । जा जा म्हणती स्वस्थ ॥५४॥
स्वधामा गेला दासोपंत । मुखें नाथाचे गुण गात । वेळोवेळां महिमा आठवित । स्वस्थळा जात स्वानंदें ॥५५॥
इकडे एकनाथ सदनीं । उद्धवासह पावले येवोनी । सदा लीन भगवद्भजनीं । काळ कीर्तनीं सारिती ॥५६॥
धन्य धन्य हे संतजन । धन्य धन्य त्यांचें अर्चन । धन्य प्रेमभाव भक्ती पूर्ण । धन्य नारायण वश केला ॥५७॥
या संतांचा कीर्तनरस । श्रोतीं सेविला सावकाश । पुढील कथा अविनाश । वदविता सुरस स्वरूपें ॥५८॥
संत सदय उदार । कोमळ त्यांचें बहु अंतर । संत दीनांचे दातार । संत माहेर शरणागता ॥५९॥
त्या संतांचे चरणीं । अनंतसुत लोळांगणी । या म्हणे जी वरदपाणी । म्हणोनि लोळणी घालित ॥३६०॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविक भक्त । पञ्चपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥३६१॥

॥ इति पञ्चपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ५७ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीसद्गुरुदत्तानंताय नमः ॥

नमो सद्गुरुअविनाश दत्ता । सच्चिदानंदा समर्था । कृपाघना अनाथनाथा । षड्गुणभरिता सर्वज्ञा ॥१॥
तूं सदय होसी उदार । शरणागता तुझा आधार । नाम स्मरतां धांवसी सत्वर । जाणोनि अंतर पावसी ॥२॥
आपुल्या कृपें करोन । पावन केलासी जनार्दन । एका जनार्दनाचा दास पूर्ण । त्यासी कृपादान दीधलें ॥३॥
त्या अनन्याची कीर्ती । वाढविली तुवां कृपामूर्ती । तेवीं दासोपंतावरुती । केलीस प्रीती अविनाशा ॥४॥
उभय लीलेचा रस । गत कथाध्यायीं वर्णविला विशेष । परिसोनि सुख श्रोत्यांस । त्या आनंदास पार नाहीं ॥५॥
श्रोते श्रवणीं बैसले । तयांचें चित्त असे वेधलें । त्यांसी तृप्त कीजे दयाळें । मातें कनवाळे कृपा करीं ॥६॥
मी तों मतिमंद अज्ञान । पतित अनाथ बुद्धिहीन । दुर्बळ करंटा अकिंचन । तोषवूं मन केंवि त्यांचें ॥७॥
पांगुळा न साधवे गती । अंधा न परीक्षवे मोती । मुक्या न करवे पंडिती । बधिर ग्रंथीं न सुखावे ॥८॥
तेवीं हीन मी पामर । तोषवूं कैसेनि अंतर । म्हणोनि प्रार्थितों वारंवार । अभयकर देइजे ॥९॥
तव कृपेचें महिमान । मुका वाचस्पति होय जाण । पांगुळा गिरि जाय वेंघून । अंध रत्न पारखी ॥१०॥
अद्भुत तुझा कृपाकर । शब्द जात आयके बधिर । उत्तरा देईल प्रत्युत्तर । हें लाघव थोर कृपेचें ॥११॥
यास्तव दिनरजनीं । तुज प्रार्थितों करुणावचनीं । मज तोषवीं अनाथालागुनी । कृपादानीं आपुल्या ॥१२॥
आम्हीं बाळकीं घ्यावी आळ । तुम्हीं पूर्ण करावी ती सकळ । म्हणोनि तूतें दीनदयाळ । भक्तवत्सल म्हणताती ॥१३॥
तुझें नाम पतितपावन । दीनबंधु दयाघन । उदार दाता सर्वज्ञ । ऐश्वर्यसंपन्न तूं होसी ॥१४॥
अनुपम तुझा सर्व योग । जाणसी अनन्याचे प्रसंग । भाविक प्रेमळ तुझें अंतरंग । त्याचे उद्योग साहसी ॥१५॥
वक्ता विनवी श्रोत्यांसी । भक्त परम प्रिय दत्तासी । कांहीं न धरोनि थोरपणासी । करी काजासी सर्वस्वें ॥१६॥
हा त्रिगुणात्मक सर्वेश्वर । ब्रह्मरूप परात्पर । शरणागतासाठीं अवतार । धरितो अपार पार नाहीं ॥१७॥
अंबऋषीच्या कैवारा । धरिले प्रीतीं दशअवतार । करोनिया दुष्टसंहारा । धरिली धरा पृष्ठीं दंतें ॥१८॥
आणिक चौदाचा प्रकार । कार्याकारणीं दाविला साचार । जगद्गुरु दत्त दिगंबर । आद्य प्रसर पुढती ॥१९॥
जितुकी युगमार्गांची भरती । त्यांत चोविसांची गणती । माजी कल्पमानाची प्रवृत्ती । अवतार होती त्यामानें ॥२०॥
त्या चौ युगांमाजीं घोर । कलियुग अतिअनिवार । पापवृष्टी अति घोर । प्रवाह घोर दुराचरणीं ॥२१॥
येथें व्हावया तरणोपाव । सर्वेश्वरें रचिला उपाव । अवतार भक्तांचे समुदाव । सकळ जीव तारावया ॥२२॥
मुख्य अवतार कलींत दोन । आदि अंतीं प्रमाण । त्यांत प्रस्तुत बौद्ध होवोन । कृत्य अवलोकन करी सर्व ॥२३॥
कलियुगअंतीं प्रकार । प्रगट कलंकी होणार । तो दुष्ट अधमांचा करील संहार । क्षाळील समग्र धरा हे ॥२४॥
या कलियुगाचे प्रथमचरणीं । बौद्धरूप राहिला होवोनी । संतलाऊं या मेदिनीं । प्रगट करोनी योजिले ॥२५॥
कृष्ण अवतार संपतां । उद्धवें प्रार्थिलें भगवंता । पुढें कलियुग घोर अवस्था । जीवा मुक्तता कैसेनी ॥२६॥

त्याचा तरणोपाय व्हावया । अभयामृत वदा सदया । कोण मंत्र कोण क्रिया । ती गुणालया निरोपीं ॥२७॥
ऐकोनि उद्धवाचें करुणावचन । कृपें द्रवे तैं श्रीकृष्ण । म्हणती उद्धवा सावधान । करीं श्रवण सांगतों ॥२८॥
उणें आणी अमृतास । ऐसा श्रेष्ठ भक्तिरस । तो सेविजे सावकाश । अंतरीं उल्हास धरोनी ॥२९॥
मन्नामाचें भजन । वाचे करावें अनुदिन । मद्रूपीं करावें अर्चन । निष्ठा धरोन सप्रेम ॥३०॥
पाहें पां त्या पार्था । समरीं उपदेशिली गीता । ते पुढिलांचिया स्वार्था । साधिजे परमार्था अर्थ तो ॥३१॥
या स्वीकारणीं जो विनटे । तो मत्पद पावे गोमटें । त्याचें चुकती सर्व झटे । परसंकटें वारील तो ॥३२॥
उद्धवा तुम्हां संतांचे अवतार । कलियुगीं प्रगटतील निर्धार । ते हा प्रगट करितील प्रकार । राहणी सुंदर आचरोन ॥३३॥
उद्धवा ते भक्तजन । केवळ असती मत्प्राण । मी त्यांचे वचनाधीन । कौतुकें पुरवीन तयांचीं ॥३४॥
संतांसि जे शरण होती । निष्ठा प्रेम विनय भक्ती । भाव सदृढ जयां चित्तीं त्यां मी प्रीतीं प्रतिपाळीन ॥३५॥
कल्पयुगें अवतार घेतले । नाना चरित्र दाखविले । परी भक्तप्रीतीच्या कल्लोळें । दावीन आगळें वर्तोनी ॥३६॥
माझें सर्व अधिष्ठान । तें तों असे भक्ताधीन । भक्तभूषणें मज भूषण । त्यासाठीं सगुण होणें मज ॥३७॥
हें उद्धवातें गुज । निरोपी प्रेम गरुडध्वज । म्हणे सांभाळीं आतां हें बीज । पुरेल चोज सर्वांचें ॥३८॥
त्या अभयोक्तीतें परिसोन । कलियुगीं प्रगटले संतजन । प्रेमभक्ती भांडवल दुकान । शुद्ध केणं भावार्थियां ॥३९॥
दुकान घातलें चव्हाट्टा । सबळ वसविल्या ज्ञानपेठा । कोण्ही आलिया हाटा । व्यापारीं तोटा नसेची ॥४०॥
वस्तुनामें तीं अनंत । नव भांडारें विभक्त । त्यासी जो घेववेल पदार्थ । तेणेंचि अर्थ पुरती ॥४१॥
संत बैसले दुकानीं । व्यापार मांडिला तयांनीं । करिती सर्व घेणींदेणीं । मुखत्यारपणीं आपुल्या ॥४२॥
खोटें घेती खरें देती । व्यापार करितां कधीं न ठकती । मरती केणीं न सरती । सुखी होती घेणार ॥४३॥
संतांऐसा भाग्यवंत । नाहीं धुंडितां त्रिभुवनांत । संत उदार सदय शांत । जेणें भगवंत वश केला ॥४४॥
संतहृदयींची भक्ती चोखडी । देखोनि धांवे हरि तांतडीं । भावा भुलोनियां निचाडी । प्रेमगोडी विनटला ॥४५॥
भक्ति देखोनि प्रेमळ । काय करी अविनाश कृपाळ । एकनाथाचा द्वारपाळ । होवोनि तत्काळ तो ठेला ॥४६॥
वाहोनि कावडी भरी पाणी । गंध देतसे उगाळोनि । सर्व देवरूपें धरोनि । काम कारणीं राबलें ॥४७॥
भाग्यनिधी एकनाथा । दाविलें त्या दासोपंता । त्याची छेदोनि अहंभावता । निरहंकारता बाणविली ॥४८॥
एकात्मतेचा योग । एकनाथींच अभंग । एकनिष्ठपणा सांग । एकविधा चांग भक्ति ज्यांची ॥४९॥
कर्म धर्म नारायण । कर्तव्यपणें न धरी अभिमान । कल्पविकल्पातीत मन । करी कथन हरिचर्चा ॥५०॥
नामापरतें नेणें सार । नारायणीं रंगलें अंतर । नाहीं द्वैत द्वेषविकार । नांदे निर्विकार स्वानंदीं ॥५१॥
घडी पावावया निभ्रांत । परी बैसविलें स्वचित्त । चकित आचरणें समस्त । थरथरा कांपत अरिवर्ग ॥५२॥
एवं एकनाथनामाभिधान । वास्तव्य गोदातटीं प्रतिष्ठान । तो एकात्मतें राहिला भजोन । जगदोद्धारण करावया ॥५३॥
त्या कीर्तीचें महिमान । तें अद्भुत असे वर्णन । ताहाराबाज करी विवरण । केलें निरोपण विस्तारें ॥५४॥

दत्तप्रासादिकसार । तोचि वर्णिला येथें प्रकार । पुढील कथेसि पडेल अंतर । म्हणोनि आंवर पैं केला ॥५५॥
असो एकनाथाची कीर्ती । फांकलीसे या त्रिजगतीं । ते ऐकोनि मुमुक्षु धांवती । शरण होती निजभावें ॥५६॥
किती नाथासी जाले शरण । यांचें तों नसेचि गणन । नाथकृपेचें महिमान । आपणांसमान करिताती ॥५७॥
जेवीं तो स्पर्शक मणी । हिराच करी गारस्पर्शनीं । परी पुढें न चले तेथोनी । दृष्टांत सहजीं अयोग्य ॥५८॥
यालागीं आणिक । दृष्टांत योजूं सम्यक । काष्ठासि अग्नित्व दे पावक । पावकें पावक सर्व होय ॥५९॥
याति वर्ण कुळ नासी । गुरवी काठिण्य वक्रतेसी । दाहकशक्ती स्पर्शकासी । असे योजनेसी योग्य हें ॥६०॥
तेवीं हा एकनाथ । अवतरला जगदोद्धारार्थ । शरणागताचे पुरवी अर्थ । निजसुख स्वार्थ जोडवी ॥६१॥
हा त्याचा प्रताप ऐकोन । नरहरिनामा गृहस्थ पूर्ण । मुमुक्षुपणें नाथा शरण । जाला येवोन परम प्रीतीं ॥६२॥
आधीं प्रपंचीं उदास । कनककांतेची नाहीं आस । सदा अर्चनीं रंगलें मानस । भक्ति विशेष हरीची ॥६३॥
साधुसंतमुखीं ऐकिलें कीर्तन । व्यर्थ जिणें सद्गुरुवांचून । तया जाइजे आधीं शरण । करित कल्याण तो एक ॥६४॥
सद्गुरु भवतापातें निवारी । गर्भवासापासोनि तारी । अज्ञानतम दूर करी । प्रबोध विवरी मानसीं ॥६५॥
समूळ तिमिरातें निरसी । मना निववी ज्ञानरसीं । आपीआपणा करवी आरसी । लाधवी सरसी लाभ जोडी ॥६६॥
असो सद्गुरु आहे सर्व संपन्न । परी ज्याचें त्यापाशीं हितकल्याण । निर्मळ असतां जीवन । साबण गुण करीतसे ॥६७॥
प्रेमभाव भक्तिशुद्ध । सेवाधर्मीं आनंद । नेणें कदा वादविवाद । सद्गुरुबोध लाहे तो ॥६८॥
हें कीर्तनीं निरोपण । नरहरीनें केलें श्रवण । धिग् धिग् म्हणे हें जिण । सद्गुरुसी शरण न गेलों ॥६९॥
ईश्वरें दिल्हा हा नरकाय । त्याचें सार्थक केलें काय । आतां धरूं सद्गुरुपाय । ते उपाय करतील ॥७०॥
म्हणोनि एकनाथपदासी । शरण नरहरी गेला वेगेंसी । अनन्यभावें सेवेसी । रतला प्रेमेंसी आदरें ॥७१॥
मागिल्याची सोडोनि आस । जाला सद्गुरुपदाचा दास । जीवेंभावें धरिली कास । विषयभोगीं उदास अंतरीं ॥७२॥
दिवा रजनीं जागोन । करी सद्गुरुचें सेवन । सेवेमाजीं रंगलें मन । न रुचे तन धन त्यापरतें ॥७३॥
सेवेमाजीं रहाणी । सहज येत अंगीं बाणोनी । बोध होतसे पुराणश्रवणीं । उपजे कीर्तनीं भक्तिप्रेमा ॥७४॥
नम्रता आणि विनयभावं । सहज साधे न करितां उपाव । संतनमनीं अहंभाव । होय वाव संघट्टणें ॥७५॥
भजनाचे परिपाठीं । हर्षे आल्हाद उपजे पोटीं । सद्गुरुबोधें अज्ञान निवटी । कल्पनागांठी विराल्या ॥७६॥
दृढ सेवेचा बाणतां छंद । निंदा द्वेष गेला भेद । लाभहानीचा नुपजे खेद । वाचे गोविंद रामकृष्ण ॥७७॥
सद्गुरुचे अर्चनीं जागतां । विकृति विकार जाला मावळता । लोभ मोह जाला रमता । अनुसरतां निजनिष्ठें ॥७८॥
नरहरीसी बाणलें सद्गुरुध्यान । नवविधा त्यामाजी येत घडोन । सद्गुरुचें न टाळी वचन । लक्षोनि चरण राहिला ॥७९॥
पडतां दुःख न सांगावें । जीवींचें जीवींच तें भोगावें । कांहीं लागतां न मागावें । हर्षे वागावें सेवेंत ॥८०॥
ऐसें वागतां सेवेंत । कांहीं संवत्सर लोटत । देखोनि त्याचा भक्तिभावार्थ । नाथ कृपावंत आज्ञापिती ॥८१॥
गुज गुह्य सांगितलें कानीं । तो मंत्र जपावा बैसोनि आसनीं । परी असावें निरान्यस्थानीं । निश्चळ मनीं निर्वेध ॥८२॥

यापरी बोलतां सद्गुरुनाथ । हृदयीं जाला सद्गदित । सद्गुरु म्हणती किमर्थ । होसी दुःखित मानसीं ॥८३॥
नरहरी विनवी कर जोडोन । स्वामिपदसेवा हें अनुष्ठान । सद्गुरुस्वरूपाचें अवलोकन । हेंचि ध्यान पैं माझें ॥८४॥
सद्गुरुसेवनीं जडली प्रीत । हांचि माझा निरामय एकांत । पूजन गोमटें मंडित । पदीं भावार्थ हेंचि पैं ॥८५॥
सेवानिष्ठ रात्रंदिन । पदीं लक्ष राहिलें बाणोन । यापरतें नावडे मजलागोन । चरण सोडोन नव जावें ॥८६॥
जाणोनि दासहृदयींचा भावार्थ । काय बोलती एकनाथ । बा रे बोलसी तूं यथार्थ । परी कार्यार्थ वेगळा ॥८७॥
माझी आज्ञा तुजसी । मान्य वंदीं ते शिरसीं । कदा न अव्हेरीं यासी । सांगें तें वेगेंसी करावें ॥८८॥
जाय तूं देवगडशिखरीं । तेथें श्रीजनार्दनपदस्थान ओवरी । तुज बोधिलें जें अंतरीं । ती सेवा करीं तये स्थळीं ॥८९॥
तेथें महत् लाभातें पावसील । अपार सुख विश्राम पावेल । भेटी अवधूताची होईल । स्वनिष्ठें येईल अनुभवा ॥९०॥
मी आणि जनार्दन । येथें नाहीं भेदभान । मम लाभाचें तें स्थान । न करीं अनमान जाय त्वरें ॥९१॥
आग्रह देखोनि सद्गुरुचा । मान घेतला त्या आज्ञेचा । तोचि सुमुहूर्त लाभाचा । योग प्रयाणाचा साधित ॥९२॥
सद्गुरुपदाब्ज वंदोन । प्रदक्षिणा करोनि तीन । सद्गुरुमूर्तीचें करोनि ध्यान । पुनरा नमन साष्टांगीं ॥९३॥
तेवींच गिरिजामाता । ऐसें नमिलें उभयतां । आज्ञा घेवोनि होय निघता । देवगडपंथा चालिला ॥९४॥
सद्गुरुनामें करीत भजन । पावला देवगडपट्टण । गडशिखरीं जावोन । सारिलें नमन पादुकेसी ॥९५॥
देवगड म्हणजे दौलताबाद । तेथें जनार्दनपंताची समाधी प्रसिद्ध । तपाचर्नेनीं स्थळ शुद्ध । योगीवृंद पावती ॥९६॥
असो तेथें नरहरी । आज्ञेऐसी सेवा करी । दत्तध्यान धरोनि अंतरीं । बैसला निराहारी नेमस्त ॥९७॥
सप्रेम भक्तिभावें अनुष्ठान । एकाग्र मनें साधी साधन । श्रीजनार्दनाच्या पादुका पुजोन । करी भजन स्वानंदें ॥९८॥
ऐसे होतां कांहीं दिवस । तंव वळवळला अविनाश । धरोनिया फकीरवेष । तिघे माध्यान्हास पावले ॥९९॥
नरहरिचें सरतां जपध्यान । उघडोनि पाहे जंव नयन । तंव तिघे फकीर सन्निधान । बोलती वचन काय त्या ॥१००॥
यवनभाषेनें बोलती । येथें कां हो बैसलेती । कोण हेतु धरिलासे चित्तीं । सत्य निश्चितीं सांगावें ॥१॥
कासया करितां निरशन । कोणाचें इच्छितां आगमन । आमुचा हा वसता ठिकाण । तुम्ही कोण या ठायां ॥२॥
येरू देखोनि चाकाटला । मनीं भयभीत तैं जाला । म्हणे मीं काय वदावें याला । मनीं चिंतावला न बोले ॥३॥
फकीर पुनरा वदती । सांडीं आमुची तूं भीती । कोणें पाठविलें ये स्थळाप्रती । अर्थ चित्तीं सर्व सांगें ॥४॥
ऐसी देतां आठवण । तैं आठवलें सद्गुरुवचन । तुज तेथें दत्तदर्शन । पावेल पूर्ण निर्धारें ॥५॥
ऐसी अभयोक्ती असतां । हे फकीर जालों पाहता । तेही मज पुसती वार्ता । परी चित्ता संशय ॥६॥
एकाचें व्हावें दर्शन । हे तों फकीर तिघे जण । तरी हें लाघव असे कोण । मज तों महिमान न कळेची ॥७॥
मग मनीं घेत्या विचार । बोलतां बोलावें साचार । सप्रेमें करोनि नमस्कार । जोडोनि कर निवेदी ॥८॥
म्हणे जी प्रतिष्ठानवासी एकनाथ । तो सद्गुरु माझा समर्थ । मी दास त्याचा पदांकित । नाम निश्चित नरहरी ॥९॥
याची आज्ञा मज प्रमाण । दाविलें पावलों हा ठिकाण । येथें करीं तूं सेवन । दत्तदर्शन होईल ॥११०॥

तो विश्वास धरोनि मानसीं । बैसलों निग्रहें या ठायासी । केधवां पावेन दर्शनलाभासी । हेतु मानसीं हा खरा ॥११॥
तों अवस्मात आपुलें । दर्शन मातें आजी जालें । पुसतां वृत्तांत निवेदिलें । नाहीं वंचिलें स्वामिपदा ॥१२॥
आतां माझी हे विनवणी । कधीं पावेल तो मोक्षदानी । कधीं तोषवील या अनाथालागोनी । लालसा मनीं थोर हे ॥१३॥
बोलतां सद्गदित जाला । म्हणे कधीं भेटती सांगा कृपाळा । केव्हां पाहीन त्या चरणकमळा । पदीं माळा अर्पीन ॥१४॥
लक्षी घनातें चातक । कीं चंद्रीं चकोर देख । कीं मातेसाठीं बाळक । करी शोक वाट पाहे ॥१५॥
तेवीं नरहरीचें चित्त । दत्तदर्शना व्याकुळ बहुत । हें देखोनि कृपावंत । जाले प्रगटित तिघेही ॥१६॥
म्हणती वत्सा सावधान । उघडोनि पाहें लोचन । तों तीन मूर्ती दैदीप्यमान । दत्त जनार्दन एकनाथ ॥१७॥
मूर्ती पाहतां हर्षभरित । साष्टांग घालीत दंडवत । नेत्रांबुयोगें चरण क्षाळित । प्रेम अद्भुत लोटलें ॥१८॥
न धरत चालिलें स्फुंदन । तैं विनवी एका जनार्दन । श्री दत्ता तूं दयाघन । करीं समाधान अनन्याचें ॥१९॥
नरहरी करें उठविला । दत्तें हृदयीं आलिंगिला । अभयकर माथां ओपिला । कृपें शांतविला आपुल्या ॥१२०॥
दिव्य चक्षु देवोन । आत्मस्वरूपीं केला लीन । जैसें उदकीं विरे लवण । मुरणीं मुरोन तो गेला ॥२१॥
तेथें मीतूंपण जालें वाव । जडअजडीं कैंचा ठाण । भावना तेथें अभाव । भक्त देव हरपले ॥२२॥
आकार ना तेथें विकार । विचार ना कांहीं अविचार । आप ना तेथें पर । धर ना अधर कोण काय ॥२३॥
बिंदु गेला सागरीं । तो मिळाला आनंदलहरीं । कैंची बिंदुत्वाची उरी । जाली परी तैसीच हे ॥२४॥
तैं स्वामी दत्तातें । विनविलें भावें एकनाथें । प्रसादीं पावन कीजे यातें । कृपावंते ये वेळां ॥२५॥
वत्साचें वत्स देखोन । कळवळला तो जनार्दन । स्वामीपदीं विनवोन । सावधान करविला ॥२६॥
साहित्य तात्काळ निर्मिलें । नरहरीकरीं सिद्ध केलें । मग तें पात्रीं विस्तारिलें । भोजना बैसले तिघेही ॥२७॥
मग नरहरीसी बोलती वचनें । आजि तव तपा हें पारणें । प्रसाद धणीवरी घेणें । स्वानंद भोगणें सर्वदा ॥२७॥
तृप्ति जाली तिघांसी । प्रसाद पाववला नरहरीसी । गुप्त जाले न कळतां त्यासी । अद्भुत लीलेसी दावोनी ॥२९॥
असो नरहरि जाला पावन । समाप्त केलें तेथिचें सेवन । जनार्दनपादुका वंदोन । वेगीं प्रतिष्ठान पावला ॥१३०॥
देखोनि सद्गुरु एकनाथासी । प्रेमें नमिलें साष्टांगेंसी । सद्गुरु म्हणती बा धालासी । प्रसाद आलासी घेवोन ॥३१॥
जो जीवींची गुह्य मात । ती सद्गुरुसि सकळ श्रुत । ते पामरें म्यां विदित । कोण अर्थ कराबी ॥३२॥
तूं सद्गुरु समर्थ दयानिधी । माझी तोडिली आधिव्याधी । निरसोनी सकळ उपाधी । सुख स्वानंदीं पावविलें ॥३३॥
तंव सद्गुरु म्हणती आतां । होय तीर्थाटणी भ्रमता । सर्वांभूतीं राखी समता । शरणागता उद्धरीं ॥३४॥
समर्थाची आज्ञा वंदोन । नरहरि चालिले तेथोन । स्वछंदें करिती गमन । नामस्मरण सर्वदा ॥३५॥
या नरहरीचें व्याख्यान । अद्भुत असे निरोपण । तैसेच नाथशिष्य परम पावन । असंख्य जाण असती ॥३६॥
परी सार निरोपण नरहरीचें । संप्रदायार्थ घेतलें साचें । त्यांतहि किंचित वर्णिलें याचें । येथोनि निंबयाचें कीर्तन ॥३७॥
निंबराज गृहस्थ ब्राह्मण । तो या नरहरीस जाला शरण । कीर्तनीं स्वंदी नारायण । अगाध पूर्ण लीला ते ॥३८॥

त्या निरोपणींचा विस्तार । आवरितां नावरे अपार । परी श्रोत्यां निरोपितों सारासार । श्रवणीं सादर परिसावें ॥३९॥
मूळ निंबराजाचें कुळ । नीरानरसीपुर त्याचें वास्तव्यस्थळ। उपनांव दंडवते प्रांजळ। नरसिंह प्रबळ दैवत कुळीं ॥१४०॥
येथील वृत्तिवंत आणि पुजारी । ऋग्वेदी आश्वलायन वसिष्ठगोत्री । त्याचिया वंशांतरीं । गेले बाहेरी उदिमातें ॥४१॥
ते कामकाज करितां । ऐश्वर्य लक्ष्मी पावली भाग्यता । कांहीं पदरीं नसे न्यूनता । वंश वाढता पैं जाला ॥४२॥
वंशीं निपजला भाग्यवान । तेणें देहठाणास येऊन । केली वृत्ति संपादन । ज्योतिषी कुळकर्ण त्रय ग्रामीं ॥४३॥
मग तेथें जाला रहिवास । वृत्ति वहिवटीं सुखसंतोष । त्या वंशीं निंबयास । येणें जन्मास जाइलें ॥४४॥
निंबयाचीं मातापिता । परम सुशीळ पवित्र असतां । परी संततीची वाहती चिंता । जीवीं व्यथा दारुण ॥४५॥
दीपावीण शून्य सदन । कीं बुबुळावीण नयन । कीं नासिकावीण वदन । कीं प्राणावीण कलेवर ॥४६॥
तैसी नसतां संतती । व्यर्थ प्रपंचाची स्थिती । या चितानळें चित्तीं । उभय आहाळती अहोदिन ॥४७॥
विरहदुःख न साहवे मानसीं । उबगोनि गृहस्थ गेला तपासी । एक योजन निश्चयेंसी । स्वग्राम पश्चिमेसी पैं गेला ॥४८॥
सिरूर नामाभिधान । तेथें रामेश्वर शिवलिंग पुरातन । तेथें बैसला निग्रह धरून । जपध्यान शिवाचें ॥४९॥
अनुष्ठानीं शिवा अर्चित । नित्य कटुनिंबातें सेवित । शिव भोळा हृदयीं ध्यात । न वदेचि मात येर वांयां ॥१५०॥
शिवपंचाक्षरी मंत्रासी । जपतां होय अहर्निशीं । द्वादश संवत्सर निश्चयेंसी । अर्चितां सांबासी निजप्रीतीं ॥५१॥
तयाचा भक्तिभाव देखोन । प्रसन्न जाले उमारमण । स्वप्नीं देवोनियां दर्शन । अभय वचन बोलती ॥५२॥
तूं जाय स्वधामासी । तुज पुत्र होईल तेजोराशी । मान्य होईल सर्वांसी । विष्णुभक्तीसी आचरेल ॥५३॥
प्रसन्न होईल रमारमण । जगीं कीर्ती वाढेल गहन । कीर्तीध्वज उभारील पूर्ण । करील उद्धरण बहुतांचें ॥५४॥
महाप्रसादा प्राप्त होईल । धन्यता त्याची मिरवेल । हें जग कीर्ति गातील । हरिगुण गाईल सप्रेमें ॥५५॥
आतां न बैस ये स्थळीं । जाय आश्रमा उतावेळीं । ऐसें सांगोनि चंद्रमौळी । अदृश्य तात्काळीं जालासे ॥५६॥
येरू जाला सावचित । पाहतां कोण्ही न दिसत । म्हणे दर्शन देवोनि स्वप्नांत । कैलासनाथ गेला कीं ॥५७॥
मग शिववचनाची बांधोनि गांठीं । स्वआश्रमा गेला उठाउठीं । कांतेसि हर्ष न माये पोटीं । होतां भेटी पतीची ॥५८॥
रामदर्शनें जनकजेसि उल्हास। कीं नळ पाहतां दमयंतीस। कीं चित्रांगद येतां भेटीस। स्वानंदें मानस सीमंतिनीचें ॥५९॥
तेवीं आल्हाद तिचे अंतरीं। मग वर्तलें सांगे स्वप्नांतरीं। द्विजां भोजनें देवोनि सत्वरीं। तोषविला त्रिपुरारी संतर्पणें ॥१६०॥
असो त्या वरप्रसादें करोनी । पतिव्रता जाली गर्भिणी । दिवसमास येतां भरोनी । प्रसूत मामिनी जाली ते ॥६१॥
सुंदर सगुण जाला कुमर । उभयांसी आनंद थोर । तेरा दिवस केला गजर । सोहळा समग्र यथोक्त ॥६२॥
ठेवावें काय नामाभिधान । पुसतां म्हणती ऐका वचन । अनुष्ठानीं केला निंबसेवन । तें वरप्रदान शिवाचें ॥६३॥
निंब सेविला सतेज । तरी आम्हां आवडीचें हें गुज । नाम ठेवा निंबराज । पुरलें चोज म्हणोनिया ॥६४॥
तेंचि नांव प्रतिष्ठिलें । पाळखीं घालोनि प्रेमें गाइलें । घुगऱ्या साखरपानें वाटिलें । संतोषविलें सर्वांतें ॥६५॥
बाळाचा जाला कुमर । मौंजीबंधन केलें सत्वर । वधु पाहोनि सुंदर । विवाहप्रकार सारिला ॥६६॥

शिवप्रसाद निंबया । शीघ्र विद्या पावली तया । ग्रामलेखकी करोनियां । तोषवी मायवडिलांतें ॥६७॥
प्रारब्धें दोघें वृद्धें निमालीं । कर्में सांगोपांग केलीं । प्रपंचक्रिया उभारिली । आनंदमेळीं पराक्रमें ॥६८॥
प्रपंच करी सावधान । परी कुटुंबा न होय संतान । मग द्वितीय विवाह केला पूर्ण । ब्रह्मस्व करोनि निर्धारें ॥६९॥
गंगाभागीरथी कुटुंबांसी । नामें असती निश्चयेंसी । आनंदें करितां प्रपंचासी । मागती द्रव्यासी सावकार ॥१७०॥
देतां घेतां काचावला । म्हणे काय करावें आतां याला । कांहीं तरी योजना या उपायाला । उद्योग केला पाहिजे ॥७१॥
मग स्वग्राम स्वदेश टाकोन । गुर्जरदेशीं केलें प्रयाण । मार्गीं करीतसे हरिचिंतन । म्हणे कृपाघन होसी तूं ॥७२॥
कोठें लावोनि उद्योगासी । वारीं माझिया तापासी । आनंदें रक्षीं सर्वांसी । हेंचि तुजसी मागतों ॥७३॥
यापरी नित्य करतां चिंतन । पावला गुर्जरप्रांतीं येवोन । तेथें यवनाचें अधिष्ठान । घेतलें दर्शन तयाचें ॥७४॥
हरीस दासाची चिंता । यवन लुब्धला पाहतां । वस्त्रें देवोनि अतौता । जाला सोंपिता कमाविसी ॥७५॥
साह्य होतां मेघश्याम । अंगणींचे वृक्ष होती कल्पद्रुम । खडे ते परीस उत्तम । दासी मनोरम सिद्धी ऐशा ॥७६॥
जें कर्म सानुकूळ । तें हरिकृपाची केवळ । ते निंबया फळली तात्काळ । हारपली तळमळ क्षणार्धें ॥७७॥
हरिकृपें काजवृद्धी । सदा सर्वदा यश बुद्धी । धरिलें काज जावें सिद्धी । कधीं न उपाधी बाधूं शके ॥७८॥
यवनाचा पूर्ण विश्वास । निंबया काम करी निर्दोष । तेणें बहुमान मिळे विशेष । नेमिल्या द्रव्यास मिळतसे ॥७९॥
असो करितां काजकारण । बहुत मिळविलें तेणें धन । गृहीं दिधलें पाठवून । हरिकृपें रिण वारिलें ॥१८०॥
सर्वेंचि आणविलें कुटुंबासी । पावविलें सर्व सुखासी । परी संतती न होय तयांसी । तेणेंचि मानसीं खिन्न होय ॥८१॥
असो कामकाजीं तत्पर । निंबया राखी दरबार । यवनाची कृपा अपार । वाटे प्रियकर सर्वांसी ॥८२॥
आप्तवर्गाचें समाधान । करी देवोनि वस्त्रधन । आल्या पांथिका अर्चोन । देत भोजन सद्यत्नें ॥८३॥
कीर्ति आणि धनसंपत्ती । जाली तयांची पूर्ण प्राप्ति । परी श्रीहरी विचारी चित्तीं । केंवि मत्प्राप्ती साधील हा ॥८४॥
एका अनुतापावांचोन । वैराग्यप्राप्ती नोव्हे जाण । वैराग्यावांचोनि ज्ञान । होईल कोठोन निर्धारें ॥८५॥
प्रथम यातें आहे भक्ती । परी न पावली विरक्ती । तेयोनि पुढें अनुरक्ति । प्रेम्यासी नंतर ॥८६॥
मद्भक्तीसी पाहिजे भाव । तो हा अनुतापाचा ठाव । यातें पाहिजे कांहीं उपाव । योजी रमाधव योजना ॥८७॥
एकाग्र चित्तें करोनी । ती परिसावी श्रोतेजनीं । अद्भुत ईश्वराची करणी । तीतें कोण्ही न जाणती ॥८८॥
जेथें निंबयाचा निवास । भावनगर म्हणती त्यास । तेथें एका कृषीयास । पुत्र सरस दोघे ते ॥८९॥
सांप्रदायरूप निश्चितीं । दोघे बंधू विभक्त राहती । आपुलालीं स्वकर्में करिती । उदरें भरिती स्वकष्टें ॥१९०॥
वडील बंधूची कामिनी । ती महादुष्ट पापखाणी । तिच्या सदा द्वेष मनीं । लावी कचणी दीरातें ॥९१॥
भलतैसें लक्षोनि कारण । कळ काढोनि करी भांडण । दीरजावेसी पिसाळोन । बहु शीण भोगवी ॥९२॥
धाकटे बंधूची उत्तम वृत्ती । कुटुंब केवळ पतिव्रता सती । ते उभयतां कधीं न भांडती । शांत चित्तीं सर्वदा ॥९३॥
निंदा द्वेष नावडे मनीं । सदा शुद्ध अंतःकरणीं । प्रेम ईश्वराचे भजनीं । मिष्ट जनीं भाषण ॥९४॥

थोरल्या बंधूची जे कांता । ते विपरीत सुचवी स्वकांता । पापबुद्धी करवी आक्रांता । मिरवी लोकांतीं झगडा बहु ॥९५॥
मनीं दीर मारावा । स्थळ वित्त विषय हरावा । जाच जावेसी करावा । हाचि वराग्र योग कांहीं ॥९६॥
विपरीत बोध करून । द्वेष बंधूंत आणिला दारुण । वडील न पाहे धाकट्याचें वदन । कैचें भाषण कोठोनी ॥९७॥
ऐसे लोटतां कांहीं दिवस । यात्रा जातसे द्वारावतीस । तो हेतु उपजला धाकट्यास । रणछोडजीस भेटावें ॥९८॥
मग कांतेसी बोले गुह्य मात । पाहूं जातों मी द्वारकानाथ । कांता म्हणे मी निश्चित । येतें सांगात तुमच्या ॥९९॥
येरू म्हणे आज्ञा मानीं । तूं राहें गे रक्षण सदनीं । मी एकलाचि त्वरें जावोनि । द्वारकाधीश नयनीं पाहीन ॥२००॥
तंव प्रार्थीतसे ललना । काय केली खर्चयोजना । पूजावया देवब्राह्मणा । धर्मदाना पाहिजे ॥१॥
येरू म्हणे ऐके सती । पांच मुद्रा सता होन असती । कांहीं उपहार दे निश्चितीं । त्वरित गतीं जाऊं दे ॥२॥
हें रजनींत उभय भाषण । वडील जाऊ करी श्रवण । तिचें आनंदलें मन । साधावया कारण निर्धारें ॥३॥
भ्रतारातें जागविलें । हितगुज तया श्रुत केलें । तुमचे सर्व घात येथोनि टळले । परी टाळिलें पाहिजे ॥४॥
स्त्रीबुद्धीनें जे वर्तती । ते सर्वस्वें नागवती । नाश सर्वथा पावती । सेखीं बुडती आपण ॥५॥
मोहिनीचें ऐकोनि भाषण । जाले जे वचनाधीन । ते घात पावले दारुण । अल्प निवडोन सांगतों ॥६॥
अमृतसेवनीं असुर टकले । राहूचें शीर उडविलें । पहा विरोचनाचें काय जालें । आणि संहारिलें भस्मासुर ॥७॥
भ्रष्टविलें रुक्मांगदासी । वधूं आरंभिलें पुत्रासी । आणि ठकविलें जन्मेजयासी । पावले घातासी स्त्रीबुद्धीं ॥८॥
तेवीं कृपी आपण । स्त्रीबुद्धीं लागला जाण । स्त्री म्हणे सावधान । मम वचन मानावें ॥९॥
क्षणभर मन निष्ठुर करा । दाईज बंधु संहारा । तो जातो प्रभातें द्वारकापुरा । लाग करा सर्वे तुम्ही ॥२१०॥
त्यातें टाका संहारोन । हिरोनि आणा वस्त्र पात्र धन । मग आपुलेंचि धाम दारा पूर्ण । ऐका वचन हें माझें ॥११॥
येणें तुम्हां बहु घात योजिले । ते म्यां सर्व निवारिले । ऐसें नव जाय मातें सोसिलें । साधा ये वेळे काज हें ॥१२॥
ऐसें तया भासवितां । तोही क्रोधावला परम चित्ता । कांतेसि म्हणे न करीं चिंता । साधितों अर्था ऐसेंचि ॥१३॥
इकडे धाकटा उठोन । निघे कांतेसी पुसोन । तंव वडील करीतसे भाषण । सांगा प्रयाण कोणीकडे ॥१४॥
येरू म्हणे जी दादा । जातों द्वारके नमिनों पदा । सांभाळा मागील धंदा । सदनीं मुग्धा एकली ॥१५॥
तंव वडील म्हणे मी येतों । कांतेसि मागिलें सर्व सोंपितों । कांहीं खर्चालागीं घेतों । संगें चालतों तुझिया मी ॥१६॥
मग धाकट्याची वनिता । ऐकोनि दचकली चित्ता । एकांतीं पाचारोनि कांता । चरणीं माथा ठेवित ॥१७॥
स्वामी तुम्हां यात्रे जाणें । नको तरी म्हणावें कोणें । म्हणतां माथां दोष घेणें । परी विपरीत कारणें दिसती ॥१८॥
निंब अंगीं जाला गोड । पावले अर्कास द्राक्षघड । माणिकस्वरूप जाला दगड । फाटकें धड कैसें हें ॥१९॥
क्षारासि पावली मिष्टता । खळासि पावली नम्रता । हें विपरीत भासे चित्ता । याचें अनर्था कारण हें ॥२२०॥
बंधु सवें येऊं म्हणती । विरुद्ध असतां नम्र बोलती । दिसे मज ही घातमती । यदर्थ विनंती स्वामिया ॥२१॥
आलें ओढवोनी प्रारब्ध । न मने वनितेचा तो बोध । म्हणे ईश्वरगामी वेचा वाद । यत्नाभेद न बाधे ॥२२॥

बंधूपासोनि विपरीत । न घडे जालिया प्राणांत । तुझें विकळित होऊं नेदी चित्त । पुण्यपंथ न मोडीं ॥२३॥
यापरी कांतेसि बोधून । उभय बंधू निघाले तेथून । मार्गी करितां गमन । निबिड कानन लागलें ॥२४॥
धाकुटा पुढें चालत । वाचें हरिनामातें स्मरत । वडील मागें जपत । प्राणघात करावया ॥२५॥
तंव निबिड वन गव्हारीं । विशाळ पावली एक दरी । संघही नसे बरोबरी । कपटी हेरी सभोंवतां ॥२६॥
मार्गे पुढें कोण्ही नसतां । जपोनि धांवला अवचितां । यष्टिप्रहार वोपिला माथां । पाडिला खालुता मूर्च्छित ॥२७॥
येरीं घाव घातले निष्ठुर । मस्तक फोडोनि केलें चूर । अंगें भंगिलीं समग्र । केलें शरीर शतचूर्ण ॥२८॥
वस्त्र पात्र धन हरिलें । त्यातें गर्तेमाजीं पुरिलें । अचाट कर्म करोनि आगळें । ज्येष्ठ पळे माघारा ॥२९॥
कांहीं दिवस लोटतां । स्वसदना पावला अवचितां । देखोनि हर्षली त्याची कांता । आणिल्या चिंता वोपिलें ॥२३०॥
इकडे धाकुट्याची कामिनी । चिंता करी दिनरजनीं । तों एकाएकीं नयनीं । भावा आंगणीं पाहिला ॥३१॥
म्हणे भावोजी तुम्हीं केधवां आले । मम स्वामीतें कोठें सोडिलें । काय निमित्त परतले । तें मज वहिलें सांगा जी ॥३२॥
तंव दुष्ट म्हणे ऐक वचन । मार्गी चालतां दोघे जण । यात्रासमुदाय सर्व पूर्ण । नित्य भांडण मज करी ॥३३॥
मुळींच त्याचें माझें विपट । त्यावरी मार्गी करी कटकट । मज न साहावे आला वीट । ऐकती बोभाट यात्राजन ॥३४॥
सांगतां तो नायके कोणाचें । भय नाहीं त्या लौकिकांचें । मग कांचावलें मन आमुचें । न बोलतां वाचें परतलों ॥३५॥
आम्हां न नेतां परतोन । पुढें एकलाचि गेला टाकोन । तो कोणाचें नायके वचन । आलों परतोन यासाठीं ॥३६॥
परिसोनि त्या बोलासी । सती खोंचली परम मानसीं । मग स्नान करोनि वेगेंसी । पूजोनि देवासी प्रार्थिलें ॥३७॥
स्वामीचें कैसें कुशळ । तें मज कळविजे सकळ । भार घालोनि धरिले चरणकमळ । माझी आळ पुरवावी ॥३८॥
न करीं कांहीं अन्नपान । तिष्ठे देवापुढें बैसोन । तंव सरला दिनमान । निरशनें नयन झांकोळले ॥३९॥
निद्रा लागतां नयनीं । कांत पावला येवोनि स्वप्नीं । म्हणे मज ज्येष्ठें मारोनी । सर्व हिरोनी आणिलें ॥२४०॥
निबिड काननीं महादरी । मातें जीवें तेथें मारी । शरीर आडमार्गें तें पुरी । आला माघारी करोनि हें ॥४१॥
ऐसें स्वप्नीं देखतां । घाबरोनि उठे अवचितां । अद्भुत जाली शोक करितां । म्हणे स्वामीनाथा न ऐकिलें ॥४२॥
गुण वाणोनि करी शोक । ऐकतां धांवोनि आले लोक । पुसती तीतें सकळिक । तिनें निःशंक निवेदिलें ॥४३॥
आद्यंत ऐकोनि वर्तमान । जना न वाटे प्रमाण । येरी बोले वाहोनि आण । स्वप्न अप्रमाण नोव्हे माझें ॥४४॥
मी न बोलेंचि असत्य । या चांडाळें केला खरा घात । गडबडां भूमीवरी लोळत । अहा प्राणनाथ म्हणतसे ॥४५॥
कितेक म्हणती बहु दिवस । कलह होता उभयांस । केलें असेल या कर्मास । साक्षी मनास मनचि कीं ॥४६॥
तंव ती गुजगुज फांकली । दिवाणामाजी मात गेली । अहा ही सती गांजली । निवराजा कळली मात तेव्हां ॥४७॥
मग तात्काळ पाठवोनि दूतासी । सभे आणिलें उभयांसी । पृथक जबान्या घेवोनि वेगेंसी । पाहतां मानसीं विस्मित ॥४८॥
म्हणती ऐसें केवीं घडेल । माता बाळातें खाईल । एक म्हणती नोव्हे नवल । हा कळिकाळ विपरीत कीं ॥४९॥
मग सती बोले जी हें प्रमाण । न होतां मी शिक्षा भोगीन । परी पहा पुरता शोध करोन । या व्यवधान न कीजे ॥२५०॥

मग त्या ज्येष्टातें धरिलें । शिक्षितां कधीं न वधूले । मग त्या सदनी झाडे घेतले । वित्त वस्त्र निघालें खुणेसी ॥५१॥
मुद्रा शाबीद निघतां । आश्चर्य वाटलें समस्तां धन्य सतीची योग्यता । स्वप्नवार्ता सत्य हे ॥५२॥
मग सती म्हणे जी मायबापा । मज बालकावरी कीजे कृपा । पति पावले जेथें निक्षेपा । तयासमीप चलावें ॥५३॥
निंबराजा मानली मात । समारंभें निघाले त्वरित । सती मार्गे पदीं चालत । ज्येष्ठ सांगात घेतला ॥५४॥
मार्ग जातां क्रमोन । तव तें निबिड देखिलें कानन । विशाळ दरी देखोन । भयाभीत मन सकळांचें ॥५५॥
मार्गी जेथें मारिला । तो ठाव रक्तें भरला । पुरलें स्थळ विचारिती त्याजला । तंव तो बोला न बोले ॥५६॥
सती स्वामींची सांगे मात । गर्तेत पुरिला प्राणनाथ । आडमार्गे तें स्थळ निश्चित । पाषाण रचित त्यावरी ॥५७॥
मग सव्य अपसव्य शोधितां । स्थळ सांपडलें अवचितां । मग पुनी ज्येष्ठा शिक्षोनि पुसतां । भयें सांगता मग होय ॥५८॥
तें त्या स्थळातें उकरिलें । ईश्वरें अघटित कौतुक दाविलें । मजनिमित्त अवगतीं मेले । ते पावन केलें सत्य म्यां ॥५९॥
हें कळावें सर्वांसी । म्हणोनी मात दावी हृषीकेशी । उकरोनि पाहतां तयासी । चक्रांकित राशी अस्थीच्या ॥२६०॥
मांस रक्त त्वचेचें पाणी । ऐसें देखिलें सकळांनीं । म्हणती धन्य धन्य चक्रपाणी । पतितपावनीं ब्रीद त्याचें ॥६१॥
मग निंबराज जवळी आला । कौतुक विलोकिलें सर्व डोळां । ईश्वरकृपेची अद्भुत लीला । दाविली कळा अनर्घ्य ॥६२॥
म्हणती श्रीहरि दयाळ पूर्ण । हा पतित अनाथ केला पावन । देहातें चक्रांकित करोन । चरणीं पूर्ण ठाव दिला ॥६३॥
चक्रांकित देखोनि डोळां । प्रेम पाझर सुटले सकळां । जयजयकार करोनि तये वेळा । वदनीं गोपाळा स्मरती ॥६४॥
पाहतां नेत्रीं आनंदले । चक्रांकित सकळीं दृष्टिलें । सतीनें वोसंगा घेतलें । प्रीती नमिलें सर्वांसी ॥६५॥
मागुतें सर्वां कर जोडोन । म्हणे आज्ञा द्यावी मजलागोन । कीजे आतां बोळवण । श्रीहरिचरण पाहीन मी ॥६६॥
जेथें गेले प्राणेश्वर । तेथें जाणें हा निर्धार । तुम्ही माझें माहेर । लोभ अपार असों द्या ॥६७॥
आणि एक येतें मागोन । निंबराजा द्या कृपा करोन । प्रारब्धें जें आलें मज घडोन । विन्मुख कोण त्यासी आतां ॥६८॥
परी येतुलें आतां करावें । अपराध सर्व पोटीं घालावे । भावोजीस सोडून द्यावें । यदर्थ न दंडावें कांहीं त्या ॥६९॥
जो आपआपणा जाला मारक । मजसाटीं त्रास न द्यावा निःशंक । त्यासी भोगूं द्या दुःखें सुख । निरसिलें दुःख आमुचें ॥२७०॥ जन्मकर्म दुस्तर । लोभ मोह अनिवार । तेणें त्रिविध ताप पाठीं घोर । जन्म अपार भोगणें ॥७१॥
पाठीं भवभयाची भीती । कर्मे यमजाचणी होती । ते दुःखभोग यातायाती । येणें निश्चितीं वारिल्या ॥७२॥
येणें केला हा परोपकार । आशापाश चुकविला समग्र । अनुताप पावलें मी थोर । आता सर्वेश्वर पाहीन ॥७३॥
माझी निरसिली सर्व चिंता । पाहीन आतां त्या भगवंता । जन्म न घडे आम्हां मागुता । परम लाभता पावलें ॥७४॥
हरी दीनांचा दयाळू । अनन्यांचा कनवाळू । दासजनांचा प्रतिपाळू । करी कृपाळू पावन ॥७५॥
यासाटीं तुम्हां विनंती । कठिण असे भवभीती । यासाटीं अनन्य प्रीतीं । भावें श्रीपती भजावा ॥७६॥
ऐसें सकळां विनवोन । श्रीद्वारावतीस सतीनें केलें गमन । पाहोनि श्रीकृष्णाचे चरण । देह समर्पण केला पदीं ॥७७॥
उदार कृपाळु चक्रपाणी । ठावा दिधला अनन्या चरणीं । ते वार्ता ऐकोनि श्रवणीं । पश्चात्ताप मनीं निंबराज ॥७८॥

लीला देखोनि अद्भुत । हृदयीं जाले सद्गदित । विस्मयो वारंवार करीत । योग आठवीत तयाचा ॥७९॥
म्हणे कोण केली येणें सेवा । काय अर्चिलें वासुदेवा । कोण होता न कळे ठेवा । जाला देवा आवडता ॥२८०॥
कोण केली येणें भक्ती । यात्रे गेला सहज स्थिती । मरण पाहतां अवगती । परी त्या श्रीपती आपंगीत ॥८१॥
जरी सत्य संकल्पें जाईल शरण । भक्तिभावें करील पूजन । सप्रेम आवडीं करील भजन । तरी पूर्ण कृपाधन वोळेल कीं ॥८२॥ धन्य धन्य ते उभयतां । मान्य जाले पहा भगवंता । आम्ही ब्राह्मणकुळीं असतां । कांहीं अच्युता न केलें ॥८३॥
ते असतां यातिवर्णहीन । त्यां हरि त्यां केलें पावन । आम्ही वृथा जन्म घेवोन । भार वाहोन राहिलों ॥८४॥
आशा लोभ मोह भरित । लौलिंगत सर्वदा चित्त । येणें न दिसे कांहीं हित । अवघा विषयार्थ वाढविला ॥८५॥
अनिवार मोहमायेचा पसारा । कल्पविकल्पाचा सबळ भंवरा । विकारविकृतींचा जबर मारा । कैसेनि पारा पावेन ॥८६॥
पुत्र दारा आणि धन । यासाठीं परउपार्जन । त्या लाळुचेंत गुंतलें मन । कैसेनि बंधन सुटेल ॥८७॥
धिग् धिग् आयुष्य गेलें । जन्मोनि नरदेहीं काय केलें । माझें मीपणाचें ओझें वाहिलें । स्वहित उमजलें नाहींच कीं ॥८८॥
व्यर्थ भोगिला प्रपंचशीण । गेलों विषयसंगें मी भ्रमोन । थोर जाली नागवण । नारायण अवतरला ॥८९॥
त्राहें त्राहें गा अनंता । मज येवोनि सोडवीं गा आतां । माझें कर्म पाहतां । होईल जाचिता यम थोर ॥२९०॥
जें होईल गा जाचणी । तें सोडविता मज नाहीं कोणी । निवया म्हणे चक्रपाणी । तारीं येवोनी मज दीना ॥९१॥
नको मज हा संसार । येणें जालोंसे जर्जर । काढीं येथोनि मज सत्वर । दे कृपाकर दयाळा ॥९२॥
प्रपंचा सोडिलें पाणी । तुज आर्पिली दौत लेखणी । न धरीं या कर्मी येथोनि । सत्य सत्य वाणी वदतों हे ॥९३॥
सबळ पश्चात्ताप निवयासी । होतां आला यवनापाशीं । हिसेब देवोनि तयासी । आज्ञा वेगेंसी घेतली ॥९४॥
परिवार ऐश्वर्य धन । घेवोनि निघाला तेथून । वाचे करीत हरिस्मरण । द्वारकापट्टण पावला ॥९५॥
गोमतीसी स्नान केलें । द्वारकाधीशा अर्चिलें । सर्व स्थानें पाहिलें । भावें पूजिलें दैवता ॥९६॥
तैसेंच बेटातें जावोन । घेतलें नायकासह देवदर्शन । मग नारायणसरोवरीं स्नान करोन । नारायण पूजिला ॥९७॥
परत येवोनि द्वारकेसी । न्यात मेळविली चौऱ्यासीं । भोजनें देखोनि तयांसी । मग ध्वजेसी उभारिलें ॥९८॥
षोडशोपचारें पूजोनि सर्वेश्वर । गायनाचे प्रेमें निर्भर । एका पाषाणीं देवासमोर । योजिलें सुंदर उद्धरणा ॥९९॥
येथें यात्रेसी येती अपार जन । साधु संत सिद्ध योगी पूर्ण । त्यांचे प्राप्त व्हावें चरण । रजःकण लागावें ॥३००॥
यास्तव निवराजें काय केलें । नामसुद्रेते लिहिविलें । देवाधिदेवा प्रार्थिलें । हें मज आगळें सुख यावें ॥१॥
संत साधूंचें घडावें सेवन । तुझें भजनीं रमावें मन । द्वेषबुद्धिनिंदेपासून । कीजे रक्षण सर्वज्ञा ॥२॥
मी अनन्यशरण दातारा । मज दीनातें कृपा करा । भक्तिभाव प्रेम दे उदारा । सर्वेश्वरा दीन बंधो ॥३॥
असो निवराज सर्वभावें उदास । अनुताप अंगीं विशेष । करुणा भाकोनि देवास । साष्टांग पदास नमियेलें ॥४॥
जितुकें धन मेळविलें । तितुकें सत्कारणीं वेंचिलें । आज्ञा घेवोनि तये वेळे । त्वरें निघाले तेथोनी ॥५॥
मार्गी करितां गमन । यात्रा केल्या संपूर्ण । गिरनारपर्वता येवोन । पाहिले चरण दत्ताचे ॥६॥

सिद्धपुरीं मातृगया । निघते जाले करोनिया । दैवतें लागती मार्गठायां । अर्चोनि तयां चालती ॥७॥
मग श्रीडांकुरास येवोनि । वंदिले रणछोडजीचे चरण । पश्चिमयात्रा येथें पूर्ण । निंबयाकारण घडलीसे ॥८॥
यात्राजन द्वारके जाती । निंबराज नामीं उभे राहती । जया पाहवया हेत चित्तीं । तेचि शोधिती ते ठायीं ॥९॥
अद्यापि आहे नामाभिधान । निंबराजकरींची नाममुद्रा पूर्ण । बहुत पाहती वाचोन । करिती वंदन भाविक त्या ॥१०॥
तो निंबया कुटुंबेंसी । पावला आपुले, स्वदेशीं । स्वग्राम देठण्यासी । पावला वेगेंसी निजाश्रमा ॥११॥
सदा सर्वदा चित्त । भजननामाजीं असे रत । वाउगी न करी कवणासी मात । जीवीं विरक्त उदासी ॥१२॥
अहर्निशीं छंद मनांत । केव्हां कृपा करील पंढरीनाथ । या लाभा कोण अर्थ । करी चिंतांत तळमळी ॥१३॥
काय करूं जपानुष्ठान । कीं राहूं आहारवर्जोन । कीं पंचाग्नीचें करूं साधन । का धरोनि मौन उगा बैसूं ॥१४॥
कीं सेवूं वनांतर । टांगोनि घेऊं हें शरीर । करूं कोणता प्रकार । सर्वेश्वरभेटीसी ॥१५॥
मी पातकी अधम मलिन । मूढमति मंद अज्ञान । गांठीं नाहीं कांहीं पुण्य । कैसेनि दर्शन देईल तो ॥१६॥
नाना कल्पना करीत । कांहींक स्थिरावलें चित्त । म्हणे हा काळ जातो व्यर्थ । कांहीं अर्थ साधावा ॥१७॥
श्रीभागीरथीच्या कावडी । रामेश्वरा घालीं आवडी । सहज लाभेल यात्राजोडी । जीवीं गोडी उपजली ॥१८॥
पुढील प्रसंगीं निंबाराज । सांगेल वांतेसी मनींचें गुज । आरंभील यात्रेचें काज । पुरेल चोज तयाचें ॥१९॥
संसारप्रपंचा सोडोन । सदा सर्वदा आवडे भजन । आणि ईश्वराचें पूजन । एकांतसेवन प्रीती हे ॥२०॥
ऐसे विरक्त साधुसंत । अनुतापी प्रेमभरित । भक्तिभावें अनुरक्त । हरिनामीं सक्त सर्वदा ॥२१॥
तेचि तारक या जगतीं । प्रगट ईश्वराच्या मूर्ती । पुरवावया दीनांची प्रीती । अवनीं रमती निजछंदें ॥२२॥
ते स्वयें जीवीं उदास । परी पुरविती शरणागताची आस । त्यांची धरावी दृढ कास । भवपाश तुटेल ॥२३॥
म्हणोनिया अनंतसुत । संतचरणीं सदा नत । म्हणवितो त्यांचा अंकित । ते कृपावंत सांभाळिती ॥२४॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ ॥ श्रोते परिसोत भाविक भक्त ॥ सप्तपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२५॥

॥ इति सप्तपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# अध्याय ५८ वा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुदत्तानंताय नमः ॥

नमो सद्गुरु दिगंबरा । प्रकाशरूपा परात्परा । सर्वज्ञा तूं कृपासागरा । निर्विकारा निरंजना ॥१॥ तूं अखिल अभंग सर्वोत्तम । प्रणवरूप तूं आत्माराम । वारिसी दोनांचा भवभ्रम । सकळ श्रम निवारिसी ॥२॥ तुझ्या कृपावलोकनें स्वामी दत्ता । बोलविता होसी गोड कथा । तेणें सुख संतोष समस्तां । श्रोते संतां आनंद ॥३॥ मागिले कथाध्यायअंतीं । अनुताप निंबराजाप्रती । संकल्प दृढ केला चित्तीं । स्कंधीं भागिरथी वाहावी ॥४॥ श्रोतीं परिसावें सावधान । निंबराजचरित्र परम पावन । कृपें तुष्टेल नारायण । अंगीकार पूर्ण करील ॥५॥ एकाग्रें येथें लक्ष द्यावें । श्रवणलाभातें स्वीकारावें । संतपंक्तीस प्रसाद घ्यावें । प्रेम दुणावे आगळें ॥६॥ येथें वसे प्रेमभक्ती । त्याजवळी वसे रमापती । शुद्ध भावार्थ देखोनि चित्तीं । कृपा श्रीपती करी त्या ॥७॥ ती हरिकृपा व्हावी म्हणोन । निंबयानें सोडिलें प्रपंचभान । नामस्मरणीं जाला निमग्न । लागलें ध्यान हरीचें ॥८॥ देउणग्रामीं निवास करितां । अनुतापें उवगला चित्ता । पाचारोनि तेणें उभय कांता । हितगुज सांगता पैं होय ॥९॥ तुम्हां न होय संतान । हा प्रपंच न रुचे मजलागोन । माझें बहु उदासलें मन । आयुष्य गहन न सरेची ॥१०॥ वृथा जातो हा काळ । जीवा लागली तळमळ । मज तों न पावे हरिकृपाळ । जातसे पळ युगापरी ॥११॥ तरी ही व्हावी काळक्रमणा । म्हणोनि जीवीं केली योजना । त्या परिसावें निरोपणा । वागले मना पाहिजे ॥१२॥ मी जातों महायात्रेसी । तुम्ही राहावें स्वस्थ सदनासी । कावडी अर्पीन रामेश्वरासी । हें मानसीं वागतें ॥१३॥ तुम्ही जरी साह्य व्हाल । तरीच मार्ते घडेल । तुम्हांसही पुण्य जोडेल । मान्य कराल आज्ञा जरी ॥१४॥ देखोनि निंबयाची प्रीती । तेव्हां रमणी करी विनंती । आम्हां कां न न्या तुम्ही सांगातीं । राहावें आज्ञापिती हें काय ॥१५॥ निंबया म्हणे तुम्हांलागोन । नेतां पाहिजे बहुतें धन । परिवाराचें असतां व्यवधान । न घडे साधन स्वहिताचें ॥१६॥ यदर्थ माझें आयकिजे । समाधानें आश्रमीं राहिजे । संतोषोनि निरोप देईजे । यश घेइजे येकहेंडे ॥१७॥ जाणोनि स्वामीचें मनोगत । कांता आग्रही न पडत । सुखसंतोषें वाटे लावित । हृदय सद्गदित कांतेचें ॥१८॥ मोह अनिवार दारुण । शोकें व्याकुळ जालें मन । मग निंबराजें केलें शांतवन । कृपें करून आपुल्या ॥१९॥ म्हणे न करा कांहीं चिंता । मी आश्रमा येईन मागुता । निजआश्रमा वेगीं परता । न यावया गुंता आम्हांसी ॥२०॥ असो मुमुहूर्तें निंबराज । निघतां आठविला गरुडध्वज । म्हणे पूर्ण करितां तूं काज । राखीं लाज दीनबंधू ॥२१॥ मार्गीं लागतां आनंदघन । निंबयामुखें करी नामस्मरण । गोपाळ गोविंद राम कृष्ण । वासुदेव मधुसूदन अच्युता ॥२२॥ ऐसीनि नामें वेळोवेळां । भजतां जिव्हेसि लागला चाळा । जागृतीस्वप्नसुषुप्ति केला । भजनमाळा गुंफित ॥२३॥ संत साधु महंत । अनेक जन यात्रे जात । निंबराज समुहीं चालत । परी निःस्पृह विरक्त अंतरीं ॥२४॥ मार्गीं चालतां आचरण । पक्वान्नमागत्याचें सेवन । करोनि करी क्षमाभोजन । काया शिणवोन आपुली ॥२५॥ सत्य शब्द बोलावें । कठोर कोणातें न बोलावें । असत्य निंदें न वदावें । हें व्रतस्थ वर्तें आचरत ॥२६॥

निर्विकल्प सदा अंतर । मनीं सुशील शांत स्थिर । हृदयीं ध्यास निरंतर । निंदा द्वेषपर बुद्धि नसे ॥२७॥
खळनष्टाची न धरी संगती । देहीं न वाहे विकारविकृती । शांति क्षमा दया विरक्ती । नैराश्यवृत्ती सर्वदा ॥२८॥
हीं चारी तपें सुंदर । अंगीं कडकडीत वैराग्यभर । अनुताप देहीं अनिवार । नेमिला वेव्हार स्वदेहीं ॥२९॥
मुखें करावें नामस्मरण । कांहीं स्तोत्रादि पठण । मधुर करावें भाषण । कधीं न दुर्वचन कवणातें ॥३०॥
साधु संत मुनिजनांसी । देवमूर्ती क्षेत्र तीर्थांसी । हरिरूप पाहावें सर्वांसी । एवं नेत्रांसी योजिलें ॥३१॥
हरिगुणकथाकीर्तन । सद्वार्ता पुराणश्रवण । येथें नेमिले असती कर्ण । दुर्गुण दुर्वचन नायके ॥३२॥
साधुसज्जनांची चरणसेवा । दानधर्म अर्चणें देवा । नामघोषीं ताल धरावा । हा योग करवा करानें ॥३३॥
हृदय सांत्वण सर्वांसी । योग्य स्थळ ध्यानासी । आलिंगाया साधुसंतांसी । नेमिली हृदयासी योजना हे ॥३४॥
तीर्थक्षेत्र यात्रा नेमस्त । प्रदक्षिणा संतदेवांसि युक्त । हा नेमिला पदीं क्रम निश्चित । अन्य पंथ त्यक्त तो ॥३५॥
या रीतीं निवराज वागत । महायात्रापंथ क्रमित । तीर्थे क्षेत्र दैवतें अवलोकित । सुस्नात होत स्नानदानें ॥३६॥
देवतार्चन दर्शन भजन । यामाजीं सदा निमग्न । सदा सर्वदा आनंदघन । प्रयाग पावन पाहिला ॥३७॥
त्रिवेणी स्नानानें सारिलें । तीर्थविधी संपूर्ण केले । वटमाधवा निरखिलें । भारद्वाजादि घेतलें दर्शन ॥३८॥
पुढें शिवरात्री पर्वणी । सन्निध आली हें लक्षोनी । जाते जाले आनंदवनीं । उल्हास दर्शनीं अतित्वरा ॥३९॥
अवलोकिली वाराणसी । स्नान करोनी मनकर्णिकेसी । नमोनि अन्नपूर्णा विश्वेश्वरासी । काळभैरवासी पाहिलें ॥४०॥
अंतर्बाह्य यात्रा संपूर्ण । पंचक्रोशी अवलोकन । साक्ष विनायका आळून । केलें अर्चन यथाविधी ॥४१॥
नंतर प्रयाण गयेसी । मधुमास साधावयासी । मार्गीं उल्लंघोनी कर्म नासी । पुन्हा पुन्हेसी पावले ॥४२॥
श्राद्धविधी सारोन । गयेसी केलें गमन । फल्गु पंचतीर्थ न्हावोन । विष्णुदर्शन घेतलें ॥४३॥
अष्टादशपदें अवलोकिलीं । विष्णुपदपूजा प्रेमें केली । मूर्ति गदाधराची पाहिली । तोही अर्चली निजभावें ॥४४॥
रामपर्वत प्रेतपर्वत । वेचाळीस श्राद्धें विख्यात । वटविष्णु आदिकरोनि निश्चित । वंदिलीं समस्त देवतीर्थें ॥४५॥
अठ्ठेचाळिसांची श्राद्ध भरती । करोनिया त्वरित गती । गायत्री सावित्री सरस्वती । त्रिकाळ प्रीतीं वंदिल्या ॥४६॥
ब्रह्मयोनी रुद्रयोनी । सकळ तीर्थें पाहोनी । गयावळांतें तोषवोनी । निघालें तेथोनी पूर्व मार्गे ॥४७॥
झाडखंडीं वैजनाथ । वंदोनि पाहिला जगन्नाथ । तो बंगाल देश विख्यात । जाले प्राप्त ते ठायीं ॥४८॥
करोनि जगन्नाथाचें दर्शन । यथा शक्ति केलें पूजन । महाप्रसाद सेवन । केलें संपूर्ण यात्रेसी ॥४९॥
मग पाहिला गंगासागर । स्नान दान करोनि सत्पर । सहस्र मुखांचा प्रसार । पाहोनि सत्वर परतले ॥५०॥
येतां गौडबंगालदेशीं । पाहिलें कामाक्षादेवीसी । गंडिकेश्वरी येवोनि वेगेंसी । शालिग्रामतीर्थासी विलोकिलें ॥५१॥
पुढें येतां नेपाळेश्वर । परम देश कठिण थोर । देखोनि सुवर्णभद्रविस्तार । शरयूसमोर पावले ॥५२॥
तप अयोध्यापट्टण । श्रीरामाचें घेतलें दर्शन । बजरंगही पाहोनी । केलें अर्चन तये स्थळीं ॥५३॥
शरयू उतरोन । येतां । नैमिषारण्य देखिलें चालतां । पुराण सत्रस्थळ पाहतां । पुन्हा निघते जाहले ॥५४॥

तेथोनि सलग पश्चिमेसी । येतां देखिलें भागीरथीसी । ब्रह्मावर्तक्षेत्रासी । कावडीसी भरियेलें ॥५५॥
दक्षिण दिशेतें रोहोकोन । पंथ क्रमिती अति कठिण । मार्गी यमुना उल्लंघोन । चित्रकूटभुवन पाहिलें ॥५६॥
मग नैऋत्यकोणानें निघाले । शयाद्रीमाजीं संचरले । निबिड कानन पर्वत उल्लंघिले । देश पावले गोंडवण ॥५७॥
तेथें विश्रांतीस पावले श्रीरामसुख । तापससमुदायीं चोख । अंत्राळें तीर्थ अलोलिक । पाहतां हरिख निंबराजा ॥५८॥
चार रात्री तेथें क्रमोन । क्षेत्र तीर्थ पर्वत केला अवलोकन । वाराहतीर्थाचें करोनि वंदन । करिती गमन तळवटा ॥५९॥
तेथोनि सिंहाद्रीसि पाहिलें मातापुर । श्रीरेणुकेसी केला नमस्कार । पाहोनि परशुराममूर्ती मनोहर । तीर्थ प्रियकर वंदिलें ॥६०॥ मग महाकालीतें नमोनी । अत्रिपर्वता गेले वेंघोनी । श्रीदत्तातें प्रणम्य करोनी । दर्शनें मनीं सुखावले ॥६१॥
बोलव्या वचनें श्रीदत्ता । निंबया जाला प्रार्थिता । कृपाघना समर्था । मज अनाथा भेटी दे ॥६२॥
तूं उदारांचा राणा । माझी पुरवी हे वासना । तोपवूं करोनि जरी प्रार्थना । तरी मज दीना बुद्धि कैंची ॥६३॥
यापरी करोनि विनंती । वस्तीस राहिले एक राती । निद्रेंत ध्वनि ऐकती । गुरुवीण प्राप्ती घडेना ॥६४॥
ऐकोनिया सावधान । जाली ध्वनीची आठवण । म्हणे मी कोणासि जाऊं शरण । कोण कृपादान देईल मज ॥६५॥
मनीं उदेली चिंता । मागुतीं प्रार्थिलें श्रीदत्ता । मज भेटूं दे सद्गुरुनाथा । जो परमार्था पाववील ॥६६॥
ऐसी प्रार्थना करोन । आज्ञा घेतली नमोन । पुढें करितां गमन । पावले दर्शन स्वामीचें ॥६७॥
त्या शेषाद्रिवरी चालतां । पुढें देखिलें लक्ष्मीकांता । प्रेमें अर्चोनि व्यंकटनाथा । चरणीं माथा ठेविला ॥६८॥
मनोहर प्रसाद गहन । प्रेमभावें करी आपण । रमापतीची आज्ञा घेवोन । निंबराज गमन करीतसे ॥६९॥
तैलंगण करनाटक । देश उल्लंघोनि देख । तंव द्रावीड पावला सम्यक । तोही आवश्यक ओलांडिला ॥७०॥
पुढें ऋष्यमूकपर्वत विशाळ । पंपासरोवर अतिनिर्मळ । स्नान करोनी उतावेळ । स्फटिकशिळ अवलोकिली ॥७१॥
सर्वेचि किष्किंधा पाहोन । आचार्यमठाचें दरुषण । तेथील प्रसाद घेवोन । पंथा लक्षोन चालिले ॥७२॥
वनोपवनें जातां । उल्लंघिलें महापर्वता । तों दुरोनि अवचितां । सारितानाथा पाहिलें ॥७३॥
अद्भुत तयाची गर्जना । लाटा भेदिती गगना । जळमय दिसे संपूर्ण नयना । पाहतां भ्रमणा मानसीं ॥७४॥
असो मार्ग क्रमोनि जातां । पुढें देखिलें रामनाथा । सागरतीरीं हनुमंता । जाला नमिता निंबराज ॥७५॥
रत्नाकराचें करोनि स्नान । परम प्रेमानंदें करोन । राउळीं प्रवेशले आपण । श्रीगंगार्पण करावया ॥७६॥
कावडी पाहोनि सामोरी । धांवोनि आले पुजारी । ते नेली राउळांतरीं । पूजासामुग्री समवेत ॥७७॥
निंबराज भावार्थी चांग । अभिषेकितां वाढें रामलिंग । गंगा अर्पण होतां सांग । पूजाप्रसंग अर्पिला ॥७८॥
निजभावें अर्चिला रामेश्वर । प्रार्थना केली जोडोनि कर । करोनि प्रदक्षिणा नमस्कार । जयजयकार शिवघोषें ॥७९॥
तीन रात्री तेथें राहोन । नित्य शिवार्चन करी भजन । मग रामसेतु निरखोन । संग्रह करून निघाला ॥८०॥
पंथ क्रमोनि मागुतीं । आपुले निजछंदें आनंदवृत्ती । चालतां जाली हृदयीं स्फूर्ती । कीं सद्गुरुमूर्ती न भेटे ॥८१॥
सिंहाद्रिपर्वतीं दत्तासन । तेथें जागविलें मजलागोन । कीं सद्गुरुसी जाइजे शरण । तो लाभ घडोन न ये कीं ॥८२॥

काय करूं मी उपाय । केधवां लाधतील पाय । त्या कृपेवीण सर्व अपाय । न सुचे उपाय काय करूं ॥८३॥ तळमळ लागली मानसीं । म्हणे हें वर्म पुसूं कवणासी । कोण सद्गुरु भेटवील मजसी । मी त्या पदासी नमीन ॥८४॥ जैसा तृषित तळमळे जीवना । कीं क्षुधार्थी धुंडित अन्ना । कीं दरिद्री तरफडे जेवीं धना । तेवीं मना निंबयाच्या ॥८५॥ रोगिष्ट रोगें कासावीस । वैद्य शोधी परिहारास । कीं याचक शोधी दात्यास । कीं बाळ मातेस शोधी जेंवीं ॥८६॥ तेवीं निंबया शोधीत सद्गुरुनाथा । किव्हळ होतसे बहु चित्ता । स्मरोनि उसास टाकी चालतां । म्हणे धांव आतां गुरुवर्या ॥८७॥ सदा सर्वदा ध्यास मनीं । सद्गद हृदय जळ नयनीं । परम उदास तापला मनीं । म्हणे जन्मोनी व्यर्थ जिणें ॥८८॥ ऐसा सद्गुरुविरहें निंबया । गलित जाली क्षीण काया । म्हणे सद्गुरुवांचोनि मी पशु वांयां । जेंवीं वनठायां संचरतो ॥८९॥ चित्तीं खेद वाहोनि चालत । तंव सिद्ध नदी देखिली अकस्मात । संस्थान तेथें नागनाथ । आदिनाथ सांप्रदायी ॥९०॥ तें क्षेत्र परम पावन । सिद्धनदी तीर्थ गहन । तेथें निंबराज येवोन । सुख स्वस्थान पावला ॥९१॥ तों पूर्वपुण्याचा उदधी । लोटतां पावली लाभसंधी । अकस्मात संतांची मांदी । सिद्धनदी उतरली ॥९२॥ ते नागनाथ संस्थानीं । विन्हाटा उत्तरली जावोनी । त्यामाजीं नरहरि सिद्धमुनी । सकळ जनीं नमियेला ॥९३॥ प्रतिष्ठानवासी एकनाथ । त्याचा शिष्य नरहरि हा विख्यात । जया प्रसन्न होवोनि श्रीदत्त । प्रसाद प्राप्त करविला ॥९४॥ तो करावया जगदोद्धार । स्वच्छंदें रमे अवनीवर । निंबया यावया अभयकर । सिद्धनदीतीर पावला ॥९५॥ सर्वे सांप्रदायी शिष्यजन । सेवेमाजीं सावधान । पूजासमारंभ मांडोन । सद्गुरुसी स्नान घातलें ॥९६॥ नरहरि आसनीं बैसले । संध्यावंदनादि सारिलें । विष्णुपूजेतें आरंभिलें । तें देखिलें निंबराजें ॥९७॥ सहजें निंबया जवळी आला । प्रेमें साधु नरहरी वंदिला । सद्गुरु अवलोकोनि त्याला । शिष्यांसि बोला बोलती ॥९८॥ हा गृहस्थ दिसतो भाविक । यात्रा करूनि आला देख । परी हा मुमुक्षु कामनिक । प्रसादसुख पावूं इच्छी ॥९९॥ याजलागीं नेमस्त । सिद्धटोसी केलें जागृत । तो ध्यास याच्या मनांत । पुरवे अर्थ म्हणोनी ॥१००॥ तें निंबराजें ऐकोनी । चकित जाला आपुले मनीं । म्हणे मी श्रुत न करितां यालागोनी । बोलती वाणी यथार्थ ॥१॥ तस्मात् हे असती ज्ञानी महंत । माझें जाणीतलें मनोगत । दिसती उदार कृपावंत । तरी सद्गुरुनाथ हाच कीं ॥२॥ देखोनि सद्गदित निंबया । अष्टभाव आले दाटोनिया । म्हणे शरण जावें संतराया । करितील दया वाटतें ॥३॥ दुःख व्याधी बाळा जडे । तें दीनमुख पाहे मातेकडे । सांगतां नये उगेंचि रडे । देहीं तरफडे टाहीत ॥४॥ तैसें निंबयाचें अंतर । त्रिविधतापें दुःखभर । अनुतापें कंपित शरीर । सद्गद पाझर नयनासी ॥५॥ बाळभावनेनें जागोन । मातेचें कळवळे मन । उचलू पाही मोहें धांवोन । योगिनी स्तन घाली मुखीं ॥६॥ तेवीं निंबयाची अवस्था । देखोनि उपजली दया सद्गुरुनाथा । म्हणे कायरे अंतर्व्यथा । न करी चिंता धीर धरीं ॥७॥ परिसोनियां अभयवचन । निंबराजें केलें साष्टांगनमन । म्हणे हीन मी अनाथ दीन । आलों शरण स्वामिराया ॥८॥ त्रिविध दुःखी मी उदास । भवभयें भयाभीत मानस । प्रपंची उबगला प्राण । जीवीं कृपाहीन मज ॥९॥ धांव पाव सद्गुरुराया । तारीं तारीं मज सदया । वारीं वारीं या भवभया । धरिले पायां न सोडी ॥११०॥

ऐसें निंबया करुणावचन । ऐकतां द्रवलें कृपाघन । म्हणे उठीं उठीं करितों पावन । करोनि स्नान ये वेगीं ॥११॥
सर्वोचि इतरां आज्ञापिती । हे गृहस्थ पांथस्थ असती । तुम्हीं सिद्धता करावी सर्वार्थी । न्यून निश्चित न पडावें ॥१२॥
याचा अनुताप हाचि सुदिन । प्रेमोद्भव लाभवेळा पूर्ण । उल्हास अभिजित हा जाण । करूं पावन शरणागता ॥१३॥
अष्टभावें हा भरित । हेंचि याचें सिद्ध साहित्य । भक्तिभावें हा पुनीत । पुरवूं अर्थ तयाचें ॥१४॥
मग निंबराजा पुसती । नाम वर्ण निश्चितीं । कोण स्थान काय वृत्ती । आश्रमीं असती कोण सांगा ॥१५॥
तंव मुमुक्षू जोडोनि पाणी । निरोपिता जाला सद्गुरुचरणीं । निंबया उक्त नामाभिधानीं । शुद्ध वर्णी द्विजयाती ॥१६॥
ऋग्वेद आश्वलायनशाखा । देठणीं निवास गृहस्थ देखा । ग्रामलेखकी वृत्ति पोषका । प्रपंचसुखा द्वय कांता ॥१७॥
पुढें न दिसे कुळदीपक । याचें मज न वाटे दुःख । प्राप्तकाळा मानोनि सुख । केलें सकळीक श्रुत पदीं ॥१८॥
प्रपंच केला बरवे रीतीं । परकृतें पश्चाताप चित्तीं । सद्व्ययीं वेंचिली संपत्ति । निःस्पृह वृत्ति वावरे ॥१९॥
प्रपंचीं उपजला त्रास । जीव सर्वदा उदास । येकदाच उरली आस । भवभयपाश तुटावा ॥१२०॥
अघोर जन्मकर्म यातायाती । याचें दुःख भोगूं किती । विकार जाची विकृती । भोग भोगविती दुर्धर ॥२१॥
लोभ मोह अनिवार । कल्प विकल्पें बुडविलें घर । न सुचे मज कांहीं विचार । भवपार व्हावया ॥२२॥
रात्रंदिवस जीवीं तळमळ । त्रितापाचे न साहती उमाळ । जाळीत होता चितानळ । तंव हें चरणकमळ पाहिलें ॥२३॥
निरखितां जाला उल्हास । वाटे पुरेल माझी आस । म्हणोनि शरण जालों पदास । पावन दीनास करावें ॥२४॥
तंव सद्गुरु म्हणती कळलें बीज । पुरवूं कामना तुझी आज । मग परम हर्षे निंबराज । सद्गुरुसमाज नमियेला ॥२५॥
मग सिद्धतीर्थी करोनि स्नान । वेगीं केलें तिलकधारण । नागनाथीं करी आगमन । सद्गुरुसी शरण व्हावया ॥२६॥
स्वामी आज्ञान्वयें प्रीतीं । दास सिद्धता वेगीं करिती । नरहरि समर्थ आसनीं वैसती । प्रणम्य करिती निंबराज ॥२७॥
मंत्रघोष करिती द्विज । निंबया पूजी पादांबुज । चंदन चर्चोनि सतेज । बुका अर्गज लल्हाटांगा ॥२८॥
कंठीं सुदले सुमनहार । धूप दीप उजळिले सुंदर । नैवेद्याचे प्रकार । निवेदी प्रियकर गुरुनाथा ॥२९॥
करमुखशुद्धी करविली । तांबूल दक्षिणा अर्पिली । निरांजनें ओंवाळिलीं । मावें पुष्पांजळी अर्पित ॥१३०॥
भूषणें वस्त्र पितांबर । भक्तिभावार्थे उपचार । पूर्वार्चन सविस्तर । श्रीफळ पदावर अर्पीत ॥३१॥
सारोनिया प्रदक्षिणा । साष्टांग घेलें नमना । पुरे व्हावया कामना । अष्ट भाव मनां दाटले ॥३२॥
प्रेमें रोमांचित होत अंग । देखोनि काढिले विणे टाळमृदंग । गाती करुणेचे प्रसंग । पदभृंग निंबया डुले ॥३३॥
तें सद्गुरु जाले संतुष्टमान । निकट वैसऊनि तया दिधला मान । पळवी क्षांतितां लवची मान । आरणांसमान करूं पाहे ॥३४॥
मग षडक्षरी बीजमंत्र । निंबयासी दिधला पवित्र । तेणें तृप्त केले त्याचे श्रोत्र । धन्य सत्पात्र सद्गुरु ॥३५॥
म्हणे न पावे भवभयासी । नमितां दिधलें अभयासी । या जपध्यासें निश्चयेसी । भेटेल अविनाशी श्रीदत्त ॥३६॥
अद्भुत लाभा पावसील । सर्व मनोरथ पूर्ण होतील । ईश्वरपरें कीर्ती वाढेल । अनुभवें येईल कळोनी ॥३७॥
परी निष्ठा कधीं न सांडावी । सत्पर्थी काया दंडावी । वळ कुबुद्धी गंडावी । आणि विभांडावी कुमती ॥३८॥

शुद्ध मति राखावें शुद्ध अंतर । हरिभजनीं न पडावें अंतर । मिथ्या वचन वार्ता न बोलावी इतर । प्रेम उत्तरोत्तर वाढवावें ॥३९॥ सत्संगातेंचि धरावें । सत्पंथें सदा फिरावें । कथापुराणीं सुरावें । पूजन करावें विष्णूचें ॥१४०॥ परलोकपंथा जीवीं नसावी । शांति क्षमा दया वसावी । वाणी सुशब्दीं विलसावी । भजनीं असावी मति स्थिर ॥४१॥ भूतमात्रीं जगदीश्वर । जाणोनि करावा प्रणाम आदर । शोधीत जावें सारासार । येणें सर्वेश्वर तुष्टेल ॥४२॥ यापरी निंबयातें बोधोनें । सद्गुरु नरहरीनें केला पावन । मग सांप्रदाय निरोपण । केलें पूर्ण निजकृपें ॥४३॥ नंतर उत्तरपूजा सारिली । श्रीगुरुशिष्यासी पूजी ते केली । तीर्थप्रसाद दे करकमळीं । लाभ तत्काळीं स्वीकारिला ॥४४॥ आरती उजळोनि त्वरित गतीं । सद्गुरु ओंवाळिला श्रीपती । करोनिया अर्चन समाप्ती । बैसले पंगतीं भोजना ॥४५॥ सपात्र प्रसाद सद्गुरुनाथ । देवोनि निंबया केला तृप्त । भोजनें सरतां त्वरित । आचमनें करिति सर्वही ॥४६॥ मुखशुद्धीसी तुळसीदळ । सर्वेंचि अर्पिले तांबूल । वामकुक्षीसी जातां दयाळ । निंबया चरणकमळ चुरीतसे ॥४७॥ जागृत जालियां पुराणश्रवण । अस्तमानीं संध्यावंदन । धूप दीप नैवेद्य आरती करोन । मांडिलें हरिकीर्तन सप्रेमें ॥४८॥ क्षेत्रज्ञ लोक मिळाले । कीर्तनश्रवणें सुखावले । संपतां हरीतें ओंवाळिलें । सेजे पहुडविलें देवराया ॥४९॥ मग श्रवर्णेचि जालें निद्रिस्त । निंबया सेवा जाणवीत । सुखानंदें निद्रा सारित । होतां प्रभात उठले ॥१५०॥ प्रभातीं गावोनि नामस्मरण । करोनि उठविला नारायण । काकडआरती उजळोन । प्रेमें करोन ओंवाळिला ॥५१॥ करमुखचरण प्रक्षाळिले । पंचोपचार अर्पिले । बाळभोग देवा समर्पिले । सद्भावें वंदिलें पदांबुजा ॥५२॥ त्रिकाळ आर्चिती देवराणा । पुराण भजन नित्य कीर्तना । भक्तिभाव बोधिती जना । सेवा मधुसूदना जागविती ॥५३॥ हा नित्य नेम यथोक्त । पाहोनि निंबया हर्षभरित । सर्व रहणी ठसली मनांत । सेवा करीत सानंदें ॥५४॥ एक मास तेथें राहिले । जग तेथींचें बोधिलें । भाविक भजनीं रंगले । सांप्रदायी जाले बहु जन ॥५५॥ मग निंबयासी म्हणती सद्गुरुनाथ । बहु दिवस जाले तुम्हां यात्रेंत । घरीं कुटुंबें दीनवत । असतील पाहात वाट कीं ॥५६॥ तुमचें उदास सर्वदा मन । न होय मागील आठवण । त्यांतें प्रतिपाळील कोण । पाहें भुवन जाय आतां ॥५७॥ परिसोनि सद्गुरुच्या बोला । सद्गद हृदयीं निंबया जाला । नमोनि प्रार्थी सद्गुरुला । करकमळ्य जोडोनी ॥५८॥ जी मी त्रिविधतापें तापलों । विकारविकल्पीनें नागवलों । लोभमोहपाशीं गुंतलों । भवभया भ्यालों दयाळा ॥५९॥ तंव तूं भेटलासि कृपाघन । भयें तुम्हां जालों मी शरण । माझा विनतभाव पाहोन । समर्थें अभयदान दीधलें ॥१६०॥ केला अनन्याचा अंगीकार । स्वरूपें मुक्त केलें साचार । निर्भयार्थ बोधिला अभयकर । तोषविलें अंतर निजबोधें ॥६१॥ समर्थें स्थूळ भय वारिलें । मज दीनां अंगीकारिलें । मुक्त करोनि सुख ओपिलें । सानंदें रंगलें मन सेवें ॥६२॥ ऐसें असतां कृपानिधी । मागुती आज्ञापितां उपाधी । मज नसो ती व्याधी । सेवेसी पदीं ठेवा मज ॥६३॥ कोण अपराध पाहिला । म्हणोनि लोटितां या दीनाला । मी निष्ठेनें सदां स्वामिसेवेला । नाणोनि परंतत्व न मागें दडी ॥६४॥ नियमानें केलें गमन । कीं घोरपाशोनि सोडविलें । सर्वेचि व्याघ्रजाळीं मोकलिलें । मरण आलें साच कीं ॥६५॥ बुडतां तारिलें पुरांतोनी । मग पडणी दिवशा लोटोनी । एवं हे दिसे करणी । तरी पापें मरणी साथ कीं ॥६६॥

वांचेलें गृह पडतां । पुढें आगींत जाला लोटिता । काय म्हणावें या अनर्था । त्राताचि घांता पावनी ॥६७॥
तेंचि भासलें निश्चयासी । म्हणोनि प्रार्थिलें सद्गुरुसी । न मोकला मज अनाथासी । धरिले चरणांसी सोडिना ॥६८॥
सद्गुरु म्हणती अर्भका । कैंचा वाहसी मनीं धोका । शिरीं समर्थाचा अभयशिक्का । ब्रह्मादिकां वंद्य तो ॥६९॥
नोव्हे नोव्हे ही अधर्मनीती । सांगूं ते तुज उत्तम रीती । दारा कलत्र त्यागितां निश्चितीं । अधर्मगती ते होय ॥१७०॥
गृहस्थाश्रम तो धन्य थोर । येथें सत्कर्मी घडती अपार । आल्या अतिथ्यपूजा सत्कार । सहजें निर्धार घडतसे ॥७१॥
सुखें करावें तें आचरण । परी सत्कर्मी असावें सावधान । असक्त असावें वर्तोन । नलिनीजीवन पत्र जैसें ॥७२॥
सारासार विचार देहीं । असतां अणुमात्र भय नाहीं । कांसे भोपळा सदृढ पाहीं । मग तो डोहीं बुडेना ॥७३॥
काळचक्र हें फिरतें । त्यामाजीं हें वय जातें । जीवकण पडे मुखातें । पिष्ट होतें स्वकर्मे ॥७४॥
परी जे खुंटा धरोनि राहिले । ते दळणातोनि वांचले । वर्म पाहिजे ध्यानीं आणिलें । विचारबळें निबया ॥७५॥
न विसंबावे सर्वोत्तमाचे पाय । मग अपाय ते होती उपाय । वाहूं नको वृथा भय । निरोपिली सोय जीवीं धरीं ॥७६॥
वर्तावें सांप्रदायरहणीं । लीन व्हावें संतचरणीं । लेसील बहु प्रसादलेणीं । तुझिया आचरणीं तूंचि की ॥७७॥
पूर्ण अभय सद्गुरुवचन । निवराजें हृदयीं सांठवोन । साष्टांग करोनिया नमन । आज्ञा वंदोन निघाला ॥७८॥
दत्तजनार्दन एकनाथ । सद्गुरु नरहरि वाचें स्मरत । सवेगें क्रमितां पंथ । आनंदयुक्त मानसीं ॥७९॥
जेथें भेटती संतजन । त्यांतें सप्रेमें करी वंदन । तीर्थ दैवतें क्षेत्रें पाहोन । पावला येवोन स्वधामा ॥१८०॥
घरीं कांता चिंतातुर । म्हणती जी गेलिया दिवस फार । अझोनी न येती प्राणेश्वर । कोण विचार करावा ॥८१॥
आल्या गेल्या पुसती मात । नवस बोलोनि धरिती व्रत । तुळसीसेवा आचरत । यावा प्राणनाथ म्हणोनी ॥८२॥
प्रपंचीं सर्वदा उदास । आहार शयनीं उपजे त्रास । सदा सचिंत मानस । दिवारजनीं ध्यास पतीचा ॥८३॥
शोकें जीवीं आइळती । चात कापरी वाट पाहती । प्रश्न ज्योतिषां विचारिती । शकुन पुसती ठायीं ठायीं ॥८४॥
जैसा भानुपूर्वी अरुण । अरुणापूर्वी उषःकाल जाण । पूर्वे दिसे शुभ्रमान । आरक्तवर्ण त्यामागें ॥८५॥
सहजें जागृती सर्वांस । आनंद हो लागे जीवास । आपुलाले स्वकर्मास । लागती आळस न धरिती ॥८६॥
तें निधयाचें आगमन । त्यांपूर्वी जाणवती शुभ शकुन । स्वयें वेळोवेळां वाम नयन । बाहुस्फुरण उभयांतें ॥८७॥
गंगा आणि भागिरथी । येरयेरीं तें गुज बोलती । बाई आजी वामनेत्र लवती । येरी म्हणे स्फुरती बाहु माझे ॥८८॥
तंव समोवती अनेक ललना । त्यांही शुभ बोलती वचना । त्वरें पावाल पतिदर्शना । उल्हास मना परिसोनी ॥८९॥
काग द्वारीं येवोनि बोलती । येरी त्यातें शकुन पुसती । घरा त्वरें येईल प्राणपती । तरी उठोनि निश्चितीं जाइजे ॥१९०॥
निद्रेंत देखती स्वप्न । सौभाग्यदेव्यप्रसाद अर्पण । करोनि आशीर्वादी ब्राह्मण । लाभ संनिधान सांगे ॥९१॥
पाहतां प्रभातें सावध होती । गुजगुज प्रेमें सांगती । म्हणे केधवा पावेल लक्ष्मीपती । शुभ तों जाणवती शकुन हें ॥९२॥
असो सर्वदा हेंचि ध्यानीं । बोलती गुज आपुले सदनीं । तो एकाएकीं अंगणीं । शुभ वाणी विप्र बोले ॥९३॥
म्हणे बाई सन्ध वैसलेती । तुमचे आले प्राणपती । गांवाबाहेर विश्रांती । उतरले निश्चितीं येवोनी ॥९४॥

आला ऐकोनि रामराजा । हर्षली अयोध्येची प्रजा । उल्हास मानी विशेष भाजा । सकळ समाजा आनंद ॥९५॥
तेव्हां ऐकतांची मात । उभय जाल्या हर्षभरित । ग्रामवासी लोक समस्त । सन्माना जात सामोरे ॥९६॥
आनंदघोषें करोन । भेटले निंबयांसी सकळ जन । सुवेळीं आश्रमासी यावोन । घडलें आलिंगन सकळांसी ॥९७॥
परमानंदसोहोळा । दर्शन जालें नरनारीवाळा । प्रेमाश्रु वाहती डोळां । भक्त प्रेमळ भाविकांचिया ॥९८॥
मग सुमुहूर्ते गंगापूजन । मावंद्याचें दिधलें भोजन । भेटूं आले आप्त वर्ग सोयरे जन । देती सन्मान निंबयासी ॥९९॥
पुसोनि निंबराजाप्रती । सर्व आपुले आश्रमा जाती । मग गुज गुह्य ऐकांतीं । निंबराज वनितेसी निरोपी ॥२००॥
पुसतां यात्राक्रम आद्यंत । सारासार केला श्रुत । सुखसमाधानें वार्ता बोलत । जाले निद्रेंत निमग्न ॥१॥
प्रपंचविधी आचरतां । विनय होती साधुसंतां । सद्भावें हरीतें होय भजता । बोधिली नेमता चालवी ॥२॥
चित्तीं सर्वदा आनंदघन । प्रपंचीं निःस्पृह उदासीन । तों हरिकृपें करोन । जाली गर्भीण भागीरथी ॥३॥
दिवसमासें गर्भ वाढला । जेवीं अंबुधरासी कळा । पूर्णतेसी गर्भ आला । प्रसूतिवेळा पावली ॥४॥
पुत्ररत्न जालें जनन । उल्हासलें दोघींचें मन । म्हणती कृपें द्रवला नारायण । सफलित पूर्ण केलें आम्हां ॥५॥
शिवयात्रेचा हा प्रसाद । म्हणोनि निंबयासी आनंद । म्हणे फेडिला सर्वेश्वरें विटाळवाद । निरसिला खेद अंतरींचा ॥६॥
वृद्धि दहा दिवसपर्यंत । अकराव्यासी शुद्ध होत । बारावें बारसें नेमस्त । तेराव्या प्राप्त नामकर्म ॥७॥
ग्रामवासी ज्या नारी । पाचारिल्या अतिसत्वरीं । पालख लावोनी गजरीं । सर्वांतरीं उल्हास ॥८॥
निंबराजा पुसती नितंबिनी । काय नाम ठेवावें यालागोनी । प्रिय असेल तें सांगा निवडोनी । प्रेमें करोनी गाऊं तें ॥९॥
निंबराज विचारी मानसीं । शिवप्रसाद हा निश्चयेंसी । येतां यात्रेहोनी पावलों फळासीं । दया रामेश्वरासी उपजली
॥२१०॥ उभय नामीं ऐकचि प्रेम । प्रसाद पावलों उत्तम । तरी आतां हाचि नेम । म्हणे शिवराम नाम ठेवा ॥११॥
मग शिवराम नामें गजर । करोनि वनिता गाती हाल्लुर । सौभाग्यवाणें वांटिलीं समग्र । आनंद थोर जाहला ॥१२॥
घुगऱ्या वांटिल्या साखरपानें । सुहासिनी बोळविल्या मानें । द्विज तोषविले दक्षिणें । आशीर्वचनें दिधली ॥१३॥
बाळाचें लालनपालन । उभयही करिती आवडी करून । परी निंबया भजनीं निमग्न । उदास मन प्रपंचीं ॥१४॥
एके दिवसीं एकांतीं । सांगे गुज कांतेप्रती । उत्तरयात्रे जावें निश्चितीं । उदेली चित्तीं आवडी ॥१५॥
तरी निरोप दीजे आम्हांसी । यात्रा करोनि येऊं आश्रमासी । दुश्चित्त न व्हा तुम्ही मानसीं । पुण्य कर्मासी साह्य व्हावें
॥१६॥ तंव त्या दोघी पतिव्रता । साह्य होती पुण्यव्रता । न वदती कांहीं तीव्रता । कधीं न आवृत्ता घालविती ॥१७॥
तंव त्या म्हणती स्वामिराया । हेतु उपजला यात्रा कराया । कोण करील अंतराया । त्वरें घरा या परतोनी ॥१८॥
तुम्हां येण्यासी मास अकरा । सर्वेचि जाण्याची त्वरा करा । परी विनंती कृपा करा । या लेंकरा न विसंबावें ॥१९॥
तुळंवूं आम्ही आपुल्या वचनासी । परी न करा प्रवंचनासी । हास्य न दावा जनासी । हें गुह्य मनासी यागविजे ॥२२०॥
ऐकोनि ललनेचें वचन । निंबया करी हास्यवदन । म्हणे मी स्वस्थ राखीं शिवरामीं मन । येईन परतोन आश्रमा ॥२१॥
करोनि शीघ्र सिद्धता । वचनें आनंदविल्या कांता । बाळका चुंबोनी दावी प्रेमता । सद्गद वनिता जाहल्या ॥२२॥

राय नट सोंग आणित । संपादनीं तैशीच दावित । जनाकारणें रिझवीत । परी आपण त्यांत नव्हेची ॥२३॥ तैसा निंबया संसारीं । भाव दावीत वेव्हारीं । स्वयें विरक्त अंतरीं । तें न बाहेरी प्रगटूं दे ॥२४॥ निंबया निघतां तेथोन । सर्वे बोळविनी ग्रामिक जन । तोषवोनि दिधले परतोन । निरामय आपण पंथ धरी ॥२५॥ जैसा सांपळ्यांतोनो व्याघ्र सुटला । कीं पिंजऱ्यांतुनी शुक पळाला । कीं बंदिखान्यांतोनी बंदी सोडिला । हर्ष त्याला न समाये ॥२६॥ तेवीं निंबराया सुटतां सदन । चित्तीं जाला आनंदघन । परम उल्हासें करी भजन । पंथ लक्षोन जातसे ॥२७॥ जातां पाहिला त्र्यंबकेश्वर । गंगाउगम औदुंबर । कनकळें पाहोनि सुंदर । वंदिलें थोर सप्रेमें ॥२८॥ पुढें चक्रतीर्थातें वंदोन । कुशावर्ती केलें स्नान । पुढें प्रगट गोदा पावन । संध्यावंदन सारिलें ॥२९॥ त्रिगुणात्मक त्र्यंबकराज । अर्चिला सद्भावें सतेज । क्षेत्र अवलोकिलें सहज । नमिला समाज विप्रांचा ॥३०॥ शूर्पनखेचें विटंबन । तें पाहिलें नासिकस्थान । पंचवटी रामदर्शन । योगी संतजन वंदिलें ॥३१॥ पुण्यस्तंभीं चांगदेव । जातां पाहिला केशव । पुढें लक्षिला ठाव । जें अपूर्व प्रतिष्ठान ॥३२॥ तेथें सद्गुरु एकनाथ । त्या पदीं निंबया शरणागत । डोलेश्वर विश्वनाथ । गाडेश्वर वंदित तीर्थस्तंभा ॥३३॥ तेथोनि देवगिरीसी गमन । पर्वतीं नमिलें जनार्दन । तेथोन एक योजन । वेरूळ वन सुक्षेत्र ॥३४॥ तेथें घ्रीष्मेश्वरातें पूजिलें । लेणें सर्व अवलोकिलें । स्थळ पाहतां मन आनंदलें । तपा चांगलें तापसां ॥३५॥ पुढील वेध निंबयासी । पर्वत ओलांडी काननासी । ऐसें क्रमिता । पंथासी । पावले तप्तीसी शीघ्र तेव्हां ॥३६॥ तें चांगयाचें मूळ स्थान । व्रटेश्वराचें केलें पूजन । निबिड कांतार सारोन । पर्वत गहन उल्लंघिले ॥३७॥ जातां अश्वत्थाम्याचें स्थळ । ते वापी पाहिली अचळ । शयाद्री ओलांडोनि सकळ । नर्मदाजळ विलोकिलें ॥३८॥ महा ज्योतिर्लिंग ममलेश्वर । पुजोनि पाहिलें क्षेत्र ओंकार । तेथें राहोनि तीन रात्र । प्रदक्षिणा सत्वर सारिली ॥३९॥ मग वांकुडें जावोन । पाहिलें सहस्रार्जुनाचें स्थान । राजेश्वराचें करोनि पूजन । रेवासंगम ते ठायीं ॥२४०॥ न करोनि तेथें बहुवास । पुढील गमनीं आवेश । इंदूपुर उल्लंघोनि तैं क्षिप्रेस । पाहतां मानस संतोषलें ॥४१॥ तीरीं महापुण्य पवित्र । नामें सुंदर अवंतीक्षेत्र । तेथें वसे त्रिनेत्र । महांकाळेश्वर म्हणती त्या ॥४२॥ तें महासिद्ध योग्यांचें स्थान । तपी तपती तपाचरण । निंबया करी अवलोकन । पूजन दर्शन करीतसे ॥४३॥ येथें जरी करूं वर्णन । तरी मागें केलें असे निरोपण । यदर्थ विस्तार न केला जाण । श्रोतीं कोपमान न व्हावें ॥४४॥ अवंतीयात्रा करोनी । निंबराज निघाले तेथोनी । उत्तरपंथातें लक्षोनी । पुष्करस्थानीं पावले ॥४५॥ ब्रह्म रुद्र विष्णु पुष्कर । स्नान केल अतिसत्वर । जवळी विलोकिलें नाथद्वार । क्षेत्र अजमेर लक्षिलें ॥४६॥ पंथ क्रमोनि वेगेंसी । वेगीं पावले हरिद्वारासी । तेथें वर्फवृष्टि दिवानिशीं । पार शीतासी असेना ॥४७॥ त्या हिमाचलीं करितां गमन । पाहिला दृष्टीं नारायण । पूजा नैवेद्य करोन । पंथ कठीण चालती ॥४८॥ पुढें जातां गंगाद्वारीं । पिंड अर्पिला कपारीं । शिंक्यांत बैसोनि पैलपारीं । जावोनि केदारीं पावले ॥४९॥ तेथील क्रम संपादोन । स्वर्गद्वारा केलें गमन । करूं जातां वंदन । किंचित चरण घसरला ॥२५०॥

तों वर्फस्पर्श होतां पदीं । निर्जीवतेची पावली व्याधी । येथेंचि देहाची समाधी । ऐसें बुद्धी जाणवलें ॥५१॥
तें कळा करोनि सहन । युक्तिप्रयुक्ती पंथ क्रमोन । क्षेत्रीं पावले परतोन । योजिलें शमन योजकीं ॥५२॥
असो हरिकृपें पावतां समाधान । निंबराज निघाले तेथून । गंगोत्रींची कावडी भरोन । पंथ क्रमोन चालती ॥५३॥
हृदयीं ध्याती गोपाळा । मुखीं नामघोषाचा चाळा । प्रभातें चालतां एक वेळां । यात्रामेळा चुकले ॥५४॥
नाटळेचि कोण्ही पंथीं । भलमार्गे एकले जाती । घोर काननें निबिड दिसती । श्वापदें फिरती चहूंकडे ॥५५॥
देखोनि दचकलें मन । म्हणे हें अघोर दिसे कानन । तारिता येथें नारायण । दिसतें कठिण अजी हें ॥५६॥
येथें आम्हां सांभाळिता । एक ईश्वराचि असे त्राता । येर उपाय न दिसे पाहतां । तों देखिल्या अविचितां वनगाई ॥५७॥
देखोनि भयाभीत जालें मन । तंव प्रेमें आठविला जगन्मोहन । तो बुद्धिदाता बुद्धि संचरोन । रक्षणीं कारण आठवले ॥५८॥
कावडीसी बांधोनि दोर । आपण चढले वृक्षावर । कावडी ओढोनि अधर । बांधी सत्वर वृक्षीं ते ॥५९॥
तें निरखोनि गाई धांवती । वृक्षालागीं धडका देती । निंबराजें आठविला श्रीपती । ये यदुपती म्हणोनी ॥२६०॥
स्तवितां जाला अस्तमान । गाई न हालती तेथून । संकट देखोनि जगजीवन । मात्र दारुण प्रगट करी ॥६१॥
काननीं गर्जना करिति । हरी पावले अकस्मात । निंबराजा भय द्विगुण होत । परी तो भयकृत भयनाशन ॥६२॥
पावतां व्याघ्राचें उड्डाण । गाई पळाल्या तेथून । पुच्छें पृष्ठीं वाहोन । पूर्वस्थान पावल्या ॥६३॥
व्याघ्र तयां पाठीं गेल । रजनींत निंबराज वृक्षीं राहिले । तारकनाम जीवीं धरिलें । तें रक्षिलें नरहरीनें ॥६४॥
तों होतांचि प्रभात । कावडी उतरोनि स्कंधीं घेत । हृदयीं स्मरोनि सद्गुरुनाथ । त्वरें पंथ उरकती ॥६५॥
भलतैशा वनीं वाटा । त्याही गेल्या अफाटा । त्याही मार्जी खडाकांटा । नाहीं तोटा तयांसी ॥६६॥
रीस वानरें श्वापदें अपार । अव्हासव्हा जाती भयंकर । जीवभीनी परम दुर्धर । कंप थर्थर सुटतसे ॥६७॥
परी निंबयाचा निर्धार नामीं । मुखीं भजनपंथ क्रमीं । देहाची देहीं साहे ऊर्मी । होन श्रमी चालतां ॥६८॥
अन्नउदकाविण । कासावीस होती प्राण । परी न विसंबे हरिभजन । आठवी चरण सद्गुरुचे ॥६९॥
तंव आणीक विन ओढवलें । उन्मत्त करी येतां पाहिले । ते वनीं फिरतां मोकळे । भयाभीत जालें मन फार ॥२७०॥
म्हणे देवा कृपामूर्ती । आतां करूं कवण रीती । द्वय भयें वांचविलें निश्चितीं । आतां कमळापती काय करूं ॥७१॥
अंगावरी घालितां करी । प्रल्हाद रक्षिला तुवां हरी । तोचि मातें ही जाली परी । धांव कंसारी केशवा ॥७२॥
मुल्हारदासाचा करावया भंग । यवनें लोटिला मातंग । तेथें तूं रक्षिसी श्रीरंग । तो मज प्रसंग धांव वेगीं ॥७३॥
मातला होता गजासुर । तेणें देव केले जर्जर । तैं स्तवितांचि तूं सर्वेश्वर । केला संहार शिवदत्तें ॥७४॥
आतां मातें निर्वाण । पाहे पां पडलें तैसें दारुण । दुःख न वाटे जातां प्राण । परि हे गंगा कोण पाववील ॥७५॥

अर्पण करणें रामेश्वरासी । हाचि हेतु निजमानसीं । पूर्ण करी तूं हृषीकेशी । पावन श्रीदासी सांभाळीं ॥७६॥
निंबयाचा ऐकोनि धांवा । निष्ठा कळली रमाधवा । करुणा उपजली केशवा । भक्तभावा जाणोनी ॥७७॥
करी देखोनि नरासी । गती साधी चपळेंसी । तें जाणोनि हृषीकेशी । वनीं कौतुकासी प्रगटवी ॥७८॥
निंबया पाहे भयचकित । तंव पाषाणमंदिर अकस्मात । तें देखोनि माजीं लपत । एका कोनांत दडाला ॥७९॥
तों गज तेथें पावला । शुंडा फिरवूं मंदिरीं लागला । निंबया शुंडेकडे वेधला । तंव वृश्चिक देखिला विशाळ ॥२८०॥
दोघेही देखिले काळ । पाहताचि जाला व्याकुळ । आतां वांचणें कैचें मरणमूळ । पळावया स्थळ नसेची ॥८१॥
म्हणे करुणाघना गोविंदा । समयीं धांव घाली मुकुंदा । करीं वसवोनी ये गदा । विघ्नभेदा करीं वेगीं ॥८२॥
मी जीवीं कासावीस । पाहें देवा तुझीचि वास । उशीर लागेल घालितां कास । तोंवरी नाश होईल माझा ॥८३॥
गजेंद्र पडतां संकटीं । स्मरतां धांवसी उठाउठीं । तैशापरी जगजेठी । पाव निकटी मज दीना ॥८४॥
करुणाशब्दें निंबया स्तवित । तो सर्वात्मक सर्व जाणत । तात्काळ होवोनि कृपावंत । कौतुक दावीत निजभक्ता ॥८५॥
गज उन्मत्त सबळ खुनी । शुंडा फिरवितां चारी कोनीं । उंचवी राउळ मध्यस्थानीं । तंव वृश्चिकें ताडोनी डंखिला ८६॥
वृश्चिकाच्या पुच्छघातें । विषवेदनें वेधिलें गजातें । तरफडोनि पडे धरेतें । क्षणें प्राणातें मुकला ॥८७॥
निजभक्ताचें करी छलन । तोचि हरीचा शत्रू जाण । नाना रूपें धरोन । करी संहारण तयाचें ॥८८॥
दृढतर व्हावी भक्ती । भावप्रेमा जडावे चित्तीं । म्हणोनि संकटीं सांभाळिती । दावी प्रचीती अनुतापा ॥८९॥
गज तो तात्काळ निमाला । वृश्चिकविषें काय नासला । जवळी होता गजपाळा । पोळोनि पळाला स्पर्शेंची ॥२९०॥
ऐसें नवलाव देखोन । निंबयासि वाटलें समाधान । म्हणे कृपाळू होय नारायण । केलें रक्षण सत्य माझें ॥९१॥
हा सदय कृपासिंधू । नाम याचें अनाथबंधू । महिमा वाखाणितां शिणला वेदू । श्रुती अनुवादूं कुंठित ॥९२॥
तेथें मी पामर । काय वाणूं एक जिव्हार । द्वय सहस्रा न लभे पार । तेथें उच्चार केंवि दीना ॥९३॥
देखिला वृश्चिक जो होता । त्यातें निंबया पाहे मागुता । तो जाला न दिसता । नेणें कवणिया पंथा तो गेला ॥९४॥
मग परम हर्षे करोन । निघतां कावडांतें घेवोन । तों गज पडिला द्वार धरोन । तंव ठेविला चरण मस्तकीं ॥९५॥
शरीराचा जाला भात । ठेवितां चरण गेला आंत । तंव तो युक्तीनें काढित । पाहतां कृष्णवत जाहला ॥९६॥
परी नवल जालें अतिअद्भुत । तें श्रोतीं ऐकावें सावचित । गजदेहापासोनि मुक्त । तो पावत दिव्य देह ॥९७॥
तो निंबयातें नमोन । विनवीता जाला कर जोडोन । म्हणे मी गंधर्व स्वर्गीं करितां गायन । जाला अभिमान फारसा ॥९८॥
अमरें गायना आज्ञापिलें । म्यां शब्द तें अमान्य केलें । तेणें मदांध माने देखिलें । सबळ ताडिलें शापशब्दें ॥९९॥
कीं या भूलोकीं निर्धारीं । काननीं होसी मत्त करी । सुखें वनीं विकार करीं । बहु सीगरी दाविली त्वां ॥२००॥

मग म्यां मकऱ्याचे धरिले चरण । उःशाप मागें तें प्रार्थून । त्वष्टनीं तोषला सहस्र नयन । अभयवचन कृपें दे ॥१॥
म्हणे संता पीडा करिसी । तें दुष्ट मरणें मरसी । संतपदस्पर्शे मुक्त होसी । मग तूं पावसी स्वर्गभुवना ॥२॥
तो हा माग्याचा सुदिन । उःशापाऐसें आलें घडोन । स्वामिचरणस्पर्शी जालों पावन । करितों गमन स्वर्गातें ॥३॥
मजसाठीं श्रम आपणांसी । भोगणें आलें निश्चयेंसी । आतां सुखें जावें निर्भयेंसी । मार्ग तुम्हांसी मिळेल ॥४॥
मज दीनाचा केला उद्धार तुम्ही साधु सदय उदार । करावया जगदोद्धार । अवनीवर फिरतसां ॥५॥
तुम्हीं भक्तिबळें करोनी । देव केला असे ऋणी । तो तुम्हां सांभाळी निर्वाणीं । कृपें करोनी सर्वदा ॥६॥
मी परम चांडाळ दुर्मती । श्रम दिधले तुम्हांप्रती । क्षमा अपराध कीजे संतीं । हेचि विनंती दासाची ॥७॥
यापरी करोनि प्रार्थना । वंदोनि निंबराजाच्या चरणा । गंधर्व गेला स्वर्गभुवना । पूर्वस्थाना आपुल्या ॥८॥
आतां पुढिले प्रसंगीं । प्रयाण करतील निंबराजयोगी । धन्य साधु हे प्रगट जगीं । प्रेमें हरिरंगीं रंगले ॥९॥
हे भवसिंधूचें तारूं । दीनजनांचें माहेरूं । आर्तिकांचे कल्पतरु । सदय दातारू अनन्याचे ॥२१०॥
म्हणोनिया अनंतसुत । जाला संतांसी शरणागत । पदसरोज त्यांचें इच्छित । सेवा मागत निरंतर ॥११॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । श्रोते परिसोत भाविक भक्त । अष्टपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥२१२॥

॥ इति अष्टपंचदशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ दत्त जन्म ॥

ॐ नमोजी गुरु स्वामी दत्तात्रया । कृपाळू सदया दीनबंधू ॥१॥ तुझे कीर्तिगुण वर्णाया लागुनी । इच्छितसे मन माझें बहु ॥२॥ तरि देई मति वदावया वाणी । आनंदाची खाणी प्रगटाया ॥३॥ आयका हो तुम्ही श्रोते संतजन । जन्म सुलक्षण श्रीदत्ताचा ॥४॥ सावित्री आणिक लक्ष्मी पार्वती । एके ठायीं स्थीति झाली होती ॥५॥ अकस्मात आली नारदाची फेरी । विणा स्कंधावरी घेउनियां ॥६॥ देवोनियां त्यांतें बैसाया आसन । पुसती वर्तमान त्रैलोक्यींचें ॥७॥ अहो नारदमुनी त्रैलोक्य भुवनीं । आम्हा ऐशा कोणी असती काय ॥८॥ पतिव्रता आणि सर्वसत्ता आंगीं । ऐशा कोणी जगीं असती काय ॥९॥ ऐशा गर्विष्ठ पाहे तिघीजणी । बोले नारदमुनी तयालागीं ॥१०॥ तुमचीयाहुनी श्रेष्ठ कोटीगुण । देखलीसे जाण पतिव्रता ॥११॥ भूलोकाचे ठायी अत्रिमुनी-जाया । सती अनुसूया नाम तिचें ॥१२॥ तुम्हां ऐशा दासी तिजला शोभती । काय सांगू स्याति तिची तुम्हा ॥१३॥ ऐसे आयकोनी मुनीचें वचन । मनामाजीं खिन्न जाल्या तिघी ॥१४॥ आपुलिया घरा उठोनियां गेल्या । पतीसी बोलल्या जाउनियां ॥१५॥ आइका हो तुम्ही आमुचें वचन । कापतीस होती प्राण बहू ॥१६॥ अनुसयेची कीर्ति नारदमुनीनीं । वर्णिली येवोनी आम्हांपाशीं ॥१७॥ तरी तुम्ही जावें मृत्युलोकाठायीं । अनुसूयेचे गृहीं लागवेगीं ॥१८॥ हरोनियां तिच्या सत्वालागीं जाण । यावें परतून निजघरा ॥१९॥ स्त्रियांचे वचन आयकोनी कानीं । तिघे तत्क्षणीं उठीयेले ॥२०॥ ब्रह्मा, विष्णु आणि तिजा चंद्रमौळी । निघाले ते काळीं मृत्युलोका ॥२१॥ स्नानसंध्येलागी अत्रिमुनी गेला । माध्यान्हीं पातला दिनमणी ॥२२॥ तयाकाळीं तिघे होवोनि अतीत । गेले अकस्मात भिक्षेलागीं ॥२३॥ अनुसूयेलागीं मारुनिया हांक । बोलती कौतुक करोनिया ॥२४॥ भिक्षा घाली माते आम्हांसी सत्वर । नग्न दिगंबर होवोनियां ॥२५॥ नाहीं तरी आम्ही जातों परतोनि । सत्वासि घेउनि तुझ्या आतां ॥२६॥ आयकोनि ऐसें अतिथी वचन । पतिव्रतारत्न चिंतावलें ॥२७॥ करोनियां मनीं पतीचें चिंतन । तीर्थातें घेऊन शिंपीयलें ॥२८॥ तंव ते तिघेजण झाले तिघे बाळ । रांगती लडिवाळ होवोनियां ॥२९॥ अनुसुया नग्न होवोनि आपण । करि दुग्धपान तयालागीं ॥३०॥ तिघेजण एक्या पाळणीं घालून । ओवीया गाऊन हालवीत ॥३१॥ इतुकियामाजीं अत्रिमुनी आले । बाळातें पाहिलें निजडोळां ॥३२॥ विस्मित होवोनि आपुलिया मनीं । म्हणे श्रेष्ठ कोणी असती हे ॥३३॥ असो या लागून झाले बहुदिन । स्वर्गीचे भुवन शून्य ठेलें ॥३४॥ लक्षुमी पार्वती सावित्री या तिन्ही । चिंताग्रस्त मनीं जाल्या बहू ॥३५॥ एके ठायीं सर्व होवोनियां गोळा । चिंता वेळोवेळीं करिताती ॥३६॥ इतुक्यांत आली नारदाची फेरी । मंजुळ उच्चारी नाममंत्र ॥३७॥ देवोनि आसन बैसविले मुनी । करिती विनवणी तयांलागीं ॥३८॥ आमुचे भ्रतार गेले कोणीकडे । आम्हांसी सांकडे घालोनियां ॥३९॥ तयांवीण आम्हां न गमेचि क्षण । जाले बहुदिन तयालागीं ॥४०॥ तयांवीण सर्व शोभती मंदीर । दिसति भयंकर आम्हांलागीं ॥४१॥ तुम्हांप्रति कोठें भेटतील तरी । सांगावें सत्वरीं आम्हांलागीं ॥४२॥ तंव बोले मुनि तयां स्त्रियांप्रती । देखियेले पती तुमचे म्यां ॥४३॥ अनुसुयेचे घरी तिघेजण बाळ । होवोनि लडिवाळ खेळताती ॥४४॥ आयकोनी ऐसें मुनीचें वचन । विस्मित होऊन बोलती त्या ॥४५॥ आमुचिया बोला गेले सतीवरीं । आम्हांलागीं घोरीं घालूनियां ॥४६॥ चला जाऊं आतां तेचिया घरा । मागूनि भ्रतार घेऊं आजी ॥४७॥ अभिमान दूर सांडुनियां जाण । पातल्या शरण अनुसूयेसी ॥४८॥ म्हणती वो माते देई चुडेदान । करी



॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परमभागवत

श्री अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा

विरचित

# श्री दत्तप्रबोध

## भाग ८ वा

अध्याय ५९ ते ६१

# ॥ श्री दत्त प्रबोध ॥

## अध्याय ५९ वा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नमो सद्गुरु दत्त विमळा । आनंदकंदा जगत्पाळा । पतितपावना हृदयकोमला । परम कृपाळा उदारा ॥१॥
अबाधित तुझी कीर्ती । वर्णितां न सरे कल्पांतीं । कुंठित जाल्या श्रुती । तेथें मी किती अनुवादूं ॥२॥
जीवनें भरला सागर । त्याचाही घडे आवर । गणवेल मेघाचा तुषार । परी तव गुणसार न वर्णवे ॥३॥
किती अवनीचे हरळ । किती आगोळ्या नभमंडळ । हेंही मोजवेल एक वेळ । परी तव गुण आकळ सकळांतें ॥४॥
तुझे अबाधित गुण । किंचित गावया इच्छी मन । ह्या बाळकाचा हेतु देखोन । लळा पूर्ण करिसी तूं ॥५॥
येरव्ही पाहतां मी मंदमती । होय बुद्धिहीन सर्व जाणती । परी ऐसियासी ग्रंथीं । देवोनि स्फूर्ती बोलविता ॥६॥
हें तंव तुमच्या कृपेचें कारण । अनन्यासी देतां भूषण । हृदयीं वसोनि वदविसी गुण । आपुलें महिमान आपणची ॥७॥
काष्ठयंत्र काय वाजावें । सुस्वर जनीं वाखाणावें । उरगकुरंगादि लुब्धावे । हें काय घडावें त्याचेनी ॥८॥
परी वाजीवणार वेगळा । धन्य त्या वाजीवत्याची कळा । मोहक उठवोनी नाद रसाळा । लुब्धवी सकळां स्वगुणें तो ॥९॥
तेवींच तूं कृपासागरा । हृदयीं बसोनि दातारा । उठविसी शब्द उद्गारा । कथा विस्तारा पाववीसी ॥१०॥
श्रोता वक्ता तूंचि होसी । निरोपोनि श्रवण करिसी । एकपणें एकचि होसी । द्वैत प्रेमासी वाढविलें ॥११॥
गत कथाध्याय अंतीं । निंबयाची निवारिली भयगुंती । दाविली तया अनुभूती । गंधर्व निश्चितीं उद्धरिला ॥१२॥
पुढतीं श्रोतीं व्हावें सावधान । गोड कथारस करा पान । सांडा अन्य व्यवधान । द्या अवधान एकाग्रें ॥१३॥
गंधर्व स्तवोनि जातां । विस्मयो जाला निंबया चित्ता । म्हणे हें कोण कौतुक भगवंता । मज दाविता जालासी ॥१४॥
आपुल्या चरणस्पर्शे करून । गंधर्व गेला उद्धरोन । हें न मनें निंबयालागोन । म्हणे हरिविंदान न कळे हें ॥१५॥
देवाधिदेवा सर्वेश्वरा । कौतुक दाविलेंसी हें पामरा । आतां अनाथातें कृपा करा । मज अंगीकारा दीनातें ॥१६॥
मी न जाणें तुझें सेवन । सद्भावें न केलें अर्चन । न जाणेंचि ध्यान भजन । कैसेंनी भूषण भूषविसी ॥१७॥
मी अपराधी अनाथ । हीन दीन अधम पतित । तुज न होतां शरणागत । होवोनि कृपावंत तारिलें ॥१८॥
वर्षी गळतां वांचविलें । गाईपासोनि रक्षिलें । व्याघ्रभय निवारिलें । मज वांचविलें अनाथा ॥१९॥
पुढें होतों रानभरीं । तेथें गज लागला मागें अरी । मज ठाव दिधला मंदिरीं । कृपाळू मुरारी होसी तूं ॥२०॥
तेथें वृश्चिक प्रगटला काळ । गजशुंडा भवंडी सरळ । त्या उभयभयें होतां व्याकुळ । तुझें पदकमळ चिंतिलें ॥२१॥
तथेंही कुडावा केलासी । वृश्चिकें ताडिलें गजासी । करी मुक्तोनि प्राणासी । सदया मजसी तारिलें ॥२२॥
भयेंचि गजयोक पळविले । वृश्चिक पाहतां गुप्त जाले । हरि तुंवा मातें सांभाळिलें । भय वारिलें सर्वही ॥२३॥
गंधर्वरूपें प्रगटोन । मज दिधलें आश्वासन । आता न सोडीं तुझे चरण । कृपाळू जगजीवन तूं खरा ॥२४॥
माझी भूक तहान पळविली । प्राण वपु रक्षिली । धन्य तूं कृपाळू माउली । संकटकाळीं प्रतिपाळिलें ॥२५॥

# अर्पण-पत्रिका

अनंत कोटी ब्रम्हांड नायक राजाधिराज योगीराज

**श्री दत्तात्रेय महाराज**

यांचे पवित्र व पावन चरण कमली

श्री दत्तप्रबोधरूपी कमलपुष्पातील अष्टमदल अर्पण

## – श्री दत्तात्रेय प्रार्थना –

नमस्ते ऽ नसूया सुतायार्तिहन्त्रे नमस्ते ऽ त्रिपुत्राय सर्वाधिहन्त्रे ॥
नमस्ते ऽ वधूताय लोकैक भर्त्रे नमस्ते समस्ते ऽ हिताद्यादिकर्त्रे ॥१॥
नमस्ते मखादिक्रियापापकर्त्रे नमस्ते जगत्साक्षिणेते विकर्त्रे ॥
नमस्ते ऽ सुरा रातये भक्त पात्रे नमस्ते ऽ खिलाम्या ऽ स्य पित्रे च मात्रे ॥२॥
नमस्ते जगन्मानस प्रेरकाय नमस्ते जगद्यन्त्र संचालकाय ॥
नमोयोगिवर्य प्रभो मे प्रसीद नमो भिक्षुवन्द्य प्रभो मे प्रसीद ॥३॥
भुजंग प्रयातेडिता स्मास्तु माला भुजंग प्रयातोपमं ते विशाला ॥
भवंनाशयित्वा वसन्वीश मूर्तिः शिवंकर्य पीड्या ऽ ऽ धिहन्त्रीच कीर्तिः ॥४॥

॥ अवधूत चिंतन श्रीगुरुदेवदत्त ॥

## परम पूजनीय योगिराज श्री. गुळवणी महाराज यांचा मंगल आशीर्वाद

श्रीगणेशादत्त गुरुभ्योनमः

स्मृतोऽप्यत्रतियोविघ्नंनिघ्नन्नम्यासुतःस्तुतः
गन्धर्वस्थःसहि कलौमलौघघ्नोऽस्तुनोहृदि ॥१॥

' दत्त कृपेचा सागर । मस्तकी ठेवी अभयकर प्रसन्न होवोनी देतसे वर । तें सादर परिसावें ॥६३॥ भक्ति ज्ञान वैराग्य पाहीं । मूर्तिमंत नांदो याचे देहीं । निष्ठा भाव प्रेमप्रवाहीं । सर्वदाही राहो हा ॥६४॥ शांति क्षमा दया विरक्ती वाढो घडो सत्संगति । अद्वय अभेद सर्वां भूतीं । राहो स्थिति समसाम्य ॥६५॥ विकार विकृति न बाधो यासी । रस उपजेल वाचेसी । प्रसन्न होईल हृषीकेशी मनोरथासी पुरवील ॥६६॥ ( श्री दत्तप्रबोध अ. ५३ ) श्री दत्त महाराजांनीं श्री जनार्दन स्वामींच्या प्रार्थनेप्रमाणें श्री एकनाथ महाराजांचेवर कृपा करून त्यांना वरप्रदान केलें त्यावेळचे हें वर्णन आहे. श्री गुरु प्रसादानेंच मानव पूर्णतेस जातो याचे हे निदर्शन आहे. नाथ महाराजांना श्रीदत्तप्रभूचें दर्शन श्रीगुरु कृपेमुळेंच झालें. त्यावेळीं त्यांच्या सारख्यांच्याही मनांत विकल्प उत्पन्न झाला मग इतरांची काय कथा ? ' विकार विकृति न बाधो यासीं ही स्थिति ईशप्रसादानेंच प्राप्त होणार. सर्वत्र असणाऱ्या ईश्वराचे दर्शन व कृपा गुरुप्रसादानेंच प्राप्त होणार हे श्रीमहाराजांनीं पुढील श्लोकांत सांगितलें आहे. ' असोनि सर्वत्र गुरुप्रसादा । विना न लाभे करितांहि खेदा । भेदाचि वार्ता करिजो अपार्थ । तो पूर्ण आनंद गुरु समर्थ ' याप्रमाणें श्री गुरु प्रसाद व ईशप्रसाद संपादन करण्याकरितांच मानवजन्म आहे हें समजून यावे व त्याप्रमाणें पूर्वी होऊन गेलेल्या सिद्ध पुरुषांप्रमाणें आजही साधकांना योग्य ते मार्गदर्शन होत रहावें या सदिच्छेनें, परम भागवत श्री. कावडीबावा यांनीं केलेल्या श्री दत्त प्रबोध या मोठ्या ग्रंथाचें संपूर्ण प्रकाशन कार्य श्रीनृसिंह सरस्वती सेवा मंडळाचे द्वारा, श्रीदत्त गुरु भक्त वसंतराव झुळे यांनीं एकनिष्ठेनें पार पाडले हे पाहून आम्हांस अत्यंत समाधान वाटत आहे. मानव जन्म नाना विकारांनीं भरलेला म्हणूनच अशांतिमय असा आहे. त्या सर्व विकारांचे उपशमन होऊन पूर्ण शांतीचा मार्ग दाखविण्यास संत वाङ्मयच समर्थ आहे. याद्दष्टीनें हे ग्रंथ प्रकाशन सर्वोपकारक ठरणारे आहे. सद्गुरु श्री. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्याही कांहीं ग्रंथांचें प्रकाशन श्री. झुळे यांनीं केले असुन पुढेंही ते करण्याचा त्यांचा मानस आहे. ईशकृपेनें हा त्यांचा सत्य संकल्प पार पडून भारत वर्षाचा भगवद्भजन रूप स्थायीभाव, अबाधित, वर्धिष्णु स्वरूपांत नित्य रहावा व प्रकाशकांचे आणि ग्रंथाभ्यासकांचे पूर्ण कल्याण व्हावें हीच सर्वांतर्यामी श्री वासुदेव प्रभू जवळ नित्य प्रार्थना आहे.

कार्तिक शु॥ १० गुरुवार, १८८७
श्री वासुदेव निवास, कर्वे रोड,
पुणें ४

वामन दत्तात्रेय गुळवणी

अद्‌भुत हा नवलाव । देखतां नयनीं तुम्ही सर्व । मज पुसतां हें अपूर्व । विचारितां मात्र निरोपिला ॥५४॥
ऐकतां निंबयाचें भाषण । स्तब्ध जाले आप्तजन । म्हणती हें पूर्णतेचें वचन । कोणें दूषण धावें या ॥५५॥
निंबयासी निश्चय बाणला । तेथेंचि योग हा ठसावला । रस सेवोनि निराश जाला । मनें स्थिरावला हरिरंगीं ॥५६॥
वमिल्या न सेववे वमन । तें श्वानसूकराचें सेवन । सुज्ञ म्हणती हें लक्षण । अज्ञान ज्ञान निवडलें ॥५७॥
असें निंबयाचें आचरण पाहतां । संतोष वाटला तैं समस्तां । म्हणती ऐसियाचा संग होतां । ठाव दुरिता उरेना ॥५८॥
तीन दिवस निंबयासी राहवितां । दैठणी गेली कुशलवार्ता । ते उभय कांतांनीं ऐकतां । हर्ष चित्तां न समाये ॥५९॥
उदया येतां वासरमणी । प्रफुल्लित होती कुमुदिनी । तेवीं निंबयाच्या कामिनी । आनंदभुवनीं डुल्लती ॥६०॥
तों ग्रामबाह्य प्रदेशीं । निंबराज पावले वेगेंसी । आडवे यवोनि ग्रामवासी । गजरें गृहासी-तो नेला ॥६१॥
निंबराज आश्रमीं बैसतां । शिवराम पळाला खेळतां । तयासी सांगती माता । धा रे पिता तुझा हा ॥६२॥
बाळा पदीं आणोनि घातलें । थेरें अंकावरी घेतलें । करें मुख कुरवाळिलें । चुंबन घेतलें प्रीतीनें ॥६३॥
लौकिकसंबंध मोहा दावोन । तोषविलें सकळांचें मन । मग मार्गस्थ । केले ग्रामिक जन । गाती गुण निंबयाचें ॥६४॥
म्हणती केवढा पुण्यशील । यात्रा केल्या येणें सकळ । अंतर्बाह्य हा निर्मळ । भजनीं प्रेमळ लुब्धला ॥६५॥
कोण्ही म्हणती कठिण संसार । याचा ताप अनिवार । न साहवे म्हणोनि बाहेर । देशावर करूं जातो ॥६६॥
कोण्ही म्हणती नोव्हे ऐसें । यासी लागलें देवपिसें । यात्रा करितो हा सोसें । घरीं न वसे कदाही ॥६७॥
एक बोलतसे धीट । हा उगाचि न भ्रमे कुव्हाट । यासी द्रव्याची लागली चट । म्हणोनि खटपट येव्हढी ॥६८॥
तंव एक म्हणे हो आइका । हा श्रमें मेळवितो पैका । तेणें संतुष्ट ह्या नायका । अज्ञोनी नये का ध्यानासी ॥६९॥
एक म्हणे सांडा चावटी । सर्व करणें पोटासाठीं । साधेल जया ज हातवटी । तणचि खटपटी कराव्या ॥७०॥
एक म्हणती साधु भला । यासी भलतें न बोलिजे बोला । सत्कारणीं झिजवी देहाला । कदा लोलुपेला न गुंत ॥७१॥
वं। वार्ता बोलतां भलती । याच्या दर्शनें दोष जाती । जे याचे सेवन करिती । त मुक्त होती निर्धार ॥७२॥
ऐसे जन नाना परी । गोष्टी वदती वैखरी । प्रकृति जैसी देहांतरीं । तैसेचि उच्चारी गुणदोष ॥७३॥
असोत हे जनप्रकार । निंबराजाचें शुद्ध अंतर । समवेत कांता कुमर । स्वसुखें निर्भर स्वसदनीं ॥७४॥
पाहोनिया सुदिनासी । सद्भावें पूजिलें संतांसी । सर्व निमंत्रोनि ग्रामवासी । भोजनें सकळांसी दिधलीं ॥७५॥
सदना येती भाविक जन । श्रवण करिती प्रेमें भजन । निंबयाचें वेधलें मन । श्रीहरिगुण गावया ॥७६॥
पूजन भजन ध्यानासी । कधीं न विसंबे तयासी । टळों नेदी नेमासी । अहर्निशीं सत्कर्मी ॥७७॥
तैशाचि त्याच्या वनिता । प्रेमें आराधिती भगवंता । निजभावें अर्चिती संतां । उबग चित्तां न मानिती ॥७८॥
पतिचरणीं प्रेम साचें । कधीं दुरुक्ती न बोलती वाचें । मिष्ट भाषण आनंदाचें । धर्म सवचे जाणविती ॥७९॥
कुटुंबासह सत्कर्मी आचरतां । हरीस त्याची सर्व चिंता । पुरविण त्याचिया मनोरथा । अंतर्व्यथा जाणोनि ॥८०॥
भगवत्कृपें करोन । पुन्हा भागीरथी झाली गर्भीण दिवसमास लोटतां पूर्ण । पुत्रसंतान जाहल ॥८१॥

यापरी करितां स्तवन । सद्गद हृदय आलें दाटोन । प्रेमाश्रूनें वाहती नयन । ध्यास पूर्ण वाणला ॥२६॥
सप्रेम भजनीं होवोनि रत । निर्भया आनंदें भ्रमण करित । तों पंथ सांपडला अकस्मात । संघ बहुत मिळाला ॥२७॥
मग नित्यानंदें करून । मार्ग उल्लंघीत आपण । ज्वालामुखीस पावला येवोन । पूजन दर्शन करीतसे ॥२८॥
जिकडे जिकडे तीर्थ दैवत । तिकडे तिकडे गमन करित । तों रेवाळेश्वर जाला प्राप्त । चमत्कार अवलोकित तेथींचा ॥२९॥
गोकुळ मथुरा वृंदावन । वल्देवाचें केलें दर्शन । वनें उपवनें गोवर्धन । तीर्थें संपूर्ण पाहिलीं ॥३०॥
तेथील सोहोळा विलास । स्नान दान यमुनेस । प्रसाद संपादोनि दक्षिणपंथास । वृजदेशास टाकिलें ॥३१॥
गालवस्थाना येवोन । कोटेश्वराचें घेतलें दर्शन । गुप्त प्रगट ऋषियोगी जन । त्यांतें नमोन जाय पुढें ॥३२॥
मार्गीं लागतां क्षेत्रतीर्थें । स्नान करोनि नमी त्यांतें । गिरिकंदर काननातें । उल्लंघोनि पंथातें उरकीत ॥३३॥
सह्याद्री मार्गें टाकून । सिंहाद्री तो सोडोन । शेषाद्रीतें येवोन । केलें दर्शन तुळजेचें ॥३४॥
नीट जातां दक्षिणपंथें । त्रिदेश उल्लंघिले अतौतें । देखिलें मागुतीं रत्नाकरातें । हर्ष मनातें जाहला ॥३५॥
त्वरें तीरातें जावोन । घेतलें रामनाथाचें दर्शन । गंगा अर्पोनि केलें पूजन । साष्टांग नमन पैं केलें ॥३६॥
संकल्प सिद्धीस जातां । आनंद न समाये चित्ता । म्हणे कृपाळु वा समर्था । दीनत्राता तूं होसी ॥३७॥
निर्भया विनवी सप्रेमेंसी । मागुतीं दावी मज चरणासी । आज्ञा घेवोनि सेतूसी । मग गोकर्णासी चालिले ॥३८॥
गोकर्णमहाबळेश्वर । शिवआत्मलिंग साचार । आणितांचि दशकंधर । पीडोनि विघ्नेश्वर स्थापी त्या ॥३९॥
त्या स्थानातें विलोकिलें । निजभावार्थें अर्चिलें । त्रिरात्र तेथें राहिले । शीघ्र निघाले क्रमित पंथा ॥४०॥
कर्णाटक तेलंगणांत । द्राविड मल्लाळ देशांत । महाक्षेत्र दैवतें समर्थ । तितुकीं अवलोकित परिश्रमें ॥४१॥
वरुणदिशेस करिती गमन । महादेवाचें केलें पूजन । करवीरीं श्रीलक्ष्मी वंदोनि । कृष्णास्नान मार्गीं ॥४२॥
पंचगंगा महाबळेश्वर । पाहिलें पुढें नीरातीर । शिवलिंग देव मल्हार । मोरेश्वर कन्हानीरीं ॥४३॥
सर्वेचि भुलेश्वरपर्वती । चालतां भिवरा उल्लंघिती । पुढें वंदिला गणपती । रांजणग्राम म्हणती तयातें ॥४४॥
तेथें होते आप्तजन । त्यांनीं तीन रात्री घेतलें राहोन । म्हणती विदेहस्थिति राहिलां होवोन । संसारभान सोडिलें ॥४५॥
सदा सर्वदा यात्रा करितां । काय प्रपंचाची व्यवस्था । सोंपिलें कोणाचिया माथा । कुमर यांना गति कोण ॥४६॥
मग निवराज म्हणती त्यांस । तारिता मारिता सर्वेश । पाळिता चाळिता जीवास । जगन्निवास असे की ॥४७॥
जेणें औटंचर उभारिलें । तैलाभीण प्रकाशिलें । भार पृथ्वीवरी साहिलें । कोणा उपेक्षिलें तयानें ॥४८॥
बाळ गर्भीं असतां । कोण वाहे त्याची चिंता । तेथें जो होय रक्षिता । तो येथें पाळिता उणा नसे ॥४९॥
बाळ येतां बाहेर । स्तनीं सोडितो पयपाझर । हा कां न वळे मनीं विचार । त्याचा भार चालवी तो ॥५०॥
शेषमस्तकींची धरणी । वाहीन जरी म्हणे यातोणी । हें रुचतें काय शोभा मनीं । ज्याची वाहणी तो वाहे ॥५१॥
हा वनमाळियाचा मळा । तोचि देऊं जाणे जिव्हाळा । नाहीं वनस्पतीअंगीं कळा । प्रतिपाळ कळा तयाची ॥५२॥
पाहें पां त्या पर्वतीं । वृक्ष सकळ व्याकर होती । ते उष्णकाळामाजी पुढती । जीवन त्यांप्रती कोण दे ॥५३॥

अद्भुत हा नवलाव । देखतां नयनीं तुम्ही सर्व । मज पुसतां हें अपूर्व । विचारितां भाव निरोपिला ॥५४॥
ऐकतां निंबयाचें भाषण । स्तब्ध जाले आप्तजन । म्हणती हें पूर्णतेचें वचन । कोणें दूषण धावें या ॥५५॥
निंबयासी निश्चय बाणला । तेथेंचि योग हा ठसावला । रस सेवोनि निराश जाला । मनें स्थिरावला हरिरंगीं ॥५६॥
वमिल्या न सेववे वमन । तें श्वानसूकराचें सेवन । सुज्ञ म्हणती हें लक्षण । अज्ञान ज्ञान निवडलें ॥५७॥
असें निंबयाचें आचरण पाहतां । संतोष वाटला तें समस्तां । म्हणती ऐसियाचा संग होतां । ठाव दुरिता उरेना ॥५८॥
तीन दिवस निंबयासी राहवितां । देठणी गेली कुशलवार्ता । ते उभय कांतांनीं ऐकतां । हर्ष चित्तां न समाये ॥५९॥
उदया येतां वासरमणी । प्रफुल्लित होती कुमुदिनी । तेवीं निंबयाच्या कामिनी । आनंदभुवनीं डुल्लती ॥६०॥
तों ग्रामबाह्य प्रदेशीं । निंबराज पावले वेगेंसी । आडवे यवोनि ग्रामवासी । गजरें गृहासी तो नेला ॥६१॥
निंबराज आश्रमीं बैसतां । शिवराम पळाला खेळतां । तयासी सांगती माता । बा रे पिता तुझा हा ॥६२॥
बाळ पदीं आणोनि घातलें । येरें अंकावरी घेतलें । करें मुख कुरवाळिलें । चुंबन घेतलें प्रीतीनें ॥६३॥
लौकिकसंबंध मोहा दावोन । तोषविलें सकळांचें मन । मग मार्गस्थ । केले ग्रामिक जन । गाती गुण निंबयाचें ॥६४॥
म्हणती केवढा पुण्यशील । यात्रा केल्या येणें सकळ । अंतर्बाह्य हा निर्मळ । भजनीं प्रेमळ लुब्धला ॥६५॥
कोण्ही म्हणती कठिण संसार । याचा ताप अनिवार । न साहवे म्हणोनि बाहेर । देशावर करूं जातो ॥६६॥
कोण्ही म्हणती नोव्हे ऐसें । यासी लागलें देवपिसें । यात्रा करितो हा सोसें । घरीं न वसे कदाही ॥६७॥
एक बोलतसे धीट । हा उगाचि न भ्रमे फुकट । यासी द्रव्याची लागली चट । म्हणोनि खटपट येव्हढी ॥६८॥
तंव एक म्हणे हो आइका । हा श्रमें मेळवितो पैका । तेणें संतुष्ट ह्या नायका । अझोनी नये का ध्यानासी ॥६९॥
एक म्हणे सांडा चावटी । सर्व करणें पोटासाठीं । सांपेल जया ज हातवटी । तणचि खटपटी कराव्या ॥७०॥
एक म्हणती साधु भला । यासी गलतें न बोलिजे बोला । सत्कारणीं झिजवी देहाला । कदा लोलुपेला न गुंत ॥७१॥
यां वार्ता बोलतां भलती । याच्या दर्शनें दोष जाती । जे याचे सेवन करिती । त मुक्त होती निर्धार ॥७२॥
ऐसे जन नाना परी । गोष्टी वदती वैखरी । प्रकृति जैसी देहांतरीं । तैसेचि उच्चारी गुणदोष ॥७३॥
असोत हे जनप्रकार । निंबराजाचें शुद्ध अंतर । समवेत कांता कुमर । सुखें निर्भर स्वसदनीं ॥७४॥
पाहोनिया सुदिनासी । सद्भावें पूजिलें गंगेसी । सर्व निमंत्रोनि मार्वयासी । भोजनें सकळांसी दिधलीं ॥७५॥
सदना येती भाविक जन । श्रवण करिती प्रेमें भजन । निंबयाचें वेधलें मन । श्रीहरिगुण गावया ॥७६॥
पूजन भजन ध्यानासी । कधीं न विसंबे तयासी । टळों नेदी नेमासी । अहर्निशीं सत्कर्मी ॥७७॥
तैशाचि त्याच्या वनिता । प्रेमें आराधिती भगवंता । निजभावें अर्चिती संतां । उद्वेग चित्तां न मानिती ॥७८॥
पतिचरणीं प्रेम साचें । कधीं दुरुक्ती न बोलती वाचें । मिष्ट भाषण आनंदाचें । धर्म सवचे जाणविती ॥७९॥
कुटुंबासह सत्कर्मी आचरतां । हरीस त्याची सर्व चिंता । पुरविण त्याचिया मनोरथा । अंतर्यथा जाणोनि ॥८०॥
भगवत्कृपें करोन । पुन्हा भागीरथी झाली गर्भीण दिवसमास लोटतां पूर्ण ।. पुत्रसंतान जाहल ॥८१॥

दहा दिवस लोटतां निश्चिंत । अकराव्यासी शुद्ध होत । बाराव्यासी बारसें करीत । सोहोळा आरंभित नामाचा ॥८२॥
उत्तरयात्रेचा प्रसाद म्हणोन । तेराव्यासी पालख घालोन । नाम ठेविलें नारायण । गजरें करोन आवडीं ॥८३॥
दुर्बळ असतां संसारीं । दुःख चिंता न वाहती शरीरीं । विवेकें सुखरूप अंतरीं । धैर्य तिळभरी ढळेना ॥८४॥
तुटकें फाटकें परी नेटकें । शिळें:साजुक विटकें । धड अथवा फुटकें । न मानोनि खटके गोड करिती ॥८५॥
प्रपंचीं गोड सारितां आला काळ । कधीं न अंतरीं होती विव्हळ । मानोनिया सुखेंकल्लोळ । भजनीं प्रेमळ रंगले ॥८६॥
ऐसे कांहीं दिवस लोटतां । दवयोगें अवचितां । निंबयाची ज्येष्ठ कांता । देवपंथा पावली ॥८७॥
भागीरथी शोकाकुलित । ग्रामलोक आहाळत । परी निंबया मानसीं शांत । शांतवीत सकळांतें ॥८८॥
म्हणे हें तंव ईश्वरी प्रमाण । असेल तैसें येत घडोन । याचें व्यर्थ दुःख वाहोन । मोगावा शीण किमर्थ ॥८९॥
अस्तोदय सर्वांसी । लाविला न चुके निश्चयेंसी । नाशिवंताचीच होय नाशी । जीव अविनाशी सर्वदा ॥९०॥
हें पांचां वांस्यांचें झोपडें । कर्म वायूनें पडे मोडे । याचें कां मानावें कुडें । वसतां न विघुडे कल्पांतीं ॥९१॥
या नाशिवंतासाठीं । कासया व्हावें जीवीं कष्टी । स्वप्नसंपत्तीचा हर्ष पोटीं । जागृत दृष्टीं साच नोव्हे ॥९२॥
गंधर्वनगरीचा बाजार । अवघा मायेचा वेव्हार । कोण अक्षय जाला अमर । नाना ढगाभ्र वितुळे कीं ॥९३॥
तेवींच हेंही आहे । विवेकदृष्टीं शोधोनि पाहें । दिसतें तेंचि लया जाये । शोक न वाहें सर्वथा ॥९४॥
हा अद्भुत ईश्वरी खेळ । जगीं पसरिलें मायाजाळ । कर्ता करविता कारण सकळ । नटला निश्चळ सूत्रधारी ॥९५॥
शोक दुःख मागें सारा । सबळ विवेक देहीं विवरा । खेळीं न भुला पाहा बाजेगिरा । हृदयीं सर्वेश्वरा भजावें ॥९६॥
असो यापरी बोधोन । नवोनि प्रेता केलें दहन । सर्व विधी संपादोन । दिवसमान लोटले ॥९७॥
शिवकुमार कुमरत्व पावला । व्रतबंध मुहूर्ते केला । तंव एके दिवशीं कांतेला । निंबया बोलिला ऐका तें ॥९८॥
अर्चोनि रामेश्वरासी । येतां आणिलें सेतूसी । तो अर्पण करावया गंगेसी । जावें मानसीं वाटतें ॥९९॥
प्रथम यात्रेचा अर्पिला । द्वितीय संग्रहीं राहिला । फार दिवस जाले त्याला । तो गंगेसी भेटविला पाहिजे ॥१००॥
मनोगत जाणोनि स्वामीचें । तैसेंचि वर्तणें सतीचें । संकल्प न मोडी मनींचे । शब्द सुखाचें बोलत ॥१॥
म्हणे जी स्वामी गंगा घेवोन । आश्रमीं कधीं करितील आगमन । शीघ्र पाहावे चरण । हेंचि मन इच्छितें ॥२॥
निंबराज म्हणे रामेश्वरीं । नेवोनि अर्पावी हें अंतरीं । परी कर्ता करविता श्रीहरी । जीवाकरीं असेना ॥३॥
बाळकांसहित आपण । आश्रमीं असावें आनंदघन । आम्ही शीघ्र येऊं परतोन । कधीं उदिग्न न व्हावें ॥४॥
कांहीं अडचणी न दाविनां । आनंदें बोळवी प्राणनाथा । किंचित मोहें झळंबतां । अश्रुपाता ढाळिलें ॥५॥
मंग संबोखोनी कामिनी । परतविली जावया सदनीं । म्हणे विसरूं नका चक्रपाणी । ध्यास मनीं राखावा ॥६॥
ऐसें वदोनि त्वरित । निंबराजें धरिला पंथ । तीर्थी न्हावोनि अर्ची दैवत । वंदोनि साधित गमनातें ॥७॥
सिद्ध साधु योगीजन । मुनी तापसी सहजें फरोन । मार्गी चालतां घे दरुपण । मुखीं भजन श्रीहरीचें ॥८॥
देश ग्राम पट्टण पुरें । पर्वत उच्छेयी यांतारें । निर्भयपणें सुखी विचरे । मुखीं स्मरे नामघोष ॥९॥

असो ऐसें करितां गमन । इंद्रप्रस्थीं यमुनास्नान पुढें कृष्ण गंगापावन । पापनाशन वंदनें ॥११०॥
रामघाट महाथोर । तेथें भागीरथी भयंकर । विशेष पात्राचा विस्तार । चकित अंतर अवलोकन ॥११॥
तेथें निवराज पावले । भागीरथीतें वंदिलें । स्नान दान तीरीं केलें । सेवूस अर्पिलें निजभावें ॥१२॥
आनंदें विधी संपादोन । श्रीगंगेची कावडी भरून । त्वरें निघती स्कंधीं वाहोन । क्षेत्रस्थान विलोकित ॥१३॥
द्वाळपुरासन्निधान । मुचकुंद तीर्थ पावन । त्या स्थळातें निरखोन । केलें स्नान तीर्थाचें ॥१४॥
सवेंचि पुढें चर्मण्वती । उल्लंघोनी मार्गी चालती । पार्वती सिंधु वेत्रवती । पाहोनि करिती स्नान तेथें ॥१५॥
कावेरी नर्मदा ओलांडून । तप्ती गोदा उतरोन । सीणा भिवरा कृष्णा पाहोन । श्रीरंगपट्टण पावले ॥१६॥
पूर्ण श्रीरंगातें पाहिलें । पन्हानरसिंहातें अर्चिलें । ताम्रपर्णीतीरा आले । स्नान सारिलें तेथेंही ॥१७॥
शिवकांची विष्णुकांची । पाहोनि मार्ग क्रमिती । श्रीरामेश्वरीं पावतां निश्चितीं । आनंद चित्तीं जाहला ॥१८॥
भक्तिप्रेमें अर्पिला रामेश्वर । गंगाअर्पणीं तोषविला शंकर । सेतु घेवोनि सत्वर । मार्ग दुस्तर क्रमियेला ॥१९॥
शृंगेरीपट्टणा येवोन । वंदिले आचार्यांचे चरण । उडुपी सुब्रमन्यूतें जावोन । घेतलें दर्शन तयाचें ॥१२०॥
सव्य अपसव्य फिरतां । ज्योतिर्लिंगें जाला पाहतां । लक्षोनि पश्चिम पंथा । तेथील दैवतां वंदिलें ॥२१॥
महापर्वता जातां उल्लंघोन । पाहिलें नयनीं तळकोंकण । परशुरामक्षेत्र महापावन । केलें अर्चन निवाराजें ॥२२॥
मग मावळदेशा पावले । भीमाशंकरातें अर्चिलें । तेथोनि पूर्वपंथा धरिलें । वेगीं पावले इंद्रायणी ॥२३॥
देखोनियां अलंकावती । परम हर्ष झाला चित्तीं । श्रीज्ञानेश्वरमहामूर्ती । अर्चिलें प्रीतीं तयातें ॥२४॥
क्षेत्रप्रदक्षिणा करोनी । सद्भावें साष्टांग नमोनी । वेगीं निघाले तेथोनी । पावले येवोनी निजग्रामा ॥२५॥
ग्रामवासियां कळतां । सुख वाटलें समस्तां । आनंदोनि कुमरकांता । आणिलें नाथा गजरेंसी ॥२६॥
सुमुहूर्तें केलें गंगापूजन । ब्राह्मणां दिधलें भोजन । ग्रामवासी अवघे जन । प्रसाद देवोन बोळविले ॥२७॥
आपण कांताकुमर । प्रपंचीं सावध निरंतर । हरिभजनीं तत्पर । करिती सत्कार अतिथींचा ॥२८॥
आनंदें करोनि रमतां । तंव तिसऱ्यातें गर्भिण जाली कांता । नवमास पूर्ण भरतां । विनवी कांता निवयातें ॥२९॥

साधुसंत गांवावरोन । वारकरी जाती करीत भजन । दिंड्या पताका उभावोन । आनंदें करोन जाताती ।।३८।।
तें देखोनि जाला उल्हास । म्हणे आपण पाहावा पंढरीनिवास । गृह सोंपोनि शेजारियास । वैष्णवसंगास लागले ।।३९।।
परमानंदगजरीं । संतांसवें जाय पंढरी । चहूंकडोनि येती वारकरी । होती परस्परीं आलिंगनें ।।१४०।।
ढोल दमामे मृदंग वाजती । टाळ झल्लरीचे नाद होती । सूर विण्याचे धरोनि गाती । नामें गर्जती वैष्णव ।।४१।।
देखोनि वैष्णवसमाजा । आनंद न समाये निंबराजा । दिंड्या पताका उभारिल्या ध्वजा । पंढरीराजा आळविती ।।४२।।
मार्गी नाचती वैष्णववीर । प्रेम सकळांचे अंगीं थोर । निंबयाचें रंगलें अंतर । प्रेमपाझर सुटले ।।४३।।
सर्वां करीं पताका पाहोन । निंबराज भाकी करुणावचन । म्हणे देवा करशून्य । पताकवांचून सर्वांत मी ।।४४।।
आवडी धरोनि मानसीं । आलों तुझिया दर्शनासी । दीनवत्सल म्हणती तुजसी । आपंगीं मजसी दयाळा ।।४५।।
अनाथनाथा रुक्मिणीरमणा । आलों शरण तुझिया चरणा । पावें मातें कृपाघना । पतितपावना दीनबंधू ।।४६।।
ऐसी करुणा भाकित । गुळसऱ्यासी जाले प्राप्त । तों तेथुनी कळस पाहतां साधुसंत । कुरवंड्या करीन जीवप्राणें ।।४७।।
देखतांचि राउळाचा कळस । होय अहंकाराचा नाश । पाझर फुटती खळास । अभेद मानस सर्वांचें ।।४८।।
बाष्प नेत्रीं वाहती । रोमांच अंगीं थरथरती । याती कुळ विसरती । आलिंगनीं मिसळती नारीनर ।।४९।।
तें निंबयासी आलें घडोन । नाहीं उरलें देहभान । प्रेमें सद्गदित अंतःकरण । घाली लोटांगण त ठायीं ।।१५०।।
म्हणे पांडुरंगा धांवत येईं । संसारीं भागलों माहेरा नेईं । केधवां मिठी घालीन पायीं । ठेवीन डोई त्यावरी ।।५१।।
ऐसी अट्टहासें हांक देतां । कृपा उपजली अनाथनाथा । द्विजवेषें जाला आलिंगिता । म्हणे निंबनाथा आलासी ।।५२।।
ही ध्वजा घेवोनि करीं । चाल बापा आतां पंढरी । वाट पाहे विटेवरी । भक्तकाजकैवारी गोविंद ।।५३।।
निंबराज पाहे निरखोन । तों पुढें देखिला ब्राह्मण । त्यासि म्हणे तुम्ही कोठील कोण । नामाभिधान सांगावें ।।५४।।
तंव जगदात्मा म्हणे निंबयासी । आम्ही क्षेत्र पंढरीचे निवासी । नाम विठ्ठल आम्हांसी । वसतों राउळासी निरंतर ।।५५।।
यात्रेकऱ्यांसी आडवें जावें । तुम्हांऐशा सज्जनां भेटावें । प्रसाद प्रेमळांतें धावे । त्यांचें वागावें सेवेंत ।।५६।।
आमुचें साधुसंत भाविक यजमान । त्यांचें इच्छितों कल्याण । त्या आश्रयें निर्वाह पूर्ण । होतसे पोषण आमुचें ।।५७।।
यात्रेसी आश्रयें येतां । आपुला लाभ जाला अवचितां । न चुकावें वारीसी आतां । आम्हासि आस्था आपुली ।।५८।।
आज्ञा देइजे आम्हांसी । भेटूं इतर यजमानांसी । तें निंबया काय बोले त्यासी । केधवां दर्शनासी चाल आम्हां ।।५९।।
तंव विप्र म्हणे राउळांत । उभा राहीन वाट पाहत । भेटी होईल निभ्रांत । संशय मनांत न धरावा ।।१६०।।
असो ऐसा प्रथम प्रसाद । देवोनि गेलासे मुकुंद । निंबयासी थोर आनंद । पांडुरंगपद पहावया ।।६१।।
प्रेमीक पुसती निंबयालागून । आजी हे पताका आणिली कोठून । येरू म्हणे आतांचि ब्राह्मण । गेला देवोन यात्रेंत ।।६२।।
वृत्त पुसतां सांगे अत्यंत । ऐकतां जाले प्रेमभरित । म्हणती तो होय पंढरीनाथ । प्रसाद प्राप्त करविला ।।६३।।
जयासाठीं योगीवृंद । तापसी शिणती सिद्ध । तो वत्सें भेटला परमानंद । भाग्यमंद आम्हीच की ।।६४।।
आषाढीकार्तिकी । वारी करावी तुम्ही निकी । पडूं कधीं न द्या चुकी । प्रसाद आणखी पावाल ।।६५।।

ऐकोनि संतांचें वचन । प्रेमें धरिले त्यांचे चरण । म्हणे मज भेटवा जगजीवन । देवोनि दर्शन गेला जो ॥६६॥
निंबराजें करोनि त्वरा । पावला येवोनि भीमातीरा । वेगीं जावोनि पैलपारा । आनंद गजरा पाहिलें ॥६७॥
करोनि चंद्रभागेचें स्नान । पुंडलिकाचें घेतलें दर्शन । साधुसंतांसी करोनि नमन । बिऱ्हाड घेवोन राहिला ॥६८॥
तेव महाव्रत एकादशी । दर्शना चालिले राउळासी । बाह्य मंडपाच्या सुखासी । पाहतां मानसीं आनंद ॥६९॥
ठायीं ठायीं भजनें होती । नारीनर फुगड्या घेती । विठ्ठलनामें गर्जती । टाळिया पिटिती निजछंदें ॥१७०॥
हें कौतुक पाहोन । गरुडहनुमंतातें नमोन । मध्य मंडपीं जावोन । जयविजय पूर्ण अवलोकिले ॥७१॥
समीम मंडपीं रंगशिळा । तेथें दर्शनासी तिष्ठे मेळा । सन्मुख दिसतसे सांवळा । निंबया डोळां विलोकी ॥७२॥
वळें गाभारा उल्लंघोन । लाट केली अवलोकन । तया तळवटीं रिघोन । धरिले चरण हरीचे ॥७३॥
बुका लावोनि ललाटीं । तुळसीहार घातले कंठीं । आलिंगिला भावें जगजेठी । चरणीं मिठी घातली ॥७४॥
श्यामसुंदर सुहास्यवदन । विशाळ हृदय आकर्ण नयन । कटीं कर उभा समचरण । विटे जडून राहिला ॥७५॥
कृपाळू बाप जगजेठी । आल्या गेल्या देतो भेटी । कवणासी नाहीं आडकाठी । प्रीती पोटीं भाविकांची ॥७६॥
ध्यान विलोकिता सद्गदित । निंबया जाला प्रेमभरित । न निघवे तेथोनि परत । स्वरूपीं रत जालें मन ॥७७॥
असो बहवे करितां वारी । निंबया पावला दक्षिणद्वारीं । सन्निध लक्ष्मी बाहेरी । तीतें नमस्कारी आदरें ॥७८॥
सव्य घेतांचि भक्तसखा । पृथ्वीसी पाहिल्या अष्टनायका । अधिष्ठानीं भीमकन्यका । ती जगदंबिका वंदिली ॥७९॥
चौऱ्याशीचें घेवोनि दर्शन । क्षेत्रप्रदक्षिणें केलें गमन । क्षेत्रदैवतें पाहोन । वाळवंटीं येवोन पावला ॥१८०॥
तेथें कथाकीर्तनें होती । ठायीं ठायीं समाज दिसती । चरित्रें हरीची गाती । श्रोते डोलती प्रेमसुखें ॥८१॥
तो ब्रह्मानंद पाहोन । वेधलें निंबयाचें मन । वाटे ऐसें करावें कीर्तन । घोषें नारायण आळवावा ॥८२॥
हा छंद लागला मानसीं । मुखें गाय करुणा हरीसी । मग सरतां सर्व निशी । उदया द्वादशी पावली ॥८३॥
स्नानसंध्या नित्य नेम सारोन । नैवेद्य हरीसी केला अर्पण । क्षेत्रप्रदक्षिणा पुनरा करोन । रात्रौ कीर्तन श्रवण करी ॥८४॥
नित्यानित्य पाहतां सोहळा । पौर्णिमेसी वेणुनादीं काला । महाद्वारींचा प्रसाद घेतला । फुटला मेळा तेथोनी ॥८५॥
निंबया आज्ञा घेवोनी । पावला येवोन देवठाणीं । काहीं दिवशीं कांता येवोनी । बाळें घेवोनी पावली ॥८६॥
ते सुकुमार तिघे कुमर । केवळ त्रिमूर्तीचे अवतार । पाहतां निवे उभय अंतर । सफलित संसार निंबयाचा ॥८७॥
आनंदें क्रमितां काहीं दीन । तों कार्तिकी आली सन्निधान । कांतेसी बोले वचन । करितों प्रयाण पंढरीये ॥८८॥
कांता म्हणे दीड मास । अझोनि कार्तिकीस अवकाश । येरू म्हणे इच्छितें मानस । घालावें देवास दंडवत ॥८९॥
दंडवते उपनाम आम्हालागोनी । तें कोण्ही साधिलें पूर्वजांनीं । तोचि उद्धार जाला मनीं । परिपूर्ण करणी हरीची ॥१९०॥
ऐसें बोलोनि त्वरित । निंबया आरंभी प्रणिपात । देवठाणाहोनी निघत । जनलोक धांवत पाहावया ॥९१॥
जैसा जयाचा निर्धार । तो पूर्णकर्ता जगदीश्वर । भक्तिप्रेमा भाव साचार । त्यासी अंतर पडों नेदी ॥९२॥
गांवोगांवींचे लोक धांवती । परामर्श निंबयाचा करिती । जगीं वाढती जाली कीर्ती । जेवीं फांकली भानुप्रभा ॥९३॥

नित्यानित्य प्रीती करोन । अधिकाधिक वाढे नमन । वृत्ति सेवेमाजीं निमग्न । नामस्मरण सर्वदा ॥९४॥
येतां पंढरीचे जवळीक । अंतरीं वाटलें परम सुख । संत साधु पावले अनेक । पाहती कौतुक निंबयाचें ॥९५॥
गेला चंद्रभागा उतरोन । मनीं कळवळला नारायण । म्हणे मजसाठीं कष्ट सोसोन । निंबया दर्शन घेऊं आला ॥९६॥
प्रेम निंबयाचें देखोनि थोर । परम आनंदला रुक्मिणीवर । म्हणे हा प्रसादासि जाला पात्र । कृपा यावर करावी ॥९७॥
श्रीहरि जाले हर्षभरित । हें देखोनि रुक्मिणी पुसत । आजी महोत्साह देहीं होत । तो कोण अर्थ सांगावा ॥९८॥
तंव निंबयाचें आचरण । रुक्मिणीसी कथी स्वयें आपण । म्हणे भक्त हे वैराग्यसंपन्न । आवडले प्राण पैं माझे ॥९९॥
काय रुक्मिणी सांगूं तुजसी । तेणें सर्वस्व अर्पिलें मजसी । मायामोहप्रपंचासी । न गुंतोनि मानसीं नैराश्य ॥२००॥
ऐसें वागतें माझिये मनीं । प्रसाद करावा त्यालागोनी । तंव बोले आदिमाया रुक्मिणी । विचार मनीं नाहीं तुम्हां ॥१॥
जे घालोनि बैसले आसन । ध्यान मुद्रा मौन धारण । वायुआहार धूम्रपान । प्रसाद पावन न करा त्यां ॥२॥
पंचाग्नि साधोनि तपती । निराहारी राहोनि जपती । यज्ञयागीं अवदान घोपिती । त्यांसी न श्रीपती पावसी तूं ॥३॥
वेडेंवांकुडें भावडें । दुबळें पिसाट बोबडें । कुबजें लंगडें चिपडें । त्याचें कोडें पुरविसी ॥४॥
मुकें तोतरें अज्ञान । यातिमतिज्ञानहीन । अनाचारी पापी मलिन । त्यासी तुष्टोन पावसी ॥५॥
तंव हरि म्हणे रुक्मिणीसी । तूं तरी सत्यचि बोलसी । परी तीं माझीं मजऐसीं । पूर्ण पिसीं मजसाठीं ॥६॥
हीं माझीं मज जाणती । मजव्यतिरिक्त कांहीं नेणती । तुवां वर्णिलें ते जाणती । मज न मानती कांहीं ते ॥७॥
मज अनुसरल्याची सरी । काय कीजे त्या पामरीं । ते मरती मलया भरीं । ऐसीं जन्मागारीं भ्रमती ॥८॥
माझे वेडेवांकुडे परम भक्त । ते आन पदार्थी न होती सक्त । आशा लोभीं परम विरक्त । देतां न घेत कांहींच ॥९॥
तंव बोले ती रुक्मिणी । किती भूपवितां त्यांलागोनी । मी टकवीन त्या एक क्षणीं । पाहें चक्रपाणी आतांची ॥२१०॥
धनकामिनीतें बहु भुलले । शेखीं स्वकर्मा नाडले । याचे पाड ते केतुले । क्षणांत झोले देईन ॥११॥
पांडुरंग म्हणे तुझी मात । या वैष्णवापुढें न चले सत्य । तो वां पाहिला भागवत । जाला लोलिंगत परिसासी ॥१२॥
तंव रुक्मिणीसी क्रोध आला । म्हणे आजी टकवीन निंबयाला । कौतुक दावीन तुम्हांला । करकंकणाला आरसा क ॥१३॥ ऐसें बोलती गुह्य गुज । तंव नमीत पावला निंबराज । राउळीं नमोनी गरुडध्वज । मूर्ती सतेज पाहिली ॥१४॥
प्रार्थी जीवें भावें करोन । स्तवितां प्रेमें पाझरती लोचन । म्हणे सदया अनाथ मी आलों शरण । दे कृपादान आवडीचें ॥१५॥ मग बाह्य करी प्रदक्षिणा । नमिल्या हरीच्या अंगना । न करितां कांहीं प्रार्थना । राउळीं नमना पूर्ण केलें ॥१६॥
रुक्मिणी म्हणे केव्हडा धीट । मजपुढें न हालवीच ओठ । परी आतांचि करीन वीट । केले कष्ट बुडवीन ॥१७॥
तंव तो एकादशीदिन । होत आला अस्तमान । विन्हाडीं उपहार करून । कीर्तना जाऊन बैसला ॥१८॥
सर्व रात्र जागरण जालें । कीर्तनश्रवणीं मन उल्हासलें । म्हणे कृपाळे विठ्ठले । माझें न ठले पुरविसी ॥१९॥
या वाळवंटीं उभें राहून । स्वयें संतांपुढें करावें कीर्तन । अभ्यास नाहीं तळमळे मन । वय संपूर्ण चालिलें ॥२२०॥
मज न सुचे उपाय । पांडुरंग माझे माय । तुझे धरिले जीवीं पाय । सर्व होय तुझे हातीं ॥२१॥

मुका मुक्तेश्वर बोलविला । पांगुळा कूर्मदास चालविला । आंधळा सुरदास डोळस केला । मजविषयीं तुजला काय जालें ॥२२॥ काय तुज मागें धन संपत्ती । काय राजवैभवाची आस चित्तीं । म्हणोनी न पावसी जगत्पती । तरी ते मज निश्चितीं न लगेची ॥२३॥ माझी कीर्तनीं वासना । ते तूं पुरवी जनार्दना । आणिक नसेची कामना । भय मना न धरीं तूं ॥२४॥ ऐसा स्तुतिवाद करितां । भानू जाला प्रकाशता । संतीं ओंवाळिलें भगवंता । निंबया संता आलिंगी ॥२५॥ करोनिया जयजयकार । स्नाना चालिले यात्राभार । निंबया उठला सत्वर । चंद्रभागातीर पाहिलें ॥२६॥ मुखमार्जनादि करोन । स्नान संध्या केलें तर्पण । करोनिया देवतार्चन । म्हणे घेवोनि दर्शन यावें आधीं ॥२७॥ वेगीं राउळासी जातां । तंव पावली रुक्मिणीमाता । म्हणे ठकावें निंबयासि आतां । वैराग्यनिरोशता पाहूं याची ॥२८॥ मग स्वयें जाली माळीण । गाजरें घेतलीं हारा भरोन । उभ्या बाजारीं येवोन । बैसली झांकोन माळासी ॥२९॥ त्याच मार्गें निंबया आला । माळिणीनें पाचारिला । म्हणे होसी साधु भला । अंतरीं कळवळा दयेचा ॥३०॥ बोले जोडोनि करकमळ । क्षुधित टाकोनि आलें बाळ । तें करीत असेल कोल्हाळ । बहु व्याकुळ क्षुधार्थ ॥३१॥ तुम्ही घेऊं जातां दर्शन । परी येथें बैसाएक क्षण । ही पाटी करावी रक्षण । बाळा स्तनपान करोनि येतें ॥३२॥ निंबया म्हणे कितीक दूर । सांग तुझें असे घर । येरी म्हणे राउळीं निर्धार । असे पोर जवळीच ॥३३॥ तुम्ही क्षणभरी बैसा येथें । मीं त्वरें आतांचि येतें । कैसी टाकोनि राहीन मातें । हें का तुम्हातें न कळेची ॥३४॥ वर्म निंबयासी न कळे कांहीं । रक्षण बैसला तये ठायीं । म्हणे वेगीं ये बाई । वदे रखुमाई आतांची ॥३५॥ निंबयातें गुंतवोन । राउळांत गेली आपण । इकडे पाटीचें रक्षण । घटिका दोन पैं केलें ॥३६॥ तंव ती न येचि माघारीं । निंबया पडला विचारीं । म्हणे मी करूं कोण परी । तंव घटिका चारी लोटल्या ॥३७॥ जो तो पुसे निंबयासी । कासया येथें बैसलासी । येरू वृत्तांत सांगे त्यासी । विस्मित मानसीं ते होती ॥३८॥ अनेक दुकानें होतीं जवळी । त्यासी म्हणे ही पाटी सांभाळी । मालकीण गेली राउळीं । येतां जवळी यावी तिच्या ॥३९॥ ते म्हणती तूं रिकामा । आम्हांस पडले आपुल्या कामा । जीचें तीस यावें पावोनि श्रमा । मग आश्रमा तुम्हीं जावें ॥४०॥ मागुतीं निंबया बोले त्यासी । तुम्ही ओळखितां काय तिजसी । ठावें नसे म्हणती आम्हांसी । कधीं न तिजसी देखिलें ॥४१॥ तंव दिन आला दोन प्रहार । ती नये परतोन सुंदर । जीवीं आला खेद फार । म्हणे शारंगधर अंतरला ॥४२॥ राउळांतोनि आले संत । म्हणती बैसलां वेळ बहुत । येरें निवेदिला वृत्तांत । अद्यापि न येत काय करूं ॥४३॥ पाटीमाजीं काय आहे । वस्त्र सोडोनि तरी पाहे । मग सक्रोधें लवलाहें । सोडितां होय निंबया ॥४४॥ फांका चिरीत गाजरें । अवघें कनकाची सारें । देखोनि निंबया मागें सरे । तिरस्कारें अंतरीं ॥४५॥ म्हणे देवाधिदेवा पांडुरंगा । कां मांडिलासी मज दगा । मज नावडे ज्या संगा । तेंचि अंगा लिगटसी ॥४६॥ मागत असतां अमूल्य हिरा । तों पुढें सरसाविल्या गारा । इच्छित होतों मुक्त तुरा । तों कागरा धाडिलें ॥४७॥ प्रार्थिलें व्हावा राजबिंडा । तों उपजला कर्मी धोंडा । चिंतित होतों दुग्ध मांडा । तो सडका कोंडा लाधला ॥४८॥ हे देवाधिदेवा हृषीकेशी । मज दीना कां उपेक्षिसी । अनाथाची रळी करिसी । योग्य समर्थासी काय हें ॥४९॥

आर्धीच मरोनी मानसीं।त्यावरी अनन्या कां गांजिसी। आमुच्या छलनें कोप तुजसी।तरी सुदर्शनासी आज्ञा दे॥२५०॥
विरोधें बोलतां देवासी । सद्‌द जाला मानसीं । अनुतापें कंप देहासी । लुटविलीं यात्रेसी गाजरें ॥५१॥
जनलोक कौतुक पाहोन। म्हणती केव्हढा अभागी ब्राह्मण। प्राप्त जालें असतां कांचन। दिधलें लुटवोन फुकट कीं॥५२॥
एक म्हणती पिसाट थोर । त्यासी काय तें हाटकर। पंढासी प्रवीण सुंदर। काय खीर गाढवा॥५३॥
मुक्ताहार मर्कटासी । सुगंध उटणें रीसासी। मुक्ताचारा वायसासी । काय योजकासी म्हणावें॥५४॥
एक म्हणती निंबया साधू। न वाहे धनाचा आल्हादू। धना अंगीं अनर्थ बाधू। पंधरा संवाद् भागवतीं॥५५॥
म्हणोनि लुटविलें कांचन । निंबयासी आवडती हरिचरण । मृत्तिका शेण सोन । हें तों यासमान तयासी॥५६॥
कौतुक पांडुरंगें अवलोकिलें । तंव राउळीं निंबराज शीघ्र आले । गहिंवरें हृदय दाटलें । नेत्रीं सुटले पाझर॥५७॥
म्हणे देवा कृपावंता । कां छळिसी मज अनाथा । मज काय करणें या धनवित्ता । घालिसी गुंता भ्रान्ताची॥५८॥
हें जयासी आवडे । त्याचें न पुरविसी कोडें । त्यासी घालिसी सांकडें आम्हां वाडेंकोडें देसी तूं॥५९॥
नाहीं विषय प्रपंचीं चाड । तुझें नाम आम्हां गोड । कीर्तनसुखाची आवड । मुख्य जोड पाय तुझे॥२६०॥
पांडुरंगा पतितपावना । हेचि माझी विज्ञापना । ते आणोनिया मना । पुरवी वासना कृपानिधी॥६१॥
यावरी लावसील विटाळ । तरी प्राण सांडीन तात्काळ । माझें अंतर जाणसी सकळ । विपरीत खेळ नको हे॥६२॥
यापरी निंबया देवासी । प्रार्थोनि नमी चरणासी । मग जावोनि रुक्मिणीपाशीं । सांष्टांगेंशीं वंदिलें॥६३॥
म्हणे माते जगज्जननी। मूळपीठे विश्वस्वामिनी। बरीच कृपा केली आजिचे दिनीं। टाकिलें गोवोनी अनाथा या॥६४॥
हें काय तुम्हांसी उचित । व्यसनीं पाडावें शरणागत । न जाणावें अनन्याचें हित। त्यासी घात योजावा॥६५॥
ऐसी तूं माउली कैसी । आळ बाळाची न जाणसी । पय मागतां विष देसी । निष्ठुर मानसीं किमर्थ॥६६॥
कोण अपराध पाहिला । म्हणोनी हा दंड योजिला। कां मानसीं आला वंटाळा । देसी बाळा लोटोनी॥६७॥
येयोनि आतां कृपा करा । आपुली माया आपण आवरा । तें ऐश्वर्य न रुचे आम्हां पामरा । चरणीं थारा देइजे॥६८॥
तुम्ही ऐश्वर्यनिधी उदार । तरी बहुत असती मागणार । सुखें तोषवा त्यांचें अंतर । आम्ही क्षुधातुर कृपेचे॥६९॥
यापरी विनवोनि मातेसी । आपण गेला आश्रमासी । नैवेद्य करोनि वेगेंसी । अर्पोनि हरीसी सेवीत॥२७०॥
संध्यावंदन करोनि।कीर्तनीं बैसला करूं श्रवण।इकडे रुक्मिणीसी म्हणे जगज्जीवन। पाहिलेंसि चिन्ह निंबयाचें॥७१॥
तुम्हीं प्रकार दाविला अद्‌भुत। परी तो काय जाला लोलिंगत। सुवर्ण गाजरें लुटोनि देत। निकुर करीत आपणावरी
॥७२॥ विनवोनी बोले रुक्मिणी। धन्य तुझे भक्त चक्रपाणी। नाहीं ऐश्वर्य चाड त्यांचे मनीं। पाहिलें कसोनी देवराया
॥७३॥ पूर्ण कळलें शारंगधरा। निंबया तुझा भक्त खरा। यासी आतां अंगीकारा। ळठे सुंदरा पुरविजे॥७४॥
तंव जालासे प्रभात। निंबया स्नानालागीं। जात। वृद्ध साधु होवोनि रुक्मिणीकांत। पावला त्वरित चंद्रभागे॥७५॥
निंबया निघतां परतोन। तयासी बोले ब्राह्मण। मजसी करणें असे स्नान। एक क्षण उभा राहे॥७६॥
येथें भय उचल्यांचें। पद ऐश्वर्य जतन करीं आमुचे। मग काढोनि सर्व अंगींचें। स्वाधीन निंबयाचे करीतसे॥७७॥

मायुर्ती म्हणे तूं विदेही। हातींचे गमावसील पाहीं। आपुले अंगीं सर्व लेईं। म्यकरें शेषशायी श्रृंगारीत ॥७८॥ कंठीं घालीत तुळसीमाळा। अंगीं बाणविली मेखळा। कटीं बांधिला पीतांबर पिवळा। टोपी शिरकमळा घातली ॥७९॥ काठी दिधली करांत। पादुका लेववी पायांत। चिपळ्या देवोनि हातांत। बोले भगवंत सांभाळीं ॥२८०॥ आतां सुखें करीं भजन। मी करूं जातों स्नान। ऐसें बोलोनि मधुसूदन। गेले निघोन शीघ्र गती ॥८१॥ निंबया उभा निवांत। वाचे श्रीहरीचें भजन करीत। वेळ जाला बहुत। न ये परत ब्राह्मण तो ॥८२॥ संत जंव अवलोकिती। निंबया दिसे पांडुरंगमूर्ती। सद्भावें नमोनि आलिंगिती। आल्हाद चित्तीं सकळांच्या ॥८३॥ तंव निंबराज विनवी संतां। काय करूं मी सांग आतां। द्विज लावोनि गेला चिंता। येतों आतां म्हणोनी ॥८४॥ हें ऐश्वर्य मातें सोंपिलें। सांभाळीं म्हणोनि बोलिले। आपण स्नानालागीं गेले। परत न आले अद्यापी ॥८५॥ त्यासी जाला एक प्रहर। कोणता करूं सांग विचार। साधु म्हणती सर्वेश्वर। प्रसाद निर्धार देवोनि गेला ॥८६॥ हें प्रासादिक भूषण। पावलें सत्य तुज लागोन। करीं यातें जतन। तुष्टला नारायण तुज खरा ॥८७॥ मग मिळोनि संतमंडळी। जयजय करोनि पिटिली टाळी। म्हणती कृपाळु हा वनमाळी। पुरवितो आळी दासाची ॥८८॥ हें परिसोनि संत अभयवचन। निंबया साष्टांग घाली नमन। सप्रेमें देत आलिंगन। उत्साह पूर्ण मानसीं ॥८९॥ पहावया प्रसादकौतुक। यात्रा लोटली सकळिक। निंबयासी नमिती भाविक। पाहतां सुख सर्वांसी ॥२९०॥ पौर्णिमेसी वेणुनादीं। काल्यासी गेली संतमांदी। प्रसाद सेविती परमानंदीं। निंबया निजछंदीं नाचत ॥९१॥ येतां पश्चात् वंदोन। राउळा पावले येवोन। निंबया पाहे हरिवदन। करी नमन सप्रेमें ॥९२॥ म्हणे देवाधिदेवा विश्वंभरा। करुणाघना परात्परा। अनाथबंधो रुक्मिणीवरा। सदय उदारा पांडुरंगा ॥९३॥ मज दीनाची करुणा। आली तुज स्वामी कृपाघना। मज लेविलें भूषणा। परी कामना उरली कीं ॥९४॥ कीर्तनीं तुझे गुण गावे। सप्रेमें निर्भय आळवावें। हा सोस घेतला जीवें। तो माधवें पुरवावा ॥९५॥ नाहीं मज पाठपाठांतर। न कळे कांहीं ताल सूर। हेतु तरी उद्भवला थोर। जाणसी अंतर सर्व माझें ॥९६॥ कृपाकरा जगन्निवासा। ही पुरविजे माझी आशा। तुझें लडिवाळ मी सर्वेशा। श्रीरमेशा कृपानिधी ॥९७॥ यापरी करोनि विनंती। स्वस्थाना गेला निश्चितीं। कृपें द्रवला श्रीपती। गजवदनाप्रती पाचारिलें ॥९८॥ म्हणे जाय निंबयासी। प्रसाद देईं कीर्तनरसीं। सिद्धिबुद्धी तुजपाशीं। विलंब यासी न करावा ॥९९॥ विठ्ठलासि विनवी गजवदन। सर्व सत्ता तुमची पूर्ण। वाढवीनसां आमुचें भूषण। आज्ञा प्रमाण आम्हांतें ॥३००॥ इकडे निंबया रजनींत। निमग्न असतां निद्रागत। कौतुक स्वप्नीं पाहत। ब्राह्मण आरक्त विशाळ दोंदी ॥१॥ म्हणे हो निंबया सावधान। करीं तूं हें प्रसादसेवन। सुखें करिसील कीर्तन। वक्तृत्व निरोपण गोड बहु ॥२॥ स्वमुखिचा तांबूल काढिला। निंबयाचे करीं दिधला। तेणें सुपुष्टीत सेविला। रस चोखिला हृदयांत ॥३॥ पाठ नसतां करिसील कीर्तन। प्रसंगीं रंगदेवता होईल प्रसन्न। कोणतेही कीर्तनीं न पडे न्यून। सप्रेम हरिगुण गासील ॥४॥ अखंडित हा वरद। तुज दिधला प्रसिद्ध। भोगीं आतां ब्रह्मानंद। आनंदकंद पावेल ॥५॥

ऐसे वरप्रसाद देवोन । अदृश्य जाला गजवदन । निंबया जाला सावधान । आठवोनि स्वप्न विचारी ॥६॥
म्हणे हें स्वप्न कैसें काय । मुखामाजीं तांबूल आहे । अवलोकोनि कराकडे पाहे । धूतां न जाय डाग तो ॥७॥
असो. प्रभाते उठोन । केलें चंद्रभागा स्नान महाद्वारींचा प्रसाद सेवोन । आज्ञा घेवोन निघाला ॥८॥
पंथ चालतां सहजेसी । कोण्ही वर्णिलें सेत्राळतीर्थासी । मनीं वागलें जावें स्नानासी । वेगीं त्या स्थळासी पावला ॥९॥
पर्वतावरी चढोन । कठिण पंथ निबिड कानन । तें सरोवर पुण्य पावन । करिती स्नान सिद्ध मुनी ॥२१०॥
तेथोनि मांडव्यऋषीचं स्थळ एक योजन पूर्वेसि निर्मळ । उत्तरेसी लंबयोजन पर्वत विशाळ । महादेश्वर प्रबळ लिंग असे ॥११॥ सरोवराचे नैऋत्य कोनीं । मल्हारलिंग अर्ध योजनीं । यापरि सभोंवतीं मांडणी । अद्भुत अवनीं हें तीर्थ ॥१२॥
तेथें करितां अनुष्ठान । मनकामना होतसे पूर्ण । नित्य योगी सिद्धांचें आगमन । होतसे दर्शन बहुतांसी ॥१३॥
तेथील भूमी कनकमय । व्यासें वर्णिला तो ठाय । साधकां तेथें लाभ होय । भागीरथीतोय तेथींचें ॥१४॥
तो महिमा ऐकोन । निंबराज आले घ्यावया दर्शन । प्रेमभावें केलें स्नान । सवेंचि पूजन शिवाचें ॥१५॥
भावें अर्चिला उमावर । करीन बैसले भजनगजर । लोटोनि गेले तीन प्रहर । कांहीं उपहार न केला ॥१६॥
होत आला अस्तमान । उमेसि बोले पंचवदन । माझा प्रसादपुत्र हा निंबया जाण । वैराग्यसंपन्न भावार्थी ॥१७॥
पांडुरंगें गौरविला । तव पुत्रें प्रसाद दिधला । यात्रा साधोनि येथें आला । क्षुधित बसला यथोनी ॥१८॥
यास्तव तुम्हीं प्रगट व्हावें । आर्त स्वार्थ पुरवावें । अमयें अंतर तोषवावें । पावन करावें लडिवाळा ॥१९॥
शिववचनीं आनंदोन । गौरी जाली गौळण । दधिदुग्धें पाटी भरोन । पावली येवोन जगदंबा ॥२२०॥
लावण्यरूपातें जागलें । निंबयानें दृष्टीं पाहिलें । म्हणे माते अस्तवेळे । वस्तवेळें । वस्ती स्थळें हीं नसतीं ॥२१॥
अंबा म्हणे आम्हांसी । नित्य जाणें येणें या पंथासी । तुम्ही कां बैसला या ठायासी । जाले भोजनासी कीं नाहीं ॥२२॥
निंबराज म्हणती तीर्थ पावन । आजी आम्हां क्षेत्रउपोषण । तंव जगदंबा पाटी उतरोन । पात्र भरोन पय देत ॥२३॥
म्हणे काननी कैचें निरशनासी । करा या आनां पयपानासी । मग आवांका येईल भजनासी । वाचा सरसी चालेल ॥२४॥
आमचे गाईचें दुग्ध गोड । सेवितां पुरे अंतरींचें कोड । तुम्हां कार्तनाची आवड । जोडवील जोड रसना हे ॥२५॥
निंबराज हसती गद्गदा । माते बाळासी करिसी फार प्रीती । अंबा म्हणे त्वरीत गती । सेवा अनुभूतीं कळेल ॥२६॥
भाविक नरहरीचा किंकर । प्राशी पय अति सत्वर । तृप्त जाला धणीवर । करी नमस्कार अंबेसी ॥२७॥
अंबा म्हणे द्विजवरा । मी जातें आपुल्या घरा । आनंदें तोषवाल सारीनरां । कीर्तनगजरा करोनी ॥२८॥
वर देवोनि गुप्त जाली । तें निंबया ती माव कळली । जिव्हेसि स्फूर्ती फावली । मति विकासली काव्यार्थ ॥२९॥
रात्र सारिली नामस्मरणीं । प्रभातें निघाले तेथोनि । आनंदें पावले स्वभुवनीं । उल्हास मनीं कीर्तनाचा ॥२३०॥
हें जे पदती आख्यान । भक्तिभावें करिती श्रवण । तयां तुष्टेल नारायण । हेतु पूर्ण करील तो ॥३१॥
अनंतसुत विनवी संतां । पाहोनि पुढें गोड कथा । श्रीअविनाश होय वदविता । तुम्ही भावार्थी जाणते ॥३२॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । सदा परिसोत भाविक भक्त । नवपंचदशोध्यायार्थ गोड हा ॥३३॥

# अध्याय ६० वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जयजय पंढरीशा दिगंबरा । अजअजित सर्वेश्वरा । निगमागमवंद्या परात्परा । अखिल सारा सर्वज्ञा ॥ १ ॥
जयजय पांडुरंगा सर्वोत्तमा । गुणातीता आत्मारामा । आनंदकंदा सुखविश्रामा । पूर्ण कामा जगद्गुरु ॥ २ ॥
जय पुंडलीकवरदा विठ्ठला । सच्चिद्घना पूर्ण कृपाळा । अनाथनाथा त्रिभुवनपाळा । पुरविसी लळा भक्तांचा ॥ ३ ॥
अनन्यभावें तुतें शरण । जे जे होती भक्तजन । त्यांसी देसी कृपादान । वारिसी शीण तयांचे ॥ ४ ॥
भक्त तुझे आवडते । त्यांचे मनोरथ करिसी पुरते । मागिलें अध्यायीं निंबयातें । भूषविलें हातें आपुल्या ॥ ५ ॥
धाडोनिया विघ्नेश । तांबूलप्रसाद दिधला त्यास । स्नाना जातां सेवाळ्यास । पावची प्रसादास जगदंबा ॥ ६ ॥
दीन हीन पामर । त्याचा भूपें करितां अंगीकार । मग ग्रामीक सभाग्य नर । करिती सत्कार मानिती ॥ ७ ॥
तैसी समर्थे साह्यता केली । मति निंबयाची प्रकाशिली । भक्तिकीर्तना उद्भवली । कृपाकल्लोळीं तुमच्या ॥ ८ ॥
वक्ता विनवी श्रोतेजना । निंबराज आरंभी कीर्तना । सादर होइजे श्रवणा । चित्त निरोपणा देइजे ॥ ९ ॥
टाळ वीणा मृदंग । साहित्य मिळवी सांगोपांग । मांडिला सुरस कीर्तनप्रसंग । वदनीं पांडुरंग आळविला ॥१०॥
निर्भय उभा राहिला कीर्तनीं । नवल जालें सर्व जनीं । धांव घातली श्रवणीं । जैसे प्रयोजनीं वराडी ॥११॥
पुढें वीणा वाजवी स्वयें सुस्वर । मागें ताल धरती दोघे कुमर । शिवराम नारायण नामधर । रूपें मनोहर साजिरे ॥१२॥
शैव वाजवी मृदंगासी । निंबया आळवी पांडुरंगासी । गजर करोनि अभंगासी । गातां व्यंगासी पडेना ॥१३॥
निंबया करी निरोपण । श्रोते देती अवधान । तालस्वर चाले संगीन । मागें नंदन सांभाळिती ॥१४॥
भजनीं वाजवी करटाळी । तदुपरी वाजवी श्रोतेमंडळी । भजनगजर धुमाळी । आनंद मेळीं गर्जना ॥१५॥
अभंग पदें अवघीं नूतन । तसेंचि टीकेचें निरोपण । ऐकोनि श्रोते निमग्न । देहभान विसरती ॥१६॥
हरिगुण यश कीर्ती । सप्रेमें कीर्तनीं गाती । कांहीं कथाभागा योजिती । यथा पद्धती निरोपण ॥१७॥
नित्यानित्य प्रसंग । कीर्तनीं ओढवे अद्भुत रंग । श्रोते श्रवणीं होती दंग । म्हणती धन्य संग फावला ॥१८॥
नवल करिती अवघे जन । म्हणती कधीं शिकला हा कीर्तन । रसवृष्टी होतसे सघन । योजितो व्याख्यान अद्भुत
॥१९॥ माग ताल धरिती हे कुमर । कोठें केलें पाठांतर । वाणी गोड रस मधुर । वाटे चमत्कार आम्हांतें ॥२०॥
जेंवि कोणी गुरु बोलती । येणें सेवा करोनि तोषविला श्रीपती । त्याची कृपा हे निश्चिती । अद्भुत मती त्यायोगें
॥२१॥ प्रसन्न होतां भास्कर । कोठोनि राहे अंधकार । साह्य होतां रोहिणीवर । तापसंहार सहजची ॥२२॥
तेवी तुष्टतां कृपाघन । देहीं नुरेचि अज्ञान । अबाधित प्राप्त होय ज्ञान । हें महिमान कृपेचें ॥२३॥
जाली निंबयासी हरिकृपा । तेणेंचि हा मार्ग जाला सोपा । हृदयीं उजळिलें ज्ञानदीपा । येणें रूपा वर्म हें ॥२४॥
डोहाळींच जाणावें गर्भासी । औदार्यें ओळखिजे दात्यासी । आचरणीं ओळखिजे वर्णासी । शब्दें पंडितासी जाणिजे
॥२५॥ तेवीं निंबयाच्या कीर्तनावरोनी । कृपा आली आम्हां कळोनी । हा रस कृपेवांचोनी । भलते वदनीं न निपजे

॥२६॥ असो कीर्तन करितां निंबराज । अधिकाधिक मिळे समाज । संसार प्रपंच सोडोनि काज । न धरोनि लाज धांवती
॥२७॥ भावार्थ करिती श्रवण । श्रवणींच वेधलें मन । मन होतसे उन्मन । कीर्तनीं विरोन जाय वृत्ती ॥२८॥
कीर्तनवृष्टी सुरस । श्रोतेवक्ते समरस । तेथें कैंचा विरस । ब्रह्मरस प्राशिती ॥२९॥
भक्तिमार्ग बोधिला जगीं । अवघेचि वेधिले पांडुरंगीं । विषयी जाले वीतरागी । निंबयासंगीं रंगले ॥३०॥
ऐकोनि निंबयाची ख्याती । वैदिक पंडित ज्ञाते येती । वैगुण्य आगं इच्छिती । श्रवणें होती तल्लीन ॥३१॥
स्पर्शमण्यासी कठिण गारा । भिंडू गेल्या रोषें सैरा । परी त्या होवोनि ठेल्या हिरा । पडिल्या विसरा मागिल्यातें ॥३२॥
तेवींच निंबयाचे कीर्तनीं । जाती आपणत्या विसरोनी । आत्ममीपण जाय विरोनी । विनतचरणीं ते होती ॥३३॥
कीर्तनानंद घोषीं । वेधला विलास सकळांसी प्रेमें अनुसरले भक्तीसी । भावें निंबयासी भजती ते ॥ ३४ ॥
सर्व जनांसी लागली गोडी । तंव समीप आली आषाढी । आनंदाची उभविली गुढी । मनीं आवडी दर्शनाची ॥३५॥
निंबया म्हणे सर्वांसी । चला बापहो पंढरीसी । भेटूं प्रीतीं वैष्णवांसी । पाहूं हृषीकेशी धणीवरी ॥ ३६ ॥
तो सकळांचा मायबाप । जयाचे नामीं काळा कंप तो शरणागतासी सकृप । ताप संताप वारितो ॥ ३७ ॥
त्यासी जातां शरण । करी जन्मकर्मनिवारण । तोडी सकळ भवबंधन । करितो पावन पतितातें ॥ ३८ ॥
शरणागत त्याचे स्नेहाळ । त्यांची पुरवितो स्वयें आळ । परम कृपाळू गोपाळ । चला चरणकमळ पाहूं त्याचे ॥३९॥
ऐकोनि निंबयाचें वचन । सिद्ध झाले भाविक जन । म्हणती दावीं आम्हां त्याचे चरण । कृपावन पाहू तो ॥४०॥
सिद्ध वारकऱ्यांचे भार । पताका उभविल्या अपार । टाळ विणे मृदंग सुस्वर । ढोल झल्लर दमामे ॥ ४१ ॥
चाळ चिपळ्या वाजती । नाना वाद्यनाद उठती । चालतां ठायीं ठायीं नाचती । घोष करिती नामाचा ॥ ४२ ॥
गांवोगांवींचे जन । निंबयासी घालिती लोटांगण । मुक्कामीं गेलिया करिती कीर्तन । आदरें श्रवण प्रेमसुखें ॥४३॥
चालतां पताका फडकती । नाद वाद्यांचे उठती । वैष्णव नामघोषें गर्जती । भंवर घालिती ठायीं ठायीं ॥ ४४ ॥
ऐसा आनंद गजर । करितां पाहिलें हरिशिखर । आरत्या करोनि नमस्कार । येरायेर आलिंगिती ॥ ४५ ॥
अंगीं रोमांच उभारले । हृदयीं सद्गदित जाले । नेत्र उदकें हेलावले । प्रेमें गहिंवरले सर्वही ॥ ४६ ॥
उल्हासें पावले भीमातीर । उतरोनि गेले पैलपार । नामघोषें जयजयकार । यात्रा अपार दाटली ॥ ४७ ॥
निंबराज उभे वाळवंटीं । साधुसंतां जाली भेटी । आलिंगनीं पडली मिठी । होतसे वृष्टी प्रेमाची ॥ ४८ ॥
करोनि चंद्रभागे स्नान । घेतलें पुंडलिकाचें दर्शन । त्वरें राउळातें जावोन । साष्टांग नमन महाद्वारीं ॥ ४९ ॥
नमोनि नामयाची पायरी । संचरले मंडपांतरीं । एकमेळें नरनारी । खेळती परोपरी फुगडिया ॥ ५० ॥
तो सुखसोहळा अपार । ब्रह्मानंदें होतसे गजर । पुढें वंदोनि गरुडपार । मारुती कर जोडोनि ॥ ५१ ॥
नमोनि मध्यमंडपीं गेले । जयविजयातें पाहिलें । समीप मंडपीं रंगशिळे । नाचत जाले वैष्णव ॥५२॥
तेथोनि पाहिलें हरिवदन । चित्ता वाटलें समाधान । निकट गाभारा उल्लंघोन । लाट स्पर्शन पैं केलें ॥५३॥
परतें जातां सिंहासनीं । उभा विटे चक्रपाणी । कर ठेवोनिया जघनीं । पाहे निरखोनि निजभक्त ॥५४॥

तो मायबाप देखोनि दृष्टीं । बुका लाविती ललाटीं । तुळसी सुमनहार घालिती कंठीं । चरणीं मिठी संप्रेमें ॥५५॥
हरिमूर्ति निरखोन । बाहें कवळिती नारायण । जीवें करिती निंबलोण । मागुतीं नमन सारिती ॥५६॥
बडवे करितां वारी । जन पावती दक्षिणद्वारीं । उतरोनि पायऱ्या झडकरी । गर्जती सुस्वरीं नामघोषें ॥५७॥
क्षेत्राधिपति मल्लिकार्जुन । त्यांचें घेवोनि दर्शन । श्रीलक्ष्मी सन्य घालोन । नायका संपूर्ण नमियेल्या ॥५८॥
आदिमाया रुक्मिणी । तीतें निजभावें नमोनी । चौऱ्याशींतें पाहोनी । मध्यमंडपीं येवोनी नमियेलें ॥५९॥
महाद्वार ओलांडिलें । चोख्यातेंहि अवलोकिलें । मग क्षेत्रप्रदक्षिणेतें केलें । बिऱ्हाडीं पावले सर्वही ॥६०॥
तृतीय प्रहरीं वाळवंटीं । जाली वैष्णवांची दाटी । उभारिल्या पताका थाटी । जाल्या भेटी एकमेकां ॥६१॥
सर्व वारकरी पंढरीसी आले त्यांसवें तुक्यानें पत्र हरीसी धाडिलें । तें देवापुढें वाचिलें । तें ऐकिलें पांडुरंगें ॥६२॥
तें विठ्ठल बोले रुक्मिणीसी । शरीरपीडा तुकयासी । न येववे येथें तयासी । म्हणोनि पत्रासी धाडिलें ॥६३॥
हा आषाढींचा सोहळा अद्भुत । दर्शनासी पावले साधुसंत । मज जाणां नये निश्चित । कोण अर्थ करावा ॥६४॥
निंबयाराज भक्तशिरोमणी । तो परम उत्साह पावला येवोनि । त्यासी तोषवावें आजिचे दिनीं । हेतु मनीं फारसा ॥६५॥
तंव रुक्मिणी म्हणे अनाथनाथा । कल्पतरूसी कायसी चिंता । चिंतामणीसी उद्विग्नता । कैंची समर्था तेवि तुम्हां ॥६६॥
तुकयासी पाठवुनी मूळ । आणवावा जी उतावेळ । मग गरुडा धाडिलें तात्काळ । गेला पळ न लगतां ॥६७॥
तुकयानें गरुड पाहोन । केलें तया साष्टांग नमन । म्हणे तूं श्रीहरीचें वहन । आम्ही पूर्ण दास त्याचे ॥६८॥
गरुड म्हणे स्कंधीं बैसावें । हरिदर्शना वेगीं चलावें । येरू म्हणे पद न ठावें । शोभे बरवें ज्याचें त्या ॥६९॥
हरीसी सांगा माझी विनंती । येवोनि भेटावें लक्ष्मीपती । शरीरीं पावलों बहु ग्लानी । करुणा चित्तीं येऊं दे ॥७०॥
गरुड पावला हरीपाशीं । निवेदिलें अवस्थेसी । मग आज्ञा केली शेषासी । तुम्ही तुकयासी आणावें ॥७१॥
न लगतां एक क्षण । शेष गेला आज्ञा वंदोन । करितां तुकयासी पाचारण । येरू नमन करी त्या ॥७२॥
तुकया म्हणे तूं पवित्र । अंगासनें फणीछत्र । वरी पहुडे राजीव नेत्र । प्रिय पात्र त्याचा तूं ॥७३॥
आम्हीं करावें तुम्हां वंदन । पद स्पर्शावया अधिकार कोण । काय सुषुप्ती दाटली त्यालागोन । न येववे म्हणोन धाडी तुम्हां ॥७४॥ देहदुःखें प्राण व्याकुळ होती । अंगीं नसे अणुमात्र शक्ती । यालागीं तुम्हा माझी विनंती । आळवा श्रीपती जागवा ॥७५॥ तुझे लाडके सज्जन । त्यांसाठीं वेधलें मन । मी वाट पाहे अनाथ दीन । येवोनि शीण निवारीं ॥७६॥ फणींद्रा हरीतें सांगावें । मजसाठीं फार विनवावें । सांगा अनाथा दर्शन द्यावें । मज न साहवे तव विरह ॥७७॥
फणिवरें करोनि श्रवण । त्वरें पाहिले हरिचरण । विनवणी तुकयाची केली निरोपण । जाली श्रवण हरीतें ॥७८॥
इकडे भिवरेचे तीरीं । साधुसंत मिळाले वारकरी । निंबयासी ते अवसरीं । बोलती कुसरी ऐका ते ॥७९॥
तुम्हां श्रीहरि जाले कृपावंत । प्रसादभूषणें सकरें लेववित । तेणें सुखावलें तुमचें चित्त । परी अर्थ काय केला ॥८०॥
जाला तुम्ही प्रसादपावन । तरी या वाळवंटी करावें कीर्तन । तें करूं आजी आवडीं श्रवण । ऐसें मन इच्छितें ॥८१॥
देखोनि संतांचा हेत । जाले निंबराज आनंदभरित । तुम्ही साह्य असतां कृपावंत । सादर सेवेंत सेवक हा ॥८२॥

बोलतां पावला अस्तमान। पुढें आरंभिलें कीर्तन। टाळ विणे मृदंग आणोन। स्वर संपूर्ण मेळविले ॥८३॥
कर्निनीं बैसले संत। त्यांचीं नामें विख्यात। संतोबा पवार तो गणेशनाथ। बोधला बहुत भावार्थी ॥८४॥
शेख महंमद मुसलमान। प्रल्हादबाबा ब्राह्मण। भक्त माविक सज्ञान। यात्रा जन अपार ॥८५॥
वैदिक शास्त्री पुराणिक। पंडित ज्योतिषी चार्वाक। गृहस्थ भिक्षुक वर्ण अनेक। बैसले संकळिक श्रवणासी ॥८६॥
सभोंवतीं श्रवणीं सज्जन। मध्यें निंबयाचें कीर्तन। श्रीपांडुरंगाचें करोनि ध्यान। विठ्ठला ये म्हणोन पाचारिलें ॥८७॥
हांवेसरसे प्रेम दाटलें। जीवनपाझर नेत्रीं सुटले। भजनीं नामघोष केले। नादें दुमदुमलें भीमातीर ॥८८॥
प्रेमावांचोनि भजन। तेथें न वसे नारायण। लावण्यवती कुंकुमहीन। मुख मलिन तें होय ॥८९॥
षड्रस अन्न रांधिलें। लवणविणें फिकें जालें। सेविनां नवजाय सेविलें। लवणें जालें ग्राह्य सर्वां ॥९०॥
तेवीं निंबयाचे कीर्तन। प्रेमभरित निरोपण। काव्यरसिक नूतन। मुखांतून निघतसे ॥९१॥
निरोपणीं अद्भुत रस। श्रवणीं आनंद श्रोत्यांस। वारंवार करिती नामघोष। पिटीती टाळीस आनंदे ॥९२॥
हरिविठ्ठलनामें गर्जना। नाद भेदीत जाय गगना। ध्वनी पडतांचि काना। देव विमाना आरूढले ॥९३॥
ऐकावया कथानंद गजर। विमानीं दाटले सुरवर। दुमदुमलें देखोनि भीमातीर। हर्षे निर्भर विमानीं ॥९४॥
श्रीहरीची यशकीर्ती। गावोनि भक्तिभाव स्थापिती। प्रसंगतरा चरित्रे वाखाणिती। गोड निरोपिती भावार्थ ॥९५॥
भजनानंदीं निंबया नाचत। रंग अद्भुत ओढवत। श्रवणीं श्रोते डुल्लत। प्रेमभरित सर्वही ॥९६॥
निरोपणीं वेधलें मन। तैसेचि नेत्र आणि कर्ण। टाळिया चुटक्या करें करून। न चळे आसन कवणाचें ॥९७॥
जे जे जयाची आवड। ते ते श्रवणमात्रें पुरे कोड। ऐकती एकाग्र निवाड। म्हणती गोड कथा हे ॥९८॥
सेवितां तो कथारस। कोण्हा नुपजेचि आळस। निद्रा न ये नयनांस अंतरी उल्हास न माये ॥९९॥
अनुपम कीर्तनीं आनंद सोहळा। निंबया अंगीं प्रेम कळा। ते देखोनि धांवला सांवळा। दावी लीला अद्भुत ॥१००॥
निंबयाचे स्कंधावरी। चिमणे रूप उभा हरी। मोरकुंचे द्वय करीं। निंबयावरी ढाळीत ॥१॥
ब्रह्मानंदें कीर्तन होत। त्या रसीं निमग्न समस्त। न कळे जाली प्रभात। देहातीत सर्वही ॥२॥
तंव एक सावकारसुंदरी। रजनीत होती मंदिरीं। स्नाना चालिली भींवरेतीरीं। तंव समाज दूरी पाहिला ॥३॥
आनंदें होतसे कीर्तन। तें अवलोकी राहून। तों निंबयास्कंधी नारायण। कुंचे ढाळून राहिला ॥४॥
यज्ञयाग नाना करिती। अवघड तपें आचरती। जपमुद्रा मौन धरिती। तयां न प्राप्ती लाभे हे ॥५॥
तो भक्तभाविकांलागोनी। सुलभ जाला कीर्तनीं। ते याकडेही न पाहोनि। निमग्न भजनीं तल्लीन ॥६॥
शिव ज्यातें ध्याय चित्तीं। ब्रह्मादिक जया स्तविती। ते सगुण पांडुरंगमूर्ती। स्कंधावरुती पाहिली ॥७॥
घनश्यामवर्ण सकुमार। किरीटकुंडलें प्रभाकर। वैजयंती मुक्ताहार। पायीं तोडर वांकि वाळे ॥८॥
कटिप्रदेशीं पीतवसन। क्षुद्र घंटा दैदिप्यमान। हृदयीं शोभे वत्सलांछन। करीं कंकणमुद्रिका ॥९॥
सुहास्य वदन अतिसुंदर। आकर्ण नयन पद्माकार। सरळ नासिक बिंबाधर। कुंतलांकुर वक्र ते ॥११०॥

क्षीरोदक वरी पाटोळा । शोभा साजिरी पद्मकमळा । चिमणें रूप स्कंधस्थळा । अंगी मेखळा कनकवर्ण ॥११॥
ऐसी मूर्ति अवलोकितां । आनंद न समाये तिच्या चित्ता । तटस्थ नयन पाहतां । धांव अतौता ते घाली ॥१२॥
जेवीं देखोनि धेनूतें । वत्स धांवे न धरते । कीं माय देखोनि बाळातें । तैसें तीतें जाहलें ॥१३॥
कीं चुंबकातें देखोन । लोह होय त्वरें संलग्न । तेवीं सावकारपत्नी धांवोन । धरी चरण निंबयाचे ॥१४॥
म्हणे बा रे धन्य होसी । पार नाहीं तव भाग्यासी । जीवें निंबलोण करीन तुजसी । स्कंधीं ह्यपिकेशि वाहिला ॥१५॥
सर्वेंची प्रेमे दे आलिंगन । वरतीं पाहे जंव न्याहाळून । तों न दिसे मनमोहन । करी रुदन आक्रोशें ॥१६॥
तंव श्रोते म्हणती काय जालें । येरी म्हणे चिमणे रूप सांवळें । निंबयाचे स्कंधीं पाहिलें । मोरकुंचे धारिले द्वय करीं ॥१७॥ श्यामसुंदर सुहास्य वदन । मुगुटकुंडलें देदिप्यमान । वैजयंती कौस्तुभ पीतवसन । प्रभायमान साजिरी ॥१८॥
कंठीं मुक्तहार एकावळी । शोभा अनुपम चरणकमळीं । दक्षिणां मोरकुंचें वनमाळी । स्कंधस्थळीं पाहिला ॥१९॥
पाहतां मन जाले पिसे । येवोनि चरण धरिले सरसे । तें आतां कां मज न दिसे । सांगा कैसें करूं आतां ॥१२०॥
निंबया दावीं तें लोचनीं । म्हणोनि मिठी घाली चरणीं । आश्चर्य वाटलें सर्व जनीं । म्हणती लाभ धणी तुज माथे ॥२१॥
दुग्ध जेवीं धेनुवंशीं । तें होय प्राप्त वत्सासी । त्यायोगें लाभ सर्वांसी । गोष्टी ऐसी जाली हे ॥२२॥
मग पाहीं स्कंधावरी । पदमुद्रा देखिली गोजिरी । सत्य वाटलें सर्वांतरी । वानिती थोरी निंबयाची ॥२३॥
भाग्य बाईचें वाखाणिती धन्य धन्य निंबया म्हणती । धन्य पदें पाहिलीं संतीं । हर्ष चित्तीं नं समाये ॥२४॥
मग निंबया सद्गदित । पांडुरंगातें आळवित । भक्तिभावें पाचारित । ये त्वरित विठ्ठला ॥२५॥
गुप्तरूपें लीला दाविली । पूर्ण तृप्ति एका केली । तृष्णा सकळां वाढविली । ती कां न केली तृप्त देवा ॥२६॥
तूं भक्तवत्सल दीनानाथ । सदय उदार समर्थ । अर्थभूत हे श्रोते संत । हे कां क्षुधित ठेविले ॥२७॥
त्रैलोक्यपति तूं उदार । सर्वार्थी तूं दाता थोर । न तोषविसी सर्वांचें अंतर । कैंवीं बडिवार होय हा ॥२८॥
एका वृष्टी एका अवर्षण । कैसा म्हणावा कृपाघन । तूं अभेद सर्वालागून । परी भेद दिसोन आला आजी ॥२९॥
एका तृप्त करावें पूर्ण । येरां वडवावें उपोषण । ऐसियातें दाता कोण । म्हणेल जाण समर्था ॥१३०॥
जागरण एकादशीदिनीं । सर्व उपोषणाचीं फेडीं पारणीं । तृप्त करीं सकळांलागोनी । वाढवीं भजनीं उल्हास ॥३१॥
जयजय करुणाकरा रुक्मिणीवरा । अनाथनाथा परात्परा । सदय कोमळा उदारा । जगद्धोद्धारा दीनबंधो ॥३२॥
जय श्यामसुंदरा मनमोहना । कमलदलाक्षा राजीवनयना । गुणातीता निरंजना । भक्तमानसरंजना धांव घाली ॥३३॥
जय भीमातीरविहारा दिगंबरा । सगुणरूपा लावण्यसुंदरा । तोषवीं आम्हा अनाथांच्या अंतरा । कृपा करा सर्वेशा ॥३४॥
यापरी सप्रेमें करोन । निंबया आळवितां नारायण । तात्काळ प्रगटला स्कंधीं येवोन । सप्रेमें तल्लीन श्रोते वक्ते ॥३५॥
जे होते सभाग्य संत । सान थोर श्रोते समस्त । प्रेमानंदें डुल्लत । जाले तटस्थ पाहती ॥३६॥
प्रगट मूर्ति साकार । तेही भजनानंदीं निर्भर । टाळ्या पिटोनी करिती जयजयकार । तों प्रभा थोर फांकली ॥३७॥
कित्येकीं पाहिला दृष्टीं । निंबयासी देतसे भेटी । वर्षल्या आनंदाच्या कोटी । सुरवर वृष्टी करिताती ॥३८॥

तुळसी बुका सुमनसंभार। वृंदारक वर्षती अपार। भीमातीरीं जयजयकार। वाद्यगजर नामघोष ॥३९॥
पंचारती उजळिती। काया कुरवंड्या करिती। तवं निंबयासी वरदोक्ती। वदे श्रीपती ऐका ते ॥१४०॥
यावें आषाढी कार्तिकीला। वेणुनादीं करावा काला। लाह्याकवळ वांटीं सकळाला। मान तुजला तेथींचा ॥४१॥
निंबया होता ब्रह्मानंदीं। वरद ऐकिला त्या संधीं। तैं सकळां तल्लीन समाधी। निर्भर मांदी संतांची ॥४२॥
ऐसा जाला आनंदसोहोळा। उल्हास नरनारीबाळां। मग ओंवाळी सांवळा। गुप्त जाला सर्वेश्वर ॥४३॥
समूह सर्व उठले। आनंदें निंबराजा भेटले। कथारंग वोसरले। देव गेले स्वस्थाना ॥४४॥
गेली न कळेचि राती। प्रभाते उगवला गभस्ती। स्नानें करोनि भीमरथीं। पारणें करिती आनंदें ॥४५॥
नित्य निंबयाचें कीर्तन। प्रेमें श्रवण करिती सर्व जन। तंव वडव्यालागीं स्वप्न। स्वयें नारायण देतसे ॥४६॥
पौर्णिमेचा सोहोळा। वेणुनादीं असे आगळा। तो निंबराज मान दिधला। करविजे काला त्या हातीं ॥४७॥
तो मज प्रियकर कवळ। सेवितां संतुष्ट मी गोपाळ। मान्य करा तुम्ही सकळ। निंबया प्रेमळ आवडता ॥४८॥
हांडी लाही त्या करींची। मज गोड लागे या संतांची। ऐसी आज्ञा होतां साची। करिती निंबयाची प्रार्थना ॥४९॥
तुम्हां तुष्टला सर्वेश्वर। चला गोपाळपुरीं सत्वर। आळवोनिया जगदोद्धार। कवळ सुंदर वांटावे ॥१५०॥
मग सकळ समाज मिळोन। निंबराजें काला केला पूर्ण। प्रसाद सकळां वांटोन। आले परतोन स्वस्थाना ॥५१॥
रात्रीं भोजनें सारिलीं। रजनी आनंदें क्रमिली। स्नानें करोनि प्रभातकाळीं। पावली मंडळी महाद्वारा ॥५२॥
महाद्वारींचा काला। विप्र हरिदासानें केला। आवडीं प्रसाद सेविला। फुटला पाळा यात्रेचा ॥५३॥
संतीं आज्ञा घेवोन। पंढरीक्षेत्रातें नमोन। जेवीं सायुज्या करितां गमन। कन्या परतोन पाहतसे ॥५४॥
तैसे संत वेळोवेळां। पंढरी अवलोकिती डोळां। मार्गस्थ होतांचि पाळा। उदास सांवळा अंतरीं ॥५५॥
रुक्मिणीशीं गुज बोले हरी। उदास लागती मज पंढरी। संतावीण न गमे क्षणभरी। केधवां माघारी येतील ॥५६॥
चाल जाऊं आतां देहूसी। भेटूं जावोनि तुकयासी। मग पाचारिलें गरुडासी। वेगीं स्कंधासी बैसले ॥५७॥
म्हणे तुकया विठ्ठल अंतरीं। कां हो न ये अद्यापी हरी। कां अलोभ केला मजवरी। कां संतां माझारी गुंतला ॥५८॥
तुकयाचें सद्गद अंतर। संतापला देहीं अनिवार। तंव गरुडाचा ऐकिला फटत्कार। दृष्टीं न्याहाळून पाहिला तो ॥५९॥
गरुडस्कंधीं पाहिला हरी। शंख चक्र शोभले करीं। वास कसिली पीतांबरीं। कंकणें करीं झळकती ॥१६०॥
मुगुट कुंडलांची दीप्ती। तेणें लोपला तो गभस्ती। बाहुभूषणें डोल देती। कौस्तुभ वैजयंती वनमाळा ॥६१॥
कंठीं एकावळी मुक्ताहार। तडित्प्राय मेखळा सुंदर। पायीं मंदाचा तोडर। रूप मनोहर सांवळें ॥६२॥
एका स्कंधीं ते रुक्मिणी। मदनमाता विश्वजननी। सकळ सौंदर्याची खाणी। भव्य भूषणीं मंडित ॥६३॥
येतां तुकयाचे सन्निधान। येरें घातलें लोटांगण। भक्तिभावें प्रेमें केलें अर्चन। आणिक स्तवन करुणारसें ॥६४॥
धार दोनांचा दयाळ। भक्तजनासी कनवाळ। कवळी तुकयासी तत्काळ। केला शीतळ अंगसंगें ॥६५॥
म्हणे तुकया गुज सांगोन। उदास [illegible] माझें म[illegible] [illegible]स आले संतजन। पत्र निवेदन केलें मज ॥६६॥

जीर्णी उपजली खंती। परी यात्रेसाठीं पडिली गुंती। तंव निंबराज भक्त भोळा प्रीती। त्याची प्रेमभक्ती अनिवार ॥६७॥ तेणे मज कीर्तनी मोहिलें। तुजऐसेंच तें गमलें। मग मनोरथ त्याचे पूर्ण केले। स्वस्थळा लाविलें तोषवोनी ॥६८॥ त्या समस्तां बोळवोन। तैसाचि पावलों येथें येवोन। तुकया तुम्ही माझे प्राण। तुम्हासाठीं सगुण मज होणें ॥६९॥ तुकया म्हणे देवराया। आम्ही विनत तुझिया पायां। तुझी पूर्ण आम्हांवरी दया। धरिसी माया सत्य वरसा ॥१७०॥ तूं निराकार निर्गुण। मायातीत निरंजन। निरालंब सच्चिद्घन। सनातन अव्यय तूं ॥७१॥ ऐसा तूं गा निराकार। लीला विग्रहीं जालासि साकार। ऐकोनि अनन्याचें करुणोत्तर। धरिसी अवतार सगुणत्वें ॥७२॥ वेदशास्त्रपुराण। श्रुतिवाक्यार्थ प्रमाण। नटसी प्रगट भक्तांचें पाहोन। करिसी कारण नानाविध ॥७३॥ आम्हां अनन्यां प्रतिपाळिसी। घेणं आळ लळे पुरवीसी। आलीं संकटें निवारिसी। दान देसी कृपेचें ॥७४॥ मग तोषोनि तुकयासी। काय बोले हृषीकेशी। केधवां येशील पंढरीसी। सांग मजसी भक्तराया ॥७५॥ तंव तुकया जोडोनि कर। म्हणे आषाढी कार्तिकी आम्हां माहेर। आठव मूळ धाडिजे सत्वर। चरणीं सादर दास हे ॥७६॥ देवभक्तांचा वाग्विलास। तेथें अद्भुत प्रेमरस। तुकयासि पुसोनि जगन्निवास। पंढरीस पावले ॥७७॥ तया लोटतां कांहीं दिवस। सवेग पावला कार्तिकमास। आनंद उत्साह संतोष। जावया पंढरीस समारंभें ॥७८॥ चहूंकडोनी यात्रा वाहती। ढोल दमामे मृदंग वाजती। टाळ झल्लरी चे घोष होती। सुस्वर नाद निघती विण्याचे ॥७९॥ सवें पताकांचे भार। गरुडटके माहीमरातबी सुंदर। सूर्यपान छत्रें मेघडंबर। मोर्चेल चामर वारिती ॥१८०॥ शिबिकें पांडुरंगमूर्ती। नामघोषें संत गर्जती। परमानंदें सप्रेम चित्तीं। संत येती पंढरिये ॥८१॥ भार पावले बहुतेक। परी त्यामाजीं नामधारक। जयासी गुज बोले वैकुंठ नायक। कीर्ती अलोलिक जयाची ॥८२॥ देहुस्थानवासी तुकाराम। कान्हया बंधु उत्तम। अनगडशा रामशास्त्री सप्रेम। मवाळ नाम गंगाजी ॥८३॥ माणकोजी यमाजी बोधला। शिवाजी भक्त आगळा। भागीरथी सून वेल्हाळा। प्रेमकळा ममताई ॥८४॥ श्रीगोंदेकर प्रसिद्ध। यवननामें शेख महंमद। महाभक्त द्विज प्रल्हाद। जेणें मुकुंद वश केला ॥८५॥ रामदास कल्याण रामदासी। आक्का वेणू सेवेसी। केशवस्वामी तेजोराशी। विनट अहर्निशीं रामनामीं ॥८६॥ रंगनाथ कृष्णदास। आत्या स्वामी ज्ञाता विशेष। जयराम हा महापुरुष। कीर्तनरस अद्भुत त्याचा ॥८७॥ मधादी तो गणेशनाथ। ज्याची लीला अति विख्यात। संतोबा पवार वैराग्यवंत। निंबराज संत भावार्थी ॥८८॥ ऐसिया संतांचे भार। चहूंकडोनी आले अपार। तेणें दुमदुमिलें पंढरपूर। यात्रेसि पार नाहीं तेथें ॥८९॥ नित्य देवाचें दर्शन। नित्य प्रदक्षिणा येती करोन। ठायीं ठायीं होनात कीर्तन। राउळीं भजन सर्वदा ॥१९०॥ आरंभ दशमी पासोनि होत। एकादशी जागरव्रत। रथ देवाचा मिरवत। पारणें होत द्वादशीं ॥९१॥ त्रयोदशी चतुर्दशी संतर्पण। सकळ क्षेत्रांचे अवलोकन। संतदेवांचें दर्शन। कथाकीर्तन भजन तें ॥९२॥ होता पौर्णिमेची प्राप्ती। घेणुनादा यात्रा जाती। काला पाहूं सुरवर येती। लाहा वेचिती अद्यापि ॥९३॥ तंव संत बोलती वचन। निंबपासी हरीनें दिधलें वरदान। तो काला आजी आपण। करूं श्रवण खेळ पाहूं ॥९४॥

म्हणोनि निंबया सांगाती । सकळ संत मिळोनि जाती । उदेला सर्वां हर्षप्रीती । श्रवणीं बैसती सभोंवतें ॥९५॥
निंबराजें संतां नमोन । काल्यासि उभा राहिला आपण । टाळ वीणा मृदंगस्वर सांवरोन । केलें स्तवन हरीचें ॥९६॥
विठ्ठलनामें पाचारितां । हृदयीं पावली सद्गदता । नामघोषें भजन करितां । रंग भरता जाहला ॥९७॥
प्रथम अभंग वदोन । करिता जाला निरोपण । निर्गुणाचें अधिष्ठान । भक्तिभूषण प्रेमात्तत्व ॥९८॥
संकटदशा करुणवाणी । होतां निर्गुण आणिलें सगुणीं । अवतारमालिका वर्णनीं । लीला रंगणीं रामकृष्ण ॥९९॥
आठव्याचा करोनि आठव । निरोपितां जाला लीलाभाव । त्यांत गोकुळीचें वैभव । स्वयमेव आरंभी ॥२००॥
निरोपणीं जाली वृष्टि । आनंद भरला सर्वां पोटीं । वेधलें तनमन तैशीच दृष्टी । विराल्या गोष्टी इतर त्या ॥ १ ॥
कृष्णवृत्ती कृष्णभाव । चौर्यकर्मी मांडिला डाव । पाचारितां गोसमुदाव । तंव संत सर्व उठले ॥ २ ॥
निरोपण ऐकतां प्रेमळ । सर्वांसि वाटलें हें गोकुळ । आम्ही कृष्णगडी गोपाळ । म्हणोनि तात्काळ उठले ॥ ३ ॥
निंबयां करीं प्रश्नादर । गोपाळ देती प्रत्युत्तर । रामदास सुदामा सुंदर । पेंधा निर्भर तुकया तो ॥ ४ ॥
योगला तो बोधला । वडव्या संतोबा भला । गणेशनाया बोवडा जाला । वाकुंडा रंगला रंगया । ॥५॥
कोण्ही जाले अन्य गडी । कोण्ही बाळा तरुणी गोपी प्रौढी । गोरस चोरिती लवडसवडीं । तडा फोडी भाजनांची ॥६॥
दुग्ध दहीं नवनीत । भक्षीत सांडीत मुखमर्दित । सेखीं गोप पळोनि जात । गाईस सोडित वासरें ॥७॥
बाळें चिमटोनी जागविती । प्रभातें गोरस नासलें पाहती । मग यशोदेसी गाऱ्हाणे वदती । विपरीत गती कृष्णाची हे ॥८॥ कृष्ण गोपींचें भाषण । यशोदेसी देती दूषण । कोण्ही बोलती रुसोन । यशोदा समरसोन शांतवी ॥९॥
नंतर वत्स रक्षणासी । यशोदा धाडी कृष्णासी । काननीं जातां वळामेंळी । भार गोधनासी रक्षावया ॥२१०॥
जे जे बाळकांचे खेळ । गोपाळ खेळती सकळ । कृष्णाबीण गोपी विकळ । संसारीं तळमळ सर्वदा ॥११॥
छंद कृष्णाचा मनीं । त्या छंदें संसार आचरणीं । कृष्णरूप अवघें भावोनी । स्वानंदें रमती रमतानी ॥१२॥
झाडणें सडासंमार्जणें । कांडणें पाखडणें उदक भरणें । मंथणें दळणें पाक करणें । विवेकें देखणें कृष्णमय ॥१३॥
फुगडी जखटी पिंगा । रंगीं रंगला अंगा । गीतीं गाती श्रीरंगा । जन्मकर्मसंगा नाशिती ॥१४॥
इकडे गोपाळांचे खेळीं । स्वयें खेळे तो वनमाळी । चकरा भंवरा जाळी । वावडी निगळी उडविती ॥१५॥
लिगुऱ्या मांडोनि खेळती चेंडू । गलगोटिया विटीदांडू । हुतूतू हमामा खोखो मांडू । काढिती दंडू मल्लकुस्ती ॥१६॥
लपंडाई लपती । येरयेरां सांपडविती । खेळांस नाहीं नीती । खेळिया श्रीपती आगळा ॥१७॥
गडी न देतां वांटून । एकल्या कृष्णा सांगती वळण । मुरलीनादें गाई मेळून । क्षुधित माध्यान्ह पळों नेदी ॥१८॥
गोपाळांसंगे खेळती । क्षुधित धेनू नाकळती । गडी शिणले धांपा देती । येती काकुलती कृष्णातें ॥१९॥
कृष्णें आकळिल्या धेनू । गड्यांचा वारिला शीण । मागुती खेळा म्हणे कान्हू । म्हणती नाणूं खेळ मना ॥२२०॥
खेळतां पळतां हिंपुटी । जाले पुरे पुरे जगजेठी । क्षुधा लागली आतां पोटीं । घालिशी गोष्टी मग गोड ॥२१॥
कान्हा निरोपण निंबराज । खेळ खेळोनि दावी चोज । प्रवृत्तिनिवृत्तिपर बोले गुज । श्रवणीं समाज सुखावले ॥२२॥

शिदोऱ्या एक ठायीं करोन । काला केला संपूर्ण । सकळ गोपां बैसवोन । स्वकरें श्रीकृष्ण वांटी त्या ॥२३॥ दहीं लाह्या घेवोनि दुरडी । निंबया सावधान करी गडी । घ्या रे दहींभात म्हणे आवडीं । प्रसादगोडी कृष्णास्त्रें ॥२४॥ प्रथम मुष्टी करीं घेतां । निंबया सद्गदित जाला चित्तां । म्हणे विठ्ठला ग्रास घेतां । प्रसादे समस्तां तोषवीं ॥२५॥ ते सप्रेम शब्द ऐकोनि । तात्काळ प्रगटला चक्रपाणी । श्यामसुंदर बाळवेष धरोनि । आलों म्हणोनि मुख विकासी ॥२६॥ तंव तो मन्मथ पुतळा ॥ संतीं देखी घनसांवळा । म्हणती निंबया तूं भाग्यागळा । दे कवळा मुखीं आतां ॥२७॥ नाना यज्ञहवनें व रिती । त्यांतें अवदान न घे ऐसें निश्चितीं । तो हा तुजपुढें रमापती । आनंदे विकाशिती लाह्यातें ॥२८॥ जे लोहचूर्ण भक्षोन । जयासाठीं करिती अनुष्ठान । तो जगदात्मा जगज्जीवन । पसरी वदन लाह्यातें ॥२९॥ जयासी शिव हृदयीं ध्यात । जया वेदशास्त्रपुराणें गात । जो महासाधकां नोव्हे प्राप्त । तो वदन विकाशीत कवळातें ॥२३०॥ परिसोनि संतांचें वचन । निंबराज झाले सावधान । प्रेमें हरिमुखीं कवळ दे आपण । धालें त्रिभुवन एका कवळें ॥३१॥ तो प्रसादकवळ सुरस । सेविती आवडीं विष्णुदास । लाह्यांची वृष्टी आसपास । होतां सुरवरांस फावलें ॥३२॥ मग निंबयाचे स्कंधावरी । शीघ्र वेंधले तेव्हां हरी । दहींहंडी फोडिली झडकरी । प्रसाद निजकरीं वांटिला ॥३३॥ जो आनंदाचा कंद । तो संतीं प्रगटला ब्रह्मानंद । तो पूर्ण करिता भक्तछंद । देत वरद निंबराजा ॥३४॥ म्हणे सात पिढिपर्यंत । तुझे वंशी भगवद्भक्त । मी लळे पुरवीन त्यांच निश्चित । वदोनि भगवंत गुप्त जाला ॥३५॥ परिसोनि हरीच्या अभयवचना । जयजयकारें केली गर्जना । कुरवंड्या करोनि रुक्मिणीरमणा । निंबयाचरणा वंदिती ॥३६॥ संतमहंता जाल्या भेटी । काला संपवोनि परतल्या थाटी । मार्गीं नमनाची दाटी । वर्षल्या कोटी आनंदाच्या ॥३७॥ संत जावोनि बिऱ्हाडीं । भोजनें सारिलीं परवडी । गोविंदनामें घेतली गोडी । सकळ जोडीं जोडिली ॥३८॥ प्रतिपदेसी महाद्वारींचा । प्रसाद घेवोनि काल्याचा । समूह फुटला यात्रेचा । उतार सरितेचा ज्या रीतीं ॥३९॥ कितेक पंचमीपर्यंत । प्रक्षाळपूजा हरीची पाहत । चातुर्मास्य करोनि समाप्त । आज्ञा मागत देवराया ॥२४०॥ तें हरिमूर्ति दीनवदन । भक्त बोलती गौरववचन । देवा सत्वर दाखवीं चरण । कृपा पूर्ण असों दे ॥४१॥ यापरी आज्ञा घेती । आपुलाल्या स्वस्थळा जाती । भगवज्जनांची परमप्रीती करी खंती परमात्मा ॥४२॥ निंबयाचे कीर्तिगुण । सर्वतोमुखीं होय वर्णन । सांप्रदाय घेती जन । अर्चनमान चहूंकडे ॥४३॥ संतसाधु घरा येती । येरयेरां प्रेम वाढविती । भजनकीर्तन घोष होती । लाविलें भक्तीं जग सारें ॥४४॥ जया तुष्टे नारायण । तेथें कोणतेंही न पडे न्यून । सकळ ऐश्वर्य वोळंगे येवोन । लाभ चालोन येती घरा ॥४५॥ निंबयाचे तिघे कुमर । तयांसी कन्या अर्पिती भाविक विप्र । अनुक्रमें साधिलें सैंवर । धरामर तोषविले ॥४६॥ पुत्र सुना कांता आपण । प्रपंचवृद्धी हरिकृपें करोन । परि लिप्त नोव्हे निंबयाचें मन । सदा ध्यान हरिपदीं ॥४७॥ स्वच्छंदें फरोनि रमतीं । नावडे कवणाची संगती । तंव मनीं हेत उपजला निश्चितीं । सद्गुरुप्रती भेटावें ॥४८॥ म्हणोनि करिती गमन । शोधित चालिले आपण । केधवां पाहीन सद्गुरुचरण । ध्यान पूर्ण अंतरीं ॥४९॥ मुखीं सदा भजन हरीचें । हृदयीं ह्येन सद्गुरूचे । ग्रामें शोधिती पंथाचे । पुसती वाचें शोध जना ॥२५०॥

नित्यानित्य करिती गमन । तंव ग्रामवासी भेटती येवोन । मुक्कामी रात्रौ करिती भजन । श्रोते जन मिळती ॥५१॥
तंव चालतां मार्गी एक नगर । तेथील भाविक नारीनर । तेथें निंबराज वस्तीस स्थिर । जाले निर्धार अस्तवेळें ॥५२॥
तंव परिचयाचे गृहस्थ । तेथें भेटले अकस्मात । त्यांनीं निंबयाचे केलें आतिथ्य । प्रेमें प्रार्थित सद्भावें ॥५३॥
आजी महापर्व पावन । जालें स्वामींचें दर्शन । आम्हां अनाथालागून । करवा पान कथारस ॥५४॥
पंढरीसी श्रवण केलें । तैंपासोनि कर्ण भुकेले । कृपावरें पाहिजे तृप्त केलें । म्हणोनि धरिलें चरणातें ॥५५॥
गांवांत आले निंबराजसंत । हें प्रगट जालें सकळांत । धांवोनि आले भाविक भक्त । प्रेमें प्रार्थित कीर्तनार्थी ॥५६॥
निंबया म्हणे मी एकला । साहित्य समुदाव नाहीं आणिला । परी तें वर्म न कळे भाविकांला । आग्रह केला बहुतची ॥५७॥
देखोनी तयांचें चोज । सचिंत जाला निंबराज । म्हणे संगावीण कठिण काज । श्रीहरी लाज राखिता ॥५८॥
तंव ग्रामीक बोलती वचन । आम्ही साहित्य आणितों मेळवोन । यासी न लगे एक क्षण । अभयदान देइजे ॥५९॥
भाविक प्रेमळांचें शुद्ध अंतर । देखोनि निंबया दे रुकार । आश्वासनें उठले सत्वर । पांडुरंगमंदिर झाडिलें ॥६०॥
एकीं शेवातें आणिलें । एकें टाळ मेळविले । एकें बैसकेतें घातलें । दीप उजळले चहूंकडे ॥६१॥
कोण्ही पाचारणें करिती । कोण्ही हारबुका खिरापती । कोण्ही सिद्ध करोनि आरती । समाज मिळती श्रवणातें ॥६२॥
सर्वांचें देखोनि भक्तिप्रेम । निंबराजें आळविला मेघःश्याम । म्हणे पूर्ण करीं यांचे मनोधर्म । माझें वर्म तुज ठावें ॥६३॥
ऐसें प्रार्थोनि त्वरित । वीणा मिळविला स्वरांत । शैव मृदंग वाजवीत । निंबया आरंभित स्तवनातें ॥६४॥
मागें तालधारी नाहीं कोण्ही । निंबया उभा राहिला कीर्तनीं । तंव भक्तवत्सल चक्रपाणी । द्वय रूपें धरोनी पावल
॥६५॥ निंबयाचे द्वय कुमर । शिवराम नारायण प्रियकर । पांथिकवेषें नटोनि श्रीधर । येवोनि नमस्कार घातला ॥६६॥
निंबया त्यांतें पाहोन । हर्षभरित जाला आपण । म्हणे साह्यकारी नारायण । पुत्रांचें आगमन घडविलें ॥६७॥
प्रसंग पाहोनि धरिले टाळ । आश्चर्य करिती पाहतां सकळ । पावले पाहोनि ही वेळ । होय कृपाळ हरी या ॥६८॥
निंबया जाला संतोषमान । हर्षें आरंभिलें कीर्तन । वायघोषे करितां भजन । आला ओढवोन रंग बहु ॥६९॥
निरोपणीं बोध अपार । चरित्र लाविलें सुंदर । सुखावलें श्रोत्यांचे अंतर । करवी गजर भजनाचे ॥७०॥
परमानंदें करोन । तालें साधी नृत्य उड्डाण । प्रेम गहिंवरें वाहती नयन । श्रवणीं तल्लीन सर्व होती ॥७१॥
तीन प्रहरपर्यंत । कीर्तनसोहळा रसभरित । प्रेमळ बुका हार समर्पित । शेष चर्चीत सकळांतें ॥७२॥
पूर्वपदातें आणोनी । कीर्तन आणिलें अवसानीं । शीघ्र आरती उजळोनि । चक्रपाणी ओंवाळिला ॥७३॥
काया कुरवंडी करोन । निंबया नमिती श्रोतेजन । प्रेमें देती आलिंगन । हरिविठ्ठल म्हणोनि संपविलें ॥७४॥
निंबराजें घातलें दंडवत । मग ठायीं बैसले समस्त । खिरापती सकळां वांटित । आनंदे सेवीत प्रसाद तो ॥७५॥
मग बोलती प्रबुद्ध जन । समर्थें केलें आम्हां पावन । करविलें सकळां कथामृतपान । धन्य दिन आजीचा ॥७६॥
साह्य तुम्हां श्रीधर । प्रसंगीं पावले दोघे कुमर । निंबया मागें पाहे सत्वर । तंव आश्चर्य थोर जाहलें ॥७७॥
आले ते सकळीं पाहिले । कीर्तन सरतां गुप्त जाले । नवल सकळां तें वाटलें । वर्म कळलें निंबराजा ॥७८॥

म्हणे दीनोद्धारणा जगत्पती । माझी ऐकोनी विन्नंती । पुत्र रूपेत्व-रितगती । साह्य निश्चिती जालासी ॥७९॥ संकट पडता अनन्यासी । स्मवितां त्वरें धावसी । हा आजी अनुभव सकळां मजसी । सत्य हृषीकेशी दयाळ तूं ॥२८०॥ तैं सकाळांसी आनंद थोर । म्हणती संतसंगे लाभ अपार । दृष्टीं पाहिला श्रीकरधर । करिती नमस्कार निंबया ॥८१॥ आज्ञा निंबयाची घेवोन । गृहा गेले श्रोतेजन । निंबया आठवी सद्गुरुचरण । म्हणे दर्शन पावेन कधीं ॥८२॥ चिंतन करितां जाली प्रभात । वदनीं आठविला स्वामी दत्त । सिंहाद्रीचा संकेत । आठवला मनांत निंबयाच्या ॥८३॥ म्हणे जी अवधूता दिगंबरा । कां न कृपा करिसी दातारा । भेटी देत आलासि परंपरा । हें मज अंतरा ठावें कीं ॥८४॥ सकृपें उपदेश देवोन । केलें जनार्दनासी पावन । एकनाथासी दिधलें दर्शन । प्रसाद पूर्ण पाववीला ॥८५॥ त्या नाथाचा अनुग्रहीं । नरहरी जालासे पाहीं । तया देवगढाचे ठायीं । दर्शन लवलाही दिधलें ॥८६॥ त्या नरहरीचा अंकित । तुज मी जालों शरणागत । तै आज्ञापिलें स्वप्नांत । तें म्या हृदयांत सांठविलें ॥८७॥ तुझिया कृपें करोन । ते लाभ लाभलों संपूर्ण । परी अद्यापि आपुलें दर्शन । कां न घडोन येतसे ॥८८॥ ऐसा आठव करोनि मनीं । निंबराज निघाले तेथोनी । पंथ उरकितां ध्यान ध्यानीं । निबिड काननीं पावले ॥८९॥ प्रतिष्ठानातें जावें । सद्गुरु समर्था भेटावें । हाचिं हेतु मनोभावें । निंबराजें जीवें धरियेला ॥२९०॥ जातां निबिड काननासी । दत्तस्मरणें सप्रेम मानसीं । तंव तो स्मरगामी निश्चयेंसी । प्रगट वेगेंसी गुरुरूपें ॥९१॥ तंव एकाएकीं चालतां । एकटें देखिलें सद्गुरुनाथा । धांवोनी चरणीं ठेविला माथा । आलिंगिलें समर्था प्रेमभावें ॥९२॥ पाहोनि सद्गुरु नरहरीची मूर्ती । जीवा पावली परम विश्रांती । मग करिता जाला विनंती । एकटे या पंथीं कोणीकडे ॥९३॥ तंव ते म्हणती करिसी स्मरण । म्हणोनि प्रगटलों येवोन । कळलें साकल्य आम्हालागोन । साधिलासी पूर्ण भक्तियोग ॥९४॥ भक्तिभाव तुज प्रेमा । अद्भुत कळला पुरुषोत्तमा । प्रसाद पाववोनि वाढविला महिमा । कीर्तनी सर्वोत्तमा आळविसी ॥९५॥ कालचे कथारंगीं येवोन । तुज साह्य जाला नारायण । तुजसाठीं होणें त्या सगुण । अमान्य वचन न करीच ॥९६॥ तो भक्तिभावाचा लंपट । सोडोनि धांवतो वैकुंठ । स्कंधीं उभा राहोनि नीट । वारी धीट कुंचे करीं ॥९७॥ तुज दिधलें तेणें भूषण । सप्त पिढ्यांचें वरदान । दिधलासे काल्याचा मान । उरला कोण अर्थ सांगें ॥९८॥ निंबया म्हणे जी सद्गुरुराया । ही तंव सर्व तुमची दया । विदित पूर्वींच या पायां । यावरी पुढलिया न जाणसी ॥९९॥ तूं सर्वज्ञ सर्वात्मक । मी तुझें लडिवाळ बालक । कराल तें थोडें कौतुक । हेतु आवश्यक जाणसी ॥३००॥ परी करितों पदासि विनंती । नेत्रभरी पहावी श्रीदत्तमूर्ती । आणीक अर्थ नाहीं चित्तीं । पद निश्चितीं साक्ष हे ॥१॥ यापरी विनवितां सद्गुरूसी । सद्गद जाला मानसीं । प्रेमांबु वाहती नयनासी । मिठी चरणांसी घातली ॥२॥ देखोनि निंबयाचें अंतर निर्मळ । हृदयीं ओळखिला पूर्ण प्रेमळ । आली शरणागताची कळवळ । दत्त दयाळ प्रगटला ॥३॥ मग करें उचलोनि निंबयासी । म्हणे उठें वत्सा पाहें मजसी । कवळोनियां हृदयासी । अभयकरासी ओपिलें ॥४॥ निंबया करी अवलोकन । तंव त्रिगुणात्मक मूर्ती सगुण । पद्पाणी विराजमान भव्य त्रिवदन पद्कमल ॥५॥ शंख चक्र त्रिशूल । डमरू कमंडलु माळ । विश्रांती हृदय विशाळ । लेपन परीमळ सुगंधी ॥६॥

कर्णी कुंडलें मुद्रा देदीप्यमान। बाहुवटीं भ्रीदभूषण। जटा मुगुट शोभा गहन। कनकवर्णमेखळा ॥७॥
कंठीं रुद्राक्ष स्फटिक मुक्तामाळा। कांसे पीतांबर सोनसळा। उत्तरी वस्त्र शुभ्र अंचळा। सूत्र गळां उपवीत ॥८॥
करांगुळीं मुद्रिका जाण। मनगटीं जडित कंकण। हृदयीं पदक विराजमान। एकावळी पूर्ण सलंब ॥९॥
पदीं वांकी गर्जे तोडर। पादुका तळवटीं सुंदर। सरोज सुकुमार पाउलें त्यावर। मूर्ति मनोहर पाहिली ॥११०॥
सच्चिदानंद मूर्ति पाहतां। संतोष जाला निंबया चित्ता। नेत्र वेध न होय फिरता। वृत्ति तटस्थता पावली ॥११॥
रूप न्याहाळोनि नयनीं। सप्रेमें मस्तक ठेविला चरणीं। करुणा गायिली निजवदनीं। तोषला मोक्षदानी निंबराज ॥१२॥ दत्तें कामधेनु पय काढिलें तें निंबराजातें पाजिलें। गुह्यज्ञानानें बोधिलें। हृदयीं प्रज्वाळिलें ज्ञानदीपा ॥१३॥
अभयहस्त ठेविला माथां। मोडिली द्वैताची व्यथा। बाणविली एकात्मता। निर्विकल्पता पाववीली ॥१४॥
योगयुक्तीच्या मार्गासी। निरोपी सकळें अविनाशी। दत्त करी स्वात्मतेसी। निजानंद वळीसी ओपिलें ॥१५॥
आणीक निर्वदिती खूण। तुम्हीं वंशप्रसादपावन। वाढवावया भक्तिमहिमान। सेवा हेचि पूर्ण तव करें ॥१६॥
जाय राहें स्थिर स्वस्थ। सहजें होनील कार्यार्थ। ऐसें बोलोनि श्रीदत्त। जाला गुप्त ते ठायीं ॥१७॥
निंबराज पावला सुखसमना। आनंदें स्वस्थानीं आला पावता। देहे ठाणवासी पूर्णता। योग साधिता होय तो ॥१८॥
हें निंबराजाचें आख्यान। सांप्रदायार्थ केलें निरोपण। तें न वर्णिलें परिपूर्ण। ग्रंथ विस्तीर्ण वाढेल ॥१९॥
यास्तव आटोप केला। संत सज्जना जाणविला। श्रीविठ्ठलें जो बोधिला। सार लिहिला त्यांतहि ॥२२०॥
निंबराजवंशी अद्भुत। जाले महापुरुष भगवद्भक्त। उदार आणि पंडित। ज्ञानी महंत प्रतापी ॥२१॥
विठ्ठलबाबा नामाभिधान। तो सद्गुरु उदार सघन। तेणें आचंन केलें हें बोधन। परिसार निवडोन निरोपिलें ॥२२॥
विठ्ठल निंबराजीं तारूं। विठ्ठल त्या वंशा आधारू। विठ्ठलनामें सकळ वेव्हारू। विठ्ठल भवपारू कर्ता जीवा ॥२३॥
विठ्ठलदैवत अधिष्ठान। विठ्ठल सद्गुरु परमपावन। अनंतसुत त्या अनन्य शरण। याचक होवोन दान मागे ॥२४॥
तिष्ठनां याचक चरणापाशीं। कृपादान दिधलें भिक्षेसी। तो प्रसाद सेविनां अहर्निशीं। संतपदासी विनटलों ॥२५॥
इति श्रीदत्तप्रबोधग्रंथ। श्रवणेंचि पुरती मनोरथ। श्रोते परिसोत भाविक भक्त। षट्दशोध्यायार्थ गोड हा ॥२२६॥

॥ इति षट्दशोध्यायः समाप्तः ॥

# ॥ अध्याय ६१ वा ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

जय सद्‌गुरु सिंहाचलनिवासा। आदिअनादि महापुरुषा। लोकत्रयपालका अविनाशा। पूर्ण परेशा परात्परा ॥१॥
चित्तचालका चैतन्यघना। गुणातीता गुणप्रज्ञा। सर्वांगत सर्वज्ञा। तुझी आज्ञा वंद्य सर्वां ॥२॥
मायातीत तूं जगद्‌गुरु। तुझा सकळांसि आधारु। तुझिया नामें भवपारु। तारूं दातारु तूं अनन्याचें ॥३॥
तूं उदार दयाळू दाता। तूं सर्व भावें सर्वांचा त्राता। तूंचि कर्ता होसी करविता। सर्वीं सर्व सत्ता तुझीच ॥४॥
तुझिया सत्तेवांचोन। अणुमात्र न घडे कांहीं कारण। भोक्ता भोगविता भोग संपूर्ण। तूं अधिष्ठान सर्वांचें ॥५॥
पाहें पां काष्ठयंत्राची पुतळी। नाचविल्याऐशी नाचली। सूत्र न हालवितां पडली। मेली ना जन्मली कांहींच ॥६॥
तो अल्प हा थोर। खेळ अवघा औडंबर। छाया मंडपीं दावी प्रकार। तेवीं सूत्रधार तूं श्रेष्ठ ॥७॥
खेळ खेळवोनि निराळा। तैसाचि तूं करवोनि वेगळा। व्यापक सर्व तुझी कळा। निमित्तासि पुतळा पुढें कीं ॥८॥
हा अनुभव माझा मजसी। मूढ अज्ञान मतिमंदासी। आपुल्या कृपायोगें वदविसी। वसोनि वाणीसी ग्रंथ हा ॥९॥
मागिले अध्यायअंतीं कथा। निंबराजा भेटला सि श्रीदत्ता। सकृपें हस्त ठेवोनि माथां। देहठाणीं पावता जाला तो ॥१०॥
हें संतीं केलें श्रवण। आटोपलें निंबयाचें आख्यान। तंव श्रोते करिती प्रश्न। ग्राम देहठाण नाम कैसें ॥११॥
देखोनि प्रश्न श्रोत्यांचा। सुत विनवी अनंताचा। तुम्हां अर्थ श्रवणाचा। मज निरोपणाचा तैसाची ॥१२॥
विनवितों जोडोनि कर। ग्रंथा होतसे विस्तार। यास्तव किंचित निवेदितों सार। तें सादर परिसावें ॥१३॥
हें दधीचिऋषीचें कानन। ये स्थळीं आश्रम त्याचा पावन। नित्य करितां तपानुष्ठान। निवास पूर्ण ये ठायीं ॥१४॥
तो धीर गंभीर उदार। सदय शांत दाता थोर। शुद्ध सुशील सर्वदा अंतर। तपतेजें भास्कर दुसरा ॥१५॥
पूर्वी वृत्रासुर दैत्य माजला। तेणें प्रतापें जिंकिलें भूगोला। देवादिकां अजिंक्य जाला। नाटोपे कवणाला कदा तो ॥१६॥
देवादिकां पडलें संकट। तैं आराधिला नीलकंठ। सकृपें द्रवला कैलासपीठ। उपाय स्पष्ट निवेदी ॥१७॥
या वृत्राचें व्हावया हनन। दुर्घट असे साधितां कारण। तो जरी पुसा उपाव कोण। तरी सावधान परिसिजे ॥१८॥
प्रसन्न होवोनि दधीचिऋषी। स्वशरीरींच्या अस्थि देईल तुम्हांसी। त्यांचीं शस्त्रें करोनि सरसीं। युद्ध दैत्यासी करावें ॥१९॥ तेणें तो पावेल मरण। येऱ्हवीं नावरे कवणालागोन। वासवा नव हातें करोन। त्याचें नाशन या रीतीं ॥२०॥
परिसोनि स्वहितवाक्यातें। सुरवरें नमिलें शिवातें। आज्ञा मागोनि जातां पंथें। ऋषिआश्रमातें पावले ॥२१॥
दधीचि आश्रमा जावोन। सुरवर घालिती लोटांगण। अमरें अद्‌भुत केलें स्तवन। ऋषि सुप्रसन्न जाहले ॥२२॥
अंतरसाक्षी तो ऋषिवर्य। तेणें जाणीतलें देवकार्य। महाश्रेष्ठ उदार आर्य। विचारें धैर्य वळाविलें ॥२३॥
म्हणे कोण हेतु आलां धरोन। तें कथा मातें निरोपण तंव सहस्राक्ष म्हणे जीं कठीण। न बोलवे वचन आम्हांतें ॥२४॥
ऋषि म्हणे सत्य सदा। कार्यार्थीं न धरावी लज्जा कदा। तंव सुरेंद्रें दृढ धरिलें पदा। म्हणे तारकसुधा आम्हां तूं ॥२५॥
तूं उदार धीर सदय दाता। शरणागताचा होसी त्राता। तुजवांचोनि पदा रक्षिता। ब्रह्मांडीं शोभित नसेची ॥२६॥

ऋषी देई अभयदान । निर्भय करा निरोपण । मागाल तें करीन अर्पण । परोपकारार्थ जाण सुरेंद्रा ॥२७॥
अमरें जोडोनियां पाणी । आयंत निवेदिलें चरणीं । तैं ऋषि आनंदला मनीं । म्हणे धन्य पर्वणी आजी हे ॥२८॥
परोपकारालागोन । शिबीनें देह दिधला छेदोन । मांस स्वकरें तुलोन । रक्षिला प्राण कपोताचा ॥२९॥
परोपकारार्थ ही काया । पडतां लोभ कां धरणें वायां । मग स्वकरें छेदोनि लवलाह्या । अस्थि तयां समर्पिल्या ॥३०॥
दधीचिऋषीचें देहस्थान । परोपकारीं देह केला अर्पण । ते दिवसापासोन । देहठाण नाम या ॥३१॥
शरण आले सकळ देव । देहदान घेतलें अपूर्व । उभय क्रमाचें वैभव । म्हणती देव देहठाण ॥३२॥
आणीक एक श्रोत्यांसी । विनविती सादर श्रवणासी । तिघे पुत्र निंबराजासी । त्यांत चरणसेवेसी उभयतां ॥३३॥
शिवराम आणि नारायण । दोघेही वैराग्यसंपन्न । सरितातीरीं स्मशान । करिती सेवन गुरुपदीं ॥३४॥
सद्गुरुप्रसादें निश्चितीं । त्रिवर्गां जाली संतती । तेही भक्तचूडामणी असती । सांप्रदाय चालविती यथाक्रमें ॥३५॥
सद्गुरुपादुकासन्निधान । सहपरिवारें राहिले आपण । परी निरामयार्थ स्थान । ठेविलें योजोन टेंकडी ॥३६॥
तेथें निंबयाचा कुमर । नारायण नामें निरंतर । कुटिका बांधोनि सारासार । करीत विचार बैसला ॥३७॥
ज्येष्ट निंबयाचे द्वार धरोन । करीत बैसला चरणसेवन । निशिदिनीं भगवंती ध्यान । तो कृपाघन साह्य त्या ॥३८॥
भक्ति भाग्य संपत्ती । विष्णुवैभवें शोभती । प्रेमळ उदारधीर असती । पूर्वपद्धती सांभाळती ॥३९॥
सद्गुरु उत्साह शिवरात्रीसी । सहा दिवस नेमेंसी । ब्राह्मणभोजन कीर्तनासी । दिवानिशीं आनंद ॥४०॥
दिंडी पताका उभवोन । मिरवत सर्व यात्रा जन । रात्रौ काला गांवांत करोन । संतां अर्चोन बोळविती ॥४१॥
तोचि सोहोळा अद्यापवरी । पाहती कीर्ति दिगंतरीं । पांडुरंग वसे संतां घरीं । साह्यकारी भक्ताचा ॥४२॥
जेथें नारायणाचा निवास । नारायणगड म्हणती त्यास । सांप्रदायी सेवेस । नाम पुत्रास दादावा ॥४३॥
तोही भाविक प्रेमळ विशेष । सदा सादर गुरुसेवेस । कीर्तनभजनीं उल्हास । विनत संतांस सर्वदा ॥४४॥
तंव कोणे एके दिवशीं । नारायण आज्ञापिती दादावासी । आजी देव येती भोजनासी । सिद्ध पाकासी करावें ॥४५॥
येरें अवश्य म्हणोन । सिद्धता केली संपूर्ण । पर्वनीं सडासंमार्जन । दिव्य स्थान तें केलें ॥४६॥
नारायणें हरीतें प्रार्थिलें । म्हणे देवांसह येईजे ये वेळें । देखोनिया भक्तआळें । पुरवी लळे सर्वेश्वर ॥४७॥
विमानें देवांची दाटलीं । शोभा चौपासीं पावली । श्रीपांडुरंगमूर्ती भेटली । पात्रें विस्तारिलीं असंख्य ॥४८॥
कामधेनू वसिष्टसदनीं । क्षेत्रीं तृप्त असंख्य सदनीं । न्यून न पडे पदार्थ कोण्ही । अद्भुत करणी दाविली ॥४९॥
तेवीं सदना येतां रुक्मिणीकांत । सिद्धिऋद्धि तेथें वोळंगत । न्यून तें पूर्ण होत । हें सामर्थ्य कृपेचें ॥५०॥
देव आसनीं बैसले । आनंदे करोनि जेवविले । हें कौतुक जनीं ऐकिलें । पाहूं पावले चमत्कार ॥५१॥
शिवराम आणि नारायण । प्रार्थना करिती प्रेमें करून । पाहतां न दिसती जनांलागोन । परी शोभा गहन शोभली ॥५२॥
अन्नें जीं जीं वाढिती । दोनीं पात्रींचीं सरतीं । शब्द कर्णी ऐकती । परी न दिसती नयनानें ॥५३॥
भाविकांनें वाटे नवल । अधम कुचेष्टी कोटाळ । मांडिला सर्व चोराचा खेळ । अन्नें सकळ भूतें खाती ॥५४॥

द्रव्यघट सांपडतां अभाग्यासी । कोळसे खापरें दिसती त्यासी । तेवीं येथें भाविकांसी । भूतें मानसीं वाटलीं ॥५५॥
असो सरतां भोजन । जालें करमुखप्रक्षाळण । जयराम दादाचा पाचारोन । म्हणती सावधान तांबूल द्या ॥५६॥
तांबूल म्हणतां सिद्ध राशी । त्रयोदशगुणी निश्चयेंसी । उभयपात्रीं भरोनि वेगेंसी । वांटिती सकळांसी आनंदें ॥५७॥
देव अर्चोनि तोषविले । तंव भाविक प्रसादा पावले । नारायण म्हणे ये वेळे । द्वैन न केलें पाहिजे ॥५८॥
मग ग्रामवासी नारीनर । आदि करोनि लहानथोर । सकळां प्रसाद पाववला सत्वर । तृप्त अंतर सकळांचें ॥५९॥
ज्या रीतीं देव अर्चिले । त्या रीतीं समाज सर्व पूजिले । पांडुरंगें दयाळें । भक्त बैसविले सपंक्ती ॥६०॥
त्रैलोक्यपति आनंदकंद । भक्तां देत स्वकरें प्रसाद । तृप्ति जालिया मुकुंद । विडे गोविंद दे सर्वां ॥६१॥
यापरी सर्वां केली तृप्ती । देव देवातें प्रार्थिती । भाग्यवंत साधु वर्णावे किती । त्यांसवें श्रीपती क्रीडसी ॥६२॥
संतसंगीं तुझा वास । तूं संतांचा निवास । येथें भोगिती सुखविलास । वैकुंठ तुम्हास नावडे ॥६३॥
लक्ष्मी चरणाची दासी । ते नावडे गा तुजसी । संताघरींची जनीदासी । शेणी वेंचिसी तिजसवें ॥६४॥
कौस्तुभ वैजयंती टाकोन । वांकळा जाळी पांघरोन । नावडे सुग्रास मिष्टान्न । भाजीचें पान गोड लागे ॥६५॥
वासुकीपर्यंक शीतळ सुरवाडें । रत्नमंदिर तूतें नावडे । संतांचें प्रिय झोंपडें । खाटें पडिपाडें निजसी ॥६६॥
देवा तुज आवडी भक्तीची । भूषणें लेसी प्रेमाची । भोजनें करिसी भावार्थाची चाड आणिकाची असेना ॥६७॥
तुझे आवडते भक्तराज । त्यांसी बोलसी तूं गुज । ते तुझें जाणती निज । पुरविसी चोज कृपेनें ॥६८॥
सकळ ऐश्वर्यातें सांडोन । सत्संगरंगीं राहिलासि रंगोन । हें सुख आम्हां कोठोन । दिल्हा टकवोन देवपणा ॥६९॥
यास्तव गा कमळापती । परिसिजे आमुची विनंती । सेवा घडवावी आम्हांप्रती । लक्ष्मीपती हेंचि दे ॥७०॥
हरी म्हणे देवादिकां । पाहाल तुम्ही संतकौतुका । त्या हरिखें पावाल सुखा । मग वैकुंठनायका पाहाल ॥७१॥
ऐसें बोलतां सर्वेश्वर । देव करिती जयजयकार । कुसुमें वर्षती अपार । वाद्यगजर नभीं जाला ॥७२॥
सुरवरें वंदोनि देवभक्तांसी । सख्य घालोनि गळासी । विमानें उंचावलीं आकाशीं । स्वस्थानासी पावले ॥७३॥
ग्रामवासी अवघे जन । हरिप्रसाद पावले जाण । अपूर्व महिमा पाहोन । आनंदघन जालेती ॥७४॥
मनीं नवलाव करिती । कीर्ति मुखें वाखाणिती । कुतर्क भावातें सांडिती । शरण होती संतपदा ॥७५॥
देव संतोषविले या स्थळासी । म्हणोनि देवदैठणें म्हणती त्यासी । आदरोनि संतप्रश्नासी । निरोपिला पदासी भावार्थ
॥७६॥ देव देवांची देवता । संतआश्रमीं जाला रमता । यास्तव देवदैठणें वाक्यता । आली योग्यता तयासी ॥७७॥
देव भावाचा भुकेला । संताश्रमीं सुखावला । न विसंबे क्षणभरी त्याला । वाहे कळवळा दासाचा ॥७८॥
दयाळ तो करुणाकर । पूर्ण अनन्याचा दातार । जाणे सर्वांचें अंतर । प्रेमळा फार सांभाळी ॥७९॥
होय जगाचें हा जीवन । व्यापकत्वें राहिल व्यापून । परि दीनाची करुणा ऐकून । रूप सगुण धरीतसे ॥८०॥
या भक्तिप्रेमासाठीं । नाना रूपें धरी जगजेठी । भक्तासि तारी हा संकटीं । कृपा पोटीं दीनाची ॥८१॥
जे अनन्यशरण लडिवाळ । त्यांचें न पाहेचि यातिकुळ । हा शुची अथवा चांडाळ । तुरजे मळ अंतरीं ॥८२॥

ऐसा कृपाळ रुक्मिणीरमण। भाविक प्रेमळ त्याचे प्राण। त्यांचें न मोडी कदा वचन। होवोनि आधीन राहतो ॥८३॥
त्या बळीचा पाहोनि भावप्रेम। वचनी गुंतला सर्वोत्तम। वामनमूर्ती त्रिविक्रम। होवोनि धाम रक्षितो ॥८४॥
अद्यापि बळीचे द्वारीं। उभा दंड घेवोनि करीं। तोचि पुंडलिकाचे पारीं। भीमातीरीं पाहिला ॥८५॥
पुंडलिकाचे गुंतला वचनीं। कर ठेवोनिया जघनीं। उभा ठेला मोक्षदानी। समचरणी साजिरा ॥८६॥
ज्यासि ध्यानीं ध्यातो नीळकंठ। तो विटेवरी राहिला नीट। पाहे निजभक्तांची वाट। देतो भेट शरणागता ॥८७॥
दीनदयाळ चक्रपाणी। पुरवी भक्तांची आयनी। भक्तां निरखी कृपालोचनीं। उदित वरदानीं सर्वदा ॥८८॥
सदय उदार हा गोपाळ। निजभक्तांची पुरवी आळ। अनन्यासी पूर्ण दयाळ। दीनवत्सल दीनानाथ ॥८९॥
भीमातीरवासी दिगंबर। आदि अनादि परात्पर। तेणें आनंदें संप्रदाय थोर। वाढविला विस्तार निजकृपें ॥९०॥
शेषशायी नारायण। स्वरूपीं असतां निमग्न। नाभीस जन्मला चतुरानन। उघडोनि नयन निर्बुजला ॥९१॥
वेडावला पाहे भयाभीत। दीनमुखें बोभात। कृपें द्रवला श्रीअनंत। स्वानंदें त्वरित हंस होसी ॥९२॥
त्या हंसरूपें करून। निजकृपें बोधिला चतुरानन। चतुराक्षरमंत्र उपदेशून। निजगुह्यज्ञान निरोपिलें ॥९३॥
प्रकाशित केली बुद्धी। निरोपिला सकळ विधी। तो त्या अनुक्रमें साधी। म्हणोनि विधी नाम त्यासी ॥९४॥
त्या गुह्यज्ञानाचा प्रकाश। करवी विधाता अत्रीस। ध्यानीं निमग्न साधी तयास। निजात्मसुखास पावला ॥९५॥
त्या आचरणें फळ। अवतरलें परब्रह्म निश्चळ। त्रिगुणात्मक दत्तदयाळ। म्हणवी बाळ अनुसूयेचा ॥९६॥
अनेक अवतार होवोनि गेले। परी हें दत्त विमळरूप संचलें। अत्रीनें गुह्यज्ञान तेथें ठेविलें। परमार्थी भले अक्षयीं ॥९७॥
दत्त दयाळ उदार। निजकृपें करी जगदोद्धार। उभा पुंडलिकासमोर। दिगंबर समपदीं ॥९८॥
चंद्रभागा दक्षिणवाहिनी। पंढरीक्षेत्रीं पुंडलीकमुनी। अविनाश तया सन्निधानी। तिलक रेखोनी अद्यापी ॥९९॥
तो परमात्मा जगद्गुरू। दत्त अविनाश दिगंबरू। जनार्दनपंतासी अभयकरू। हे दातारू निजकृपें ॥१००॥
स्वअनुग्रहें करून। जनार्दन केला सधन। देवगडीं परमपावन। तेथें अधिष्ठान तयाचें ॥१॥
त्या जनार्दनपदीं निर्भ्रांत। सेवा साधी एकनाथ। भाव देखोनि त्याचा सत्य। दे परमार्थ निजकृपें ॥२॥
प्रसन्न होवोनि जनार्दन। केला एकनाथ पावन। करवी दत्ताचें दर्शन। प्रसाद पूर्ण लाधविला ॥३॥
ज्ञानेश्वराचा अवतार। तो हा एकनाथ साचार। जगतीं प्रगटला सर्वेश्वर। जगदोद्धार करावया ॥४॥
प्रतिष्ठानवासी एकनाथ। त्याची लीला अतिअद्भुत। असंख्य तारिले शरणागत। गुह्य निरोपिन नरहरीतें ॥५॥
करविलें देवगडीं अनुष्ठान। तेथें भेटविला दत्त जनार्दन। नराचा वारावया भागशीण। हरीच पूर्ण प्रगटला ॥६॥
शरणागतासी सकृप। नारीनर केले हरिरूप। ऐसा ज्याचा पूर्ण प्रताप। वारिले ताप अनन्याचे ॥७॥
तो नरहरी पूर्ण दयाळ। अनन्यासी कनवाळ। निवृत्तीसी द्रवला कृपाळ। देखोनि प्रेमळ भाविक ॥८॥
शिव सनातन शांत। विष्णुभक्तीचा पूर्ण हेत। म्हणोनि अंशरूपें प्रगटत। नाम विख्यात निवराज ॥९॥
हे जाणोनिया बीज। कृपें बोधिला निवराज। कर्णी सांगोनि गुह्य गुज। ज्ञान सतेज दिधलें ॥११०॥

गुरुप्रसादातें लाभला । भक्तिभावार्थें रंगला । निजप्रेमें कीर्तनीं विनटला । हरि ठेला स्कंधावरी ॥११॥
श्रीदत्त ओळला कृपाधन । निंबराजा दिधलें दर्शन । वाढलें जगीं महिमान । परी निमग्न हरिरूपीं ॥१२॥
भक्तिप्रेममार्गे करोनि । तोषविला तो चक्रपाणी । वास्तव्य सदा देठणीं । स्वानंदसुखनीं डुल्लत ॥१३॥
त्याचे चरणीं शिवराम । सेवें तरला सप्रेम । नारायण नरहरी उत्तम । साधिती क्रम तैसाचि ॥१४॥
निंबराज पूर्ण दयावंत । तेणें अनुग्रहिले तिघे सुत । त्यांची लीला अतिविख्यात । देव समस्त जेवविले ॥१५॥
आणिक उद्धरिले सांगूं किती । सांप्रदायासी नाहीं गणती । भक्तीसी लाविले नेणती । धन्य जगती त्यांचेनी॥१६॥
तो शिवराम परम पावन । भक्तिज्ञानवैराग्यसंपन्न । तेणें आपुलें गुह्यज्ञान । जयरामीं पूर्ण ठेविलें ॥१७॥
जयराम रंगला नामीं । भक्तिमार्गी भागवतधर्मी अंतर सुशील सत्कर्मी । प्रेमउर्मी निमग्न ॥ १८ ॥
आवडे सदा कीर्तनगजर । सदा साह्य रुक्मिणीवर । शरणागताचा करी उद्धार । लोभ अपार सर्वां भूतीं ॥१९॥
निंबराजासी रुक्मिणीरमण । सुप्रसन्नें लेववी भूषण । दिधलें स्ववस्त्र पीतवसन । करावें रक्षण अद्यापी ॥१२०॥
तैंपासोनि सर्वांसी । पिंवळा बाणा सांप्रदायासी । पिंवळ्या पताका निश्चयेंसी । शोभा श्रीहरीसी मानली ॥२१॥
सोंवळें करविलें परिधान । तैसेंचि करविलें कीर्तन । तोचि क्रम सर्वांलागोन । करिती आचरण त्या रीतीं ॥२२॥
उभें राहावें कीर्तनीं उघडें । पागुटें नसावें आंगडें । कांस घालोनि वाडेंकोडें । गावे पवाडे श्रीहरीचे ॥२३॥
ती आज्ञा शिरीं वाहोन । सांप्रदायी करिती कीर्तन । सप्त पिढीं वरप्रदान । निंबराजा पावन जालेंसे ॥२४॥
तेंचि जयरामें रीतीं । यथाक्रमें चालविली पद्धती । तेचि सांप्रदाया आज्ञापिती । हरिपदीं प्रीती वाढविजे ॥२५॥
जयरामपदीं लीन । प्रेमें जाला नारायण । जुनरीं तया वास्तव्यस्थान । सदा सेवन देठणी ॥२६॥
गुरुपदापरतें । अन्य साधन नावडे त्यातें । मातेवीण बाळातें । पदार्थ रुचते न होती ॥२७॥
दिनरजनी करी सेवा । दुःख न मानीं कधीं जीवा । ओळखोनि त्याच्या प्रेमभावा । ठेवी ठेवा जयराम ॥२८॥
अभ्यास करोनि भागवतीं । नित्य सद्गुरुपुढें निवेदिती । अंगी वैराग्य बाणली विरक्ती । क्षमाशांती परीपूर्ण ॥२९॥
निर्द्वंद्व निरहंकार । अणुमात्र मनीं नसे मत्सर । सद्गुरुरूप देखे चराचर । रंगलें अंतर हरिनामीं ॥१३०॥
सद्गुरुआज्ञेकरोन । स्वस्थळा पावला जाण । गृहस्थाश्रमधर्म आचरोन । तीर्थाटण पैं केलें ॥३१॥
मग विटोनि प्रपंचासी । ग्रहण कलें दीक्षसी । न राहती एका स्थळासी । पुनर्तीर्थासी योजिले ॥३२॥
जेथें जेथें वसती । ब्रह्मविद्येतें निरोपिती । मुमुक्षूतें सुपंथ दाविती । अनन्याप्रती उपदेश ॥३३॥
नावडे लौकिक डंबविचार । एकांतीं विचारी सारासार । अखंड समाधी तदाकार । वृत्ति स्थिर सर्वदा ॥३४॥
त्या नारायणाचे पदीं । अनंतें अर्पिली मनबुद्धी । प्रसन्न होवोनि कृपानिधी । आधिव्याधी निरसिली ॥३५॥
बाळपणींच सद्गुरुनाथें । कृपा केली कृपावंतें । योपितांचि अभयकरातें । भक्तिपंथें लागती ॥३६॥
सद्गुरुमुखें करोन । नित्य होतसे निरोपण । तें सांप्रदायी करिती श्रवण । भाविकजन सर्वही ॥३७॥
ऐसें होतां कांहीं दिवस । सद्गुरु सांगती शिष्यास । समाधि घेणें आतां आम्हांस । पांवर गांवास तुम्हीं यावें ॥३८॥

आश्विन शुद्ध चतुर्थीसी । नेमिला नेम निश्चयेंसी । आळस न करावा येण्यासी । आश्चर्य सकळांसी वाटलें ॥३९॥
सद्गुरु सकळां पुसोन । कांवर गांवीं पावले येवोन । संप्रदाया पाचारोन । केलें निरोपण तेसेंची ॥१४०॥ तंव
सांप्रदायी पावले तृतीयसी । भजनाजागर तये दिवशीं । महिपती शिष्य अधिकारासी । पुजी सद्गुरुसीं साक्षेपें ॥४१॥
सद्गुरु आज्ञा करिती । विठु पिठु साधु असती । त्यांचे सन्निध निश्चिती । समाधी आम्हांप्रती देइजे ॥४२॥
मानलें सकळां तें वचन । सांप्रदायी करिती पूजन । महाप्रसाद पंगती सेवोन । पुढती भजन आरंभिलें ॥४३॥
तंव सद्गुरु आसनीं बैसले । प्राणायामानें साधिलें । रेचक कुंभक पूरक केले । वाहटें ग्राहाटिलें तत्क्षणीं ॥४४॥
तंव अद्भुत नवलाव झाला । दशमद्वारा भेद केला । बाह्य प्रकाशोनि ज्योतीकळा । प्रकाश भरला चहूंकडे ॥४५॥
जैसा उसळे गगनीं बाण । तारा झळके त्यांतून । कीं रजनींत नभतारा तुटोन । येतां जन पाहती ॥४६॥
तेवीं ज्योती ऊर्ध्वपंथें । गेली सांडोन देहातें । तें करिती जन शब्दातें । धन्य योग्यानें वाखाणिती ॥४७॥
विमानीं पाहोनि योगीश्वर । करिती सप्रेम भजनगजर । मिरवत चालिलें बाहेर । पूजा सम्यक मंत्रघोषें ॥४८॥
पूर्वीं स्थळ दिधलें नेमोनी । समाधि दिधली तये स्थानीं । लिंगार्चनानें करोनी । प्रसाद वांटोनी निघाले ॥४९॥
पंधरा दिवसपर्यंत । आनंदसोहोळा क्रमें होत । वृंदावन विठुपिठूचें टोलत । संतोष दावित सकळांनें ॥१५०॥
नित्य कथाकीर्तनें होती । तसीच चाले अन्नशांती । पूर्ण होतां उत्साहसमाप्ती । सांप्रदायी जाती स्वधामा ॥५१॥
त्या नारायणाचा दास जाण । अनंत त्याचें नामाभिधान । वृत्तिवंत गृहस्थ पूर्ण । वास्तव्यस्थान हांगातीरीं ॥५२॥
महाउत्तम पाराशरक्षेत्र । आदिदैवत सिद्धेश्वर । तेथें तप आचरला मुनी थोर । पर्वतोदर विशाळ तें ॥५३॥
तेथें कुशावर्ततीर्थ आहे । तेथोनि प्रवाह तळवटीं वाहे । तपियातें पवित्र स्थळ होय । दोष जाय स्नानेंची ॥५४॥
त्या पर्वताचे सन्निधान । पाराशरक्षेत्र विस्तीर्ण । पराशर स्नानालागोन । मनकर्णिका प्रार्थोन आणिली ॥५५॥
कुंड मनकर्णिकेसी बांधिलें । गोमुख तयातें योजिले । ओघ त्यांतोन बाहेर चाले । सुस्नात जाले सर्वजण ॥५६॥
तो प्रवाह दक्षिणेसी । ओघ पावला हांगेश्वरासी । तेथोनि हांगा नाम तिजसी । अंती हंगदेवासी पावली ॥५७॥
जैसी भीमाशंकरापासून । भीमरथी जाली निर्माण । भिवरा भीमा म्हणती सकळजन । पावली येवोन पंढरिये ॥५८॥
तेथें चंद्र कलंक पावला भागा । नांव पावली चंद्रभागा । तद्रुपरीच नाम हें हांगा । हागेश्वर संगापासोनी ॥५९॥
त्या हांगेचे तीरीं । पिंपळगांवनामें नगरी । दैवत पिंपळेश्वर निर्धारीं । उत्तरेश्वर उत्तरीं महाद्वारा ॥१६०॥
जी परशुरामाची जननी । आदिमाया माता पुरवासिनी । बाह्य प्रदेशीं रेणुकाभवानी । उत्तरस्थानीं निवास ॥६१॥
तेथील ज्योतिष्य कुळकर्ण । अष्टाधिकार अनंतासी पूर्ण । आणिक ग्रामें असती तीन । वृत्ति पुरातन तयाची ॥६२॥
कुटुंब सोयरे परिवार । नित्य करणें वृत्ति वेव्हार । परी संतचरणीं प्रीती थोर । येतां सत्कार करावा ॥६३॥
राधिका तयाची कांता । माउली केवळ पतिव्रता । कांहीं विवंचना न करी प्राणनाथा । पाहोनि मनोगता वर्तत ॥६४॥
पतिचरणाचें सेवन । सदा मुखीं नामस्मरण । पांथिक आश्रमा येतां चालोन । देती अन्न उदक तयां ॥६५॥
करीती पंढरीची वारी । सद्गुरु उत्साह करिती घरीं । स्वयें अनंत कथा करी । ताल धरी भगिनीपुत्र ॥६६॥

आवडीं ब्राह्मणां देती भोजन । राखिती संतांचा सन्मान । सद्गुरुरूपें करून । कीर्तनीं गढून मन गेलें ॥६७॥
काला ललीत पाठांतर । होऊं लागलें अतिसत्वर । खेळ खेळतां प्रेमा अपार । ललीत सुंदर तैसेंची ॥६८॥
आपुले बाळमित्र मिळवोनी । कराची सोंगसंपादनी । प्रवृत्ति निवृत्ती पाहोनी । ज्ञानी अज्ञानी आनंद ॥६९॥
दिव्या पताका उभारोन । गरूडटके माहीमरातब योजोन । ढोल दमामे सिद्ध करोन । टाळ मृदंग पूर्ण वीणेनाद ॥१७०॥
ऐशा गजरें छबीना । काढोनि मिरवावा गुरुराणा । भजनीं करावी गर्जना । मिरवोनि सदना मग यावें ॥७१॥
जे जे उत्साहास येती । सत्कारें तयां बोळविती । प्रतिसंवत्सरीं सेवा या रीतीं । उभयतां करिती स्वानंदें ॥७२॥
श्रीपंढरीसी जावोन । पांडुरंगमूर्ती आणिली प्रार्थोन । मंदिर हरींचे सिद्ध करोन । केलें स्थापन निजप्रेमें ॥७३॥
एकादशीस हरिमंदिरीं । कीर्तन करावें प्रेमगजरीं । आल्या पांथिका विश्रांती वरी । तोपरी अंतरी सेवोन ॥७३॥
प्रपंच करी सावधान । परमार्थीं प्रेमा दारुण । नित्यानित्य हरिभजन । आवडी करून करीतसे ॥७५॥
दुर्गे पांडुरंगउपासक । लावीण नेणेंचि आणीक । संतार्चनीं अतिहरीख । भाव चोख अंतरीं ॥७६॥
एके दिवशीं आपण । सद्गुरुउत्साह करितां जाण । पूर्वदिवस लोटले दोन । काला पूर्ण षष्ठीचा ॥७७॥
तो पहावयासी काला । अद्भुत मिळाला जनमेळा । तृणमंडपाच्या तळा । काला आरंभिला आंगणीं ॥७८॥
तों एकाएकीं घन । वळोनी आला चहुंकडोन । श्रोत्यांचें दुश्चित्त मन । ठाईं गजवजोन बोलती ॥७९॥
म्हणती काल्याची आनंद वेळ । पर्जन्य तों पातला सबळ । होऊं पाहे रंग वितळ । दुजें स्थळ असेना ॥१८०॥
घ्यावया काल्याचा प्रसाद । जीवीं धरोनि आलो आल्हाद । येथें ओढवलें हें प्रारब्ध । जीवीं खेद सकळांच्या
कोण्ही म्हणती चला घरा । कोण्ही म्हणती धरा आसरा । एक म्हणती सांभाळा मखरा । बैसका आवरा त्वरेनें॥८२॥
अनंत उभा होता कीर्तनीं । कितेक सलगी बोलती वाणी । कैचा काला काला जनीं । राहिला होवोनी आटोपा
कैसी भक्ती कैसा प्रेमा । भाव कळोनी आला आम्हा । व्यत्यय आला देवकामा । ढौल रिकामा गेला कीं ॥८४॥
एक विनोदें बोलती । अघटित कर्म करावें संतीं । येथे तो असे गृहस्थी । योजितां चित्तीं चमत्कार ॥८५॥
नानापरी बोलती जन । उठूं लागले तेथून । तो अनंते विरंग देखोन । करुणावचन गाय देवा ॥८६॥
सद्गद हृदयीं जाला । करुणासिंधु आठविला । म्हणे धांव घाली विठ्ठला । मांडिला काला भंग तो ॥८७॥
तुझिया कीर्तिचे पवाडे । म्यां ऐकिले निचाडे । अनन्यासी पडतां सांकडें । तें तूं धडफुडें वारिसी. ॥८८॥
ऐसें असतां चक्रपाणी । आजी न सांभाळिसी हे वाणी । हा पामर उभा कीर्तनीं । रंग नारायणीं राखिजे ॥८९॥
सेवा आरंभिली सिद्धी जावी । समाजमंडळी तोषवावी । बीदें आपुलीं सांभाळावी । कीर्ति वाणावी तुझी जनीं ॥९०॥
ऐसे करितां स्तवन । बाष्पें वाहती नयन । विगलीत अवस्था देखोन । कृपाळु नारायण बोळला ॥९१॥
देखोनि अंतरींचा भाव । प्रगट करितां जाला माव । बाळकरूपें सहज स्वभाव । बोले ठाव न सोडा ॥९२॥
देवुळींच होता ध्वनी । कित्येकीं ऐकली श्रवणीं । अनंतें विश्वास धरोनि मनीं । सर्वा लागोनी विनवीत ॥९३॥
आषाढीचे वारीन । वेणुनादीं जाती भिजत । काला करिती पर्जन्यांत । तोचि अर्थ जाणिजे हा ॥९४॥

स्वस्थ बसा स्वस्थानीं । काला ऐकिजे श्रवणीं । कृपा करील चक्रपाणी । निश्चय मनीं असावा ॥९५॥
धरोनि बैसा निर्धार । कृपा करील सर्वेश्वर । श्रवणीं चित्त द्यावें सादर । आनंदगजर करावा ॥९६॥
करोनि सद्गुरूतें नमन । आरंभ काल्यासी केला पूर्ण । आनंदें भजन घोष करोन । चालविलें निरोपण सप्रेमें ॥९७॥
ईश्वराची अद्भुत करणी । पर्जन्यवृष्टी चहूंकडोनी । बुंद न पडे मंडपस्थानीं । गांवांत वाहावणी होतसे ॥९८॥
जितकें अनंताचें मंदिर । तेथें न येचि तुषार । इतर वर्षे शिळाधार । लोक समग्र पाहती ॥९९॥
जेवीं जगमित्राचे सदनीं । अग्नि लागला चहूंकडोनी । कुटुंबपरिवार निमग्न शयनीं । जगमित्र स्तवनीं स्तवी देवा ॥२००॥
श्रीहरी होवोनि कृपावंत । अग्नि वरचेवरी उडवीत । कुटुंबपरिवारसह त्या रक्षीत । त्यापरी दावीत मात्र हे ॥१॥
कीं राका बकाकरितां स्तवन । आम्यांत पिलीं वांचविलीं पूर्ण । तेवीं सभोंवता असोनि पर्जन्य । कोरडें सदन ठेविलें
॥२॥ ऐसी दोन दिवस पर्यंत । झडी पर्जन्याची अद्भुत । परि तेथें बुंद नसे वाड्यांत । उत्साह होत आनंदें ॥३॥
आश्रमालागीं ओले जाती । येतां जातां मार्गीं भिजती । वाड्यांत येतां वस्त्रें वाळविती । मग बैसती कीर्तनीं ॥४॥
ऐसा नवलाव देखोन । धन्य धन्य म्हणती जन । वंदिती अनंताचे चरण । करिती श्रवण कथारस ॥५॥
काला लळीत पूर्ण जालें । प्रसाद सकळां वांटिले । यात्राजन बोळविले । आटोपिलें सर्वही ॥६॥
आवरा आवरी होत । तो पर्जन्य दाटला वाड्यांत । धन्य कृपाळु भगवंत । महिमा वाढवीत भक्ताचा ॥७॥
अनंत राधिका आनंद घन । म्हणती हरी कृपाळु पूर्ण । केलें श्रीदाचें रक्षण । पतितपावन नाम खरें ॥८॥
अद्भुत पर्जन्य वारा । येतां रक्षी नामयाच्या घरा । तेवींच ये अवसरां । आम्हां पामरां सांभाळिलें ॥९॥
यापरी गुण आठवून । जीवींचें जीवीं समाधान । मागुतीं महायात्रेसी गमन । कावडींत बैसोन पैं केलें ॥२१०॥
त्रिस्थळीं यात्रायोग पूर्ण जाला । विष्णुपदीं राधिकेनें देह ठेविला । अनंत प्रपंचा पासाव मुक्तता पावला । आनंद वाटला
मनांत॥११॥परत प्रयागीं येवोन। दशाहाऱ्याची पर्वणी साधोन। आवडीनें घेतलें सन्यासग्रहण। होवोनि नारायण राहिले
॥१२॥ मग ब्रह्मावर्ताप्रती पावले । वाल्मीक आश्रमीं राहिले । समाधी उदयीक बोले । सावध राहिलें पाहिजे ॥१३॥
ज्येष्ठकृष्ण पंचमी प्रभात । स्वामी जाले समाधिस्थ । मिळोनिया साधुसंत । घोष करीत भजनाचा ॥१४॥
विमानीं बैसवोनि वेगेंसी । मिरवत नेलें भागीरथीसी । अर्चोनी जळ समाधीसी । देवोनि अवभृतासी पैं केलें ॥१५॥
तेरा दिवस पर्यंत । उत्साह जाला आनंद भरित । त्या पदीं होतां शरणागत । प्रसाद प्राप्त विठ्ठला ॥१६॥
तो अनंत सद्गुरुपिता । राधिकानामें माझी माता । त्यांनीच विठ्ठलनाम ठेविलें सुता । दयाळु समर्था काय वाणुं ॥१७॥
जो जगद्गुरु स्वामी दत्त । तोचि रूपें नटला श्रीअनंत । उभा विटेवरी विठ्ठल विराजित । सद्गुरु समर्थ सदय हा ॥१८॥
महाक्षेत्र गाणगस्थानीं । दत्तजयंतीची पर्वणी । विप्ररूपें चोधिले येवोनी । साह्य कीर्तनीं जाला तो ॥१९॥
तेणेंचि लाविला पिसा । लेहोनि ठेवीं कथारसा । परी अज्ञानपणें केलें आळसा । तें अविनाश न गमेची ॥२२०॥
मागुती केलें सावधान । चालवी स्वकार्येचें निरोपण । पत्र लेखणी धरितां जाण । साहित्य पूर्ण होईल ॥२१॥
वचन विश्वास जीवीं धरिला । ग्रंथ इंद्रपुरीं आरंभिला । तो संतकृपें सिद्धीस पावला । दत्तची बोला बोलवी ॥२२॥

ग्रंथ निरोपणीं आधार। नाना संमतांचे विचार। अवधूत कृपेचे उद्गार। वदविता निर्धार दत्तची ॥२३॥ दत्त सदय दाता जाण। करावया मनोरथ पूर्ण। ग्रंथरूपें प्रगट आपण। सदा सुप्रसन्न भाविकां ॥२४॥ ज्यासी दत्त भक्तीची आवडी। त्यासीच या ग्रंथीं उपजे गोडी। तोचि जोडील येथींची जोडी। येर कवाडी काय जाणे ॥२५॥ ज्यां दत्तमूर्तीचें ध्यान। दत्तउपासना ज्या लागोन। तेचि या ग्रंथी घालिती मन। ग्रंथ संग्रहोन वाचती नेमें ॥२६॥ जैसा लोभी जपे धनासी। तैसें जपावें या ग्रंथासी। प्रेमे सांठवीजे मानसीं। आणि भाविकांसी बोधिजे ॥२७॥ होय अज्ञानाचें निरसन। सकृपें दत्त देईल ज्ञान। याचें औदुंबरी पठण। शुचिष्मंत पूर्ण असोनि ॥२८॥ करावया जगदोद्धार। ग्रंथरूपें प्रगटला दिगंबर। श्रवणपठणीं जो सादर। तया कृपाकर पावेल ॥२९॥ एकसष्ट अध्यायीं वदविला ग्रंथ। हा दत्तचरणीं असे अर्पित। त्या हृदयीं उपजली प्रीत म्हणोनि लिहवीत आदरें ॥३०॥ एकसष्ट अध्याय मनोहर। केवळ दत्ताचे दामोदर। तेथें सुखावतील नारीनर। ताप दूर होतील ॥३१॥ एकसष्ट अध्याय हा ग्रंथ पूर्ण। केवळ हें दिव्य रसायन। भवरोग निरसे संपूर्ण। श्रवणेंपावन सर्व होती ॥३२॥ चित्त करोनि एकाग्र। श्रवणीं असावें सादर। एकसष्ट अध्यायाचें सार। तो विस्तार परीसीजे ॥३३॥ प्रथमोध्यायीं मंगळाचरण। गणेशसरस्वती गुरुनमन। मातापिता संत श्रोतेजन। प्रेमें स्तवून वंदिले ॥३४॥ द्वितीयोध्यायीं प्रार्थिलें दत्ता। वर्णिली अनसूयेची पड्गुणता। माजीं दृष्टांनीक दोन कथा। सार पतिव्रताव्याख्यान ॥३५॥ अत्रिआश्रमीं नारदमुनीं। भेटोनि वार्ता त्रयस्थानीं। रमा उमा क्रोध सावित्रीचे मनीं। वर गुंतविले वचनीं तिसऱ्यांत ॥३६॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर। सिंहाचलीं पावले सत्वर। ते अनसूयेनें केले किशोर। चतुर्थांत प्रकार सुंदर तो ॥३७॥ नारद स्वर्गाप्रती गेला। रमा उमा सावित्रीशीं संवाद जाला। शोधीं शोधाप्रती पाठविला। पांचवा संपला या रीतीं ॥३८॥ नारदें निवेदोनि तिघींसी। आणिल्या वेगें सिंहाचळासी। दावोनिया बाळांसी। पूर्ववत भ्रतारांसी सहाव्यांत ॥३९॥ सातव्यामाजीं गोड कथन। अनसूयेसि पावलें वरप्रदान। देवासहित विमानीं बैसोन। पावले भुवन कैलास सत्य ॥४०॥ आठव्यामाजीं वैकुंठासी। देव नेतसे देवासी। अनसुया पावोनि गर्भासी। दुर्वास पुत्रासी पावली ॥४१॥ श्रीअवधूताचें जन्मकथन। सकळ सुरवरांचें आगमन। नाना परी करोनी स्तवन। पावले स्वस्थान नवव्यांत ॥४२॥ दहाव्यांत नामजातक। वाढविलें करोनि कौतुक। मग गर्भा आला सत्यनायक। संतोपदायक चंद्र प्रगटे ॥४३॥ बाळत्वाचे खेळोन खेळ। सर्वे चिमेखळा बंधन तात्काळ। यात्राक्रमणीं संवाद प्रबळ। अकराव्यांत रसाळ कथा हे ॥४४॥ द्वादशत्रयोदशा माझारी। यात्रा साधिली निर्धारीं। भूमंडळीं हिंडोनि सत्वरीं। सुख अंतरीं पावले ॥४५॥ चतुर्दशांत सुखदायक। भेटीसपावले देवादिक। मातापितृऋषिगणा देख। आलिंगिता हरिख न समाये ॥४६॥ पंचदशामाजी विशेष। जाला ज्ञान संवाद उपदेश। माजविला सेवाभक्तिरस। अति सुरस गोड तो ॥४७॥ विवाहीं आग्रह वडिलीं धरिला। तो ज्ञानशब्दें निरसिला। चंद्र गृहस्थाश्रमी केला। सोळाव्यांत कथिला हा योग ॥४८॥ सत्राव्यापासोनि विसाव्यापर्यंत। गुरुव्याख्यानें बोध बहुत। तो श्रीदत्त अनसूयेसि निवेदीत। गुणग्राह्यार्थ आदरें ॥४९॥ आध्यात्मिक ज्ञानाच प्रश्न। त्यांचें दत्त करी निरोपण। पंचभूतउत्पत्ती मूळापासोन। एकविसांत कथन हें जालें ॥५०॥

पंचवीस तत्वांचा प्रकार । तो पृथक दाविला विस्तार । हें निरोपण अतिसुंदर । बेविसाव्यांत सार जाणिजे ॥५१॥
यदु सहस्रार्जुनाचें कथन । परशुराम अवतार पूर्ण । देह उद्भव प्रकरण । हें निरोपण तेवीसांत ॥५२॥
जें ब्रह्मांडीं विस्तारिलें । तें पिंडामाजीं सर्व दाविलें । उभय ऐक्यत्वीं प्रकाशिले । चोविसाव्यांत कथिले हेचि पैं ॥५३॥
या पंचविसाव्यामाझारी । अद्भुत तत्वावबोधपद कुसरी । वर्णिली मेरुची थोरी । द्वीपखंडादि धरी देहींच ॥५४॥
षट्चक्राचे भेद पाहीं । अजपेचे योग तेही । मात्रादि योजना ठायीं ठायीं । निवेदिलें अठही सविसांत ॥५५॥
सत्ताविसामाजी चाळीस प्रश्न । त्यांचें अवधूते केलें निरोपण । तें सहा अध्याय परिपूर्ण । कथिले ज्ञान मानेंसी ॥५६॥
अनुसयेते अनुताप जाला।ती शरण गेली सद्गुरुला। ते हे तिसाव्यांत योग साधिला।प्रसादसोहळा चवातिसावा ॥५७॥
शुकसनकादिक तपोराशी । दत्तदर्शना पावले सिद्धादीसी । प्रश्नोत्तरें सुख सकळांसी । पस्तिसाव्यासी हे कथा ॥५८॥
स्वच्छंदें दत्तासी भ्रमण । गिरीनाळ्यपर्वती सिद्धां भेटोन । लागलें गोरक्षाच कथन । जन्मनिरोपण छत्तिसावा ॥५९॥
सद्गुरु सेवा करोनि । चर्पट अंगीकारिला उभयांनीं । गोरक्षा बैसवोनि योगासनीं । सदतिसाव्यालागोनी हे कथा॥२६०॥
मच्छिंद्र गेले मळुराळ देशी । गोरक्षे संवादिलें योगासी । शोधूं जाना गुरुसी । भेटी कानिफासी अडतिसावा ॥६१॥
मळ्याळ देशा गोरक्ष गेला । सद्गुरु मच्छिंद्र सोडविला । मेनीनाथ पदीं स्थापिला । एकूणचाळिसावा संपविला या काजीं
॥६२॥ मच्छिंद्रा लोभमोह जडला दारुण । त्याचें गोरक्षें केले निवारण । अवंतीसी पावले येवोन । संपविला निरोपान
चाळिसावा ॥६३॥ भर्तृहरी आख्यान सुरस । तो आरंभ एकेचाळीसाव्यास । बेचाळिसाव्यांत अनुताप विशेष । त्रेचाळि-
सास जोगसिद्धी॥६४॥गोरक्षमच्छिंद्र निघाले । पश्चिमदेशाप्रती पावले । श्रीदत्तासी गोरक्ष भेटले । संवाद आरंभिले चवे-
चाळिसीं॥६५॥पंचेचाळिसांत वाग्वाद । सेचाळिसाव्यांत गीताप्रबोध । सत्तेचाळिसीं खेळ प्रसिद्ध । जाला खेळ अदृश्यीं
॥६६॥अनुताप गोरक्षाप्रती । प्रगट जाली दत्तमूर्ती । देव योगियां आनंद चित्तीं । अठ्ठेचाळिसीं ख्याती निश्चित हे ॥६७॥
योगिसिद्धसाधुजन । गोरक्ष मच्छिंद्रासमवेत पूर्ण । तयां बांधी दत्त आपण । एकूणपन्नासीं निरोपण गोड हे ॥६८॥
योगियां निरोपिली जन्मलीला । निवेदिलें रेवामहात्म्य जननीस्थळा । अश्वासिलें योगियां सकळां । अदृश्य जाला पन्नासीं
॥६९॥ जनार्दनसंता केलें पावन । एकनाथें केलें सेवासाधन । परचक्रीं युद्धकंदन । जालें निरोपण एकावन्नीं ॥७०॥
करिता सद्गुसेवा । हिशेब दिधला बरवा । दाविले दत्तलीलालाघवा । अनुताप जीवा बावन्नीं ॥७१॥
एकनाथा जालें दत्तदर्शन । यात्रा जाली संपूर्ण । गृहस्थाश्रमधर्म संपादोन । तुष्टला नारायण त्रेपन्नीं ॥७२॥
श्रीखण्ड्या होवोनि हरी । सेवा केली एकनाथा घरीं । नाथ गेले अलंकापुरीं । शांतीची परी चापन्नीं ॥७३॥
श्रीपादाचें लीला कथन । नंदीसि तृण करविलें भक्षण । चांग्या राण्याचें चरित्र जाण । पंचावन्नीं निरोपण मधुर तें ॥७४॥
एकादशस्कंदीं रचिली टीका । कृपें द्रवली मनकर्णिका । दासोपंत चरित्र देखा । छपन्नीं अलोलिका कथा हा ॥७५॥
एकनाथासि हरी जाला शरण । कृपें अवधुताचें दर्शन । निंबराजासी अनुताप पूर्ण । सत्तावन्नीं कथन हें सार ॥७६॥
निंबराज फिरतां तीर्थाटणीं । शरण गेले सद्गुरुचरणीं । फळलाभ झाला सदनीं । कथा अठावन्नीं गोड ही ॥७७॥
रुक्मिणीनें परीक्षिला निंबया । पांडुरंगें वाणविला वाणा तया । प्रसाद पाववला गुण गाया । एकुणसाठी दया हे केली

॥७८॥ साठीमाजीं कीर्तनानंदी। विठ्ठल उभा राहिला स्कंदीं। निंबराज तोपविला वरदी। रसवृद्धी अपार ॥७९॥
निंबराज पुत्रपौत्राची लीला। देहठाणक्षेत्रींचा सोहोळा। सांप्रदायार्थ वर्णिलें सकळां। एकसष्टीं संपविला सारासार॥८०॥
श्रीमद्दत्तकृपें करोन। एकसष्ट अध्याय जालें निरोपण। रहस्य जाणती संत सज्ञान। वदविता पूर्ण दत्त येथें ॥८१॥
सदय उदार हा अविनाश। जाणें अनन्याचें मानस। निष्ठा देखोनि विशेष। पुरवी आस तयाची ॥८२॥
येथें संशय न धरिज चित्तां। अनुभवयुक्त असती कथा। प्रेममार्गे अनुसरतां। पुरवी मनोरथां दासाच्या ॥८३॥
त्या कृपेचें होनां दान। कळसा पावलें निरोपण। आवडीं करितां पठण श्रवण। दत्तदयाघन तुष्ट तो ॥८४॥
हृदय भुवनीं श्रीदत्त। प्रगटोनि वदविला ग्रंथ। आरंभ जाला माळव्यांत। स्थळ विख्यात परियसा ॥८५॥
ॐकार अवंतिका मध्यस्थान। इंद्रपुरनामाभिदान। तेथें चाळीस अध्याय संपवोन। साधिलें प्रयाण तेथोनि ॥८६॥
पाहावें द्वारकाधीशासी। म्हणोनि निघालो वेगेंसी। पावले येवोनि गुर्जर देशीं। देवतीर्थ क्षेत्रांसी पाहिलें ॥८७॥
रेवाडाकुरमध्यस्थ। क्षेत्र बडोदें विख्यात। वसती साधुसंत योगिमहंत। दैवतें अद्भूत महात्म्यानें ॥८८॥
होनां सर्वांचें दर्शन। चित्ता वाटलें समाधान। संतपदी होतां शरण। आपंगिलें पूर्ण मजदीना ॥८९॥
संतकृपा आश्रय होतां उल्हास जाला पदीं रमतां। अवसर देखोनि आरंभिता जालो ग्रंथा पुढती ॥२९०॥
या क्षेत्रीं सुरस। अध्याय जाले एकवीस। पूर्वीचे असती चाळीस। एवं एकसष्टीस रचियलें ॥९१॥
श्रीमद्दत्तकृपाप्रसादें करोन। बोबड्या शब्दें जालें निरोपण। तुम्ही संतसाधु दयाघन। गोड करून घेईजे ॥९२॥
शालिवाहन शके सतराशेव्यांयशी। संवतएकुणिशेसोव्वासी। प्रजापतीनामसंवत्सरासी। परिपूर्तीसी ग्रंथ आला ॥९३॥
चैत्रशुद्धप्रतिपदा भृगुवासर। रेवतीनक्षत्र प्रथम प्रहर। ब्रह्मयोगलाभ वेळा सुंदर। ग्रंथ निर्धार संपविला ॥९४॥
हा एकसष्ट अध्याय ग्रंथ। दत्तप्रबोधनामें अद्भुत। यांतील सर्व भावार्थ। तुम्ही साधुसंत जाणते ॥९५॥
जीं अक्षरें दत्तें वदविलीं। तीं संतांप्रति निवेदिलीं। येथील रस हृदयकमळीं। आनंदमेळीं सांठविजे ॥९६॥
तुम्ही साधु सदय उदार। दीन अनाथ मी पामर। तुमचे कृपेचा मज आधार। तेणेंचि वडिवार गाय हा ॥९७॥
तुम्ही दत्तरूप संतमूर्ती। कृपें पाळितां अनन्याप्रती। आर्त पुरवितां धरिलें चित्तीं। अबाधित कृती तुमची ॥९८॥
त्या कीर्तीचे ऐकोनी पोवाडे। शरणपदीं झालों वाडे कोडें। करजोडुनी प्रार्थी पुढें। सेवा आवडे मंज सांगा ॥९९॥
मज प्रेम या संतसेवनीं। लाभ घडतील सहजें करोनी। यालागीं ध्यास मनीं। कृपें करोनी हेचि द्या ॥३००॥
अनंतसुत विनवी संतांसी। अनन्यभावें शरणपदासी। मज सांभाळीजे दीनासी। अभयदानासी देईजे ॥१॥
इतिश्रीदत्तप्रबोध ग्रंथ॥ श्रवणेंचि पुरती मनोरथ॥ सदा परिसोत भाविकभक्त॥ एकसष्ठितमोध्यायार्थ गोड हा ॥३०२॥

॥ इति एकसष्ठितमोध्यायः समाप्तः ॥

## आरती श्री दत्तात्रेयांची

अनसूया नंदना तुज ओवाळूं आरती । अनसूया नंदना मज निज चरणी दे रती ॥धृ॥ सर्वात्मा तूं असोनि वससी या माहुरी । निजदासा भेट द्याया भिक्षा कोल्हापूरीं । वससी या विश्रावासा सह्याद्रि गिरिवरी ॥अनसूया ॥१॥ निजभजका भेट देसी निजनामोच्चारणें । कलिमाजीं वाढती तुज दत्ता या कारणें । जाणुनि हें तुजपाशीं येलें म्यां गान्हाणें । निजचरणा दावि याहुनि नच दुसरें मागणें ॥ अनसूया ॥२॥ यतिरूपा येउनी तूं वससी कृष्णातटीं । निजदासा भेट द्याया जागृत तूं संकटीं । प्रत्यक्ष गाणगापुरीं दिससी दासा मठीं । नमवुनि हें वासुदेव तुज जोडी करपुटी ॥ अनसूया ॥३॥

## आरती

करितों प्रेमें तुज नीराजन स्थिरवुनिया मन । दत्तात्रेया सद्गुरुवर्या भावार्थेकरून ॥धृ॥ धरणीवर नर पीडित झाले भवरोगें सर्व । कामक्रोधादिक रिपुवर्गें व्यापुनि सगर्व । योग याग तप दान नेणती असतांहि अपूर्व । सुलभपणें निजभजनें त्यासी उद्धरि जो शर्व ॥१॥ अत्रि मुनिच्या सदनीं तीनी देव भुकें येती । भिक्षुक होउनि अनसूयेप्रति बोलति त्रयमूर्ति । नग्न होउनि आम्हां प्रतिधा अन्न असें वदती । परिसुनि होउनि नग्न अन्न दे मंव ते शिशु होती ॥२॥ दुर्वासा भिध मौनी जाहला शंभु प्रमथेंद्र ब्रह्मदेव तो झाला चंद्र तो उपेंद्र ॥ दत्तात्रय जो वीत निद्र तो तारक योगींद्र । वासुदेव यच्चरण चिंतुनी होतिल्या तंद्र ॥३॥ करितो प्रेमें तुज नीराजन स्थिरवुनिया मन दत्तात्रेया सद्गुरुवर्या भावार्थेकरून ॥

अवधूत चिंतन श्रीगुरुदेव दत्त

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा

दत्तात्रय गुरु माझे आई मजला ठाव द्यावा पाई

ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय

# परम भागवत अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा यांचें संक्षिप्त चरित्र

परम भागवत अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा हे मूळचे नगर जिल्ह्यांतील पारनेर तालुक्यांतील पिंपळगांवचे रहाणारे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होत. हे गांव हांगा नदीच्या तीरावर आहे. यांचे गोत्र भारद्वाज. पिंपळगांवचे हे वतनदार कुळकर्णी होते. यांचा निश्चित जन्मशक उपलब्ध नाही. पण इसवी सन १७९५ ते १७९७ असावा असे जुन्या कागदपत्रावरून समजते. या गांवा व्यतिरिक्त आणखी तीन गावची कुळकर्णीपणाची वतनदारीहि यांचेकडे होती. त्यांचे संपूर्ण नांव विठ्ठल अनंत पिंपळगांवकर होय. सदासर्वकाळ ईश्वर चिंतनांत राहून वतनदारीचे काम पहात असत. त्यांचे मातोश्रीचे नांव राधिका होते. हे आपल्या मातापित्याची सेवा पूर्वकाळच्या श्रावण पुंडलिकाप्रमाणें करीत. आपल्या पिताजीनाच ते गुरुस्थानी मानीत असत यावरून त्यांचे वडिलांचा परमार्थ मार्गांत केवढा दांडगा अधिकार होता हे सिद्ध होते. वृद्धापकाळीं त्यांचे मातापित्यानी काशीयात्रेस जाण्याची मनिषा प्रगट केल्याबरोबर दोघाना विठ्ठलबावानी कावडीमध्यें बसवून यात्रा केली म्हणून त्यांना कावडीबुवा असे लोक म्हणू लागले आणि तेच नामाभिधान रूढ झाले. वडिलांचे आज्ञेप्रमाणें विठ्ठलबुवा आपले मातापित्यास कावडीत बसवून नाना प्रकारचीं तीर्थे क्षेत्रे करीत बरोबर सामान वहाण्यासाठीं एक नोकर व घोडा असे घेऊन मुक्काम दर मुक्काम करीत विष्णुपदी आले असतां त्यांचे मातोश्रीचे निर्याण झाले. आधीच अनंत बुवा विरक्त होतेच त्यात पत्नीचे निर्याणामुळे संसार बंधनातून पूर्ण मुक्त झाले. असे जाणून त्यांनी संन्यास दीक्षा घेतली. पण वाराणशीस आल्यानंतर अनंतबुवांचेहि निर्याण झाले. तेव्हां विठ्ठलबोवानीं त्यांना गंगेमध्यें जलसमाधी दिली व रिकाम्या झालेल्या कावडीमध्यें श्रीविठ्ठल रखुमाईच्या मूर्ती ठेवून पुढील तीर्थयात्रा केली. सतत भगवान श्रीदत्तात्रयांचे स्मरण करीत यात्रा करीत असतां विठ्ठलबोवांचा मुक्काम गाणगापूर क्षेत्रीं झाला. त्यावेळीं श्री दत्त जयंतीचा उत्सव चालू होता. अशा मंगल प्रसंगी प्रत्यक्ष भगवान दत्तात्रयानीं विठ्ठल बोवांना ब्राह्मण वेषानें दर्शन देऊन श्री दत्त प्रबोध या सर्वांग सुंदर ग्रंथाची रचना करणेस अनुज्ञा दिली व मुखामध्ये रात्री प्रसाद तांबूल घातला. तरी-सुद्धां या दिव्य ग्रंथाची रचना आपले हातून होईल किंवा कसे याबद्दल साशंकता निर्माण झाल्याकारणानें प्रत्यक्ष लेखन विठ्ठल बोवाचे हातून सत्वर होईना तव्हां प्रभु पुनः विप्रवेषानें प्रगट झाले व निःसंदीग्ध आश्वासन दिले की मी संपूर्ण सहाय्य करणार आहे तेव्हा शीघ्र लेखनास सुरवात करावी. हे प्रभूचे वरदान मिळाल्यानंतर मात्र विठ्ठल बोवानीं श्री दत्तप्रबोध ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. एकापेक्षा एक असे सरस अध्याय फार जलद गतीनें लिहिले जाऊ लागले. असे ४० अध्यायाचे लेखन उज्जयिनीक्षेत्री पुरे केल्यानंतर थोडी द्वारावती यात्रा करावी असे त्यांचे मनास आले व त्यानिमित्तानें त्यांचे बडोद्यास आगमन झाले. तेथील वातावरण संत मंडळींचा सहवास यानें प्रसन्न झाल्यामुळे कावडी बावांनीं बडोद्यासच कायमचे वास्तव्य करण्याचे निश्चित केले व तेथे श्रीराम मंदिरामधेच श्रीविठ्ठल रखुमाई मूर्तीची स्थापना करून श्री दत्त प्रबोध ग्रंथाचे राहिलेले २१ अध्यायाचे लेखन बडोद्यास पूर्ण केले. हा संपूर्ण ग्रंथ इ. सन १८६० मध्यें म्हणजे चैत्र शुद्ध प्रतिपदा भृगुवारी शके १७८२ रोजी पुरा केला. ईश्वर सेवेत बडोदे मुक्कामी निमग्न असतांच श्री. विठ्ठल बोवा संवत १९१९ आषाढ शुद्ध अष्टमीस वैकुंठवासी झाले. ते जरी पार्थीव देहाने आपल्यामधून गेले असले तरी ग्रंथरूपाने सतत आपणा सन्निधच आहेत व भाविकांना आपल्या अस्तित्वाची जाणीव नित्य देत असतात. श्रीदत्तप्रबोधाचे प्रथम प्रकाशन श्री. दामोदर सावळाराम यंदे यानी इ. स. १९०० मध्यें केले. त्यानंतर कोष दिवस हा ग्रंथ भाविकाना उपलब्ध नव्हता म्हणून श्री नृसिंह सरस्वती सेवा मंडळ, मुंबई यानी

॥ श्री गणेशदत्त गुरुभ्यो नमः ॥

श्री नारेश्वर निवासी परमपूजनीय श्रीरंग अवधूत महाराज
यांची स्तोत्रे

## १ श्रीस्वामिसमर्थस्तोत्रम्

स्वामिन्नमस्तेऽक्कलकोटवासिन्
समर्थनाम्नेऽपरनारसिंह ।
श्रीशावतार त्रितयार्तिहारिन्
प्रचण्डकाय प्रणयैकशुल्क ॥१॥

प्रपन्नकल्पद्रुम पापदाव
स्फुलिंगनेत्रोदकशील साधो ।
आजानुबाहोऽगमलील योगिन्
ह स्वैरचारिन्नतितुष्ट तिष्ठे ॥२॥

दिग्वस्त्रभूप प्रविदग्धपूपन्
कारुण्यसिन्धो नतदीनबन्धो ।
मां बालरङ्गं कृपयोद्धर त्वं
जहीह मां मा भवसिन्धुपोत ॥३॥

स्तोत्रं स्वामिसमर्थस्य चतुर्विंशतिनामभृत् ।
यः पठेत्प्रयतो भक्त्या निर्भयः स सुखी भवेत् ॥४॥

इति श्रीदत्तपादारविन्दमिलिन्दब्रह्मचारिपाण्डुरङ्ग( रङ्ग अवधूत ) महाराज-
विरचितं श्रीस्वामिसमर्थस्तोत्रं संपूर्णम् ।

## २ श्रीपादस्तवः ।

यो वै पूर्वं दत्तनामाऽत्रिसूनु—
स्तीर्णो भक्तत्राणमात्रैकहेतुः ।
श्रीपादश्रीवल्लभः सोऽयमेव
चक्रे लीलां कुर्वपुर्यां सुदिव्याम् ॥१॥

मूर्खं विप्रं विज्ञमेवं चकार
शूद्रायादाद्राज्यमेव प्रतुष्टः ।
प्राणान् प्रापच्छ्रेष्ठविप्रः स धन्यो
यल्लीलातः कृत्तशीर्षश्च चोरैः ॥२॥

दत्त्वाऽम्बायै स्वात्मदानं सुतूर्णं
प्रादुर्भूतो यः करञ्जे नृसिंहः ।
तेन कीर्तिं गाणगापुरे प्रकामम्
वन्दे तं त्वां दीनबन्धो प्रसीद ॥३॥

नान्यद् याचे मेऽस्तु ते सत्स्मृतिर्मो
येनाहं स्यां त्वत्स्वरूपे विलीनः ।
नानात्मैक्यं चानुभूयैव सद्यः
सोऽहं-भावेन प्रभो विश्वमूर्ते ॥४॥

बद्धा मुक्तिं प्राप्नुयुः 'रङ्ग' मोहा—
दार्ताः पाठाद् दुःखमुक्ता भवेयुः ।
निःस्वा वित्तं वंशहेतु ह्यपुत्रा
ज्ञानं चाज्ञाः प्राप्तकामा लभेरन् ॥५॥

सुप्तेष्वन्येष्वत्र तिष्ठे त्वमेको
जागर्मीत्थं त्वां प्रपद्ये सुदीनः ।
मा मे बन्धोऽहंकृतः स्यात्कदाचिद्
आस्तां ते के श्रीकरः संततं मे ॥६॥

श्लोकषट्कान्वितं पुण्यं श्रीपादस्तवमुत्तमम् ।
पठन्नाधिमयं हित्वा रङ्गमुक्तश्चरेद् भुवि ॥७॥

इति श्रीदत्तपादारविन्दमिलिन्दब्रह्मचारिपाण्डुरङ्ग ( रङ्ग अवधूत ) महाराज-
विरचितः श्रीपादस्तवः संपूर्णः ।

## ३ दत्तमंत्रगर्भश्रीपादस्तोत्रम् ।

दत्तात्रेयो दयासिन्धुर्दिव्यदृष्टिर्द्रमप्रियः ।
हरिर्हारी हिरण्याभः श्रीपादः शरणं मम ॥१॥

कृष्णः कमलपत्राक्षः कर्पूराभः कलिक्षतिः ।
उन्मत्त उडुपाध्यक्ष उन्निद्र उरसि स्थितः ॥२॥

आनन्ददायकश्चाप्त आर्तत्राणसुदीक्षितः
दिगंबरो दिव्यतेजा दाता द्रां-बीजतोपितः ॥३॥

मुनिर्महामना मायी मन्त्रेशी मङ्गलप्रभुः ।
बालो बालप्रियो बन्धुर्बलाहकद्युतिर्बलिः ॥४॥

पिशाचः पांसुलिप्ताङ्गः पुण्याकृष्टः पुमान् परः
ज्ञानसागरक्षण्यात्मा ज्ञराड् ज्ञानिजनप्रियः ॥५॥

द्विचत्वारिंशदेतानि नामानि श्रीपदः प्रभोः
प्रतिश्वासे पठन्मर्त्यो 'रङ्ग' मुक्तो भवेद्ध्रुवम् ॥६॥

इति श्रीदत्तपादारविन्दमिलिन्दब्रह्मचारिपाण्डुरङ्ग (रङ्ग अवधूत) महाराज-
विरचितं दत्तमंत्रगर्भश्रीपादस्तोत्रं संपूर्णम् ।

## ४ श्रीनृसिंहसरस्वतीपादुकास्तोत्रम्

श्रीपादश्रीनृसिंहाख्यं औदुंबरनिकेतनम् ।
नृमार्णि सद्गुरुं वन्दे नरभावविमुक्तये ॥१॥

सिंधुकान्त दयासिन्धुं पादुकारूपिणं यतिम् ।
हरन्तं भक्तजाड्यं कं कृष्णावेणीयुतिस्थितम् ॥२॥

सच्चित्सुखैकदातारं संविन्मात्रैकविग्रहम् ।
रहस्यस्थायिनं देवं नानात्मैक्यप्रबोधिनम् ॥३॥

स्वतन्त्रं स्वैकवरदं स्वप्रकाशं स्वस्वस्तरम् ।
तीर्थतीर्थं तिग्मरश्मि तिष्यतारं त्रयीमुखम् ॥४॥

श्रीखण्डभूतिलिप्ताङ्गं श्रीकण्ठकृतसौहृदम् ।
पाथोदश्यामलं शान्तं सर्वरीश-सहोदरम् ॥५॥

दुर्दैवद्रुमदावाग्निं दुर्लभेक्षं दुरासदम् ।
कामरूपं काकनिद्रं कामचारं कविप्रियम् ॥६॥

नतितुष्टं नयाकृष्टं योगिनीराजितं विभुम् ।
मायामाणवकं मत्तं मण्डलेश्वरमण्डितम् ॥७॥

मीनदृष्टिं मनोवेगं मनःसंतापहारिणम् ।
तिमिताक्षं तपोम्भोधिं 'रङ्ग' प्लोषणशान्तये ॥८॥

श्रीनृसिंहसरस्वतीपादुकास्तोत्रमुत्तमम् ।
पठन् विघ्नैर्न बाध्येत सद्भक्त्या संयतेन्द्रियः ॥९॥

इति श्रीदत्तपादारविन्दमिलिन्दब्रह्मचारिपाण्डुरङ्ग (रङ्ग अवधूत) महाराज-
विरचितं श्रीनृसिंहसरस्वतीपादुकास्तोत्रं संपूर्णम्

श्री गणेश दत्तगुरुभ्योनमः

॥ भगवान श्रीनृसिंह सरस्वती ॥



औदुंबरा तळवटी नरसिंह योगी
कृष्णातटी परम शांत सुखास भोगी
ध्यानस्थ होवुनि समस्त चरित्र पाहे
अनन्य जो शरण इच्छित देत आहे

अनंत कोटी ब्रह्मांडनायक भगवान श्रीनृसिंह सरस्वती स्वामी महाराज पुरस्कृत ग्रंथ मालेपैकीं प्रथम पुष्प म्हणून परम भागवत श्री. अनंत सुत विठ्ठल ऊर्फ कावडी बावा विरचित 'श्री दत्त प्रबोध ग्रंथ' (अध्याय ६१ ओवी संख्या १४२३७) आजच्या सुमंगल प्रसंगीं संपूर्णपणें प्रकाशित होत आहे. स्वामी महाराजांचे कृपेमुळेंच हे कार्य होत आहे. यापुढील प्रकाशन यथावकाश प. प. श्री. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज कृत श्री दत्तमहात्म्य, श्री दत्तलीलामृताब्धिसार व श्री सरस्वती गंगाधर यांचा वेदतुल्य ग्रंथ श्री गुरुचरित्र हे हाती घेण्याचा संकल्प आहे. सत्य संकल्पाचा दाता भगवान या उक्तीप्रमाणें पुढील कार्यामधेही महाराजच आम्हास सहाय्य करणार अशी आमची पूर्ण श्रद्धा आहे.

श्री त्रिपुरी पौर्णिमा
शके १८८७

श्री नृसिंह सरस्वती सेवा मंडळ
मुंबई

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

परम भगवत् श्रीअनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा यांचा अप्रतीम ग्रंथ श्रीदत्त प्रबोध (अध्याय ६१, ओवी संख्या सुमारें १४३००) आठ भागामध्यें तयार असून या संपूर्ण ग्रंथाची किंमत फक्त रु. १२ ठेविली आहे. या व्यतिरिक्त सुट्या प्रत्येक भागाची किंमत रु. १॥ आहे. हा ग्रंथ खालील ठिकाणाहून मिळूं शकेल.

१) श्री. जनार्दन केशव जोशी, तुळशीदास तेजपाळ चाळ, २ रा मजला शिवाजी पार्क, कोहिनूर मिल नं. ३ जवळ माहिम, मुंबई नं. १६.

२) श्री. भास्कर दत्तात्रय जोगळेकर, ब्लॉक नं. एवन्-शारदाश्रम, भवानीशंकर रोड, दादर, मुंबई नं. २८.

३) श्री. गणपत विनायक खेंबूरकर, १८, हरिश्चंद्र गोरेगांवकर लेन, गांवदेवी, मुंबई नं. ७.

४) श्री जगन्नाथ लक्ष्मण प्रभुदेसाई, जगन्नाथाची चाळ, घ. नं. १२६-सी, फणसवाडी, मुंबई नं. २.

५) श्री. वसंत द्वारकानाथ गुप्ते, विठ्ठल निवास, जयप्रकाश रोड, २ रामबाग, अंधेरी.

६) श्री. भास्कर दत्तात्रय भांड, ५-शंकर कुटीर, ब्लॉक नं. ५४, सायन पूर्व, मुंबई नं. २२.

७) श्री. जी. डी. गोगटे, कमला निवास, पहिला मजला १६९ बी पुरंदरे पार्क, डॉ. आंबेडकर रोड, दादर, मुंबई नं. १४.

८) श्री. प्रभाकर दहिवेलकर (जोशी), विठ्ठल वाडी, तुवांची चाळ, मुलुंड मुंबई.

९) श्री. गोपाळ कृष्ण भावे, काशी भुवन, दिक्षीत रोड, विलेपार्ले, (पूर्व) मुंबई नं. ५७ (A. D.)

१०) श्री. गणेश जनार्दन फाटक, गंगाराम खत्री वाडी, २५८ जी ठाकुरद्वार पोष्टाचे मागें, मुंबई नं. २.

११) मेसर्स तुकाराम पुंडलीक शेटे, तुकाराम बुक डेपो, माधवबाग, मुंबई.

१२) मेसर्स निमकर आणि मंडळी, धार्मिक ग्रंथाचे विक्रेते माधवबाग सी. पी. टँक, मुंबई.

१३) मेसर्स बलवंत पुस्तक भांडार, गिरगांव पोर्तुगीज चर्च जवळ मुंबई नं. ४.

१४) श्री. श्रीनिवास व्यंकटेश ऊर्फ बापूसाहेब नखाते, १६३९, सदाशिव पेठ पुणें ९.

१५) श्री. दा. भा. मोकासदार, कृष्णवाचे राममंदिराजवळ, मु. व. पोष्ट कारंजा, जिल्हा अकोला, महाराष्ट्र.

१६) श्री. दत्तात्रय रामकृष्ण शुक्ल, ४ टिळकपथ, इंदोर, मध्यप्रदेश.

१७) डॉ. एम्. डी. पुस्तके, डॉ. पुस्तके क्लीनिक, नया बझार, लष्कर, ग्वाल्हेर, मध्यप्रदेश.

१८) श्री. सुंदरनाथ माधवराव राजापूरकर, श्रीकावडी बुवांचे मंदिर, चौखंडी रोड, बडोदा, गुजराथ राज्य.

१९) श्री. गु. त्र्यं. जोशी, बडकर चौक, घराटे चाळ, माता मंदिर रोड, नागपूर.

२०) श्री. श्री. रा. खालपेकर, संघ कार्यालया जवळ, स. नं. ६ महाल, नागपूर (महाराष्ट्र).

२१) श्री. वसंत नरहर झुळके, ब्लॉक नं. १४२, बिल्डिंग नं. १४, सेंट्रल गव्हर्नमेंट सर्व्हंटस रेसिडेन्शिअल क्वार्टर्स, आग्रा रोड, घाटकोपर, मुंबई ७७.

## श्रीअनंतराय वडील सद्‌गुरु यांची आरती

आरति अनंतराया । स्वामी सद्‌गुरु सदया ।
नमितसे तव पाया । 'सुत' कुरवंडुनि काया ॥धृ.॥

होता पर्जन्यवृष्टी । जिव झाला बहु कष्टी ।
पांडुरंगे रक्षियेले । प्रार्थुनि त्वां केला काला ॥१॥

ठेवुनि वरद हस्त । यात्रा घडविली समस्त ।
घेई प्रयागी सन्यास । 'सुत' चरणी सेवेस ॥२॥

क्षेत्र गालवस्थानी । विप्रवेशें त्वां येवुनि ।
आज्ञापिलें लेखनासी । साह्य होवून मी तुंशी ॥३॥

विश्वासोनी वचनासी । इंद्रपुरी आरंभिला ।
ग्रंथ "दत्तप्रबोधा" सी । दत्ते संदये बोलविला ॥४॥

एकसष्ट अध्यायांत । ग्रंथ वदविला समस्त ।
दत्तचरणांते अर्पित । 'सुत अनंत राया ॥५॥

करितां पठण औदुंबरी । दत्तत्रया कृपा करी ।
निरसोनी भव रोगा । पावे सत्वर उपाया ॥६॥

अनंत श्रीसद्‌गुरु पिता । नांमे राधिका माता ।
विठ्ठल विनवितसे । कृपा दान दे 'सुता' या ॥७॥

महद्‌पादरजोभिषकाभिलाषी
नम्र सुं. मा. राजापूरकर
रचयिता

### ॥ आरती निंबराजयाची ॥

आरती निंबराजा । जया सिद्ध सहजा ॥
मो तुंपण मावळले । ब्रह्म देखणे बोजा ॥१॥

स्वरूपी भेद नाहीं । स्थुळसूक्ष्म पाही ।
यापरी विचरतो । सर्व देखणे तेही ॥२॥

निर्गुण रूप आहे । सगुणरूप काजा ।
येवोनी लवलाहे । भक्त तारिले बोजा ॥३॥

## आरती दुसरी ॥

आरती निंबराया । गुणातीत गुणालया ।
भावे तुज ओवाळीतो । येली कुरवंडी काया ॥१॥

सर्वात्मक तुची होसी । ज्ञान धन गावीलासी ।
अद्वय अभेद तूं । कृपे दीना उद्धरसी ॥२॥

आनंत सुत आळवीतो । तुम्हा सर्वत्र लक्षीतो ।
सच्चिघन आत्मतत्वी । लाभ अलभ्य लाभतो ॥३॥

## श्रीगुरुपरंपरा

| | |
|---|---|
| आदिनाथ | आदिनाथ गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी । |
| ब्रह्मदेव | ब्रह्मदेव गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| अत्रिनाथ | अत्रिनाथ गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| दत्तात्रय | दत्तात्रय गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| जनार्दन | जनार्दन गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| एकनाथ | एकनाथ गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| नरहरी | नरहरी गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| निंबराज | निंबराज गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| जयराम | जयराम गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| शिवराम | शिवराम गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| नारायण | नारायण गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| आनंत | आनंत गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| विठुराज | विठुराज गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| गोपाळ | गोपाळ गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |
| शंकर | शंकर गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ॥ |

# ॥ हादिविद्यायुतं श्रीचक्रम् ॥



## श्रीदत्तप्रबोध सप्ताह पद्धतीनें वाचण्याची पद्धत

श्रीदत्तप्रबोध ग्रंथ हा श्रीदत्तसंप्रदायावर एक अप्रतीम ग्रंथ असल्यानें श्रीदत्त भक्तांनी श्रीगुरू चरित्राप्रमाणें याचे थोडे कां होईना पण नित्य वाचन मनन ठेवावे. त्यायोगें त्यांचे मनामध्यें भगवान श्रीदत्तात्रयांसंबंधी अत्यंत प्रेम निर्माण होईल व त्यांची पूर्ण कृपा झाल्याशिवाय रहाणार नाहीं असें वरदान प्रत्यक्ष दत्तात्रयानी या ग्रंथास दिले आहे. या ग्रंथाची सप्ताह पद्धती आणि १५ दिवसात पारायण करण्याची पद्धती खालीलप्रमाणें दिली आहे.

| दिवस | अध्याय | ओवी संख्या |
|---|---|---|
| १ | अ. १ ते ९ | २०९७ |
| २ | अ. १० त १९ | २०६० |
| ३ | अ. २० ते २९ | १९५९ |
| ४ | अ. ३० ते ४० | २०५९ |
| ५ | अ. ४१ ते ४८ | २००९ |
| ६ | अ. ४९ ते ५५ | २०९३ |
| ७ | अ. ५६ ते ६१ | १९५९ |
| | | १४३३६ |

### पंधरा दिवसात पारायणाची पद्धती

| दिवस | अध्याय | ओवी संख्या |
|---|---|---|
| १ | अ. १ ते ४ | १०६६ |
| २ | अ. ५ ते ९ | १०३१ |
| ३ | अ. १० ते १४ | १०४० |
| ४ | अ. १५ ते १९ | १०२० |
| ५ | अ. २० ते २४ | ९२८ |
| ६ | अ. २५ ते २९ | १०३१ |
| ७ | अ. ३० ते ३५ | १०२८ |
| ८ | अ. ३६ ते ४० | १०३१ |
| ९ | अ. ४१ ते ४४ | ९३९ |
| १० | अ. ४५ ते ४८ | १०७० |
| ११ | अ. ४९ ते ५१ | ८१९ |
| १२ | अ. ५२ ते ५४ | ९८७ |
| १३ | अ. ५५ ते ५७ | ९०३ |
| १४ | अ. ५८ ते ५९ | ६४५ |
| १५ | अ. ६० ते ६१ | ६२८ |
| | | एकूण ओवी संख्या...१४,३३६ |

ज्या महाभागांना प्रातःकाळी फुरसत मिळणार नाही त्यांनी सायंकाळी स्वच्छ हातपाय धुवून नित्य या ग्रंथाचे थोडेथोडे पठण ठेवले तरीहि कार्यभाग होणार आहे.

## आरती श्री दत्तात्रयाची

आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता । तुझे स्मरण करितां माझी चुके भवव्यथा भावे चरण कमलावरी ठेवितो माथा । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥धृ॥ तुझे स्मरण करतां दत्ता सत्वर येसी । हाती धरुनी शिष्याला चनन्यात नसी । चैतन्याचे स्वरूप स्वतः तू मजला दाविसी । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥१॥ चैतन्याची प्रभा पाहतां हर्ष वाटे मजला । त्रिगुण पंचभुतांचा अवघा मेळा तिथें जमला । तुर्याराणी ॐकार दावून पुढे नेले मजला । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥२॥ तुर्याराणी पुढे ब्रह्मकूट असे थोर । तिथे जन्म गंगेचा स्नान करिती हरिहर । तया पलिकडे महाशून्य निराकार । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥३॥ शून्यामध्यें पाहतां तेथें सत्राची वस्ती । जिव शिव हे दोन्ही पक्षी तेथें नांदती । तया पलिकडे निरंजन ज्योत असे दिसी । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥४॥ ज्योत रूपाचा प्रकाश पाहता त्रिभुवनि पडला । दाहि दिशा व्यापिल्या उन्मनी गुरु दाखवी मजला । तेथुन पुढें जाता परब्रह्म एकला । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥५॥ परब्रह्म भगवान तयाचा नकळे अंतपार । दाहि दिशा व्यापिल्या प्रकाशें कोंदले अंबर । तेथुन पुढे जाता मिळाले मज माझे घर । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥६॥ माझें घरी मी जावून बसलो आपरूप होऊन । माझा मीच कर्ता हर्ता मज माझी खुण । मीच एकटा मीच सर्व दुजा नाहीं कोण । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥७॥ श्रीगुरुची अघटित करणी नकळे कोणाला । म्हणून भक्त हृदयी ध्यानी स्मरती चरणाला । म्हणे परम हंस गुरु गणपती चरणी थारा देई भक्ताला । आरती सप्रेम जयजय श्रीगुरुदत्ता ॥८॥

ॐ श्रीसद्गुरु दत्त महाराज की जय

निर्गुण परब्रह्म

भगवान पांडुरंग ( पंढरपूर )



# निवेदन

॥ श्रीगणेश दत्तगुरुभ्योनमः ॥

जें जें मनी इच्छावें । तें तें भगवत् कृपें पावावें ॥

भगवान् अनिनंदनाचे कृपेनें श्रीदत्तप्रबोधाचा आठवा भाग ( अध्याय ५९ ते ६१ ) आजच्या शुभमुहूर्तावर जनताजनार्दनाचे चरणी अर्पण करण्यास आम्हांस फार आनंद होत आहे. श्रीदत्त प्रबोध हा संपूर्ण ग्रंथ आतां भाविकांना अत्यंत अल्प किंमतींत मिळूं शकेल. संपूर्ण ग्रंथाची किंमत रु. १२ फक्त ठेविली आहे. गेल्या दीपावलीस प्रथम भाग प्रसिद्ध झाला आणि या दीपावलीस आठवा म्हणजे शेवटचा भाग प्रसिद्ध होत आहे. हा प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध करण्याची आमची शक्ति नव्हती व नाहीं पण केवळ भगवान श्रीदत्तात्रयाचीच इच्छा प्रबळ असल्यामुळें आम्हीं जे जे पाऊल या ग्रंथाच्या प्रकाशनाचे दिशेनें टाकलें त्यांत आम्हास यश येत गेलें. या कार्यांत अनेक व्यक्तींचें संपूर्ण सहाय्य झालें आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें ठरविल्यानंतर प्रथम बडोदा येथील परम भागवत श्रीकावडीबुवांचे मंदिराचे विश्वस्त व मूळ हस्तलिखित ग्रंथाचें मार्गदर्शनें जतन करणारे माननीय श्री. सुंदरनाथ व श्री. जगन्नाथ माधवराव राजापूरकर यांचें संपूर्ण सहकार्य मिळालें. त्यांनीं प्रत्येक बाबतींत आम्हांस सूचना करून आमचेकडून हें कार्य करवून घेतलें. एक प्रकारें पूजनीय कावडीबाबांनी त्यांचे रूपानें ही प्रेरणा केली अशीच आमची धारणा आहे. एवढेंच नव्हे तर बडोद्यास या ग्रंथाचा प्रचार त्यांनीं फार मोठ्या प्रमाणांत केला आणि अद्यापहि करीत आहेत. आजारीपणानें अंथरुणावर पडून असतानासुद्धा माननीय श्री. सुंदरनाथ राजापूरकर यांनी आम्हांस अमोल सहाय्य केलें. याबद्दल त्यांचे उतराई कसें व्हावें हें आम्हास समजत नाहीं. त्यांचे आभार मानण्यास आमच्याजवळ शब्द शिल्लक नाहीं. आम्हीं त्या अत्रिनंदनाचे चरणी सतत हीच प्रार्थना करितो कीं यापुढेंहि त्यांचे आमच्यावर असेंच निरतिशय प्रेम रहावें. या ग्रंथाचे प्रकाशनामध्यें जसें श्री. राजापूरकरांचें सहाय्य झालें तसेंच रामदास प्रेसचे मालक माननीय श्री. स. पां. जोशी यांचेंहि अत्यंत सहाय्य झालें. त्यांचा व आमचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध गेले १२ वर्षांचा आहे व आतांपर्यंतचें आमचें भगवान् श्रीदत्तात्रयांचे वाङ्मयासंबंधीचें सर्व प्रकाशन त्यांनीच पुरें केलें आहे. श्रीदत्त प्रबोधाव्यतिरिक्त सर्व दत्तात्रयांचें वाङ्मय जनतेस विनामूल्यच दिलें आहे. आमच्या मंडळाची आर्थिक स्थिति हा प्रचंड ग्रंथ प्रकाशित करण्याची मुळींच नाहीं पण केवळ श्री. जोशी यांचे आमचेवरील निरतिशय प्रेमामुळेंच हा ग्रंथ प्रकाशित होऊं शकला एवढें सांगितलें म्हणजे त्यांचे आमचे मंडळावर केवढें ऋण आहे याची कल्पना येऊं शकेल. या ऋणातून आम्हीं मुक्त होऊं शकणार नाहीं. आम्ही भगवान् श्रीदत्तप्रभुंचे चरणी सतत प्रार्थना त्यांचे सर्वांगीण कल्याणाबद्दलच करीत आहोत. तसेंच श्री समर्थ प्रेस, टांगा व श्री रामदास मुद्रणालय, दादर येथील काम करणारी सर्व प्रेमी मंडळींनी अत्यंत परिश्रमपूर्वक आणि नियमित वेळेत हे ग्रंथ छपाईचे काम केलें त्याबद्दल आम्हीं त्यांचेहि अत्यंत आभारी आहोत. या ग्रंथाचे कार्य चालूं असतां कांहीं महाभागानी देणग्या देऊनहि आम्हास उपकृत केलें आहे. त्यांचा नामनिर्देश न करतां त्यांचेवर भगवान् श्रीदत्तप्रभूंनी कृपा करावी अशी नित्य प्रार्थना करीत आहोत. शेवटीं भाविकांना आमची

नम्र प्रार्थना आहे की, हा दिव्य ग्रंथ ज्यांना संग्रह करण्याची इच्छा असेल त्यांनी हा ग्रंथ विकत व ऐपत नसलेल्या व्यक्तीस वाचावयास देऊन त्यांचेमध्यें या ग्रंथासंबंधीचे प्रेम निर्माण करावे व त्यांची उ वाढण्यास सहाय्य करावें. या ग्रंथामध्यें जे फोटो समाविष्ट केले आहेत ते आमचे परममित्र व प्र चित्रकार श्री. स. कृ. काळे व श्री. पारसनीस यांनीं तयार केलेल्या तैलचित्रावरून घेतलेल्या ब्लॉक्सचे आहेत. त्यांचे या महत्त्वपूर्ण सहाय्याबद्दल आम्ही अत्यंत आभारी आहोत. असेर ज्या म अनसूया नंदनाचे कृपेनें हे महत्त्वपूर्ण कार्य पुरें होऊं शकले त्यांचे चरणीं आमची विनम्र प्रार्थना आ आमच्या मंडळाकडून त्यांनी अशीच सतत सेवा घ्यावी व भाविकामध्यें या ज्ञानाचा प्रसार कर शक्ति द्यावी.

॥ श्रीगुरुदेव दत्त ॥

श्री त्रिपुरी पौर्णिमा शके १८८७ श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, मुं

प्रकाशक : ध. न. कुरळे, श्रीनृसिंहसरस्वती सेवा मंडळ, खो. नं. १४२, बिल्डिंग नं. १४,
सेंट्रल गव्हर्नमेंट सर्व्हंट्स रेसिडेन्शिअल क्वार्टर्स, आग्रारोड, घाटकोपर, मुंबई नं. ७७.
मुद्रक : स. पां. जोशी, रामदास मुद्रणालय, शिवाजी पार्क रोड नं. ३, दादर-मुंबई २८.